# श्री चक्रधर

## चरित्र

★


लेखक

विष्णु भिकाजी कोलते

नागपूर



अरुण प्रकाशन

मलकापूर (वऱ्हाड)

किंमत सहा रुपये.

महानुभावीय हस्तलिखितांचे

साक्षेपी संशोधक, संग्राहक व सहाय्यक

**महंत श्रीगोपीराज महानुभाव, रितपूर**

यास

सप्रेम सादर समर्पण

# संक्षेप-चिन्हे.

| | | | |
|---|---|---|---|
| आचारबंद | आ. बं. | लीळाचरित्र एकांक.[1] | ली.च.ए. |
| गद्य पूजावसर | ग. पूजा. | ,, ,, | एकांक. |
| गोपीराज ग्रंथसंग्रह | गो. ग्रं. सं. | लीळाचरित्र पूर्वार्ध | ली.च.पू. |
| गोविंदप्रभु चरित्र. (वि. भि. कोलते) | गो.प्र.च. | ,, ,, | पूर्वार्ध. |
| | | लीळाचरित्र उत्तरार्ध | ली.च.उत्त. |
| पद्य पूजावसर | प. पूजा. | ,, ,, | उत्त. |
| पूजावसर | पूजा. | लीळाचरित्र भाग २ | भा. २ |
| भगवद्गीता. | गी. | ,, भाग ३ | भा. ३ |
| भागवत स्कंध. | भा. स्कं. | ,, ,, ४ | भा. ४ |
| | | विचारबंद | वि. बं. |
| भास्करभट्ट बोरीकर (वि. भि. कोलते) | भा. बो. | विविधज्ञान विस्तार | वि.ज्ञा.वि. |
| | | सह्याद्रि वर्णन | स. व. |
| मराठी वाङ्मयाचा इतिहास (ल. रा. पांगारकर) | म.वा.इ. | सूत्रपाठ[1] आचार | आ. |
| महानुभावीय मराठी वाङ्मय (य. खु. देशपांडे) | म.म.वा. | ,, आचारमालिका | आ. मा. |
| | | ,, विचार | वि. |
| | | ,, विचारमालिका | वि. मा. |
| महानुभाव तत्त्वज्ञान (वि. भि. कोलते) | महा.तत्त्व. | ,, उद्धरण | उद्ध. |
| | | स्मृतिस्थळ (वा. ना. देशपांडे) | स्मृ. स्थ. |
| महाराष्ट्र सारस्वत | म. सा. | | |
| मूर्तिप्रकाश | मूर्ति. प्र. | स्थानपोथी (वि. भि. कोलते) | स्था. पो. |
| लक्षण बंद | ल. बं. | | |
| लीळाचरित्र | ली. च. | ज्ञानेश्वरी | ज्ञाने. |

१. लीळाचरित्र व सूत्रपाठ यासाठी श्री. ह. ना. नेने यांच्या आवृत्त्या वापरल्या आहेत. वरील सूचीशिवाय इतर ग्रंथांची नावे त्या त्या ठिकाणी संपूर्ण दिली आहेत.

# प्रस्तावना

## – १ –

श्रीचक्रधरस्वामींचे चरित्र लिहिण्याची मुख्य सामुग्री म्हणजे म्हाईंभटांनी संकलित केलेला 'लीळाचरित्र' हा बृहद्ग्रंथ होय. हा अपूर्व ग्रंथ सुप्रसिद्ध महानुभावीय संशोधक श्री. ह. ना. नेने यांनी पाच लहान-मोठ्या विभागात यापूर्वीच प्रसिद्ध केलेला आहे. पण केवळ या मुद्रित ग्रंथावरच अवलंबून राहणे शक्य व इष्ट नव्हते. म्हणून 'लीळाचरित्रा'च्या मूळ हस्तलिखित पोथ्या मिळतील तितक्या मीने गोळा केल्या. काही विवाद्य प्रश्नांचा उलगडा करून घेण्यासाठी या हस्तलिखितांना शरण जाण्यावाचून गत्यंतर नव्हते, हे प्रस्तुत चरित्र पूर्णपणे वाचल्यावर वाचकांना दिसून येईल. मीने पाहिलेल्या व उपयोजिलेल्या 'लीळाचरित्रा'च्या हस्तलिखितांचा एकंदर तपशील पुढीलप्रमाणे :

**क प्रत** :– ही पोथी श्रीगोपीराजग्रंथसंग्रहालयातील असून ती संपूर्ण आहे. पोथीचा समाप्तिलेख पुढीलप्रमाणे :

" सके : ॥ १४ सरावन वदि चौथी : वार सोमवार तदीनी लीखीते : एथाप्रति लीखीते : "

**ख प्रत** :– श्री गुंफेकर महानुभाव, रितपुर, यांच्याकडून मिळालेली ही पोथी संपूर्ण असून तिचा समाप्तिलेख पुढीलप्रमाणे आहे :

" शके ॥ १५०० ॥ ११ ॥ विरोधी नाम सवत्सरे आखाड वदि पंचमी वार अदित : तदीनी पुर्वार्ध लीळा संपूर्ण "

**ग प्रत** :- ही पोथी श्रीगोपीराजग्रंथसंग्रहातील असून ती संपूर्ण आहे. पोथीच्या शेवटी लेखन-शक दिलेला नाही. तथापि ती तीनशे वर्षापेक्षाहि अधिक जुनी असावी असे वाटते. पोथी सकळ लिपीत लिहिलेली आहे.

**घ प्रत** :- श्रीगोपीराजग्रंथसंग्रहातून मिळालेल्या या पोथीच्या प्रारंभी श्रीकृष्णावताराच्या व श्रीदत्तात्रेयप्रभूच्या काही लीळा असून श्रीचक्रधरावताराच्या पूर्वार्ध लीळांना 'श्रीएंबका न वचणे' या लीळेपासून सुरवात झालेली आहे. अर्थात, एकांक भाग हीत नाही. पूर्वार्धीच्या इतर सर्व लीळा आहेत. पोथीच्या शेवटी लेखन-शक नाही. सुमारे तीनशे वर्षापूर्वी लिहिलेली असावी असे वाटते. सकळ लिपीत लिहिलेली असून अक्षर अतिशय वळणदार व सुवाच्य आहे.

**ङ प्रत**:- श्रीगोपीराजग्रंथसंग्रहातून मिळालेल्या या प्रतीची आरंभीची व शेवटची काही पाने फाटलेली आहेत. एकांकातील पहिल्या १० लीळा नाहीत. 'कांतीए श्रीचांगदेवराउळा शिष्या भेटी' येथून एकांकातील सर्व व पूर्वार्धातील 'तथा सारस्वतकाळ प्रसंसा' पर्यंतच्या लीळा या पोथीत आलेल्या आहेत. पोथी अपूर्ण असल्यामुळे लेखन-शक नाही हे स्पष्ट आहे. तथापि पोथी अत्यंत प्राचीन असावी. कमीत कमी चारशे वर्षांची तरी असावी असे दिसते. पोथीची लिपी सकळ असून हस्ताक्षर वळणदार नसले तरी मोकळे व सुवाच्य आहे.

**च प्रत**:- ही पोथी श्रीगोपीराजग्रंथसंग्रहालयातील असून तिच्यात एकांकीच्या सर्व व 'राजेया परीखीत पुरुष स्वनाम गोपन' पर्यंत पूर्वार्धाच्या लीळा अंतर्भूत झालेल्या आहेत. पोथी अपूर्ण. अर्थात लेखन-शक नाही. तथापि ती तीनशे वर्षांची जुनी असावी असे वाटते. पोथी सकळ लिपीत लिहिलेली असून हस्ताक्षर सुंदर व वाचनीय आहे.

**छ प्रत** :- श्रीगोपीराजग्रंथसंग्रहातील पोथी. आरंभीची व शेवटची बरीचशी पाने जीर्णत्वामुळे फाटलेली आहेत. एकांकीच्या बऱ्याच

लीळा गेलेल्या आहेत. तथापि पूर्वार्ध भाग संपूर्ण आहे. पूर्वार्धाच्या शेवटी असलेला समाप्तिलेख पुढीलप्रमाणे :

॥ शके १५२८ ॥ पराभव नाम संवत्सरे कार्त्तीक शुद्ध पंचमी रविवारे प्रथम प्रहरे इदं पुस्तकं अलिखत् ॥

**ज प्रत** :- श्रीगोपीराजग्रंथसंग्रहातील या पोथीच्या प्रारंभीची व शेवटची बरीच पाने गेलेली आहेत. एकांक भाग संपूर्ण, पण पूर्वार्ध भाग मात्र 'ब्रह्मसान विश्वस्तंभन' या लीळेपर्यंतच आढळतो. पोथीची लिपी सकळ असून अक्षर साधारण आहे. पोथी बरीच जुनी आहे.

**झ प्रत** :- श्रीगोपीराजग्रंथसंग्रहातील या पोथीत एकांक व पूर्वार्ध भाग संपूर्ण आहे. पोथीतील मजकूर श्री. नेने यांनी छापलेल्या पूर्वार्धासारखाच आहे. पोथी कवीश्वर लिपीमध्ये लिहिलेली असून हस्ताक्षर सुस्पष्ट व मोकळे आहे. समाप्तीचा उल्लेख पुढीलप्रमाणे :

" संवत १९०६ दुरमतः नाम सतः मास वैशाख तीथ नौमी : सोमवार दीन तीसरे प्रहरी लेख समाप्त : वजिराबाद देशनाव पंज्याब "

**ञ प्रत**:- श्रीगोपीराजग्रंथसंग्रहालयातील ही पोथीसुद्धा कवीश्वरी लिपीत लिहिलेली असून तिच्यात एकांक भाग खेरीज करून संपूर्ण पूर्वार्ध व उत्तरार्ध आलेला आहे. पूर्वार्धातील लीळांना 'पांडेया स्वपनी नाम स्विकारू' या लीळेपासून आरंभ झालेला आहे. पोथीच्या शेवटी लेखन-शक नाही; तरी ती सुमारे २०० वर्षापूर्वीची तरी असावी असे दिसते. हस्ताक्षर अतिशय वळणदार व सुवाच्य आहे. लेखनकौशल्याच्या दृष्टीने पोथी पाहण्यासारखी आहे.

**ट प्रत**:- माहूर येथील प. म. श्री दत्तलक्षराज कवीश्वर यांच्या संग्रहातून मिळालेली ही पोथी इतर महानुभावीय पोथ्याप्रमाणे बांधलेली नसून सुट्या पानांची आहे. प्रत्येक पानाची लांबी ९ इंच व रुंदी ५॥ इंच आहे. पोथी सकळ लिपीत लिहिलेली असून हस्ताक्षर चांगले आहे. आख्यायिकांच्या मजकुरात आलेली श्रीचक्रधरोक्त सूत्रे लाल शाईने लिहिलेली आहेत. ही सर्व सूत्रे पारमांडल्य आम्नायातील तळेगावकर

शाखेच्या एका पोटविभागाचा जो स्वतंत्र सूत्रपाठ आहे त्यातील सूत्राशी अक्षरशः जुळतात. अर्थात, लीळाची ही पोथी त्या स्वतंत्र पोटविभागाचीच होय हे उघड दिसते. सूत्रांचा व लीळांचा हाच पाठ तळेगावकर पाठ म्हणून सर्वसामान्यतः संबोधिला जातो. तेच नाव पुढील सर्व विवेचनात मीने कायम ठेवलेले आहे. तळेगावकर पाठाच्या या पोथीच्या शेवटी लेखन--शक दिलेला नाही. तथापि ती दोनशे वर्षांच्या अलीकडची नसावी असे कागदाच्या जीर्णपणावरून वाटते.

**ठ प्रत** :- माहूर येथील प. म. श्रीदत्तलक्षराज कवीश्वर यांच्या संग्रहातील ही पोथी आहे. हिचा विशेष हा की ती सुंदरी लिपीत लिहिलेली आहे. सुंदरी लिपीतील पोथ्या वाइंदेशकर पाठ म्हणून महानुभाव पंथात प्रसिद्ध असलेल्या आढळतात. मीनेहि त्यांचा उल्लेख वाइंदेशकर पाठ म्हणूनच पुढील विवेचनात केलेला आहे. दुर्दैवाने या पोथीच्या आरंभीची व शेवटाचीहि बरीचशी पाने गेलेली आहेत. 'गणपती मढी माहादाइसा प्रश्नें निज पूर्वरूप प्रत्यभिज्ञा कथन' या लीळेपासून तो 'वासनीये मुकया वाग्दान कथन' या लीळेपर्यंत एकांकीचा भाग या पोथीत आलेला आहे. अर्थात या पोथीत फक्त एकांकीच्या आणि त्याहि अपूर्ण लीळा सापडतात. आहेत त्या लीळा मात्र अतिशय विस्ताराने सांगितलेल्या आहेत, हा या पोथीचा विशेष म्हणून नमूद करता येईल. पोथीच्या शेवटी 'शके १४२५ रुधरोद्गार संवत्सरेसीं संपूर्ण' असा समाप्तिलेख आहे. पण तो पोथीलेखकाच्या हस्ताक्षरात नसून इतर कुणी तरी मागाहून लिहिलेला असावा असे दिसते. तथापि कागदाच्या जीर्णत्वावरून ही पोथी कमीत कमी ३५० वर्षा--पूर्वीची तरी असावी असे वाटते.

**ड प्रत**:- सुंदरी लिपीत लिहिलेली वाइंदेशकर पाठाची ही पोथी देखील प. म. श्रीदत्तलक्षराज कवीश्वर, माहूर, यांच्या संग्रहातूनच मिळाली. **ठ** प्रतीप्रमाणेच या पोथीचीहि आद्यंतीची बरीच पाने काळाच्या भक्ष्यस्थानी पडलेली आहेत. पोथी २५० वर्षापूर्वीची असावी असे वाटते.

**ठ** आणि **ड** प्रतींचा अन्योन्यसंबंध नमूद करण्यासारखा आहे. आरंभापासून तो 'वासनीये मुकया वाग्दान कथन' या एकांकीच्या ज्या

लीळा ठ प्रतीत विस्तरशः वर्णन केलेल्या आहेत त्या ड प्रतीत अत्यंत संक्षेपाने आलेल्या आहेत. पण तदनंतरच्या एकांकीच्या व पूर्वार्धातील लीळा ड प्रतीत विस्ताराने वर्णन केलेल्या आढळतात. दुर्दैवाने पूर्वार्धातील शेवटच्या बऱ्याच लीळा फाटलेल्या पानाबरोबर नाहीशा झालेल्या आहेत. 'देमाइसा लुखुबाइसा पाठवणी प्रसंगे प्रथम वस्त्री संबोख' या आदीपर्यंतच्याच पूर्वार्ध-लीळा या पोथीत आलेल्या आहेत.

**ढ प्रत :-** ढ प्रत म्हणजे कै. राजवाडे यांना आनंदाश्रमातून 'अनिर्वचनीय पुस्तक' म्हणून मिळालेली पोथी[1]. ही पोथीहि सुंदरी लिपीतच लिहिलेली, अर्थात वाइंदेशकर पाठाचीच होती. ती शके १६११ मधे नकललेली असल्याचे कै. राजवाडे यांनी नमूद केलेले आहे. 'लीळासंवाद' या नावाने त्यांनी उल्लेखिलेली पोथी ती हीच होय. ही मूळ पोथी हल्ली कुठे आहे याचा पत्ता लागत नाही. पण कै. राजवाडे यांच्या सांगण्यावरून श्री. वि. ग. जावडेकर यांनी तयार केलेली या पोथीची बाळबोध नक्कल धुळे येथील श्रीसमर्थ--वाग्देवता--मंदिरात आहे. अर्थात ढ प्रत म्हणजे वस्तुतः उपरि--निर्दिष्ट पोथीची श्री जावडेकरांनी नकलून ठेवलेली श्रीसमर्थ--वाग्देवता--मंदिरातील प्रत होय.

**त प्रत :-** श्रीगोपीराजग्रंथसंग्रहालयातून मिळालेली ही उत्तरार्ध लीळांची पोथी सकळ लिपीत लिहिलेली असून ती संपूर्ण आहे. पोथीच्या शेवटी असलेला समाप्तिलेख पुढीलप्रमाणे :

"सकु १४६० । भाद्रपक्षु (दु) : सुध पंचमी
बुधवारू : ततदीनीं : उत्तरार्ध समात"

**थ प्रत:-** उत्तरार्ध लीळांची ही पोथी श्रीगोपीराजग्रंथसंग्रहालयातील असून ती सकळ लिपीत लिहिलेली आहे. अक्षराचे वळण सुंदर आहे. पोथी संपूर्ण आहे. शेवटी पुढीलप्रमाणे समाप्ति-लेख आढळतो :

---

१. भा. इ. सं. मं. वार्षिक इतिवृत्त. शके १८३५.

२. या नावाविषयी श्रीबाळकृष्ण शास्त्री महानुभाव यांनी केलेली चर्चा पहा. ( संशोधक त्रैमासिक वर्ष ५. अंक १ आणि २. पृष्ठ १२५ ).

" श्रीसकें ॥ १४९५ ॥ श्रीमूख नाम सवंछरे ॥ भाद्रपदु वद्य त्रितिया : सोमदीने दावसे ग्रामे : मळेस्थाने लीळा उत्तरार्ध चरित्रे संपूर्ण मिति "

**द प्रतः**– महंत श्री साधेराज महानुभाव, रितपुर, यांच्याकडून ही पोथी मिळाली. ती सकळ लिपीत लिहिलेली असून संपूर्ण आहे. अक्षराचे वळण साधारण आहे. शेवटी पुढीलप्रमाणे समाप्तिलेख आढळतो :

" शके १५३९ पींगळ शवस्सरे दक्षीणायने शशीरीतौ कार्तिक मासे शूक्लपक्षे : शतमी रवीवारे श्रवण नक्षेत्रे गजयोगु नेवासें थान मार्क्ये तें थोने पुस्तक समाप्त "

**ध प्रतः**– श्रीगोपीराजग्रंथसंग्रहालयातील ही उत्तरार्ध लीळांची पोथी संपूर्ण असून ती सकळ लिपीत अतिशय सुवाच्य व वळणदार हस्ताक्षरात लिहिलेली आहे. पोथीच्या शेवटी असलेला समाप्तिलेख पुढीलप्रमाणे :

" संके : १५६९ : सर्वजीत नाम संत्सरे भाद्रपद मास शुक्लपक्ष नवमी वार सन्यवार तददीनीं पुस्तक संपूर्ण समाप्त "

**न प्रतः**– श्रीगोपीराजग्रंथसंग्रहालयातून ही पोथी मिळालेली असून ती सकळ लिपीत, सुवाच्य व सुंदर हस्ताक्षरात लिहिलेली आहे. पोथीत उत्तरार्धातील सर्व लीळा आलेल्या आहेत. शेवटचा ओवीबद्ध समाप्तिलेख असा :

" पोखूर ग्राम परियसा : खर संवत्सरीं श्रावण मासा
तिथी अष्टमी शुध मंगळवारु दीसा : लीळामृत
भांब्रिरकर जनार्धनु : तयाचा सुत सारंगू पाटवर्धनु
तयासी उत्तरार्ध लीळा लिहुनि : दिधलिया मूकूंदें कपाटीयें "

**प प्रतः**– श्री गुंफेकर महानुभाव, रितपुर, यांच्याकडून मिळालेली उत्तरार्ध लीळांची ही पोथी सकळ लिपीत लिहिलेली असून ती संपूर्ण आहे. शेवटी " येवं उतरार्ध चरीत्रे संपूर्ण समाप्त " एवढाच उल्लेख आहे. लेखन-शक वगैरे काहीच दिलेला नाही. मूळ उत्तरार्ध लीळा संपल्यानंतर पोथी

लेखकाने उत्तरार्धाची काळगणना लिहून ठेवलली आढळते. पोथीचे हस्ताक्षर अतिशय सुंदर व वळणदार आहे. पाहण्यासारखे आहे.

**फ प्रतः**- श्री गोपीराजग्रंथसंग्रहालयातून मिळालेली उत्तरार्ध लीळांची ही पोथी सकळ लिपीत लिहिलेली आहे. हिची आरंभीची व शेवटची बरीच पाने फाटलेली आहेत. तथापि उत्तरार्धातील सर्व लीळा (मधल्या काही लीळा सोडून) तीत आलेल्या आहेत. पोथीची बांधणी नीट न झाल्यामुळे पाने उलट सुलट लागलेली दिसतात. लीळांच्या शेवटी समाप्तिलेख नाही. तथापि पोथी तीनशे वर्षांची तरी प्राचीन असावी असे वाटते.

**ब प्रतः**- श्रीगोपीराजग्रंथसंग्रहालयातील उत्तरार्ध लीळांची ही पोथी सकळ लिपीत लिहिलेली असून तिची आरंभीची काही पाने फाटलेली आहेत. त्यामुळे पहिल्या ८ लीळा काळाच्या भक्ष्यस्थानी पडल्या आहेत. पोथी बरीच जीर्ण झालेली असून उत्तरार्धलीळाच्या शेवटी पुढील समाप्ति- लेख आढळतो :

"शके १५३१ शाधारन छवछरे वैशाख पूर्णवा शुक्रवारे सेगाव नामे नगरे तत्रस्थाने उत्तरार्ध लीळा समाप्त ॥ ५९० ॥ लीखक पाठकयो ॥ तळेग्राम कृष्ण दामचें हस्तक्षर आणि त्याचेंचि पुस्तक ॥ * ॥

**भ प्रत** :- महंत श्री साधेराज महानुभाव, रितपुर, यांच्याकडून ही उत्तरार्ध लीळांची पोथी मिळालेली असून ती सकळ लिपीत वळणदार हस्ताक्षरात लिहिलेली आहे. 'इति उत्तरार्ध लीळा संपूर्ण समाप्त' झाल्यावर अज्ञातलीळा, श्रीकृष्णलीळा व सह्याद्रीच्या लीळा या पोथीत लिहिलेल्या असून त्यांच्या शेवटी पुढील समाप्तिलेख आहे :

" संवत १७ सें ७४ सके १६ सें ४० हेमलंबी संवत्सरे भाद्रपद वद तीज सुक्रवारीं तद्दीनीं लीखन समाप्त "

या पोथीतील मजकूर व **ब** प्रतीतील मजकूर जवळ जवळ सारखा आहे. त्यामुळे **ब** प्रतीप्रमाणेच ही **भ** प्रतहि तळेगावकरीच होय हे उघड दिसते. शिवाय विशेष हे की काही लीळांचे क्रम खेरीज करून या दोन्ही

प्रतीतील बहुतेक मजकूर, पुढे निर्देशिलेल्या तळेगावकर पाठाच्या **म** प्रतीशी बरोबर जुळतो. फरक इतकाच की **म** प्रतीत ज्याप्रमाणे तळेगावकर पाठातील काही सूत्रे लाल शाईने लिहिलेली आहेत तशी या दोन प्रतीत नाहीत. किंबहुना ती सूत्रे या दोन प्रतीत नाहीतच. बाकी सर्व बाबतीत ह्या दोन्ही पोथ्या तळेगावकरी '**म**' प्रतीप्रमाणेच आहेत. **म** प्रतीत काही काही ठिकाणी थोडा मजकूर जास्त आढळतो इतकेच. तेव्हां **ब**, **भ** व **म** या तिन्ही पोथ्या तळेगावकरांच्याच आहेत हे उघड होते.

**म प्रतः**– प. म. श्री तळेगावर महानुभाव यांच्याकडून मिळालेली उत्तरार्ध लीळांची ही पोथी, पूर्वार्ध लीळांच्या **ट** प्रतीप्रमाणे सुट्या पानांची आहे. **ट** पोथीच्या पानापेक्षा या पोथीच्या पानांचा आकार थोडा मोठा आहे. पोथी सकळ लिपीत लिहिलेली असून **ट** प्रतीप्रमाणेच हिच्यातहि तळेगावकरांच्या सूत्रपाठातील वचने जिथे जिथे आलेली आहेत तिथे तिथे ती लाल शाईने लिहिलेली आहेत. अर्थात, या पोथीत उत्तरार्ध लीळांचा तळेगावकरी पाठ आढळतो हे स्पष्ट आहे. पोथीच्या शेवटी असलेला समाप्तिलेख पुढील प्रमाणे :

" शके शतरा ॥ १७ ॥ तेवीस : २३ ॥ दुर्मत नाम संवत्सरे : भाद्रपदमासे वद्य पक्षे शष्टी रविदिने प्रथम प्रहरे यके : आरोलीग्रामे प्रगाणे रामक्षेत्रे तत्र स्थळे लीख्यते :......**तडागोपसंज्ञीकस्य** हरीराज सुत कान्हेराज मुनेश्वर ॥ तत्सुतं लिखितं शास्त्रं कृष्णनामंच विद्यते ॥

वरील सर्व पोथ्यांचे वर्गीकरण प्रामुख्याने तीन विभागात करता येईल. (१) आम्नाय ऊर्फ पिढीपाठ; (२) तळेगावकर पाठ; (३) वाइंदेशकर पाठ. तळेगावकर आणि वाइंदेशकर पाठांच्या पोथ्यांचा निर्देश त्या त्या नावाने स्पष्टपणे केलेला आहे. इतर सर्व पोथ्या आम्नाय ऊर्फ पिढीपाठाच्या होत. महानुभाव पंथात हाच पिढीपाठ बहुतेक सर्वत्र प्रचलित आहे. अर्थात् पोथ्या आढळतात त्याहि विशेषेकरून याच पाठाच्या. प्रामाण्याच्या दृष्टीने पिढीपाठच सर्वात अधिक महत्त्वाचा होय, आणि म्हणून तोच प्रस्तुत चरित्रग्रंथ लिहितांना मीने आधाराला घेतला आहे.

या तिन्ही पाठांच्या प्रामाण्याविषयी थोडा अधिक खुलासा करणे अवश्य वाटते. लीळाचरित्राची प्रथम निर्मिती म्हाइंभटांनी केली हे प्रसिद्ध आहे. ( स्मृ. स्थ. १४१ ). म्हाइंभटांनी तयार केलेली लीळाचरित्राची मूळ पोथी पुढे खालशाच्या धाडीत हरवली. कमळाइसाच्या हिराइसेला संपूर्ण ग्रंथ मुखोद्गत होता. तिने सांगितलेल्या लीळांच्या आधारे परशरामबासांनी लीळाचरित्र ग्रंथ पुन्हा लिहून काढला. पण हिराइसाप्रमाणेच इतर काही शिष्यांनासुद्धा ह्या लीळा मुखोद्गत होत्या. त्यामुळे क्वचित लीळांच्या व श्रीमुखीच्या शब्दांच्या बाबतीत मतमतांतरे निर्माण झाली. ती सर्व एकत्रित करून प्रथम परसरामबासांनी एक पाठ तयार केला. तोच पिढीपाठ होय. थोरल्या पाठाच्या पोथीतील अन्वयस्थळात " तिसरा मन्वतरी परसरामबासीं समस्त वासना एकवट करूनी एक पाठ केला : तेथ परसरामबा वासना प्रधान : तयासि पीढीपाठ म्हणती " असा उल्लेख आहे. कालांतराने अचळशिवबासांनी चरित्राची शोधनी करून पिढीपाठाची नवीन संहिता तयार केली. तोहि पिढीपाठ म्हणूनच प्रसिद्ध आहे. या शिवबासाप्रमाणेच पारमांडल्य आम्नायातील नागनाथबासाने एक पाठ तयार केला होता. शिवबासाने संशोधून तयार केलेला पाठ आणि नागनाथबासांनी तयार केलेला पाठ या दोन्ही पाठांना महानुभावपंथात प्रामाण्य होते. सिद्धांते हरिबास व धाकुटे सोंगोबास यांच्या अन्वयस्थळात तसा स्पष्ट उल्लेख आहे. " हीराइसाची शोधनी मुळ : मग शिवबासाचा पीढीपाठ : आन पारमांडल्ये आम्नाइ आनोबासाचिया नागनाथाचा पाठ : ऐसिया तिन : तीही रूपाचिया चरित्र सोधनीया सर्वासी प्रमाण : एर काहीहि प्रमाण नोहे : क्षेपक जाणावे : का पा : क्रांतदर्शी पूर्वजी एथार्थ ईश्वरहेतु तोचि घेतला : एर नाही घेतले : म्हणौनि इतुका साधकी बाधकी अवांतरहि प्रमइ आर्थनिर्णए तो प्रमाण : एर अप्रमाण जाणावे " असे अन्वयस्थळकारांनी म्हटले आहे. यावरून सिद्धांते हरिबास आणि धाकुटे सोंगोबास यांच्या काळापर्यंत तरी पिढीपाठ व पारमांडल्य आम्नायातील नागनाथबासांचा पाठ या दोनच पाठांना पंथाची मान्यता होती असे दिसते. वाइंदेशकरपाठाचा यात उल्लेखहि नाही. तसाच तळेगावकर-पाठाचाहि उल्लेख नाही. हे दोन्ही पाठ मागाहून बऱ्याच काळानंतर निर्माण झालेले असावेत. तळेगावकर पाठासंबंधी तर तळेगावकरांच्या अन्वयस्थळात तसा उल्लेखहि सापडतो.

नागदेवाचार्यांचे शिष्य आनेराजव्रास, ह्यांची शिष्या बाणाइसे, तिचा शिष्य हरिव्रास आणि या हरिव्रासाचा शिष्य तळेगावकर दत्तोव्रास याने "हीरंबा पाठ प्रधान करूनि : परशरामव्रास : रामेश्वरव्रास : आणि अणिकही आचार्ये तयाची वासनांतरे एकवटुनि पूर्वार्ध चरित्रे : उत्तरार्ध चरित्रे : द्वापारचरित्रे : ऋधपुरचरित्रे : अज्ञातचरित्रे : अन्वयी लाविली :" तळेगावकर पाठ म्हणून प्रसिद्ध असलेला तो हाच दिसतो. परशरामव्रासाने तयार केलेल्या आणि शिवव्रासांनी संशोधिलेल्या पिढीपाठानंतर हा तळेगावकरांचा पाठ निर्माण झाला हे उघड दिसते. तीच गोष्ट वाइंदेशकर पाठासंबंधीची असावी. सिद्धांते हरिव्रास आणि धाकुटे सोंगोव्रास यांच्या अन्वयस्थळातील मताप्रमाणे तत्त्वतः हे दोन्ही पाठ अप्रमाण ठरतात. या दोन्ही पाठातील आख्यायिकांची भाषा वगैरे पाहिली म्हणजे ही समजूत खरी असावी असे वाटते. वाइंदशकराचा पाठ हा लीळाचरित्राच्या सर्व पाठात अत्यंत विस्तृत असा पाठ आहे. पिढीपाठात जी माहिती सांगितलेली आहे तीच विस्तारून आणि फुगवून वाइंदेशकर पाठात आढळते. तळेगावकर-पाठात देखील श्री चक्रधरस्वामींना उद्देशून वापरलेली विशेषणे लक्षात घेता तो पाठ बराच अलीकडचा असला पाहिजे असे मत झाल्यावाचून राहत नाही. दुसरे असे की, चक्रधरस्वामींच्या आयुष्यातील निरनिराळ्या काळासंबंधीचे शकसंवत्सरांचे उल्लेख, जे पिढीपाठातील आख्यायिकामधे कोणत्याहि स्वरूपात मुळीच आढळत नाहीत ते वाइंदेशकर आणि तळेगावकर या दोन्ही पाठात आढळतात. यावरूनहि पिढीपाठाच्या तुलनेने दुसरे दोन्ही पाठ हे फार निराळे वाटतात. कित्येक ठिकाणी तर महितीमधेहि अंतर आढळते. उदा० अळजपूरच्या रामदरण्याची गोरांब्रानामक एक मुलगी आणि तिच्याशी स्वामींनी केलेला विवाह ही एक नवीनच गोष्ट वाइंदेशकरांनी वर्णन केलेली आहे. तिला अन्य पाठात आधार नाही. स्वामींच्या उत्तरापंथे प्रयाणाच्या प्रसंगी ते ज्या स्थळांना भेटी देऊन गेले असे पिढीपाठ व वाइंदेशकर पाठ यावरून वाटते, त्याहून निराळा क्रम तळेगावकरांच्या पोथीत आहे. या गोष्टी लक्षात घेता प्रस्तुत चरित्र लिहितांना प्रामुख्याने पिढीपाठाचाच पुरावा मान्य करणे मला योग्य वाटले. आवश्यक त्या ठिकाणी वाइंदेशकर आणि तळेगावकर पाठ यातील माहिती पिढीपाठाला उपोद्बलक असेल तर तिचाहि उपयोग केलेला आहे. पण स्थूल

मानाने पिढीपाठ हाच प्रस्तुत चरित्र-ग्रंथाला प्रमाणभूत मानलेला आहे ही गोष्ट नमूद करणे अवश्य वाटते. याला दुसरेहि एक कारण असे आहे की, सध्या महानुभाव पंथात लीळाचरित्राच्या पोथ्या आढळतात त्या प्रामुख्याने पिढीपाठाच्याच. इतर दोन्ही पाठांच्या पोथ्या त्या मानाने फार कमी मिळतात. पिढीपाठाला मिळालेली ही मान्यता लक्षात घेऊन तोच प्रस्तुत चरित्रासाठी प्रमाण मानणे उपयुक्त वाटले. मला पहावयाला मिळालेल्या सर्व पोथ्यांची माहिती वर नमूद केलेली आहे. तिच्यातील एक हेतु असा की अभ्यासकांना या पोथ्यांची माहिती व्हावी व पुढे मागे कुणाला त्यांचा उपयोग करण्याची इच्छा झाल्यास तसा तो करता यावा.

लीळाचरित्राशिवाय इतरहि काही ग्रंथ साधनसामुग्री म्हणून मला उपयोगी पडले. त्यात रत्नमालास्तोत्र, गोविंदप्रभुचरित्र, स्मृतिस्थळ, वृद्धाचार, वृद्धान्वय किंवा अन्वयमालिका इ. ग्रंथ प्रमुख होत. संक्षेपसूचीवरून मला उपयोगी पडलेल्या इतर ग्रंथांची सहज कल्पना येऊ शकेल.

— २ —

या ठिकाणी लीळाचरित्राच्या अद्यावत् आवृत्तीच्या आवश्यकतेसंबंधी दोन शब्द लिहिणे अप्रस्तुत होणार नाही. मराठी वाङ्मयातील पहिलाच गद्य ग्रंथ या दृष्टीने लीळाचरित्राचे मूल्य फार मोठे आहे. भाषिक दृष्टीने तर त्याची योग्यता अपूर्व आहे. यामुळे या ग्रंथाची आधुनिक पद्धतीने संपादणी होणे मला फार आवश्यक वाटते. श्री. ह. ना. नेने यांनी लीळाचरित्र संपूर्ण स्वरूपात प्रसिद्ध केलेले आहे हे खरे. त्यात निरनिराळ्या वासना, शोध कितीतरी आहेत ! त्यामुळे एकाच लीळेत तोच प्रसंग अनेक ठिकाणी पुनरुक्त झालेला दिसतो. वासनांतरे नमूद करतांना काही वाक्यांची एकेकदा, दोनदोनदा आवृत्ति झालेली आढळते. प्राचीन ग्रंथलेखनाच्या पद्धतीप्रमाणे हे योग्य असले तरी आधुनिक अभ्यासकाचा त्यामुळे फार घोटाळा होतो. या सर्व वासना वेगळ्या काढून व त्यांचा पाठभेदामधे आधुनिक पद्धतीने अंतर्भाव करून मूळ ग्रंथाची संहिता तयार करणे अत्यंत आवश्यक आहे.

लीळाचरित्राच्या मूळ पाठातून केसोबासांनी निरनिराळे दृष्टांत निवडून त्यांचे वेगळे पुस्तक केल्यामुळे आजच्या उपलब्ध पाठात त्यांचा

अंतर्भाव झालेला आढळत नाही. त्याऐवजी 'गोसावी खडेयाखुबटेयाचा दृष्टात नीरुपीला' (उत्त. ४०); 'यावरि गोसावी ब्रह्मचारी घोडेयाचा दृष्टांत नीरूपिला' (उत्त. ९४); 'यावरि चाटसीएचा दृष्टांत नीरूपिला' (उत्त. ४६१) इत्यादि वाक्ये घातलेली आहेत. मूलस्थापनेच्या दृष्टीने त्या त्या ठिकाणी तो तो दृष्टात संपूर्ण असायला पाहिजे. तसा तो घातल्यावाचून लीळाचरित्राची अधिकृत आवृत्ती तयार व्हावयाची नाही. महानुभाव पंथाच्याच दृष्टीने नव्हे तर मराठी वाङ्मयाच्या व भाषेच्या दृष्टीने अशा आवृत्तीची गरज आहे लौकरच अशा प्रकारची संहिता तयार करण्याचा प्रयत्न करण्याचे मीने योजले आहे एवढेच आश्वासन या ठिकाणी देतो.

— ३ —

श्रीचक्रधरस्वामी हे महाराष्ट्रातील एक सुप्रसिद्ध संत होत यात शंका नाही. जन्माने ते महाराष्ट्रीय नसले तरी त्याचे सर्व कर्तृत्व महाराष्ट्रात झाले, त्यामुळे ते महाराष्ट्रीयच होते असे मी समजतो. महाराष्ट्राविषयी त्यांच्या इतका आदर आमच्या दुसऱ्या कोणत्याहि संताने व्यक्त केलेला नाही. 'महाराष्ट्री असावे' या आपल्या विधिवचनाने आपल्या अनुयायांना त्यांनी जो आदेश दिलेला आहे त्यामुळे महाराष्ट्र हे महानुभावपंथीयांचे पुण्यपावन असे धर्मक्षेत्र बनले आणि म्हणूनच पंजाब, काश्मीर, वायव्य सरहद्द प्रांत इत्यादि विभागातील महानुभाव तीर्थयात्रेसाठी महाराष्ट्रात येत असतात. जी गोष्ट त्यांनी 'महाराष्ट्रा' विषयी केली तीच मराठी भाषेविषयीहि केली. महाराष्ट्रात आल्यानंतर आपल्या दैनंदिन व्यवहारासाठी व धार्मिक उपदेशासाठी त्यांनी स्वतः महाराष्ट्रातील जनतेच्या भाषेचा—मराठी भाषेचा आश्रय केला. अखिल भारताला पूज्य असलेल्या भगवद्गीतेचे तत्त्वज्ञान कालमानानुसार परिष्कृत करून ते त्यांनी मराठी जनतेला तिच्याच भाषेतून उपदेशिले. त्यांच्या प्रयाणानंतर त्यांची वचने जशीची तशी लिहून ठेवल्यामुळे अर्थात ती मराठी गद्यातून लिहून ठेवण्यात आली व त्यामुळे मराठीला महानुभावांच्या दृष्टीने धर्मभाषेची प्रतिष्ठा प्राप्त झाली. चक्रधरांचे हृद्गत उत्तम रीतीने जाणणाऱ्या नागदेवाचार्यांनी आपल्या शिष्यांना सर्व ग्रंथरचना मराठीतूनच करण्याचा आदेश दिला. त्यामुळे मराठीत सुंदर

असे अनेक गद्यपद्य ग्रंथ निर्माण झाले. या सर्वांच्या मुळाशी चक्रधरस्वामींची प्रेरणा होती हे विसरता कामा नये. सारांश, महाराष्ट्र आणि मराठी भाषा यांच्याशी श्रीचक्रधरस्वामींचा अत्यंत निकटचा संबंध होता. त्यांच्या उपदेशाचे अनेक परिणाम महाराष्ट्राच्या संस्कृतीवर झालेले आहेत यात शंका नाही. त्याचमुळे त्यांच्या चरित्राचे आणि कार्याचे विविध दृष्टींनी पर्यालोचन करण्याचा पुष्कळ विद्वानांनी प्रयत्न केलेला आहे. महाराष्ट्राच्या या ज्ञानेश्वरपूर्णकालीन संतासंबंधी विचारवंतामध्ये विशेषच जिज्ञासा निर्माण झालेली आहे. त्यामुळे त्यांचे हे चरित्र लिहून प्रसिद्ध करणे मला आवश्यक वाटले. 'लीळाचरित्र' हा आख्यायिकांचा ग्रंथ प्राचीन मराठी गद्यात लिहिलेला असल्यामुळे सर्वसामान्य वाचकांना त्याचा फारसा उपयोग होत नाही. म्हणून अनेक महानुभावांनी, स्वामींचे चरित्र आधुनिक भाषेत व आधुनिक पद्धतीने लिहिण्याची मला अनेकदा सूचना केली. तदनुसार आज हा चरित्र ग्रंथ महानुभाव व महानुभावेतर वाचकांच्या व विचारवंतांच्या समोर ठेवतांना मला अतिशय आनंद वाटतो.

इतर पंथीयांच्या दृष्टीने श्रीचक्रधरस्वामी नुसते संत असले तरी महानुभावांच्या दृष्टीने ते 'ईश्वरावतार' होते. आपल्या अनेक साधुसंतासंबंधी अशा समजुती प्रचलित आहेत. श्री ज्ञानेश्वरमहाराज हे भगवान विष्णूचा अवतार होते असे वारकरी लोक समजतात. 'ज्ञानेशो भगवान् विष्णुः' ही सुप्रसिद्ध उक्ति आणि तत्कालीन इतर संतांनी काढलेले 'महाविष्णूचा अवतार। सखा माझा ज्ञानेश्वर' 'महाविष्णूचा अवतार। श्री गुरु माझा ज्ञानेश्वर' हे उद्गार हीच गोष्ट स्पष्ट करतात. इतर संतांच्या ईश्वरावतारित्वाविषयीहि अशाच समजुती प्रचलित होत्या व आहेत. पण चक्रधरस्वामी आणि अन्य महाराष्ट्रीय संत यांच्यात एक फरक असा की चक्रधरस्वामी स्वतःसुद्धा आपणाला ईश्वरावतार मानीत; अन्य संतांच्या बाबतीत तसे आढळत नाही. स्थूल मानाने ते सर्वजण स्वतःला परमेश्वराचे भक्त म्हणून समजत आणि त्याच भावनेने ईश्वरोपासना करीत. चक्रधरस्वामींच्या ईश्वरावतारित्वाविषयी प्रस्तुत पुस्तकाच्या सहाव्या प्रकरणात विस्तृत चर्चा केलेली आहे. श्रीकृष्ण स्वतःला ईश्वर म्हणवीत असत याहि गोष्टीचा तेथे म्या निर्देश केलेला आहे. अशा प्रवृत्तीचे अगदी आधुनिक काळातील उदाहरण द्यायचे म्हटले तर

स्वामी रामकृष्ण परमहंसांचे देता येईल. 'श्रीरामकृष्ण स्वतःला अवतारी समजत असत. लौकिक दृष्ट्या अवतार या शब्दाचा होणारा अर्थ जमेस धरून ते अवतारी म्हणवीत' असे विवेकानंदांनी सांगितले आहे; इतकेच नाही तर 'पूर्वी जो राम आणि कृष्ण म्हणून अवतरला होता तोच आता रामकृष्ण झाला आहे' असे प्रत्यक्ष रामकृष्णांचे वचनच त्यांनी प्रमाण म्हणून उध्दृत केले आहे. 'श्रीरामकृष्ण अवतारी पुरुष होते हे नितांत सत्य आहे' असा आपला अभिप्राय स्वामी विवेकानंदांनी नमूद केला आहे. (विवेकानंद. खंड १३. पा. ४७). तेव्हां स्वतःला ईश्वरावतार म्हणवून घेणारे चक्रधरस्वामी एकटेच होते असे नाही प्राचीन काळात व अर्वाचीन काळात अशा अनेक व्यक्ति होऊन गेल्या. त्यापैकीच चक्रधरस्वामी हे एक होते.

अशा अवतारी पुरुषाचे चरित्र आधुनिक युगातील वाचकांच्या समोर ठेवणे हे अत्यंत कठीण काम आहे. कारण अवतारित्वाच्या कल्पनेवरच आजचा सुविद्य वाचक सहसा विश्वास ठेवीत नाही. अवतारी पुरुषाभोवती निर्माण झालेल्या चमत्कारांच्याकडे तर तो उपहासानेच पाहतो. व्यक्ति कितीहि मोठी असली तरी सामान्य जीवाप्रमाणे तिचा वर्तनक्रम रेखाटून त्यातून तिच्या व्यक्तित्वाच्या विकासाचे शब्दचित्र काढणे हे आधुनिक चरित्रलेखकाचे मुख्य धोरण असावयास पाहिजे. हे धोरण, अवतारी म्हणून समजल्या गेलेल्या सांप्रदायिक सत्पुरुषाचे चरित्र लिहितांना स्वीकारता येणे शक्य नाही असे नाही. पण सांप्रदायिक वाचकवर्ग डोळ्यासमोर ठेवून लिहिलेल्या चरित्रात ते सर्वत्र स्वीकारणे अनेक दृष्टींनी इष्ट होत नाही, हे मात्र खरे. प्रस्तुत चरित्र लिहितांना प्रामुख्याने महानुभाव वाचक दृष्टिसमोर ठेवलेले आहेत. त्यामुळे महानुभाव पंथीयांच्या श्रद्धांना धक्का लागणार नाही अशी सर्वत्र काळजी घ्यावी लागली आहे. तथापि, इतर वाचक माझ्यासमोर मुळीच नव्हते असा मात्र याचा अर्थ नाही. त्यांच्यासाठीच, लौकिक दृष्टीनेहि चक्रधर-स्वामीकडे पाहण्याचा प्रयत्न मीने केलेला आहे. याचे प्रत्यंतर पुढील प्रकरणे वाचतांना वाचकांना सहज येईल.

अवतारी संत पुरुषांच्या आयुष्यात चमत्कारांची भरती फार; किंबहुना अशा चमत्कारावाचून जणु त्यांचे अवतारित्व अळणी होय,

अशीच त्यांच्या भक्तांची कल्पना असते. चक्रधरस्वामी याला अपवाद नव्हते. 'लीळाचरित्रा'त त्यांच्या चमत्कारांच्या अनेक आख्यायिका आहेत. त्या सर्व 'स्थित्यानंद व विज्ञान' या प्रकरणात मीने अगदी वेगळ्या काढल्या आहेत. हेतु हा की श्रद्धाशील वाचकाना त्या कळाव्या. पण, स्वामींचे श्रेष्ठत्व या चमत्कारावर अवलंबून नसल्यामुळे आधुनिक दृष्टीच्या वाचकांना, इतर प्रकरणातून त्यांच्या लौकिक जीवनाचे स्वतंत्र रीतीने दर्शन घेता येईल. इतर सर्व प्रकरणे चमत्काराच्या हकीकतीपासून शक्यतोवर अलिप्त ठेवलेली आहेत ती याचकरिता. या योजनेमुळे दोन्ही प्रकारच्या वाचकांचे समाधान होईल असा विश्वास वाटतो.

स्वामींच्या आयुष्यातील 'शेवटच्या प्रकरणा' विषयी दोन शब्द या ठिकाणी लिहिणे अवश्य वाटते. 'शेवटचे प्रकरण' हा सांप्रदायिक वाक्प्रयोग आहे आणि तो चक्रधरस्वामींच्या प्रयाणापूर्वी झालेल्या त्यांच्या वधाच्या प्रसंगाला उद्देशून वापरण्यात येतो. हे लक्ष्यात घेऊनच प्रस्तुत वृत्तांत वर्णन करणाऱ्या चौदाव्या प्रकरणाला मीने 'शेवटचे प्रकरण' हे नाव ठेवलेले आहे, हे वाचकांनी लक्ष्यात असू द्यावे. शेवटच्या प्रकरणाला कारणीभूत झालेली हकीकत म्हणजे स्वामींच्या चरित्राला लागलेला डाग होय असे कित्येकांना वाटण्याचा संभव आहे. आउसाचे नग्ननृत्य वगैरे काही प्रसंग या दृष्टीने मी लिहिलेच नसते तर फार बरे झाले असते असेहि काहींचे म्हणणे पडेल. मला मात्र तसे वाटत नाही. चरित्रनायकाच्या आयुष्यातील महत्त्वाच्या सर्व घटना जशा घडल्या तशा देणे हे चरित्रलेखकाचे कर्तव्यकर्म आहे. त्याने जाणुनबुजून अशी एखादी गोष्ट मागे ठेवता कामा नये. चरित्रनायकाचे व्यक्तित्व जसे असेल तसे वाचकासमोर मांडणे ही महत्त्वाची गोष्ट होय. त्यामुळे त्याच्या व्यक्तित्वावर किंवा स्वभाववैशिष्ट्यावर प्रकाश टाकणारा असा कोणताहि बरावाईट प्रसंग वगळणे योग्य होणार नाही एखाद्या अशा प्रसंगामुळे चरित्रनायकाचे चारित्र्य मलिन झालेले आहे असे वाटत असेल तरी वास्तवतेच्या दृष्टीने ते सर्वांच्या समोर येणे अवश्यच ठरते. कदाचित, जी गोष्ट आपणाला वाईट दिसते तीच अन्य दृष्टीने पाहणारास त्या व्यक्तीच्या स्वभाववैशिष्ट्यास उजळा आणणारी ठरण्याचा संभव असतो. चक्रधरस्वामींच्या आयुष्यात असे काही प्रसंग

आहेत की जे घडले नसते तर फार बरे झाले असते असे तुम्हाआम्हाला आज वाटेल. असे असूनहि खास लीळाचरित्रकार म्हाइभटांनी ते नमूद करून ठेवले आहेत. नागदेवाचार्यांच्या संमतीने लीळाचरित्राची रचना झालेली असल्यामुळे अशा या प्रसंगांचा उल्लेख लीळाचरित्रात असायला त्यांची काहीहि हरकत नव्हती असेच त्यावरून दिसून येत नाही काय? 'शय्यापाळना प्रमेय'काराने तर असे सर्व प्रसंग एकत्रित करून दिले आहेत. तो म्हणतो :

"तर ईश्वर अचरले तेचि करू लागावे : मा चर्चवीले ते काइ : ना : ईश्वराचेया करणामध्ये यक विलक्षण असे : जैसा वोरंगळीचा वीव्हावो : जैसा तैल्यकारीसी पहुड : जैसे सामान्य स्त्रियाचेया घरा बीजे केले : जैसी बोरीबाबुळी सींपवीली : जैसे तुरंगमा आरोहण करणे : जैसे तुंगभद्रा उदकात बीजे करणे : जैसे आउसाचीये पुष्टीवर आरोहण करणे : जैसा मुनियासी क्षेमालिंगन देववीले : यतीमुनीचेया वेखाते लंघीले : तेतुलेही विलक्षण : हे कर्म नासावया : त्रिविध दान दयावया विलक्षण आचरती"

प्रमेयकाराने वर्णिलेल्या या प्रसंगांचा उल्लेख बंदकारांनीहि जागोजाग केलेला आहे. कारण, त्यांना यांची 'विषयव्यवस्था'- सारासारविवेक-करता येत होती. वाचकांनीहि तसेच करण्याचा प्रयत्न केला पाहिजे. आपल्या दृष्टीने आपण केलेला 'विवेक' इतरांच्या दृष्टीला न पटला तर त्याबद्दल खंत बाळगण्याचे कारण नाही. एकाच प्रसंगाकडे अनेक जण निरनिराळ्या दृष्टींनी पाहत असतात. तेव्हां त्यांच्या निर्णयात फरक पडणारच. त्याबद्दल वाईट वाटण्याचे कारण काय? या दृष्टीने विचार केला तर लीळाचरित्राच्या काही नकलकारांनी स्वामींच्या शेवटच्या प्रकरणाविषयीच्या आख्यायिका पोथ्यातून गाळण्यात अंतःकरणाची समाहितता दाखविली नाही असेच म्हणावे लागते. हीच गोष्ट अवयवछेदाची आख्यायिका गाळण्याच्या बाबतीतहि घडून आलेली आहे. अर्थात्, ज्याप्रमाणे काही पोथीलेखकांनी या आख्यायिका गाळल्या आहेत त्याप्रमाणे काहींनी त्या स्पष्टपणे नमूदहि केलेल्या आहेत. अशा पोथीलेखकांना जितके धन्यवाद द्यावे तितके थोडेच होतील. सत्याकडे मोकळ्या मनाने पाहण्याची दृष्टि, त्यांच्या अंतःकरणाला

प्राप्त झालेली समाहितता, त्यांची सारासारविवेकाची शक्ति इत्यादि अनेक सद्गुण अशा पोथीलेखकांच्या अंगी होते हे आपोआप सिद्ध होते.

शेवटचे प्रकरण आणि अवयवछेद या दोन्ही प्रसंगांना कारणीभूत झालेला स्वामीवरील विचक्षण आरोप हा सर्व वाचकांचे लक्ष वेधून घेईल यात शंका नाही. यापूर्वी स्वामींच्या चरित्रावर व चारित्र्यावर आक्षेप घेणारांना तर त्यामुळे दुप्पट बळ चढल्यासारखे होईल. महानुभाव पंथाविषयी लौकिकात पसरलेल्या काही बऱ्यावाईट समजुती ह्या खऱ्याच असल्या पाहिजेत असेहि कित्येकांना वाटेल. माझ्या मते या आरोपामुळे स्वामींच्या चारित्र्यावर कोणत्याहि प्रकारचा वास्तव कलंक येऊ शकत नाही. आणि ही गोष्ट प्रस्तुत प्रसंगांचे आणि आरोपाचे वर्णन करतांना मीने स्पष्टपणे सूचित केलेली आहे. हा आरोप चक्रधरस्वामींच्या आयुष्यात अगदी शेवटी शेवटी निर्माण झाला होता हे लक्ष्यात घेतले पाहिजे. आणि त्याचे मुख्य कारण स्वामींच्या तत्त्वज्ञानामुळे आणि सामाजिक आचारविचारामुळे अन्य पंथातील धर्मधुरीणांची संपुष्टात येऊ लागलेली प्रतिष्ठा हे होय. स्वामींच्या अवयव-छेदापूर्वी त्यांचा प्राणघात करण्याचे जे प्रयत्न ब्रह्मसानू आणि महदाश्रम यांनी केले होते त्यांच्या मुळाशी स्वामींची चारित्र्यहीनता होती असे कोणी म्हणू शकेल काय? उलट, या दोन्ही व्यक्तींचे हादरलेले सामाजिक व राजकीय प्रतिष्ठेचे आसन हे त्याचे खरेखुरे कारण होते हे स्पष्ट दिसते. आणि अवयवछेदाच्या पूर्वीच्या आख्यायिका नीट तपासून पाहिल्या तर ' हे आमच्या मार्गु उच्छे-दिती ' ही महदाश्रमाला पडलेली भीति नजरेत भरते. अशा परिस्थितीत आपल्याशी मतभेद असणाऱ्या श्रेष्ठ पुरुषाच्या चारित्र्यावर शिंतोडा उडवून त्याची सामाजिक प्रतिष्ठा कमी करण्याचा प्रयत्न सर्वच सामान्य लोक करीत असतात. आतापर्यंतचा इतिहास पाहिला तर मत्सरदूषित दुर्जनांनी केलेल्या अशा आरोपाच्या कचाटीत अनेक मोठमोठे सज्जन सापडलेले दिसून येतात. जुन्या गोष्टी असोत, पण अगदी आधुनिक काळात डॉ. ॲनी बेझंट, स्वामी विवेकानंद, लोकमान्य टिळक, महात्मा गांधी यासारख्या सज्जनांना या दिव्यातून पार पडावे लागले आहे याची आठवण या ठिकाणी होणे अपरि-हार्य आहे.

डॉ. ॲनी बेझंटचे मराठी चरित्रकार श्री. रा. स. भागवत यांनी बेझंट चरित्रात स्पष्ट निर्देश केला आहे की "ब्रॅडलॉ व डॉ. बेझंट यांच्या नीतिमत्तेविषयी लोक वाटेल त्या कंड्या पिकवीत व भलभलती मते त्यांच्यावर लादीत." (पा. ५०). दुसऱ्या एका ठिकाणी ते लिहितात, "थिऑसॉफिकल सोसायटीतील बाईंचे सहकारी मि. लेडबीटर हे अनीतीने वागतात, त्यांनी माझ्या मुलाची नीति बिघडवलेली आहे...अशी भाषा या उपद्व्यापी गृहस्थांनी नारायण अय्याला पुढे करून बाईला ऐकवली व लोकातहि पसरवली....अनीतीचे सर्व आरोप अगदी खोटे होते." (पा. १३१). या दोन्ही अवतरणावरून डॉ. ॲनी बेझंट व तिचे सहकारी यांच्यावर त्यांना केवळ बदनाम करण्यासाठी त्यांच्या विरोधकांनी अनीतीचे आरोप कसे केले होते याची कल्पना येईल. विवेकानंदांच्या बाबतीतहि असाच प्रकार झालेला होता. अमेरिकेत स्वामी विवेकानंदाचा वाढत चाललेला लौकिक पाहून तेथील ख्रिस्ती मिशनऱ्यानी त्यांच्या चारित्र्यावर स्त्रीविषयक कलंक फासण्याला कमी केले नाही. विवेकानंदांचे बंगाली चरित्रकार श्री. सत्येंद्रनाथ मुजुमदार लिहितात, "समस्त संयुक्त संस्थानभर व्यापलेली स्वामीजींची अप्रतिहत प्रतिष्ठा पाहून आणि त्यांना आपल्या अर्थोपार्जनातील विघ्न समजून कित्येक हीन अंतःकरणाच्या मिशनऱ्यांनी शहरोशहरी त्यांची निंदा करीत सुटण्याचा उपक्रम केला...स्वामीजींच्या पवित्र चारित्र्यावर फक्त कलंकारोप करूनच ते थांबले नाहीत तर सुंदर सुंदर तरुण स्त्रियांना पैसे देऊन वश करून घेऊन स्वामीजींना प्रलोभित करण्याचा ते प्रयत्न करू लागले" (विवेकानंद चरित. पा. १५३). हा आरोप विवेकानंदावर करता येईल अशी बाह्य परिस्थितिहि होती. चक्रधरस्वामींच्या भोवती स्त्रियांचा जसा गराडा पडलेला असे (आणि तो पाहूनच सारंगपंडिताच्या व इतर ब्राह्मणांच्या मनात विकल्प उत्पन्न झाला होता ना !) तसाच विवेकानंदाभोवतीहि असायचा. अमेरिकेतील आपल्या व्याख्यानाविषयी स्वामी विवेकानंदांनीच एका खाजगी पत्रात असे लिहिले आहे की, "माझ्याशी येथल्या स्त्रियांची वर्तणूक इतकी दयाळूपणाची आहे की खरोखर तिचे मोल करता येत नाही. आपल्या घरी बोलावून सर्व प्रकारे त्या माझे आदरातिथ्य करीत असतात. माझ्या खाण्यापिण्याची सोय त्यांनीच लावली आहे.

व्याख्यानांचीहि सर्व व्यवस्था त्याच करतात. त्याच मला बाजारात घेऊन जातात आणि माझ्या सुखसोईंची सर्व व्यवस्था त्याच करतात." (विवेकानंद. खंड. ६ पा. २९३ ). आपल्या एका व्याख्यानाच्या वेळचे वर्णन वृत्तपत्रातील उतारा देऊन विवेकानंदानी कळविले ते असे : " स्त्रिया, स्त्रिया, स्त्रिया. जिकडे तिकडे स्त्रियांची गर्दी उसळून गेली होती. कोनाकोपऱ्यातूनहि स्त्रिया खेचून भरल्या होत्या." याला एक कारण " सुंदर व जादूने भरलेल्या चेहऱ्याच्या या मनुष्याचे वक्तृत्व आश्चर्यजनक असून "...वगैरे. ( खंड ५ पा. २८७ ). चक्रधरस्वामींचे सौंदर्य आणि वक्तृत्व असेच आकर्षक होते, याचे या ठिकाणी स्मरण होणे अपरिहार्य आहे. वेश्यांच्या आळीतून एकदा जात असताना एका वेश्येने हाक मारल्यामुळे तिच्या घरी जाऊन चक्रधरांनी तिच्या हातचा विडा स्वीकारला. स्वामी विवेकानंद हे तर वेश्याच्या आळींतच राहत असत. " वयाच्या तेहतिसाव्या वर्षी वारांगनांच्या भर अड्ड्यात राहूनहि त्यांच्याबद्दल धिक्काराचा एक शब्दही मी वापरला नाही " असे त्यांनीच आपल्या एका खाजगी पत्रात लिहून ठेवले आहे. ( खंड ११, पा. १९५ ). अशा परिस्थितीत अमेरिकेमधे स्त्रियांच्या घोळक्यात वावरत असतांना विवेकानंदांना बदनाम करण्यासाठी ख्रिस्ती मिशनऱ्यांनी व्यभिचाराचा आरोप त्यांच्यावर ठेवला तो केवळ त्यांच्या लौकिकाविषयी निर्माण झालेल्या मत्सरबुद्धीमुळे !

विवेकानंद स्त्रियांच्या घोळक्यात तरी वावरत; पण लोकमान्य टिळक ? पण त्यांच्यावरहि ताईमहाराजांनी असा हीन आरोप कोर्टात केलाच की नाही ? तो ऐकून घरी आल्यावर लोकमान्यांच्या तोंडून " एखादी बाजारबसवी स्त्रीदेखील आपली बेअब्रू तोंडाने कबूल करीत नाही, झाकून ठेवते. पण एवढ्या मोठ्या सरदार घराण्यातील स्त्री निष्कारण आपली बेअब्रू आपल्या तोंडाने खोटे बोलून दाखविते तेव्हां तिला धिक्कार असो ! " असे उद्गार बाहेर पडले. ताईमहाराजांनी लोकमान्यावर केलेला आरोप धादांत खोटा होता; पण त्यांची बदनामी करण्यासाठी तो केला गेला हीच गोष्ट येथे प्रस्तुत आहे. लोकमान्याप्रमाणे महात्मा गांधीहि अशा आरोपाच्या वादळात सापडले होते याचे स्मरण अनेकांना असेल. काका कालेलकरांनी प्रसिद्ध केलेल्या ' प्रसाददीक्षे 'च्या निमित्ताने काही मराठी साप्ताहिकातून महात्मा–

जींच्या विरक्तीविषयी संशय घेऊन त्यांच्या आश्रमातील अनेक जुन्यानव्या सेविकांच्या बरोबर महात्माजींचा वाईट संबंध सूचित करणारे लेख लिहिले गेले होते. या आरोपांना उत्तर म्हणून महात्माजींनी हरिजन मधे स्वतंत्र लेख लिहून त्यांत “ माझ्या ठिकाणी स्त्रीविषयक आसक्ति असेल तर या वयातहि अनेक बायका करण्याचे धैर्य माझ्यात आहे ” अशा आशयाचे उद्‌गार त्यांनी काढले होते. ( “ If I were sexually attracted towards women, I have courage enough, even at this time of life, to become polygamist. I do not belive in free love-secret or open ” ... Harijan. 4--11--1939 ). महात्माजींचे हे वाक्य वाचले म्हणजे चक्रधरस्वामींच्या एका उद्‌गाराची आठवण झाल्यावाचून राहत नाही. आपल्या संबंधी या बाबतीत बाइसाजवळ बोलतांना चक्रधरस्वामी म्हणाले होते : “ बाई : एथ जरी प्रऊर्ते असे तरी देवलोकीहुन देवकन्या नाणीजती ? ” ( श्री पाठ समुदाय. शोधनी विचार-पाठान्वय. पा. ८४ ). याचा भावार्थ असा की, “ आमच्या मनात स्त्रियांचा उपभोग घेण्याची इच्छाच असती तर मृत्युलोकीच्या ह्या कुरूप स्त्रियांचा उपभोग घेण्यापेक्षा स्वर्गातील स्वरूपसुंदर देवकन्यांना आम्ही आणले नसते काय ? ...पण त्याची आवश्यकता नाही. कारण आमच्या मनात उपभोगाची मुळी वासनाच नाही. ”

डॉ. बेझंट, स्वामी विवेकानंद, लो. टिळक, महात्मा गांधी इत्यादि लोकोत्तर पुरुषांचे जीवनचरित्र पाहिले आणि त्याच्या पार्श्वभूमीवरून त्यांच्यावर घेतल्या गेलेल्या आरोपांचा विचार केला म्हणजे हे आरोप केवळ त्यांना लोकांच्या दृष्टीने कलंकित करण्यासाठी घेण्यात आले होते असे स्पष्ट दिसेल. चक्रधरस्वामींच्या चारित्र्यावरील आरोपहि असेच होते. केवळ संशयाच्या दृष्टीनेच पाहिले तर अशा आरोपांना अनुकूल अशी भूमिका नव्हतीच असे कुणालाहि म्हणता यायचे नाही. ब्रॅडलॉ व वेडबीटर यांच्याबरोबर डॉ. बेझंटबाईचा दीर्घकाल आलेला संबंध, अमेरिकन स्त्रियांच्या घोळक्यात विवेकानंदांचा निरंतर संचार, ट्रस्टी या नात्याने ताई महाराजासारख्या तरुण विधवेशी टिळकांचा आलेला संबंध, महात्मा गांधींच्या आश्रमातील सुंदर

स्त्रिया, त्यांच्याकडून होणारी महात्माजींची परिचर्या, मुलींच्या खांद्यावर हात ठेवून त्यांचे फिरायला जाणे इत्यादि गोष्टी विकृत दृष्टीच्या माणसांच्या आक्षेपाला पुरेशा होतात. पण अशा संशयास्पद वातावरणातच सज्जनांचे धैर्य कसोटीला लागते. ‘ विकारहेतौ सति विक्रियन्ते येषां न चेतांसि त एव धीराः ’ हे कालिदासाचे उद्‌गार किती यथार्थ आहेत ! चक्रधरस्वामींच्या भोवतालची परिस्थिति सामान्य माणसाच्या दृष्टीने अशी संशयास्पद असली तरी सूक्ष्म दृष्टीने निरखून पाहिल्यास त्यांच्याकडून प्रत्यक्ष अनैतिक कृत्य घडून आलेले नाही असे स्पष्ट दिसून येते. चरित्रलेखनाच्या दृष्टीने भोवतालची परिस्थिति, तीत चक्रधरांचे झालेले वर्तन, त्यावरील सामाजिक प्रतिक्रिया आणि त्याचा राजकीय परिणाम वर्णन करणे माझे कर्तव्य होते, हे लक्ष्यात ठेवून वाचकांनी ही प्रकरणे वाचावी.

दुसरीहि एक गोष्ट या ठिकाणी विचारात घेतली पाहिजे. चक्रधरस्वामींच्या चारित्र्यावर आरोप ठेवला गेला व त्याबद्दल त्यांना त्यावेळच्या समाजधुरीणाकडून शिक्षाहि करण्यात आली हे खरे आहे. पण त्यावरून हा आरोप खरा होता असे मानण्याचे कारण नाही. तसे असते तर त्यांच्या प्रयाणानंतर महाराष्ट्रात महानुभावपंथाची पाळेमुळे खणून निघाली असती. पण तसे न होता उलट हा संप्रदाय एकसारखा वाढत गेला. त्याकडे आकृष्ट झालेले पुरुष अत्यंत विद्वान आणि विरक्त होते. नागदेवाचार्य, बाइदेवबास, भास्करभट्ट बोरीकर, केसोबास, म्हाइंभट वगैरे व्यक्तींची चरित्रे पाहिली म्हणजे विरक्तीची त्यांच्या ठिकाणी परमावधी झाली होती असे दिसून येईल. या विद्वान विरक्ताप्रमाणेच सामान्य लोकातहि या मार्गाचा झपाट्याने प्रसार झाला. इतका की तो थोपवून धरण्यासाठी ज्ञानेश्वरांना भागवत संप्रदायाची नवीन फळी उभारावी लागली. ज्या रामदेवराव यादवाने चक्रधरस्वामींना शिक्षा केली त्याच्याच घरात पुढे या संप्रदायाचा प्रवेश झाला. चक्रधरांच्या प्रयाणानंतर त्यांच्या मार्गाचा झालेला हा प्रसार व उत्कर्ष लक्ष्यात घेतला म्हणजे त्यांच्यावरील आरोप फोल होते याची खात्री पटेल. आता, एखादा मनोगाहनशास्त्री या सर्व प्रकाराकडे कोणत्या दृष्टीने पाहील हे मात्र सांगता येत नाही. चक्रधराप्रमाणेच वर उल्लेखिलेल्या डॉ. बेझंट, विवेकानंद, टिळक, महात्मा गांधी इत्यादिकांच्या मनोवृत्तींचे तो आपल्या या शास्त्राच्या दुर्बिणीतून

निरीक्षण करायला लागला तर त्याला तसे करण्याचा आजच्या युगात पूर्णपणे अधिकार आहे. त्यामुळे मानवी मनोव्यापारावर फार चांगला प्रकाश पडू शकेल यात शंका नाही. पण त्यामुळे या लोकोत्तर पुरुषांच्या लौकिकाला कोणत्याहि रीतीने बाध येईल असे वाटत नाही.

असो. चक्रधरांच्या चारित्र्यावरील आक्षेपाचे हे विवेचन लांबले खरे, पण ते आवश्यक होते. एका विशिष्ट संप्रदायाचे संस्थापक म्हणून स्वामींच्या जीवनाकडे आणि तत्त्वज्ञानाकडे अनेक दृष्टींनी पाहता येणे शक्य आहे आणि आवश्यहि आहे. पण या चरित्रग्रंथात त्या सर्वांचाच समावेश करणे इष्ट नव्हते, आणि स्थलाभावामुळे शक्यहि नव्हते. महानुभावेतर वाचक मला याबद्दल क्षमा करितील अशी मी आशा बाळगतो. इतर लहानमोठ्या स्फुट लेखांच्या रूपाने ते काम यापुढे यथावकाश होईल, एवढेच आश्वासन मी देतो. तथापि, महानुभाव पंथाच्या या प्रवर्तकाकडे कोणत्याहि दृष्टीतून पाहण्यापूर्वी त्याच्या जीवनचरित्राची पार्श्वभूमि कळणे सर्वांना अवश्य होते. ती त्यांची जिज्ञासा माझ्या या पुस्तकाने थोड्याफार प्रमाणात तरी तृप्त होईल अशी मी अपेक्षा करतो.

प्रस्तुत चरित्र लिहिण्याच्या कामी मला अनेकांचे साह्य झालेले आहे. कोणतीहि पोथी मागताच तिचा निरलसपणे शोध करून ती माझ्या स्वाधीन करणारे महंत श्रीगोपीराज महानुभाव यांचे आभार कोणत्या शब्दात मानावे तेच कळत नाही. महानुभावांच्या हस्तलिखितांचा संशोधनपूर्वक संग्रह करून तो अभ्यासकांना उपलब्ध करून देण्याच्या कामी महंत श्रीदत्तलक्षराज कवीश्वर, माहूर! आणि महंत श्रीगोपीराज महानुभाव, रितपुर या महानुभावांनी घेतलेले श्रम अपूर्व होत. महानुभावीय वाङ्मयाच्या प्रकाशनाला यांचेच श्रम प्रामुख्याने कारणीभूत झालेले आहेत. मला या दोन्ही महंतांनी बहुमोल मदत केली आहे. गेल्या पाचसहा वर्षांपासून हे कार्य अत्यंत आपुलकीने आणि प्रेमाने महंत गोपीराज महानुभाव यांच्याकडूनच होत आहे. केवळ आभार मानून त्यांचे उतराई होणे शक्य नाही, हे मी जाणतो. त्यांच्याप्रमाणेच महंत श्रीमुरलीधर शास्त्री आराध्ये ( भुसावळ ), महंत श्रीबाळकृष्णशास्त्री ( माहूर ), महंत श्री प्रभाकरशास्त्री यक्षदेव,

महंत श्री दत्तराज पाचराऊत, महंत श्री तळेगावकर इत्यादि महानुभावांनीहि मला फार मदत केली आहे. त्या सर्वांचाच मी अत्यंत ऋणी आहे. त्यांचे साह्य यापुढेहि असेच निरंतर व्हावे ही त्यांना माझी नम्र विनंती आहे. या महानुभाव महंतांप्रमाणेच वृत्तीने व आचरणाने यथार्थतः 'महानुभाव' असलेले माझे साधुशील सन्मित्र श्री. हरिभाऊ नेने यांच्या ऋणाचाहि निर्देश अवश्य केला पाहिजे. विवाद्य प्रश्नांच्या बाबतीत हस्तलिखित पोथ्या कितीहि पाहिल्या तरी प्राथमिक अभ्यासासाठी व वारंवार वाचण्यासाठी त्यांनी मुद्रित केलेल्या लीळाचरित्राच्या भागांचा मला फार उपयोग झाला. शिवाय, अनेक वेळा चर्चा व विचारविनिमय करून त्यांनी मला बहुमोल मदत केलेली आहे. त्यांना त्याबद्दल कितीहि धन्यवाद दिले तरी ते थोडेच होतील.

शेवटी माझे धाकटे बंधु श्री. जगन्नाथभाऊ यांचा उल्लेख अवश्य केला पाहिजे. बाजारात ज्यांना फारशी मागणी नाही अशा माझ्या पुस्तकांच्या प्रकाशनाची आर्थिक जबाबदारी स्वीकारण्यास प्रत्येक वेळी अत्यंत आपुलकीने ते पुढे आले नसते तर माझे सुभाषित माझ्या अंगातच जिरून गेले असते यात शंका नाही. आर्थिक जबाबदारीप्रमाणेच मुद्रणाच्याहि बाबतीत माझ्या दिरंगाईमुळे व वारंवार मजकुरात फेरफार करण्यामुळे त्यांना फार सहनशीलता दाखवावी लागते. या बाबतीतले त्यांचे श्रम वर्णन करता येणे शक्य नाही. तेव्हां धाकटे बंधु असले तरी मला वेळोवेळी 'प्रकाशा'त आणण्याचे त्यांचे श्रेय प्रगटपणे या ठिकाणी निर्देशिणे मी माझे कर्तव्यकर्म समजतो.

—वि. भि. कोलते.

१

# पूर्ववृत्त

गुजराथ प्रांतातील भरवस नावाच्या गावी एक राजा[१] राज्य करीत होता. त्याच्या प्रधानाचे नाव विशाळदेव. या विशाळदेवाच्या पत्नीचे नाव माल्हाइसा असे होते. विशाळदेव व माल्हाइसा या भाग्यशाली दांपत्याला एक मुलगा झाला[२]. त्या मुलाचे नांव त्यांनी हरिपाळदेव असे ठेवले. हा हरिपाळदेव म्हणजेच आपले चरित्रनायक श्रीचक्रधर स्वामी यांचा पूर्वावतार होय.

विशाळदेव आणि माल्हाइसा यांच्या प्रेमळ कृपाछत्राखाली हरिपाळदेव लहानाचा मोठा होत होता. काही कालावधीनंतर विशाळदेवाने हरि-

---

१. लीळाचरित्राच्या वाईदेशकर पाठात या राजाचे नाव मल्लदेव असे/ दिले असून त्याच्याविषयी विशेष माहिती पुढीलप्रमाणे नमूद केली आहे. या मल्लदेवाला भड ऋषींचा शाप होता. म्हणून त्याला पुत्र होत नव्हता. त्यामुळे त्याने एका मुलाला पालकपुत्र म्हणून जवळ बाळगले होते. या पालक पुत्राला विशाळदेवाच्या स्वाधीन करून मल्लदेव मृत्यु पावला.

२. वाईदेशकर पाठात पुढील माहिती आहे. विशाळदेवाला बरेच दिवस पर्यंत मुलगा होत नव्हता. मुलगा व्हावा म्हणून त्याने पुष्कळ देव-धर्म, नवस-सायास केले. पण त्यांचा काही उपयोग झाला नाही. मग तो वाराणशीला जाण्यासाठी बाहेर पडला. मार्गात एका अवधूताच्या वेषाने त्याला श्री दत्तात्रेय प्रभूने दर्शन दिले. विशाळदेवाने श्रीदत्तात्रेयाची पूजा केली. आणि आपणाला पुत्र व्हावा म्हणून त्याची त्याने प्रार्थना केली. प्रसन्न होऊन श्रीदत्तात्रेयांनी त्याला पुत्रप्राप्तीचा वर दिला. त्यामुळे आनंदित होऊन विशाळदेव भरवसला परत आला. तदनंतर यथाकाळ विशाळदेवाला माल्हण देवीपासून मुलगा झाला. तोच हरिपाळदेव होय.

पाळाचा विवाह कमळाइसा नावाच्या एका लावण्यमयी मुलीशी लावला. हरिपाळदेव मोठ्या आनंदात कालक्रमणा करू लागला. बहराला आलेल्या आपल्या तारुण्याच्या ऊर्मीत लावण्यचंद्रिका कमळाइसेवर तो विशेष अनुरक्त झाला होता यात आश्चर्य ते कसले ? तिच्यावर त्याचे प्राणापलीकडे प्रेम होते. तथापि आपल्या प्रियतमेच्या प्रेमात आणि प्रणयातच जो समाधान मानून राहील तो श्रीमंताचा मुलगा कुठला ? विशाळदेवाच्या कृपेने हरिपाळ-देव वैभवात लोळत होता. सुखविलासाच्या साधन-संपत्तीची त्याला मुळीच उणीव नव्हती. पैशाचा पूर त्याच्या समोर नेहमी वाहत होता. या परिस्थि-तीत त्याला द्यूताचे व्यसन जडले हे स्वाभाविक होय. सोंगट्याचा डाव मांडून द्यूत खेळण्याचा त्याला छंद लागला. आणि हा छंद, केवळ राणीवसा व राजवाडा यांच्या मर्यादात असता तर गोष्ट वेगळी होती. पण छांदिष्ट लोकांना कोणत्याहि मर्यादेचे बंधन कसे मानवणार ? हरिपाळदेव या नियमाला अपवाद नव्हता. द्यूत खेळण्याच्या नादामुळे तो भरवस मधील जुवेबाजांच्या अड्डयावर दररोज जाऊन द्यूत खेळू लागला.

असे असले तरी हरिपाळदेवाने कधी अन्याय्य किंवा असभ्य आचरण मात्र केले नाही. याचे कारण असे की तो स्वभावताच सत्प्रवृत्त आणि भावुक अंतःकरणाचा होता. गोपाळ मंत्राची त्याने दीक्षा घेतलेली होती; यावरून तो श्रीकृष्णाचा सेवक होता हे दिसून येते. गोपाळ कृष्णाचा तो नुसता सेवकच नव्हे तर परम भक्त होता. केव्हांहि शपथ घ्यायची असली म्हणजे हरिपाळदेव नेहमी गोपाळाची शपथ घेत असे यावरून हे दिसून येईल. असा हा श्रीकृष्णाचा सेवक, कमळाइसेबरोबर क्रीडा करण्यात आणि द्यूत खेळण्यात आपल्या तारुण्याचा काळ कंठू लागला.

पण मधेच हरिपाळदेवाची प्रकृति एकदम बिघडली. त्याला काही रोग झाला. या रोगाने पाचसात दिवसातच आपला प्रभाव गाजवून हरिपाळ-

---

१. हरिपाळदेवाला मृत्यु येण्यापूर्वी त्याच्या आयुष्यात दोन महत्त्वाचे प्रसंग घडल्याचे वाइंदेशकर पाठात वर्णन केले आहे. ते प्रसंग असेः (१) 'हरिपाळदेवाचा विवाह झाला. नंतर त्याच्या वयाच्या बाविसाव्या वर्षी सिंघण राजाचे सैन्य गुजराथ-वर चालून आले. सिंघणाने जगळदेव, वीझदेव, मार्यादेव यांना स्वारीवर पाठवले होते. हे ऐकून विशाळदेवानेहि त्यांच्याशी युद्ध करण्याकारिता आपले सगळे [ पुढे

देवाला काळाच्या विक्राळ दाढेत ओढून नेले. हरिपाळदेवाला मृत्यु आला. त्यावेळी विशाळदेव व माल्हाइसा यांना व कमळाइसेला झालेल्या शोकाचे काय वर्णन करावे? पण सामान्य जीवांनी मृताप्रीत्यर्थ कितीहि शोक केला तरी त्याचा उपयोग काहीच होत नाही. शेवटी हरिपाळदेवाचे मृत शरीर स्मशानात नेण्यासाठी तयारी सुरू झाली. तिरडीवर त्याचा देह करकचून बांधून तो स्मशानाकडे चालविला. प्रेतयात्रा स्मशानात येऊन पोचली. तिरडी खाली ठेवण्यात आली. सरण रचून तयार झाले आता थोड्या वेळाने हरिपाळदेवाचे मृत शरीर त्यावर ठेवणार तोच........

अचिंत्यानंत ईश्वराला अवतार स्वीकारण्याची प्रवृत्ति झाली. सामान्यतः ईश्वर तीन निरनिराळ्या रीतींनी अवतार स्वीकारतो. एक तर एखाद्या मातेच्या उदरात तो गर्भावतार घेतो; किंवा एखाद्या मातेच्या उदरात वाढत असलेल्या गर्भाला दवडून तेथे तो स्वतः व्यापतो आणि 'दवडण्याचा' अवतार घेतो; किंवा एखाद्या मृत देहात प्रवेश करून, अर्थात् पतितोत्थापन करून तो 'पतित' अवतार स्वीकारतो. या तीन प्रकाराखेरीज चौथ्या कोणत्याहि रीतीने तो कधीच अवतरत नाही. यावेळेस ईश्वराने पतितावतार घेण्याचे ठरविले; आणि तोहि हरिपाळदेवाच्या मृत शरीरात प्रवेश करून! त्याला तशी प्रवृत्ति होताक्षणीच त्याच्या प्रवृत्तीची वाट पाहत सदा तिष्ठत असलेल्या मायेला त्याने ती जाणवली आणि तिने चटदिशी हरिपाळदेवाचे मृत शरीर व्यापून ते नखशिखांत शुद्ध केले. आणि त्या मायाव्याप्त शरीरात ईश्वराचे अव्यक्त स्वरूप व्यापले.

---

**चालू**] सैन्य त्यांच्यावर रवाना केले. बरोबर आपला जूझमल्ल नावाचा प्रधानहि पाठविला. दोन्ही सैन्यांची गाठ पडून त्यात विशाळदेवाच्या सैन्याचा पराभव झाला. त्यानंतर हरिपाळदेवाने सिंघणाच्या सैन्यावर चालून जाण्याची तयारी केली. पूर्वेकडील दरवाज्या बाहेर तंबू ठोकले गेले. घोडदळ व हत्तींचे दळ एकत्रित केले. या तयारीचा वृत्तांत ऐकूनच यादवांचे सैन्य गुजराथेतून परत फिरले. पण आता हरिपाळदेव त्यांचा पाठलाग करू लागला. त्याने जगळदेव व वीझदेव यांचा पराभव केला. ठाणी बसवीत बसवीत तो वेरूळपर्यंत पोचला. तेव्हां सिंघणाने त्याजबरोबर तह केला. मग हरिपाळदेव परत आला'. (२) हरिपाळदेव पंचवीस वर्षांचा झाला त्यावेळी पुन्हा गुजराथवर शत्रूंची स्वारी झाली. या स्वारीत युद्ध करता करता हरिपाळदेवाच्या डोळ्याला (भिवइवर) व्रग झाला.

तो काय चमत्कार सांगावा ! विशाळदेवाच्या समोर, स्मशानात पडून असलेल्या हरिपाळदेवाच्या मृत शरीरात ईश्वरस्वरूप प्रविष्ट होताक्षणीच, त्या प्रेतात प्राण आला. त्याने डोळे उघडले. सरणावर ठेवण्यासाठी त्या प्रेताकडे चार मंडळी पाहतात तो काय ? प्रेताने डोळे उघडलेले ! त्यांनी एकदम हर्षाने टाळी पिटली आणि ते म्हणाले,

'हरिपाळदेव मेला नाही. जिवंत आहे ! जिवंत आहे !'

हे ऐकताच व पाहताच विशाळदेवाला किती आनंद झाला असेल ? तिरडीचे बंध तटातट तोडून टाकण्यात आले. हरिपाळदेव उठला. पितापुत्रांचे कंठालिंगन पडले. मोठ्या महोत्सवाने त्या सर्वांनी शहरात प्रवेश केला. हरिपाळदेव जिवंत असलेला पाहून माल्हाइसेच्या आणि कमळाइसेच्या आनंदाला तर पारावारच नव्हता. पहिलीचे पुत्रप्रेम आणि दुसरीचे पतिप्रेम त्यावेळी उचंबळून डोळ्यातून आनंदाश्रूंच्या रूपाने वाहू लागले असल्यास आश्चर्य वाटायला नको.

---

१. वाइंदेशकर पाठातील मजकूर पुढीलप्रमाणे आहे 'प्रधान पुत्राचे देह गेले : तया कारणे माड केले : नगरातुनि बाहिरि आनिले : नगर विसावा दीधला : मग वाद्यंत्र नादेसी नीघाले : ऐसे गावापूर्वे नैत्रिये थडिये रूद्रभूमिका : तेथ सत्याचा वड होता : तेथ ते प्रधान कुमराचे देह स्मशानासि आनिले होते : एरीकडे कमळाराणी सती रीगावेया गावामाजी मीरवावेया आइती करीत होती : तव ते पतित एणे उठऊनि स्वीकारिले : तव वस्त्र हालीनले : का हालीनले भणौनि : उत्थानपिंड देयावेया कारणे : आन पुत्रमुख पाहावेया कारणे तोंड उघडौनि पाहिले : तव एणे डोळे उघडीले : तव तेज फाकले : सजीव भाव आले ते जाणवले : वास पाहो लागले : तव लोकी ऐसे देखौनि भणितले : आरे वास पाहताए : कुमरू नाही निवर्तला : आन भणितले : कुमर जियाला : वाद्यंत्रे लागली : मढतुर वाजते होती तिये सुहावी वाजो लागली : विक्रम संवत्सरी भाद्रपद मासी शुक्लपक्षी बीजेसी शुक्रवारी एणे पुर स्वीकारीले : हरीखु जाला : कुमरू जियाला भणौनि एक प्रधानाजवळा सांघो गेले : प्रधान तेथ आला' ......

यात कमळाइसा सती जाण्याची तयारी करीत होती हा विशेष मजकूर आहे. पुत्रमुख पाहण्यासाठी आणि उत्थानपिंड देण्यासाठी विशाळदेवाने हरिपाळाच्या प्रेतावरील वस्त्र काढले म्हणून आधी म्हटले आहे. अर्थात्, त्यावेळी विशाळदेव स्मशानात होता पण शेवटी शेवटी हरिपाळदेव जिवंत झाल्याची वार्ता विशाळदेवाला कळवली आणि मग तो तेथे आला असे म्हटले आहे. यावरून काय समजायचे ? हा दुसरा मजकूर चुकीचा आहे. यात शंका नाही.

आपला पुत्र जिवंत झाल्यामुळे विशाळदेवाला अपरिमित आनंद झाला होता यात शंकाच नाही. तथापि हा आपला हरिपाळदेवच आहे की त्याच्या मृत शरीरात दुसऱ्याच कुणी प्रवेश केला आहे , अशी शंका त्याच्या मनात आल्यावाचून मात्र राहिली नाही. त्याने शोध घेण्याचे ठरविले. गावा-गावातून, रानावनातून, दरीदरकुऱ्यातून माणसे पाठवून त्याने शोध घेतला. पण त्यावेळी कोणी शरीर--त्याग केल्याचे त्याच्या आढळात आले नाही. माल्हाइसेला सांगून त्याने कमळाइसेकडून त्या जिवंत झालेल्या हरिपाळदेवाची परीक्षा पाहिली. एकांतात कमळाइसेने त्याला आपल्या विलासाच्या पूर्वस्मृति विचारल्या. हरिपाळदेवाने यथायोग्य अशीच उत्तरे दिली. त्यावरून विशाळ-देवाची खात्री पटली की हा आपला हरिपाळदेवच आहे; त्याच्या मृत शरीरात प्रवेश केलेला दुसरा कुणी नव्हे. या खात्रीमुळे त्याला समाधान वाटले.

तथापि, विशाळदेवाचे समाधान झाले असले तरी वस्तुस्थिति काय होती? स्मशानात जिवंत झालेला हरिपाळदेव हा पूर्वीचा हरिपाळदेव नव्हता. त्याच्या शरीरात पूर्वी एक सामान्य जीव व्यापून होता. आजाराने विकल झालेल्या त्या शरीरातून तो केव्हांच निघून गेला होता. आताच्या हरिपाळ-देवाचे शरीर पूर्वीचेच होते; पण त्यात पूर्वीचा जीवात्मा नसून तेथे जीवोद्धरण-व्यसनी परब्रह्म परमेश्वराचे व्यक्त स्वरूप व्यापले होते. पूर्वीचा पार्थिव प्रपंचाचा देह आता मायेने व्याप्त व शुद्ध केलेला होता. आणि त्या मायापुरात ईश्वर अवतरलेला होता. अज्ञान विशाळदेवाच्या दृष्टीने जिवंत झालेला हरिपाळदेव पूर्वीचाच होता; पण वस्तुतः तो ईश्वरावतार होता.

विशाळदेव, माल्हाइसा, कमळाइसा इत्यादींना हा आपला पूर्वीचाच हरिपाळदेव वाटणे साहजिक होते. कारण त्याच्या ठिकाणी पूर्वीची सगळी चिन्हे होती; पूर्वीच्या सगळ्या स्मृति होत्या. मृतावस्थेचा काळ हा झोपेचा मानला तर पूर्वीच्या व आताच्या हरिपाळदेवात काहीहि फरक नव्हता. त्याचे गुणदोष, स्वभाव-विशेष वगैरे सगळे काही तेच होते. असे असण्याचे मुख्य

---

१. वाइंदेशकर पाठात 'प्रधान कुशल : सीहाना चतुर : प्रधाने भणितले जे तो हा नव्हे : सिद्धसाधकाचा ठाइ का परमेश्वरावताराचा ठाइ परकायाप्रवेश असे तेही भोगाकारणे स्वीकरले अते : प्रस्तुत तरी कंथाडिनाथाचा ठाइ परकायाप्रवेश असे' असे म्हटले आहे.

कारण हे की ईश्वराने हरिपाळाचा देह स्वीकारल्यानंतर त्याचे सर्व देहधर्म आणि जीवधर्महि स्वीकारले. पूर्वीच्या 'जीव' स्वरूप हरिपाळदेवाला गोपाळ मंत्राची दीक्षा होती, गोपाळाची शपथ घेण्याची सवय होती, त्याची आपल्या लाडक्या कमळाइसेवर आत्यंतिक प्रीति होती आणि त्याला द्यूताचे व्यसन होते. या सर्व गुणधर्मांचा ईश्वरावताराने आता स्वीकार केला होता. आणि त्यामुळे पूर्वीच्या हरिपाळात व आताच्या हरिपाळात विशाळदेवादिकांना फरक वाटला नसल्यास आश्चर्य नाही ! हरिपाळदेवाच्या मृत शरीरात प्रवेश करून ईश्वराने घेतलेला हा अवतार सर्वस्वी नवीन अवतार होता असे मात्र नाही. तर परमेश्वरावतार द्वारावतीकार चांगदेवराउळ त्यांचाच हा पुनरावतार होय.

ईश्वरावतार हरिपाळदेवाचा पूर्वीच्याच हरिपाळदेवाप्रमाणे संसार पुन्हा सुरू झाला. गोपाळकृष्णाची भक्ति करून कमळाइसेच्या सहवासात त्याचा काळ आनंदात जाऊ लागला. दांपत्य–सुखाच्या वेलीला पुत्रजन्माचे फळहि लौकरच लागले. तेव्हां त्यांचा आनंद जणु शिगेला चढल्यासारखा झाला. या मुलाचे नाव महीपाळदेव ठेवण्यांत आले. हरिपाळदेवाला पूर्वीपासून द्यूताचे व्यसन होते, ते आता विशेष वाढले. ते दररोज द्यूत खेळू लागले. जुवेबाजांच्या अड्ड्यावर त्यांचे जाणेयेणे होऊ लागले. जुवा खेळण्यामधे अत्यंत पटाईत असल्यामुळे दररोज ते पुष्कळ द्रव्य जिंकत. आणि जिंकलेले सर्व द्रव्य तेथल्या लोकामधेच वाटून देत. एके दिवशी मात्र ते डाव हरले. एकामागून एक डाव हरल्यामुळे आपल्याजवळील सगळे द्रव्य ते गमावून बसले. पण जवळ द्रव्य नसले म्हणून काय झाले ? ते उधारीने खेळू लागले. त्यातहि ते पुष्कळसे द्रव्य हरले. शेवटी इतर जुवेबाजांनी त्यांना म्हटले,

"महाराज, आपणाकडे आमचे किती द्रव्य येणे झाले हे आधी पहा आणि मग पुढे खेळा." हरिपाळदेवाने पाहिले तो त्याच्या लक्ष्यात आले की त्याला पुष्कळच द्रव्य द्यायचे होते. आपल्या हातातील सोंगट्या टाकून देऊन द्यूतकारांनी हरिपाळदेवांना आग्रह केला की "महाराज, जुव्यातील द्रव्य जुव्याच्याच ठिकाणी फेडले गेले पाहिजे ! तर कसेहि करून आधी आमचे देणे द्या कसे !" हरिपाळदेवाजवळच्या थैलीतील पैसा केव्हांच संपला होता. म्हणून त्याने आपल्या अंगावरील अलंकार काढून दिले; पण तरीहि देणे फिटेना. अजून त्यांचे पाचशे आसू द्यायचें राहिले. ते आणून देण्यासाठी म्हणून ते राजवा–

ड्याकडे जाऊ लागले. धनको जुवेबाजांचा तांडा त्यांच्या मागेच आला. ते राजवाड्यात प्रवेश करण्यासाठी उंबरठा ओलांडणार तोच त्या जुवेबाजांनी त्यांना पुन्हा अडवले आणि म्हटले, "महाराज, आधी आमचे द्रव्य द्या आणि मग राजवाड्यात प्रवेश करा. आपण एकदा आत गेल्यावर मग आमची दाद घेतो कोण ?" हरिपाळदेवांनी त्यांची समजूत काढली आणि त्यांना सांगितले,

"तुम्ही निश्चिंत असा. गोपाळकृष्णाची शपथ घेऊन मी सांगतो की तुमचे सगळे द्रव्य तुम्हाला दिल्यावाचून आज मी पोटात अन्नाचा एक कणहि जाऊ देणार नाही, मग तर झाले ना ?"

हरिपाळदेवांनी गोपाळकृष्णाची आण वाहिल्यानंतर त्या जुवेबाजांना खात्री कशी वाटणार नाही ? त्यांची समजूत पटली. त्यांनी हरिपाळदेवाला राजवाड्यात जाऊ दिले.

हरिपाळदेव तडक आपल्या मंदिरात गेले. तेथे त्यांची लाडकी राणी कमळाइसा मंचकावर बसलेली होती. ती आदरपूर्वक उठून उभी राहिली. हरिपाळदेव मंचकावर बसले; आणि तिला आंजारून गोंजारून थोड्या इकडच्या तिकडच्या गोष्टी केल्यावर हळूच म्हणाले,

"कमल, तुझे दागिने काढ पाहू."

"कशाकरिता ?" कमळाइसेने पृच्छा केली.

हरिपाळदेव म्हणाले, "आज द्यूतामधे मी पुष्कळ द्रव्य हरलो. इतरांचे देणे मला फेडायचे आहे. त्यांना मी आश्वासन दिले आहे की त्यांचे देणे देऊन टाकल्यावाचून मी आज भोजन करीन तर मला गोपाळकृष्णाची शपथ आहे म्हणून."

कमळाइसा आपले दागिने देण्यास कांकू करू लागली. ती म्हणाली, "हे दागिने मला माझ्या वडिलांनी करून दिले आहेत. ते मी तुम्हाला अशा कामासाठी देईन तर माझे वडील मला रागावणार नाहीत का ?"

हरिपाळदेव म्हणाले, "काही हरकत नाही. आतापुरते हे दागिने मला तू दे. मग मी तुला याहून अधिक व चांगले दागिने तयार करवून देईन."

तथापि कमळाइसाची समजूत पटेना. तिने दागिने देण्याचे साफ नाकारले. "मी दागिने देईन तर मलाही गोपाळकृष्णाचीच शपथ आहे." अशी आण तिनेहि वाहिली.

या उत्तरामुळे हरिपाळदेवाचा चेहरा खर्कन उतरला. तो अत्यंत उदास झाला. वरच्या माडीवर जाऊन तो तसाच पडून राहिला. घरात जेवणाची तयारी झाली. आंघोळीची चौकशी करण्यासाठी म्हणून माता माल्हाइसेने हरिपाळदेवाकडे सेवक पाठविला. त्याने विनंती केली. पण 'आज आपल्याला जेवायचे नाही; भूक नाही' म्हणून हरिपाळदेवाने परत निरोप पाठविला. हा निरोप ऐकून माल्हाइसेला काळजी वाटली. ती स्वतः हरिपाळदेवाला उठवायला आली. पहाते तो आपला लाडका मुलगा उदासवृत्तीने पडून राहिलेला. तिने त्याला उठवले पण तो उठला नाही. हा प्रकार आहे तरी काय, हे माहीत करून घेण्यासाठी माल्हाइसेने कमळाइसाला विचारले. तेव्हां तिने सगळी हकीकत सविस्तर सांगितली. तितक्यात राजवाड्यातून विशाळदेव येऊन पोचला. हरिपाळाचे जेवण वगैरे झाले की नाही याविषयी त्याने चौकशी केली. तेव्हां माल्हाइसेकडून त्याला सगळा वृत्तांत कळला. तो माडीवर गेला. त्याने हरिपाळदेवाला प्रेमाने उठवून बसविले आणि विचारले

"बेटा, आज अजून जेवला का नाहीस?"

हरिपाळदेवाने सांगितले, "आज मी जुवा खेळत असतांना फार द्रव्य हरलो. गोपाळकृष्णाची शपथ घेऊन त्यांना मी सांगितले आहे की त्यांचे द्रव्य दिल्यावाचून भोजन करणार नाही म्हणून."

त्यावर विशाळदेव म्हणाला, "मग त्यात एवढे काळजी करण्यासारखे काय आहे? अरे, मी हे एवढे ऐश्वर्य मिळवलेले आहे ते तुझेच नाही का?"

विशाळदेवाने आपल्या खजिन्यातून पैशांची थैली आणवली आणि द्यूतकारांचे जेवढे देणे होते तेवढे ताबडतोब त्यांच्याकडे पाठवून दिले. त्यानंतर हरिपाळदेवाचे जेवण झाले.

हा प्रसंग हरिपाळदेवांच्या आयुष्यात अतिशय महत्त्वाचा ठरला. जिच्यावर आपण प्राणापलीकडे प्रेम करीत आलो तिने आणीबाणीच्या प्रसंगी आपल्या भावनापेक्षा दागिन्यावर अधिक प्रेम दाखवावे आणि आपले मन सांभाळण्यापेक्षा आपल्या आईवडिलांचे मन सांभाळण्याची काळजी घ्यावी याबद्दल त्यांना अतिशय वाईट वाटले. आणि ते अगदी साहजिक होते. राजैश्वर्यात लोळणाऱ्या आपल्या प्रियकराची आज्ञा पाळण्यासाठी जिला आपल्या दागिन्यांचा मोह सोडवला नाही त्या कमळाइसेची योग्यता कमी होती असे म्हटल्यास काय चूक होईल ? कमळाइसेच्या या वागण्यामुळे हरिपाळदेवाच्या अंतःकरणात उदासीनतेने प्रवेश केला तो कायमचाच ! तो संसाराला विटला. क्रीडा–विहारात आणि भोग-विलासात काही 'राम' नाही असे त्याला वाटू लागले. सर्वांच्याच बरोबर तो विषण्णतेने वागू लागला त्याने आपल्या सगळया ऐश्वर्याचा आणि प्रियजनांचा त्याग करण्याचे ठरविले. पण हा त्याग करायचा कसा ? निमित्त कोणते शोधायचे ?

हरिपाळदेवांनी एक युक्ति शोधून काढली. नागपूर जवळील रामटेक हे त्यावेळी यात्रेचे एक मोठे प्रसिद्ध ठिकाण होते. तेथे रामयात्रेला जावे म्हणून त्यांनी विचार केला. आपल्या वडिलांना विचार कळवला. पण त्यांनी परवानगी दिली नाही. कारण त्यावेळी महाराष्ट्रातील यादव राजे आणि गुर्जराधिपती यांच्या मधे कलह सुरूच होता. रामटेककडे जातांना यादवांच्या मुलखातून जावे लागणार. ते तर त्यावेळी अनिष्ट होते. म्हणून विशाळदेवाने हरिपाळच्या विनंतीला मोडता घातला. 'आपण राजे लोक आहोत. आपण स्वतः यात्रेला जाणे ठीक नाही. राजे लोकांनी आपल्या सगळ्या धार्मिक क्रिया पुरोहिताच्या द्वारा करणेच चांगले. फार झाले तर आपण काही ब्राह्मणांना पुरोहिताबरोबर पाठवू. ते यात्रा करून येतील' अशा रीतीने विशाळदेवाने हरिपाळदेवाची समजूत घालण्याचा प्रयत्न केला; पण ती गोष्ट हरिपाळदेवाला मानवली नाही.

वडिलांच्या नकारामुळे हरिपाळदेवाला अतिशय वाईट वाटले. रामयात्रेला जाण्याची त्यांची इच्छा अधिक उत्कट झाली. त्यांनी जेवणखाण कमी केले. दररोज एकेका पदार्थाचा त्याग करीत शेवटी केवळ ताकभात

खाऊन ते राहू लागले. रामयात्रेला गेल्यावाचून नेहमीप्रमाणे भोजन न करण्याचा जणु त्यांनी निश्चय केला होता. या उपोषणामुळे हरिपाळदेवाची प्रकृति खालावली. ते कृश झाले. त्यांची ती अवस्था पाहून माता माल्हाइसेचे मन न दुखणे कसे शक्य होते ? हरिपाळाला रामयात्रेला जाऊ देण्याविषयी तिने स्वतः विशाळदेवाला विनंती केली. यादवांचीच भीति असेल तर मुलाच्या संरक्षणासाठी त्याजबरोबर घोडेस्वार व सेवक द्यावे असे तिने सुचविले. हरिपाळदेवाचा हट्ट व त्याची कृश झालेली मूर्ति लक्षात घेऊन माल्हाइसेने घातलेली भीड मोडणे विशाळदेवाला अशक्य झाले. त्याने हरिपाळदेवाला यात्रेला जाण्याची परवानगी दिली. घोडेस्वारांची आणि सर्व प्रकारच्या सेवकांची सोबत घेऊन हरिपाळदेव पालखीत बसून रामयात्रेला निघाले.

ते यात्रेला निघाले त्यावेळी त्यांच्या अंतःकरणात कोणत्या भावना उचंबळून आल्या असतील, हे काय सांगावे? कमळाइसेच्या निमित्ताने उदास होऊन त्यांनी सर्वस्वाचा त्याग करायचे ठरविले होते, हे खरे असले तरी तिचा त्याग करतांना त्यांच्या अंतःकरणात कालवाकालव झाल्यावाचून कशी राहिली असेल ? बरे, कमळाइसेवर ते उदास तरी झाले होते. पण विशाळदेव आणि माल्हाइसा यांच्याविषयी कोणतेच मनोमालिन्य त्यांच्या अंतःकरणात असण्याचे कारण नव्हते. आणि खरोखर तसे ते नव्हतेहि. अशा स्थितीत, ईश्वरावतार हरिपाळदेवांनी, ज्यांना आपल्या मातृपितृत्वाचा मान दिला होता आणि ज्यांच्याकडून आपले कोडकौतुक करून घेतले होते त्या विशाळदेव–माल्हाइसेला व आपल्या पुत्राला सोडतांना त्यांचे अंतःकरण भरुन

---

१. वाइंदेशकर पाठाच्या लेखकाने हा प्रसंग भावनात्मकतेने लिहिलेला आहे. तो म्हणतो : 'यात्रेची तयारी होऊन आता राजवाड्याबाहेर पडायचे! त्यावेळी हरिपाळदेव माडीवरील आपल्या मंदिरात गेले. तेथे कमळाइसा होतीच. तिच्याकडे त्यांनी साभिप्राय नजरेने पाहिले. पण तिच्या अंतःकरणात काहीच प्रकाश पडेना. हरिपाळदेव बाहेर आले. पण लागलीच पुन्हा मंदिरात जाऊन आपल्या राणीकडे पाहू लागले. ते तीनदा आत गेले आणि तिन्ही वेळा तसेच बाहेर आले' यावरून त्यांचे अंतःकरण भावनेने भरून आले असले पाहिजे यात शंकाच नाही. तिन्ही वेळा त्यांनी कमळाइसेकडे पाहिले पण त्या दुर्दैवी अबलेकडून कोणतेच प्रत्युत्तर मिळाले नाही.

आले असेल यात शंकाच नाही. माता, पिता, पुत्र आणि पत्नी यांची व हरिपाळदेवाची ही शेवटचीच भेट होती.

मजल दरमजल करीत हरिपाळदेव आपल्या परिवारासहित रामटेककडे येत होते. तथापि, आपल्या संरक्षणासाठी दिलेले घोडेस्वार आणि सेवेसाठी सादर असलेले सेवक यापैकी कोणीहि त्यांना आपल्या बरोबर नको होता. त्यांच्यापासून स्वतःची सुटका करून घेण्यासाठी त्यांनी एक नामी युक्ती योजली. प्रत्येक मुक्कामाहून, आपला कुशल समाचार कळविण्याच्या निमित्ताने त्यांनी एकेकाला परत पाठवणे सुरू केले. हळूहळू त्यांच्या जवळील परिवार कमी होऊ लागला. असे होता होता हरिपाळदेव आणि दोन सेवक एवढेच काय ते राहिले. त्यांनाहि परत पाठविण्याचा हरिपाळदेवांनी प्रयत्न करून पाहिला. पण आपल्या स्वामीवर असीम प्रेम करणारे ते सेवक त्यांना सोडून जाण्याला काही केल्या कबूल होईनात. आपणाला सोडून आपले मालक कदाचित रात्री एकटेच निघून जातील या भीतीमुळे, ते आपल्यामधे हरिपाळदेवांना निजवीत आणि त्यांच्या दोन्ही बाजूंनी आपण झोपत. पण त्या बिचाऱ्यांना झोप कोठून येणार? आपल्याला झोप लागलीसे पाहून आपले स्वामी आपणाला सोडून जातील या प्रेमळ भीतीमुळे ते झोपेचे सोंग करून पडत खरे, पण वस्तुतः जागे असत आणि डोळ्यात तेल घालून आपल्या स्वामीचे संरक्षण करीत.

तथापि परमेश्वराच्या इच्छेपुढे कुणाचे काय चालणार? शेवटी जे व्हायचे ते झालेच. ज्या प्रसंगाला ते सेवक भीत होते तोच प्रसंग नेमका घडून आला. रामटेकच्या रोखाने मार्गक्रमण करीत असता देऊळवाड्याला ( ता. जि. अमरावती; वऱ्हाड ) त्यांचा मुक्काम पडला. तेथील काजळेश्वराच्या देवालयात रात्र कंठण्याचे त्यांनी ठरविले. आपापली अंथरुणे टाकून ते तिघेहि आडवे झाले. अनेक दिवसांच्या जागरणाने त्या विनम्र सेवकांचा दुर्दैवाने डोळा लागला. हे लक्ष्यात येताच, हरिपाळदेवांनी आपले सगळे

१. यात्रेला निघते समयी राजवाड्या भोवतालच्या तिसऱ्या द्वारा पर्यंत माता माल्हाइसा हरिपाळला वोळवीत गेली. आणि बिशाळदेव हा तर पहिल्या मुक्कामापर्यंत त्याजबरोबर होता, तेथून तो मागे परतला, असा वृत्तांत वाइंदेशकर पाठात आहे.

वस्त्रालंकार काढून ठेवले आणि केवळ नेसायचे एक वस्त्र व अंगावर एक प्रावर्ण अशी दोन वस्त्रे बरोबर घेऊन ते तेथून निघाले, आणि तडक वाट चालू लागले!

दुसऱ्या दिवशी सकाळी सेवक उठून पाहतात तो त्यांचे स्वामी होते कुठे ? त्यांच्या अंतःकरणात चर्र झाले! त्यांनी सहज चोहोबाजूंनी नजर फेकली, पण हरिपाळदेव त्यांना कुठेच दिसेनात. इतक्यात त्यांची नजर तेथे पडलेल्या अलंकारादिकाकडे गेली. त्यावरून हरिपाळदेव आपणाला सोडून गेले याविषयी त्यांना शंकाच राहिली नाही. तेव्हां त्यांच्या दुःखाला सीमा उरली नाही. जीवन निघून गेल्यावर मासोळ्या जशा तडफडतात तसे ते अंतःकरणातून तडफडू लागले. त्यांनी स्वामींना शोधून काढण्याचा विचार केला. शोध घेत घेत आणि विचारपूस करीत करीत ते रामटेकपर्यंत गेले. पण हरिपाळदेवाचा पत्ता त्यांना कुठेच लागेना. शेवटी हताश होऊन ते भरवसला परतले. विशाळदेवाजवळ त्यांनी सगळा वृत्तांत निवेदन केला. तो ऐकताच त्या प्रेमळ मातापित्यांना आणि दुर्दैवी पत्नीला किती दुःख झाले असेल याची कल्पनाच करवत नाही!

देऊळवाडा येथील काजळेश्वराच्या मंदिरात आपल्या सेवकांना सोडून देऊन केवळ दोन वस्त्रानिशी हरिपाळदेव जे निघाले ते भटकत भटकत रिद्धपुरला येऊन पोचले. त्यावेळी सकाळचा प्रहर दीड प्रहराइतका दिवस उलटला होता. रिद्धपुर नगरात प्रवेश केल्यावर फिरता फिरता हरिपाळदेव तेथील रांधवण हाटात आले. तो समोर त्यांना काय दिसले ?

तेथे एक अत्यंत विरक्त पुरुष होते. त्यांनी एक अर्धे वस्त्र परिधान केले होते. त्याचा कासोटा मोकळा होता. बाकीचे अर्धे वस्त्र त्यांनी अंगावर घेतले होते. त्यांच्या मिशा चांगल्या लांब असून त्यांची दाढी त्यांच्या नाभीपर्यंत होती. डोक्यावरील केशकलाप मोकळा होता. त्यांचा डावा डोळा अर्धोन्मीलित असल्यासारखा दिसत होता. ते आकाशाकडे पाहत होते. मधून मधून आपले आपल्याशीच ते काही बोलत आणि मधूनच हसत! त्यांच्या डाव्या हाताची करांगुळी वाकडी होती. आणि उजव्या हातात जवळच्या दुकानातील सेंगुळे बुडडे घेऊन ते चावीत आणि लागलीच थुंकून टाकीत. अशा त्या सावळ्या पण सतेज मूर्तीला पाहताच हरिपाळदेवांनी तिला कायाप्रणिपात केला.

ही मूर्ति म्हणजे श्रीगोविंदप्रभू होत हे आता निराळे सांगायला नको. सेंगुळे बुडडे चावत असतांनाच श्रीप्रभूंचे लक्ष हरिपाळदेवाकडे गेले. त्यांची दृष्टादृष्ट होताच हरिपाळदेवांनी आपले दोन्ही हात जोडून त्यांना नमस्कार व त्यांचा जयजयकार केला. श्रीप्रभु एकदम म्हणाले. "अय्या,आता हा माझा आहे बरे" असे अर्धवट स्वतःशीच बोलून ते हरिपाळदेवाला म्हणाले "अरे अरे, हे घे ना, अरे घे, घे" असे म्हणून सेंगुळे बुडड्याचा तो उष्टा प्रसाद त्यांनी हरिपाळदेवाकडे फेकला. हरिपाळदेवांनी तो वरच्यावर झेलला. आणि आपले अहोभाग्य समजून तो महाप्रसाद मोठ्या भक्तिभावनेने भक्षण केला. ईश्वरावतार हरिपाळदेवाने त्याचवेळी श्रीप्रभूपासून परावर शक्तींचा स्वीकार केला.

या शक्ति-स्वीकारापूर्वी श्रीप्रभू हरिपाळदेवांना म्हणाले, "अरे मेला जाय : चक्रा होय : चक्रु होय म्हणे : नव्हे म्हणे : श्रीचक्रधरू होयचि म्हणे" श्रीप्रभूचे हे बोलणे ऐकल्यावर 'तेव्हळि येणे परावर शक्ति स्वीकारिली आन श्रीचक्रधरु हे नाम स्वीकैरिले' यावरून हरिपाळदेवांना या शक्ति-स्वीकाराच्या वेळीच श्रीगोविंदप्रभूंनी श्रीचक्रधर हे नाव ठेवल्याचे दिसून येईल.अशा रीतीने श्रीप्रभूपासून परावरशक्ती मिळाल्यानंतर हरिपाळदेव श्रीचक्रधर झाले.

---

१. हरिपाळदेवांना श्रीचक्रधर हे नाव श्रीप्रभूंनी ठेवल्याची लीळा पीढिपाठाच्या पोथ्यात आढळत नाही. वरील लीळा तळेगावकरांच्या पाठातील आहे. (एकांक १३) पंथातील अनुयायी 'श्रीचक्रधर' नामस्वीकाराच्या बाबतीत तीच प्रमाण मानतात, म्हणून येथे नमूद केली आहे.

२. या शक्तिस्वीकाराचे थोडे स्पष्टीकरण करणे अवश्य आहे. ज्ञानाचे प्रामुख्याने दोन प्रकार आहेत. (१) पर ज्ञान; व (२) अवर ज्ञान. अर्थात परा शक्ति व अवर शक्ति या दोन्ही ज्ञान शक्तीच होत. द्वारावतीकार श्री चांगदेवराउळांनीच हरिपाळदेवाच्या मृत शरीरात प्रवेश करून श्रीचक्रधरावतार स्वीकारला हे आपण पूर्वी पाहिलेच आहे. द्वारावतीकारांचा अवतार आच्छादनीचा अवरदृश्यावतार होता. म्हणजे त्यांनी परावर अशा उभयशक्तींचा स्वीकार करून पर आच्छादिले होते आणि अवर प्रगट केले होते. हरिपाळदेवांच्या शरीरात प्रवेश करून अवतार घेतांना त्यांनी आपल्या बरोबर आपल्या अवर-जडाशक्ति आणल्या होत्या. श्रीगोविंदप्रभूपासून शक्तिस्वीकार करतांना त्यांनी अवर-चेतना शक्ति आणि पराशक्ति यांचा स्वीकार केला. श्रीचक्रधर स्वामींच्या उभय--शक्ति-स्वीकाराचे स्वरूप थोडक्यात हे असे आहे.

## २

# अवतार व नामस्वीकार

श्रीचक्रधरस्वामींनी निश्चित कोणत्या रीतीने अवतार स्वीकारला यासंबंधी महानुभावात एकमत नाही. मागील प्रकरणात वर्णन केल्याप्रमाणे द्वारावतीकार श्रीचांगदेवराउळांनी भरवस येथे स्मशानात आणलेले हरिपाळदेवाचे प्रेत उठवून नवीन अवतार स्वीकारला. महानुभावांच्या पिढीपाठाच्या सगळया पोथ्यात हाच वृत्तांत आढळतो. संस्कृत 'रत्नमालास्तोत्रा' मध्ये आलेला वृत्तांतहि असाच आहे. "सप्ताहमाग्रहमवेक्ष्य विहाय देहं देवो दयालुरपरां तनुमादधार। उत्थापयन्सपदि तत्पतितं परेतं यद्गुर्जराधिपतिमंत्रि-कुमारकस्य॥" सात दिवस वाट पाहून (कामाख्येसाठी) आपले शरीर सोडून मग देवाने (चांगदेवराउळाने) नवीन शरीर धारण केले; ते कसे ? तर गुर्जराधिपतीच्या प्रधानपुत्राचे मृत शरीर ताबडतोब उठवून, हा भावार्थ रत्नमालास्तोत्रातील या श्लोकात आलेला आहे. पण तळेगावकर पाठाला ही हकीकत मान्य नाही. त्यांच्या मते ईश्वराने स्वतंत्र रीतीने प्रधानपुत्राचे शरीर उठविले असे दिसते. त्यांच्या पाठातील आनुषंगिक आख्यायिका पुढीलप्रमाणे आहेः—

"**गुर्जराते भरवसी प्रधानपुत्र पतित पुर उत्थापूनि पुरस्वीकार**॥ तदनंतरे महदाइसे ईश्वराते पुसिले : हां जी : पुर त्यजिले मग श्री चांगदेवराउळी कोणीकडे बीजे केले : सर्वज्ञे म्हणितले : बाइ : तत्समयी गुर्जराते भरवस नगर : तेथिचा प्रधान विशाळदेव : राणी माल्हा-यीसे : तया कुमर हरिपाळदेव : तयाचे देह गेले ते स्वीकरिले : आन तेचि नाम स्वीकरिले : ते कोणी परी स्वीकरिले जी : मग देवे

सांघो आदरिले : बाइ : प्रधान कुमराते सात पाच दिवस काही रुजा उपनली : तन्निमित्ते शरीर विसर्जीले : मग माडमुख्य करूनि सदैवाचा जो मृतविधि तो पूर्ण केला : श्मसानासि आनिले : यथाविधि सरणावरि घातले : उत्थानपिंड देवो आदरिला : तत्समयी स्वीकरिले : डोळे उघडिले : वस्त्र हालीनले आन वास पाहिली : तत्समयी यासि जीवोद्धरावयाची प्रवृत्ति म्हणौनि येणेही तेथ बीजे केले : श्रीचांगदेवराउळासी आज्ञा दीधली : तेही निजधामा बीजे केले : मग येणे प्रधानकुमराचे पतित पुर उत्थापूनि स्वीकरिले..."

या उताऱ्यावरून हरिपाळदेवाचे शरीर उठविणारे ईश्वरस्वरूप आणि श्री चांगदेवराउळ ही दोन निरनिराळी होती असे स्पष्ट दिसते. एकंदर वृत्तांत सांगताना या लेखकाचा बराच घोटाळा उडालेला आढळतो. पुरत्याग करून चांगदेवराऊळ कुणीकडे गेले या प्रश्नाला उत्तर देताना स्वामींनी सांगितले की त्या चांगदेवराउळांनी हरपाळदेवाचे मृत शरीर उठविले. पण असे जर आहे तर शेवटच्या वाक्यात म्हटल्याप्रमाणे "तेही निजधामा बीजे गेले : मग येणे प्रधानकुमराचे पतित पुर उत्थापूनि स्वीकरिले" याचा अर्थ काय ? प्रधानपुत्राचे शरीर उठविले कोणी ? चांगदेवराउळांनी का ? तसे असेल तर मग त्यांनी पुन्हा त्या शरीराचा त्याग केला आणि मग ते निजधामाला गेले असे समजायचे की काय ? तळेगावकरांच्या म्हणण्याचा भावार्थ मला असा वाटतो की, द्वारावतीकार चांगदेवराउळ आपले शरीर सोडून हरि-पाळदेवाचे प्रेत उठविण्याच्या निमित्ताने आले. तो तितक्यात त्या ठिकाणी श्रीचक्रधरस्वामी (अर्थात् त्यांचे ईश्वरस्वरूप) येऊन पोचले. आणि त्यांनी विनंति केल्यामुळे द्वारावतीकार चांगदेवराउळ निजधामाला निघून गेले आणि मग श्रीचक्रधरस्वामींनी हरिपाळदेवाचे शरीर उठवून अवतार स्वीकारला. अर्थात् त्यांच्या मते द्वारावतीकार चांगदेवराउळांनी हरपाळदेवाच्या शरीरांत प्रवेश केला नाही. आणि म्हणून द्वारावतीकार चांगदेवराउळ हेच श्री चक्रधरस्वामी होत असे पिढीपाठाचे मत तळेगावकरांना मान्य नाही. हीच गोष्ट आणखीहि एका पुराव्यावरून दिसून येते. तळेगावकरांच्या सूत्रपाठातील पंचकृष्णात शेवटचे नांव श्रीचक्रधरस्वामीचे आहे. पिढीपाठाच्या पोथ्यात त्या ऐवजी द्वारावतीकार चांगदेवराउळाचे नाव दोनदा आलेले आहे. याचे

कारण उघड आहे. पिढीपाठाच्या मते द्वारावतीकार चांगदेवराउळ हेच श्री चक्रधर होत. म्हणून स्मरणीय पंचकृष्णाच्या नावामध्ये चक्रधरस्वामींच्या नावाच्या जागी चांगदेवराउळ हे नाव पुन्हा येणे साहजिक आहे. तळेगावकरांच्या पाठात तसे नाही. कारण चक्रधरस्वामींचा अवतार म्हणजे द्वारावतीकार चांगदेवराउळ होत ही गोष्ट त्यांना मान्य नाही. त्यांच्या मते द्वारावतीकार चांगदेवराउळ निराळे आणि चक्रधरस्वामी निराळे. अर्थात् हरपाळदेवाचे मृत शरीर उठविले ते द्वारावतीकार चांगदेवराउळांनी नव्हे, तर अव्यक्त ईश्वरस्वरूपाने !

वाइंदेशकरांच्या पाठात पुरस्वीकाराची हकीकत पुढील प्रमाणे दिलेली आहे. "गोसावी हिमाचळी राज्य करीत होते : तेथ गोसावियाच्या दर्शनासी चांगदेवराउळी बीजे केले : एकी विवरा दर्शन जाले : द्वारावतीकाराते गोसावी म्हणितले : तुम्ही कामाख्या निमित्त पुर त्यजून हे एथिचे पुर अंगीकरावे : हे पुर एकी विवरी परित्यजौनि एथौनि भरवसी प्रधान कुमराचे पतित उठविजैल : मग चांगदेवराउळी द्वारावतीयेसी बीजे केले : मग केतुलेया एका काळा गोसावी ते पुर हिमाचळी विवरी परित्यजूनि भरवसे गुजराथेच्या प्रधानपुत्राचे पतित स्वीकरिले : तेथ गोसावी ३२ वर्षे राज्य केले...तैसेचि गोसावी प्रधाना वारिता रामयात्रेचेनि मिषे राणियेते परित्यजून...रुद्धपुरा बीजे केले." (ली. च. ए. ४) याच वाइंदेशकर पाठात वरील लीळेनंतर पुढील लीळा आहे.

"पर्वती गोसावी बारा वर्षे क्रीडा केली : गोसावी पर्वती क्रीडता सात वर्षे क्रमिली : तव द्वारावतीये चांगदेवराउळी कामाख्या निमित्त पुर परित्यजौनि गुजराते खांबाइते प्रधानपुत्राचे पतित उठविले : तेथ केतुला एक काळ होते : मग पुर परित्यजून हिमाचळी गोसावियाचे पुर होते : ते अजरामर हेमगौर : ते चांगदेवराउळी स्वीकरिले : तेणे पुरेसी श्रीचांगदेवराउळ बद्रिकाश्रमी अद्यापि राज्य करीत असेति' (ली. च. ए. ५) या दोन्ही लीळा एकत्रित वाचल्या तर काय दिसून येते ? हिमालय पर्वतावर कोणता तरी एक ईश्वरावतार विद्यमान होता. भरवस येथील प्रधान-पुत्राच्या शरीरात त्याने प्रवेश केला व नवीन अवतार स्वीकारला. तोच श्री चक्रधर अवतार होय. भरवस येथील प्रधानपुत्राच्या शरीरात प्रवेश करण्यापूर्वी त्याने आपल्या

पहिल्या अवताराचे शरीर सोडले होते. ते ' अजरामर ' आणि ' हेमगौर ' शरीर हिमालयातील विवरात जवळ जवळ ४९ वर्षे तसेच पडून होते. त्या सुमारास द्वारावतीकार चांगदेवराउळांनी कामाख्यानिमित्त पुरत्याग केला आणि त्यांनी खंबायत येथील प्रधानपुत्राच्या शरीरात प्रवेश केला. काही दिवसांनी त्यांनी तेहि शरीर सोडून दिले; आणि हिमालयात जाऊन तेथील विवरात पडून असलेले तेथील अवताराचे ' अजरामर ' व ' हेमगौर ' शरीर धारण केले. ते अजून तेथे हिमालयात विद्यमान आहेत. यातील अद्‌भुत भागाकडे दुर्लक्ष केले तरी वाइंदेशकर पाठाच्या मते द्वारावतीकार चांगदेवराउळांनी ' भरवस ' येथील प्रधानपुत्राचे शरीर उठवून श्रीचक्रधरावतार स्वीकारला ही गोष्ट खरी नाही. भरवसच्या प्रधानपुत्राचे शरीर उठवले ते हिमालयातील ईश्वरावताराने, द्वारावतीकार चांगदेवराउळांनी नव्हे ! अर्थात् द्वारावतीकार चांगदेवराउळ म्हणजे श्रीचक्रधरस्वामी नव्हत. हीच गोष्ट त्या पाठातील मुख्य लीळेमधे आलेल्या पुढील वर्णनावरून दृढ होते.

" गोसावी सकळ अवतार व्यावृत्तीले : त्यात द्वारावतीकारहि व्यावृत्तिले : मग महदाइसी प्रश्न केला जे द्वारावतीकार तेच आमचे गोसावी असती : आता गोसावी द्वारावतीकाराची व्यावृत्ति कीजताये : यावरि गोसावी महदाइसाप्रति आपणया आन द्वारावतीकारा भिन्नता निरुपिली " ( ली. च. ए. ५ ) आपण आणि द्वारावतीकार भिन्न असल्याचा वृत्तांत या वाइंदेशकरपाठाने श्रीचक्रधरस्वामींच्या तोंडी घातला आहे. तेव्हां श्रीचक्रधरस्वामी आणि द्वारावतीकार चांगदेवराऊळ एक नव्हत ह्या त्याच्या मताविषयी शंका राहत नाही. ते त्याचे निश्चित मत आहे. हे मत प्रतिपादन करतांना आपला आणखी एक ' मुरारेस्तृतीयः पन्था ' त्याने निर्माण केलेला आहे. द्वारावतीकाराने गुजराथेतील प्रधानपुत्राचे शरीर उठवले ह्या महानुभावांच्या प्रसिद्ध समजुतीचे काय करायचे ? वाइंदेशकरपाठाचे म्हणणे असे की द्वारावतीकारांनी गुजराथेतील प्रधानपुत्राचे शरीर उठवले हे खरे, पण ते भरवस येथील प्रधानपुत्राचे नाही, तर खंबायत येथील प्रधानपुत्राचे ! खंबायत येथील प्रधानाचे हे पिल्लू वाइंदेशकरांनी नवीनच निर्माण केलेले आहे. त्याला दुसऱ्या कोणत्याहि पाठाचा आधार मिळत नाही.

तळेगावकर आणि वाइंदेशकर या दोघांच्याहि पाठातील अवतारस्वीकाराच्या हकीकतीत काही बाबतीत साम्य आढळते. द्वारावतीकारांनी भरवमच्या प्रधानपुत्राचे शरीर स्वीकारले हे दोघांनाहि मान्य नाही. हिमालयात पूर्वी विद्यमान असलेल्या ईश्वरावताराने भरवसच्या प्रधानपुत्राच्या शरीरात प्रवेश करून अवतार स्वीकारला या बाबतीत दोघांचीहि एकवाक्यता आहे. तसेच हिमालयातील ईश्वरावताराने त्यागलेले पण तेथील विवरात पडून असलेले शरीर द्वारावतीकार चांगदेवराउळांनी स्वीकारले याहि बाबतीत त्यांची एकवाक्यता आहे. त्यात फरक एवढाच की तळेगावकरांच्या म्हणण्याप्रमाणे द्वारावतीकार प्रथम भरवस येथील प्रधानपुत्राच्या शरीरात प्रविष्ट झाले (किंवा होणार होते) पण हिमालयातील ईश्वरावताराने तेथे येऊन त्यांना विनंती केल्यामुळे त्यांनी तेहि शरीर सोडले व हिमालयात जाऊन त्या ईश्वरावताराचे शरीर स्वीकारले; तर वाइंदेशकरांच्या मते द्वारावतीकार चांगदेवराऊळ भरवसकडे मुळी आलेच नाहीत. त्यांनी द्वारावतीला पुरत्याग केल्यावर प्रथम खंबायतच्या प्रधानपुत्राचे शरीर उठवले व मग काही दिवसांनी तेहि सोडून हिमालयातील ईश्वरावताराचे पडून असलेले शरीर स्वीकारले. एवढा फरक जर सोडला तर या दोन्ही पाठातील वृत्तांत जवळ जवळ सारखा आहे. त्यांच्या मते द्वारावतीकार चांगदेवराऊळ आणि श्रीचक्रधराचा अवतार हे दोन्ही भिन्न होत; तर पिढीपाठ व रत्नमाला स्तोत्र यांच्या मते हे दोन्ही एकच आहेत. तेव्हां यापैकी कोणता वृत्तांत खरा आहे, हे पाहणे अवश्य ठरते.

केवळ पाठांच्या दृष्टीने विचार केला तरीहि पिढीपाठाचे म्हणणे अधिक विश्वसनीय ठरते. कारण, वाइंदेशकर आणि तळेगावकर यांच्या चरित्रग्रंथांचे पाठ त्या मानाने अलीकडे निर्माण झालेले आहेत. पिढीपाठ त्यापेक्षा कितीतरी प्राचीन आहे. दुसरे असे की, हे दोन्ही पाठ म्हणजे महानुभावपंथाच्या अनेक आम्नायापैकी अत्यल्प उपसांप्रदायांचे प्रातिनिधिक आहेत. सर्व पंथाला ते मान्य नाहीत. या दोन्ही कारणामुळे पिढीपाठातील मजकुराला विश्वसनीयता अधिक आहे. या प्रश्नाच्या बाबतीतहि तेच मत गृहीत धरले पाहिजे. त्यावरून द्वारावतीकार चांगदेवराऊळ आणि चक्रधरस्वामी एकच होत हेच मत विशेष योग्य वाटते. या मताला संस्कृत रत्नमाला स्तोत्राचा पाठपुरावा आहे ही गोष्ट लक्षात घेतली म्हणजे त्या मताच्या विश्वसनीयतेसंबंधी शंका घेण्याला जागा राहत नाही.

दुसरे असे की, प्रस्तुत दोन्ही पाठांनी, म्हणजे वाइंदेशकर व तळेगावकर यांनी श्रीचक्रधरस्वामींच्या 'द्वारावतीकार चांगदेवराऊळ या नावाला अप्रत्यक्षपणे मान्यता दिलेली आहे.' तळेगावकराच्या लीळाचरित्र पाठातील पूर्वार्ध विभागात 'पांडेया स्वप्नी श्रीचांगदेवराउळ नामस्वीकार' या लीळेत (१२४) 'अवो हे द्वारावतीकार श्रीचांगदेवराउळ म्हणूनि स्वप्नस्थिति सांघीतली...तदनंतरे नागंणा म्हणितले : बाबा आपले नाम कायि : पांडा म्हणतो तेचि...तेही म्हणितले जी जी' यात, पांडयाला स्वप्नात श्रीचक्रधरस्वामी म्हणजे श्रीचांगदेवराऊळ असे जे दिसले होते त्याच गोष्टीला श्रीचक्रधरांनी मान्यता दिलेली आहे. म्हणजे पर्यायाने तळेगावकरांना श्रीचक्रधर आणि श्रीचांगदेवराऊळ दोघेहि एक होत असे मान्य असल्याचे या लीळेवरून दिसते. वाइंदेशकर पाठाचीहि स्थिति हीच आढळते. पण त्यात त्यांनी ही गोष्ट आडवळणाने मान्य केलेली आहे. वाइंदेशकरपाठाच्या पूर्वार्धात 'पांडया स्वप्नी नामस्वीकारु' या लीळेत '...अरे हे कोण पुरुष नेणेसी : अरे हे साक्षात द्वारावतीकार श्रीचांगदेवराउळ गोसावी : साक्षात ईश्वरू...अवो हे गोसावी कवण ऐसे तू जाणसी : तव बाइसी म्हणितले : ना : नेणे : अवो हे द्वारावतीकार श्रीचांगदेवराउळ गोसावी : अवो तेही मज मारिता राखिले वो...आन म्हणति : अवो नागुबाइ : हे द्वारावतीकार श्रीचांगदेवराउळ वो : तव बाइसी म्हणितले : हा बाबा आपणेया नाव काइ : गोसावी म्हणितले : बाइ : पांडा म्हणितसे तेचि तव म्हणा : मग येथीचे तव काइ गेले असे : पांडेया स्वप्नी शिक्षापण केले तै लागोनि जनी गोसावियासि श्रीचांगदेवराउळ ऐसे नाम ठेविले : ते गोसावी अंगीकरले' ( ली. च. पू. ३३ ).

या वृत्तांतावरून काय दिसून येते ? वाइंदेशकर पाठाच्या मतेहि पांडयाला स्वप्नात जे दिसले होते ते हेच की द्वारावतीकार चांगदेवराऊळ म्हणजेच श्रीचक्रधरस्वामी होत. या गोष्टीला स्वामींनीहि मान्यता दिली. इतकेच नाही तर त्या दिवसापासून त्यांचे तेच नाव रूढ झाले, वगैरे गोष्टी या वृत्तांतावरून स्पष्ट होतात. याच पाठाच्या एकांकातील ५ व्या लीळेत 'यावरि गोसावी महदाइसाप्रती आपणया आन द्वारावतीकारा भिन्नता निरूपिली' असे म्हटले आहे. आणि त्याच पाठातील वरील लीळेत त्या गोष्टीला चक्रधरस्वामींनी मान्यता दिली आहे. इतकेच नाही तर त्यांच्या मान्यतेसहित

त्यांचे तेच नाव लोकात रूढ झाले असे म्हटले आहे. यातून खरे काय ? माझ्या मते द्वारावतीकार चांगदेवराऊळ यांचाच पुनरवतार म्हणजे श्रीचक्र–धरस्वामी होत. ते दोघेहि एकच होत हीच गोष्ट मान्य करायला पाहिजे. कारण वर दाखवल्याप्रमाणे ही गोष्ट वरील दोन्ही पाठांनाहि अगदीच अमान्य आहे असे नाही. आणि दुसरे असे की, इतर सर्व आम्नायांना म्हणजेच पिढीपाठाला तीच गोष्ट मान्य आहे. तेव्हां द्वारावतीकार चांगदेवराऊळ व श्रीचक्रधरस्वामी हे एक होत असेच दिसून येते.

मग, तळेगावकर आणि वाइंदेशकर या पाठात स्वामींच्या अवतार-स्वीकारासंबंधी निराळा वृत्तांत देण्याचे काय कारण असावे ? मला असे वाटते की 'पंचकृष्णा' ची सुसंगत रीतीने प्रतिष्ठा करण्याच्या दृष्टीने त्यांनी हे केले असावे ! महानुभावांच्या पंचकृष्णात ( पिढीपाठात ) द्वारावतीकार चांगदेव-राऊळाचे नाव दोनदा असले तरी तत्वतः तो अवतार एकच असल्यामुळे श्रीदत्तात्रेय, श्रीकृष्ण, श्रीचांगदेवराउळ व श्रीप्रभु असे हे चारच अवतार त्यात अंतर्भूत होतात. यांना पंचकृष्ण म्हणायचे कसे ? ही विसंगती काढून टाकण्यासाठी श्रीचक्रधरस्वामींचा अवतार हा स्वतंत्र अवतार असल्याचे प्रतिपादन करणे अवश्य वाटले असावे आणि म्हणून चक्रधरस्वामी म्हणजे द्वारावतीकार नसून त्यांचा अवतार हा हिमाचळी पूर्वी विद्यमान असलेला पण भरवसच्या प्रधानपुत्राच्या शरीरात प्रवेश केलेला स्वतंत्र अवतार होय अशा आशयाचा वृत्तांत त्यांनी आपल्या पाठात घातला असे दिसते. तळेगाव-करांच्या सूत्रपाठात पंचकृष्णापैकी शेवटचा कृष्ण म्हणून ' श्रीचक्रधररायाचे चरणशरण ' असा पाठ आहे. वाइंदेशकरांचाहि स्वतंत्र सूत्रपाठ आहे असे मी ऐकतो. मला तो अद्याप पाहण्यास मिळाला नाही. पण त्यांच्या चरित्र-ग्रंथातील वरील आख्यायिकाकडे लक्ष दिले म्हणजे त्यांच्या सूत्रपाठातहि पांचवा कृष्ण म्हणून श्रीचक्रधरस्वामींचेच नाव असले पाहिजे.

वरील विवेचनाच्या साह्याने श्रीचक्रधरस्वामींच्या नावावरहि बराच प्रकाश पडू शकेल. श्रीचक्रधरस्वामींचे ' चक्रधर ' हे जसे नाव होते तसेच ' चांगदेव'राऊळ हेहि एक नाव होते. ही दोन्ही नावे एकाच व्यक्तीची होत. तसे पाहिले तर स्वामींना या दोन नावाव्यतिरिक्त इतर नावांनीहि संबोधत असत. अवतार–स्वीकारानंतर भरवस येथे असेपर्यंत स्वामींचे नाव ' हरिपाळदेव '

हे होते. रिद्धपुरला आल्यावर श्रीप्रभूंनी त्यांना ‘चक्रा’ म्हटले म्हणून ‘चक्रधर’ नाव मिळाले. एकाकी विहरणात मौनदेव, नग्नदेव व गोमटदेव अशा नावांनी लोक त्यांना हाक मारीत असत. उदाः स्वामी मेहकर येथे गेले तेव्हां बाणेश्वराच्या देवळात उतरले होते. भिक्षेला निघतांना तेथील बोणेबाईने त्यांना पाहिले व विचारले “आपण कोणीकडून आलात ?” तिच्या या प्रश्नाला स्वामींनी खुणेनेच उत्तर दिले. तेव्हां बोणेबाई म्हणाली “हा बा : तरि आपण मौनिदेया होइजैल : गोसावी मानिले” (ली. च. ए. ४४). स्वामींच्या मौनामुळेच बोणेबाईने असे म्हटले असल्याचे स्पष्ट दिसते. त्यावरून, बोणेबाइने दिलेले ‘मौन्य देव’ अथवा ‘मौन देव’ हे नाव स्वामींनी स्वीकारले. हा शब्द ‘मौनि देव’ ‘मुनिदेव’ असाहि लिहिलेला आहे. (ली. च. ए. ६४–७१). त्यामुळे स्वामी ‘मुनि’ होते म्हणून त्यांना ‘मुनिदेव’ म्हणत असे वाटण्याचा संभव आहे. पण वरील प्रसंग लक्षात घेतला म्हणजे तो बरोबर नाही हे दिसून येईल. स्वामी रामटेकला असतांना तेथील ज्या बायांनी त्यांना पाहिले होते त्यांना स्वामींचे खडकुली येथे पुन्हा दर्शन झाले. त्यावेळी स्वामींनीच आपला पूर्वीचा वृत्तांत सांगतांना म्हटले की “बाई पूर्वी हे राणी होते...तै हे दीगंबर होते : एथ मौन्य होते : तै याते नग्नदेव नग्नदेव ऐसे म्हणति” (ली. च. उत्त. १९). यावरून, एकाकी असतांना स्वामी ‘मौन’ बाळगीत असत हे लक्षात येईल व ‘मुनिदेव’ या नावा ऐवजी ‘मौन देव’ हेच त्यावेळी त्यांचे नाव असले पाहिजे ही गोष्ट स्पष्ट होईल.

त्याचप्रमाणे स्वामींना ‘नग्नदेव’ म्हणत असत हेहि वरील लीळे-वरूनच दिसून येते. स्वामींनी आपल्या ‘नग्नदेव’ नावाची आठवण करून दिल्यानंतर रामटेकची ती बाई देखील ‘आमचे नग्नदेव’ म्हणून ‘श्रीचरणा लागली’ (ली. च. उत्त. १९). स्वामी एकाकी फिरत असतांना विंध्य पर्वतात गोंड लोकांच्या वस्तीत काही दिवस राहत होते. तेव्हां तेथील गोंड स्वामींना ‘देवणे’ म्हणून संबोधीत. ‘देवणे करीते आळवीति’ (ली. च. ए. २२). देवणे हाच शब्द अन्यत्र ‘दैवन्य’ म्हणून लिहिलेला आढळतो. यावरून ‘देवणे’ अथवा ‘दैवन्य’ हेहि स्वामींचे एक नाव होते असे दिसते. याशिवाय ‘गोमटदेव’ म्हणूनहि त्यांना संबोधीत. स्वामी डोड-

विहिराला गेले तेव्हां राघवदेव यांनी “ गोमटदेव हो : बरवे केले : गोमटदेव हो : आपूलिया अपत्याते पडीताळीले ” : म्हणून स्वामींच्या चरणाचे चुंबन घेतले. ‘ लोकु पुसे : राघवदेव हो हे कवण : ते गात वात नाचत चालतचि असति : तेवीचि म्हणति : “ हे गोमटदेव : बाबा : गोमटदेवा...” या वरूनहि त्यांना गोमटदेव म्हणून आळविल्याचे, अर्थात् तेहि एक त्यांचे नाव असल्याचे दिसून येईल.

तथापि, मौनदेव, नम्रदेव, दैवन्य, गोमटदेव वगैरे नावे स्वामींना उद्देशून निरंतर वापरली जात होती असे नाही. ‘आपल्याला त्यावेळी नम्रदेव म्हणत’ असे स्वामींनी सांगितले असले तरी रामटेकची बोणेबाइ खेरीजकरून इतर कुणाच्या तोंडी ते नाव नाही. ‘ मौनदेव ’ हे नाव फक्त बोणेबाइच्याच तोंडी आढळते. ‘ गोमटदेव ’ असे फक्त राघवदेवांनीच म्हटले आहे; इतरांच्या तोंडी ते नाव नाही. कदाचित् स्वामींना त्यावेळी त्या त्या ठिकाणी या नावांनी अनेक लोक आळवीत असतीलहि, नाही असे नाही. किंबहुना तसें म्हणायला बरीच जागा आहे. त्यांना नम्रदेव म्हणून बरेच लोक म्हणत असावे असे स्वामींच्या सांगण्यावरूनच दिसते. ‘ मौनदेव ’ नावाचा उल्लेख मेहेकरच्या बोणेबाइच्याच तोंडी असला तरी सेंदुर्जना प्रदेशात स्वामी असतांना त्यांचे ते नाव प्रसिद्ध असावे असे म्हणता येते. कारण सालबर्डीच्या डोंगरावरील स्वामींच्या स्थानाला अजूनहि मौनीदेवाची गुंफा किंवा मौनी बाबाचे स्थान म्हणून म्हणतात. हे खरे असले तरीहि स्वामींची ही प्रचारातील ‘ नावे ’ नव्हत ही गोष्ट शिल्लक राहतेच. तसे म्हटले तर ही मुळी ‘ नावे ’ च नव्हत. एकाकी काळातील स्वामींची वृत्ति दाखवणारी ती विशेषणे होत. ‘ मौनदेव ’ आणि ‘ नम्रदेव ’ या दोन्ही शब्दावरून हे दिसून येईल. ‘ दैवन्य ’ हा गोंडांचा शब्द आहे आणि त्याचा अर्थ ‘ देव ’ असा असावा. श्रेष्ठ व्यक्तींना आपण सन्मानाने ‘ देव ’ म्हणतो त्याच अर्थाने गोंडांनी आपल्या भाषेत त्यांना दैवन्य म्हणून आळवले असावे. ‘गोमटदेव’ हा शब्द तर स्वामींच्या सुंदर शरीरामुळेच त्यांना लावला जात असावा. कारण, ‘गोमट’ म्हणजेच सुंदर. तेव्हां ही नावे वस्तुतः नावे नसून ती त्यांची नामरूप पावलेली विशेषणे होत असे स्पष्ट दिसते. गौतमबुद्धाची, ‘ बुद्ध ’, ‘ तथागत ’ वगैरे नावे जशी विशेषणे होती तशीच ही आहेत.

तेव्हां स्वामींची खरीखुरी नावे दोनच. एक 'चांगदेव' आणि दुसरे 'चक्रधर'. द्वारावतीकार चांगदेवराऊळ आणि स्वामी एकत्र असल्यामुळे त्यांनाहि चांगदेवराऊळ नाव पडणे साहजिक होते. त्यांनी त्या नावाचा स्वीकार केला होता. स्वामी प्रथम पैठणाला पोचल्यानंतर त्यांनी नागांबिकेला प्रेमदान दिले. नागांबिका स्वामींची शिष्या बनली. म्हणून, पूर्वी नांगाबिके-जवळ असलेली हंसराज आणि पांडे ही भलभलते बरळू लागली. एके दिवशी पांडयाला स्वप्न पडले. त्यात यमदूत येऊन त्यांनी त्याला खूप बडवले आणि म्हटले "आरे : हे कवण पुरुषु ऐसे नेणसि : हे द्वारावतीकार श्रीचांगदेवो राउळ"! दुसऱ्या दिवशी पांड्याने तो वृत्तांत स्वामींना सांगितला. त्यावर नागुबाई ऊर्फ बाइसाने स्वामींना विचारले, "बाबा : आपणेया नाव काइ : या प्रश्नाला स्वामींनी उत्तर दिले "पांडा म्हणतु असे तेचि" (ली. च. भा. २. पा. ३) अर्थात् त्यांनी 'चांगदेव' राउळ हे नाव स्वीकारले आणि तेव्हांपासून स्वामींना सगळे जण चांगदेवराऊळ म्हणून संबोधू लागले. वरील लीळेत स्वामींचा नुसताच नामस्वीकार आहे असे नाही; तीत त्यांनी, द्वारावतीकार चांगदेवराऊळ म्हणजे आपणच या गोष्टीलाहि मान्यता दिली आहे. महदाइसेजवळ तर ही गोष्ट प्रत्यक्ष स्वामींनीच सांगितली होती. (ली. च. भा. ३. पां. १०७) द्वारावतीकार चांगदेव राउळांनी शरीरत्याग कसा केला व नंतर पुन्हा अवतार कसा घेतला या संबंधीचा वृत्तांत स्वामींच्या तोंडून ऐकून 'तव महदाइसा ऐसे उमटले जे द्वारावतीकार तेचि आमचे गोसावी.' रात्रीच तिने आबाइसाला सांगितले "आबै : आबै : द्वारावतीकार तेचि आमचे गोसावी" यावरूनहि हे दोन्ही अवतार एकच होत हे जसे दिसून येते तसेच स्वामींचे नाव 'चांगदेव' असल्याचेहि दिसून येते.

स्वामींची त्यावेळी प्रसिद्धि होती तीहि चांगदेवराऊळ याच नावाने. एक वेळ दादोस ऊर्फ रामदेवांना साधेने विचारले "रामा कवणीकडे जात अससी." दादोस म्हणाले "ना : श्रीचांगदेवराउळा गोसावीयाचेया दरिसना" (ली. च. या. ३. पा. ३३). उमाइसेने वायनायकांना स्वामींच्या आगमनाची बातमी दिली होती ती "रूपैचे गुरु श्रीचांगदेवोराउळ आले असति" (सदर. पा. ९६) या शब्दात. आपल्लेच्या आईने त्याला रागावून म्हटले

होते " जैसी रूपै गेली श्रीचांगदेवो राउळा पाठी : तैसा तूं जाए का " ( सदर. पा. १०१ ); स्वामींच्या दर्शनाला जाण्यासाठी तयारी करीत असलेल्या येल्हाइसाला महदाइसेने विचारले, " ऐसी कव्हणा कारणे वेठत असति?" तिचे उत्तर आले, " ना : मी श्रीचांगदेव राउळा गोसावीयालागि वेठत असे. " ( सदर. पा. ११२ ) त्र्यंबकेश्वराहून परत जातांना सावखेड्याला येऊन उतरलेल्या रामटेकच्या बाईला तेथील ब्राह्मणाच्या बायकोने विचारले, " आइ तुम्ही काइ श्रीचांगदेवो राउळाची ? " त्या म्हणाल्या, " ना : आइ : चांगदेव राउळ ते कवण " तिने सांगितले, " ना : आइ : खडकुलिएसि एकु पुरुषु असति···" ( ली. च. उत्त. १९ ); आपले शिष्य लौकर न आलेले पाहून माहादाश्रमाने विचारले होते " जा पा रे : संन्यासी आम्हुइं कुपीन प्रवर्तना न एति : काइ तेथ श्रीचांगदेवराउळी बीजे केले " ( ली. च. उत्त. ३८०; शिवाय ली. च. उत्त. ७५, २१५, ३१६, ३३२. पहा ) इत्यादि अनेक लीळावरून लौकिकात सगळे जण स्वामींना चांगदेव राऊळ म्हणूनच ओळखत असत असे स्पष्ट दिसते.

आणि 'चक्रधर' हेहि स्वामींचे नाव होते. श्रीप्रभूपासून त्यांनी शक्तिस्वीकार केला तेव्हां स्वामींना श्रीप्रभूंनी हे नाव ठेवले असा वृत्तांत वाइंदेशकर व तळेगावकर यांच्या पाठात आहे. इतरत्र तो मला आढळला नाही. तथापि त्यांना श्रीचक्रधर हेहि नाव होते याविषयी शंका बाळगण्याचे कारण नाही. पिढीपाठाच्या पोथ्यात या संबंधी पुष्कळ उल्लेख आढळतात. आपलो हे प्रारंभी देवतांच्या भजनी फार लागले होते. त्याच्या चौकशीसाठी महदाइसा गेली तेव्हां तिने घरात समोर देवतांच्या पाषाणमूर्ति पाहिल्या आणि : 'चक्रधरू ' म्हणौनि निघाली' ( ली. च. उत्त. ५ ). यावरून महदाइसा स्वामींना उद्देशून 'चक्रधर' हे नाव वापरीत असे असे स्पष्ट दिसते. इतकेच नाही तर 'हे नाव कानी पडिले आणि गेले : देवते पाटी भरूनि आवघी पाणिपातु घातली' ( सदर ) याबरून आपलोलाहि ते नाव ठाऊक होते असे दिसते. खडकुली येथे असतांना भटोबासांनी पांगळ्याचा वेष घेऊन स्वामींची स्तुति केली ती कोणत्या शब्दांत ? तर " आगा चक्रधरा राया : पांगुळा पाए देसी : आंधळेया डोळे देसी : मूकिया वाचा देसी··· ऐसि तुझी कीर्ति आइकौनि आला मग जी : चक्रधरू राया " ( उत्त. २६ );

नाथोबांना एकदा स्थिति झाली तेव्हां धोत्र फाडून व स्वामींचे चरण माथावर घेऊन तो म्हणू लागला, " जाइजताए गा श्रीचक्रधरू राया " (उत्त. ४२); घाटे हरिभटांना स्थिति झाली तेव्हां त्यांनीहि नाथोबा प्रमाणेच " जाइजताए गा श्रीचक्रधरा " असे म्हटले होते. (उत्त. २८०); भटोबासांनी एकवेळा स्वामींना उपाहार केला. आरोगणेला सुरवात करण्यापूर्वी प्रसन्न होऊन स्वामींनी बाइसाला म्हटले," बाइ : वानरेसासि कवण ठावो ?" तेव्हां भटोबासच म्हणाले, " मज काइ आणिक ठावो असे : मज श्रीचक्रधरूचि ठावो " (उत्त. १०७); स्थितीच्या भरात भटोबास एकदा झाडावर चढले तेव्हां इतर भक्त त्यांना दगड मारीत पण भटोबास ते चुकवीत. तेव्हां स्वामींनी आपल्या हातात एक दगड घेतला आणि म्हटले, " आता तुझा कोणु गा राखैल ?" भटोबास म्हणाले "...'आता माझा श्रीचक्रधरू राखैल'..." (उत्त. १३८); आउसा ही तर नेहमीच स्वामींना 'चक्रस्वामी' 'चक्रधरु' वगैरे नांवानी आळवीत असे. सराळे येथे असतांना तिने गणपति आपयोला सांगितले " हैरे : चक्रस्वामीचा ठाइ मानमान्यता नाही " (उत्त. ७७); एक वेळा ती स्वामीवर रागावून सराळे गावी जाऊन राहिली. पण तिला स्वामींचे स्मरण वारंवार होत असे. "...'जेविली : आचवली : आणि गोसावीयांचे नाम चक्रधरू म्हणौनि घेतले : हैरे तुम्ही माझेया चक्रधरू स्वामीचिया रे : माझा चक्रस्वामी : माझा चक्रस्वामी'..." (उत्त. १३६). या शेवटच्या लीळेत तर स्वामींचे नाव चक्रधर असल्याचे स्पष्ट म्हटले आहे. पण या नावाच्या बाबतीत विशेष महत्त्वाची गोष्ट ही की प्रत्यक्ष स्वामींनी भटोबा-माजवळ आपल्या प्रयाण समयापूर्वी "चैतन्यापर वस्तु एकि आति : चक्राख्य देवता : तो तुमचा परसिद्धांत " (उत्त. ५०२) असे म्हटले आहे. स्वामी परमेश्वरावतार होते ही गोष्ट लक्षात घेतली म्हणजे हा 'चक्राख्य' देवतेचा उल्लेख त्यांच्या स्वतःसंबंधीचा आहे हे दिसून येते. तेव्हां आपण 'चक्राख्य' आहोत; आपले नाव चक्रधर आहे असेच त्यांनी या ठिकाणी म्हटल्याचे स्पष्ट होत नाही काय ! सारांश, चांगदेव राऊळ या नावाप्रमाणेच त्यांच्याकाळी चक्रधर हेहि नाव प्रसिद्ध होते हे निर्विवाद होय.

थोड्या सूक्ष्म दृष्टीने विचार केला तर असे म्हणता येते की चक्रधर हे नाव प्रामुख्याने स्वामींच्या शिष्यांच्या तोंडी येते; इतरांच्या तोंडी

त्या नावाचे उल्लेख नाहीत. याला एकच अपवाद आहे. वर दिलेल्या लीळांत घाटे हरिभट याच्या तोंडी चक्रधर हे नाव आले आहे. हा घाटे हरिभट स्वामींना अनुसरलेला नव्हता हे त्याच लीळेवरून स्पष्ट होते. बरे, हा बोधवंत होता असेहि नाही. स्वामींच्या दर्शनाला वारंवार येणाऱ्यापैकी तो एक होता. यांच्या तोंडी आलेला 'चक्रधर' या नावाचा वरील एक उल्लेख सोडला तर बाकीचे उल्लेख स्वामींच्या अनुसरलेल्या शिष्यांच्या तोंडचे आहेत. चांगदेव राऊळ हे नाव स्थूल मानाने अनुसरलेल्या शिष्याव्यतिरिक्त इतरांच्याच तोंडी फार करून येते. त्यावरून असे वाटते की लौकिकात स्वामी चांगदेवराऊळ याच नावाने विशेष प्रसिद्ध होते. पण त्यांचे अनुसरलेले शिष्य मात्र त्यांना चक्रधर या नावाने आळवीत. कदाचित्, अनुसरलेल्यांना त्यांनी चक्रधर हेच नाव मोक्षदायक म्हणून सांगितले असण्याचा संभव आहे. म्हणून सूत्रपाठातील 'अन्यव्यावृत्ति' प्रकरणातील 'चैतन्यापर परमेश्वरु' या नंतर 'तो देवो श्रीचक्रधरु : सकळ जीवाते रक्षिता हो : उद्धरिता हो' असे वाक्य भटोबासांनी घातले असावे. ते कसेहि असले तरी स्वामींची त्या वेळची दोन प्रसिद्ध नावे म्हणजे श्रीचांगदेवराऊळ व श्रीचक्रधर ही होत. त्यातहि महाराष्ट्रभर ते चांगदेवराऊळ या नावानेच विशेष विख्यात होते. त्यांचे शिष्य मात्र त्यांना श्रीचक्रधर म्हणून आळवीत, असा निष्कर्ष काढता येतो.

---

१. असे असेल तर मग 'पंचकृष्णा' तील स्मरणीय नावात 'प्रतिष्ठानी श्रीचांगदेवो राउळ सर्वज्ञांचे चरण शरण' हा पाठ कसा येतो ? येथे चक्रधराचे नाव असणे अधिक इष्ट झाले असते की नाही ? हा प्रश्न उभा राहतो. आणि तो बरोबर आहे. वस्तुतः पंचकृष्णातील इतर चार अवतारांच्या नावाप्रमाणे हा पाचवा उल्लेख श्रीचक्रधरस्वामीच्या तोंडचा नाहीच. तो केसोबासांनी घातला आहे असे वाटते. तो कुणीहि घातलेला असला तरी 'चक्रधर' हेच नाव त्या ठिकाणी अधिक शोभून दिसले असते.

# ३

# गुरुपरंपरा

श्रीगोविंदप्रभूपासून चक्रधरस्वामींनी शक्तिस्वीकार केला असल्यामुळे तेच त्यांचे गुरु होत यात शंका नाही. तथापि एक वेळ रामदेवाजवळ, आपले गुरू 'उधळिनाथ' असल्याबद्दल स्वामींनी सांगितले. रामदेव हा अनेकदा रिद्धपुर येथे जात असे. एक वेळ चक्रधरस्वामींनी त्याला विचारले, "महात्मे हो, तुम्ही परमेश्वरपुराला (रितपुरला) का जाता?" यावर रामदेव म्हणाला, "कारण, आमचे परमगुरु तेथे राहतात म्हणून!" आपले गुरु श्रीचक्रधरस्वामी आणि त्यांचे गुरु श्रीगोविंदप्रभु असल्यामुळे, आपले परमगुरु श्रीगोविंदप्रभु होत असे रामदेवाने सूचित केले. हे ऐकताच श्रीचक्रधरस्वामी उद्‌गारले, "तुमचे परमगुरु तर कांती नगरात राहतात." (ए. १०; उत्त. ३९८). हे ऐकून अर्थातच रामदेवाला अतिशय आश्चर्य वाटले. त्याने उत्सुकतेने विचारले, "ते कसे काय?" यावर स्वामींनी उधळीनाथाची हकीकत सांगितली. ती अशी. पर्वतावर बारा वर्षेपर्यंत एकांती राहून स्वामी एकटेच भ्रमण करीत होते. भ्रमण करता करता ते कांती नगराला येऊन पोचले. द्वारावतीकार श्रीचांगदेव राउळांचे उधळिनाथ नावाचे एक अनुगृहीत विद्यावंत राजगुरू होऊन तेथे राहत. श्रीचक्रधरस्वामी पाणीपात्र करण्यासाठी नगरामधे गेले तेव्हां एका माडीवर उधळीनाथ बसले होते. त्यांनी स्वामींना पाहिले. आपल्या शिष्याबरोबर निरोप पाठवून त्यांनी स्वामींना माडीवर बोलावून नेले. त्याप्रमाणे ते तेथे गेले. उधळीनाथ म्हणाले, "आपल्या या सुंदर शरीराची आपण अशी उपेक्षा का करिता?" उधळीनाथाच्या या प्रश्नाला काहीच उत्तर न देता स्वामी स्तब्ध राहिले. उधळीनाथ

विद्यावंत होते. स्वामींचे सुंदर शरीर पाहून त्यांना आपली विद्या द्यावी अशी त्यांना इच्छा झाली. आणि त्यांनी विद्यासामर्थ्याने तसा प्रयत्नहि केला. पण स्वामींनी त्या विद्येचा स्वीकार केला नाही. त्यावरून स्वामी कुणीतरी हटयोगी आहेत असे त्यांना वाटले. त्यांनी स्वामींना विनंती केली, "महाराज, माझ्या जवळ वयस्तंभनी नावाची विद्या आहे. तिच्या सामर्थ्याने मनुष्याचे वय कुंठित होते; शरीर जराजीर्ण होत नाही. आपण ही विद्या स्वीकारावी अशी माझी विनंती आहे." उधळीनाथांनी नम्रतापूर्वक केलेली विनंती मात्र स्वामींनी मान्य केली. त्यांनी ती विद्या स्वीकारली. स्वामींचे यावेळी स्थूल मानाने सव्वीस सत्तावीस वर्षांचे वय होते. वरील विद्या-स्वीकारामुळे ते यानंतरहि तेवढेच कायम राहिले. यावरून, उधळीनाथापासून आपण वयस्तंभनी विद्या स्वीकारल्यामुळे ते आपले गुरु होत असेच स्वामींनी[१] सुचविले नाही का? तेव्हां कांती नगरीतील उधळिनाथ हे स्वामींचे एक गुरू होत यात शंका नाही.

तथापि वरील आख्यायिकेतून, "उधळिनाथ माझे गुरु आहेत, श्रीगोविंदप्रभु नव्हेत" असा जो आशय निघतो तो मात्र परमार्थाने घेण्याचे कारण नाही. श्रीप्रभुशिवाय दुसरेहि आपले एक गुरु आहेत एवढेच स्वामींना या हकीकतीवरून सुचवायचे होते असे वाटते. कारण दुसऱ्या एका प्रसंगी आपले गुरु श्रीप्रभु असल्याचेच त्यांनी सांगितले आहे. कोणी एक विद्वान स्वामींच्या दर्शनाला आला होता तेव्हां त्याने स्वामींना विचारले, "महाराज! आपले गुरु कोण आहेत?" यावर स्वामी म्हणाले, "गुरु कव्हणी नेणीजे : श्रीप्रभुची थाप : थाप एकि घेतली : ते हे आठउनि असे" (उ. ३९९) म्हणजे "माझे गुरू कोण आहेत हे कुणालाच ठाऊक नाही. पण श्रीप्रभूंनी माझ्या पाठीवर एक थाप मारली. तिचे मी निरंतर स्मरण करीत असतो." यावरून श्रीप्रभूच्या थापेकडे म्हणजे पर्यायाने श्रीगोविंदप्रभूकडेच त्यांनी आपले गुरुपद दिल्याचे स्पष्ट दिसते.

---

१ 'तिसि सहस्त्र वरूषां आयुष्य' (विचार बंद) अशी परशरामबासाची वासना आहे. ही विद्या स्वीकारून चक्रधरस्वामींनी एक हजार वर्षांचे आयुष्य स्वीकारले. अर्थात्, स्वामी अद्यापि उत्तरापंथात विद्यमान आहेत असे महानुभाव महंत याच लीळेच्या आधारे समजतात.

तसे पाहिले तर उधळीनाथ आणि श्रीगोविंदप्रभू यांच्याप्रमाणे श्रीदत्तात्रेय व श्रीचक्रपाणी ऊर्फ चांगदेवराऊळ द्वारावतीकार हेहि श्रीचक्रधरस्वामींचे गुरु होते. श्रीदत्तात्रेय, श्रीचक्रपाणी, श्रीप्रभु व श्रीचक्रधरस्वामी हे सगळेच परमेश्वरावतार होत. तेव्हां त्या सर्वांची योग्यता सारखीच. त्यांच्यात गुरुशिष्य-संबंध होता असे म्हणण्यात काय स्वारस्य आहे ? तथापि लौकिक दृष्टीने, तसा संबंध असल्याचे मात्र दिसते. श्रीचक्रधरस्वामी म्हणजे श्रीचक्रपाणी ऊर्फ द्वारावतीकार चांगदेवराऊळ होत. चांगदेवराउळाचा पुनरवतार म्हणजे चक्रधरस्वामी होत हे लक्षात ठेवून, श्रीदत्तात्रेय प्रभूकडे लक्ष दिले म्हणजे तेहि स्वामींचे गुरु ठरतात. कारण श्रीचक्रपाणींनी माहूर येथे श्रीदत्तात्रेयप्रभूपासून शक्तिस्वीकार केला होता; श्रीचक्रपाणीपासून श्रीप्रभूंनी शक्तिस्वीकार केला होता हे लक्षात घेतले म्हणजे श्रीचक्रपाणी हे श्रीप्रभूंचे गुरू आणि चक्रधरस्वामींचे परात्पर गुरु ठरतात. आणि श्रीप्रभूपासून तर स्वामींनी प्रत्यक्षच शक्तिस्वीकार केलेला असल्यामुळे ते त्यांचे साक्षात गुरु होत यात शंका नाही. सारांश श्रीदत्तात्रेय, श्रीचक्रपाणी व श्रीप्रभू हे सगळेच श्रीचक्रधरस्वामींचे गुरू होत. त्यांची चरित्रे आणि त्यांचे व श्रीचक्रधरस्वामींचे परस्पर संबंध पाहणे अवश्य आहे.

## श्रीदत्तात्रेयप्रभु.

श्रीदत्तात्रेयप्रभु हे गुरु–परंपरेच्या दृष्टीने श्रीचक्रधरस्वामींचे आदिगुरु आहेत असे म्हटले पाहिजे. आणि तेच स्वामींनी उपदेशिलेल्या मार्गाचे मूळ प्रवर्तकहि आहेत. "या मार्गासि श्रीदत्तात्रेयप्रभु आदिकारण" (वि. २८५) असे स्वामींनी म्हटले ते याच अर्थाने. श्रीदत्तात्रेयांनी आरंभी अवतार घेऊन स्वतंत्र रीतीने परावर शक्तींचा स्वीकार केला. त्यांच्यापासून स्वरूप विभागून द्वारावतीकार श्रीचांगदेवराऊळ यांनी अवतार धारण केला व उभयशक्ति स्वीकारल्या. त्यातून त्यांनी परशक्ति आच्छादून अवरशक्ति तेवढी प्रगट केली. श्रीचांगदेवराउळापासून श्रीगोविंदप्रभूंनी उभयशक्तींचा स्वीकार केला. त्यातून त्यांनी अवर शक्ति आच्छादली आणि परशक्ति प्रगट केली. श्रीगोविंदप्रभूपासून श्रीचक्रधरस्वामींनी शक्ति स्वीकारली हे आपण पाहिलेच आहे. श्रीचक्रधरस्वामी हे द्वारावतीकार श्रीचांगदेवराऊळ अस-

त्यामुळे ते आपल्याकडे अवरशक्ति घेऊन आले होते आणि श्रीगोविंदप्रभू-पासून त्यांनी परशक्तीचा स्वीकार केला. या दृष्टीने विचार केला म्हणजे श्री दत्तात्रेयप्रभु हे श्रीचक्रधरस्वामींचे आदिगुरु कसे हे स्पष्ट होते. तसेच श्री चक्रधरस्वामींनी स्थापन केलेल्या मार्गाला परंपरेच्या दृष्टीने श्री दत्तात्रेयप्रभु आदिकारण कसे हेहि दिसून येते. म्हणूनच स्मरण करतांना महानुभाव साधनवंत प्रथम श्रीदत्तात्रेयप्रभूचे नांव उच्चारतात.

महानुभावांचे हे दत्तात्रेयप्रभु म्हणजे एरवी प्रसिद्ध असलेला "तीन शिरे सहा हात" धारण करणारा दत्तात्रेय नव्हे. पौराणिक कल्पनेप्रमाणे तीन शिरांचा आणि सहा भुजांचा दत्तात्रेय हा ब्रह्मा–विष्णु–महेशांचा अवतार होय. महानुभावांच्या मते ब्रह्मा विष्णु आणि महेश या तिन्ही सामान्य देवता आहेत. त्या देवतांचा एकरूप अवतार असलेला आधुनिक दत्त हा महानुभावांना वंद्य ठरणे शक्य नाही. तीन शिरे सहा हात असलेल्या दत्ताची कल्पना पूर्णपणे आधुनिक आहे. मुळात मात्र त्याची मूर्ति एकमुखी व चतुर्भुज असल्याचे दिसून येते. भागवतात 'अत्रेः पत्न्यनसूया त्रीन् जज्ञे सुयशसः सुतान् । दत्तं दुर्वाससं सोममात्मेशं ब्रह्मसंभवान् ' (स्कंद. ४ अ. १–३२). तसेच 'सोमोऽभूद् ब्रह्मणोंऽशेन दत्तो विष्णोस्तु योगवित्' (भाग. स्कं. ४ अ. १–३२) असे दत्त–जन्मा-विषयी उल्लेख आहेत. त्यावरून तो केवळ विष्णूचाच अंशावतार असल्याचे दिसते (ब्रह्मा–विष्णु–महेशाचा नव्हे) आणि तो एकमुखी असावा असे म्हणता येते. शांडिल्योपनिषदातील 'भस्मोध्दूलितसर्वांगं जटाजूटधरं विभुम् । चतुर्बाहुमुदारांगं प्रफुल्लकमलेक्षणम्' या श्लोकावरून तर तो चार भुजांचा (व एकाच मुखाचा) असल्याचे स्पष्ट होते. तथापि भागवतातील उल्लेखात दत्त हा विष्णूचा अंशावतार असल्याचे जे म्हटले आहे तेहि महानुभावांना मान्य नाही. त्यांच्या मते दत्त हा देवतावतार नाही, ईश्वरावतार आहे आणि म्हणूनच महानुभावांना तो पूज्य आहे.

श्रीदत्तात्रेयप्रभूंचा अवतार त्रेतायुगात झालेला असला तरी तो 'चतुर्युगी अवतार' असल्याचे श्रीचक्रधरस्वामींनी म्हटले आहे. (श्रीदत्ता-

---

१ विचारसमीक्षा. पा. २४.

त्रेयप्रभूचा चतुर्युगी अवतार : वि. २८२). याचा अर्थ असा की, त्रेतायुगानंतरच्याहि सर्व युगात दत्तात्रेयाचा अवतार विद्यमान आहेच. अर्थात् आजहि तो विद्यमान आहे; आणि महासंहारापर्यंत तो तसाच राहणार. त्यांचा अवतार हा इतर ईश्वरावतारापेक्षा विलक्षण आहे. ते नेहमी अदृश्यत्वाने वापरत असतात. म्हणून सहसा त्यांचे कुणाला दर्शनच होत नाही. पण दर्शन झाले तर ते कधी वाया जात नाही. एका दृष्टीने दर्शन म्हणजे बोधच. श्रीदत्तात्रेयप्रभूपासून ज्यांना बोध झालेला आहे त्यांचा बोध चरित होऊन ते प्राप्तीला पोचलेच म्हणून समजावे. कारण दत्तात्रेयप्रभु ज्याला बोध देतात त्याला आपल्याबरोबर अदृश्य करून त्याचे शाब्दज्ञान चरित व्हायला साह्य करतात व त्याला सदेहीच अपरोक्ष देतात. अर्थात्, त्यांच्या कोणत्याच ज्ञानियाला पुनःसंबंधी जन्मवण्याचे कारण पडत नाही. अपरोक्ष ज्ञान झाल्यानंतर सामान्य ज्ञान व त्यानंतर विशेष ज्ञान देऊन शेवटी प्राप्तीहि करून देतात. अर्थात् उभयदृश्यावतारापासून-श्रीमुखे बोध व्हावा अशी जोड ज्याने जोडली असेल त्यालाच त्यांचे दर्शन होते. तसेच प्रेमाचे साधन ज्याने जोडले असेल त्यालाहि त्यांचे दर्शन होते. सारांश, भक्ताला तर नाहीच, पण त्याच्यापासून बोध झालेल्या ज्ञानियाला देखील ते दुसऱ्या अवताराजवळ निरोवीत नाहीत.

ज्याने ज्ञानाधिकार किंवा प्रेमाधिकार जोडलेला नसेल त्याला जर श्रीदत्तात्रेयप्रभूचे दर्शन झाले तर तेहि वाया जात नाही. अशा पुरुषांना ते ज्ञानाधिकार घडवून दर्शन देतात. पण इतर कारणामुळे ज्यांना ज्ञान होणे शक्य नाही अशांना त्यांचे दर्शन झाले तर ? तर, अशा पुरुषांच्या बाबतीत श्रीदत्तात्रेयप्रभूंनी उच्चारलेले शब्द, वर, आशीर्वाद वगैरे सगळे यथार्थपणे फलद्रूप होतात. सारांश श्रीदत्तात्रेयप्रभूंचे दर्शन हे अमोघ होय. (ते अमोघ-दर्शन की गा : वि. २८५)

अशा अमोघदर्शन श्रीदत्तात्रेयप्रभूंनी अनेक जीवांचे त्रिविध ताप पूर्णपणे नाहीसे केले आहेत. त्यापैकी अलर्काचे उदाहरण विशेष प्रसिद्ध आहे. 'अलर्काचे तिन्ही ताप शंबोली शंबोली म्हणून त्यांनी फेडले : कारण त्यांची

वाणी अमृताचा वर्षाव करणारी आहे ' ( वि. २८३ ) असे श्रीचक्रधर-स्वामींनी सांगितले आहे. या अलर्काची हकीकत अशी :—

मदळसेला सात मुले होती. पैकी सहा जण तिच्या सांगण्यावरून दत्तात्रयप्रभूला अनुसरली. सातव्या मुलाचे नाव अलर्क. राज्यमदाने उन्मत्त झाल्यामुळे तो अनुसरत नव्हता. तेव्हां मदळसेने आपला भाऊ काशीराज याजकडून अलर्काच्या राज्यावर स्वारी करवली. काशीराजाने युद्धात अलर्काचा पराभव केला. यामुळे अलर्क तिन्ही तापांनी एकसारखा पोळत होता. त्याचे राज्य गेल्यामुळे मन निवृत्त करून तो ' सतेव त्यागिया ' बनला. आणि श्रीदत्तात्रेयप्रभूंना शरण गेला. त्यावेळी ' शंबोली शंबोली ' शद्वांचा उच्चार करून अलर्काचे सर्व ताप त्यांनी हरण केले. श्रीदत्तात्रेयप्रभूंच्या वाणीनें अलर्कांचे ताप नाहीसे होण्याचे कारण असे की त्या परमेश्वरावताराची वाणी अमृताचा वर्षाव करणारी व सुख देणारी होती. सारांश, " ये तो मदळसेचा कुमरु : आलर्क नृपवरु : श्री दत्तदेवे दीक्षा गुरू : उपदेशिला " (स. व. १३१ ).

अलर्काप्रमाणेच सहस्रार्जुनालाहि स्वामींनी आपल्या कृपाप्रसादाने पावन केले होते. हा सहस्रार्जुन म्हणजे राजा कृतवीर्य आणि राणी रेणुकावती यांचा मुलगा. त्यालाच कार्तवीर्य असेहि म्हणत. या " कृतवीर्याचेया कुमरा : नाही हाता दो संसारा "—त्याला हातपाय नव्हते. कारण, एकदा संकष्टी व्रत करतांना कृतवीर्याला जांभई आली, त्याने त्याबद्दल आचमन वगैरे काही केले नाही, यामुळे त्याला जो मुलगा झाला त्याला तोंड, नाक, डोळे व खांदे हेच काय ते अवयव होते. तोच हा कार्तवीर्य होय. गर्गमुनींच्या सांगण्यावरून त्याने माहूरजवळच्या सह्याद्रिपर्वतावर एक हजार वर्षेपर्यत श्रीदत्तात्रयप्रभूंची आराधना केली. त्यामुळे प्रसन्न होऊन श्रीदत्तात्रेयांनी त्याला सुंदर शरीर व हजार हात दिले. सर्व पृथ्वी जिंकण्याचा आणि केवळ श्रेष्ठ अशा वीराकडूनच मृत्यु येण्याचा वर दिला. सारांश, ज्या " कृतवीर्याचेया कुमरा : नाही हाता दो संसारा : तया देउनी सहस्रकरा पृथ्विपति केला ॥ श्वापदा आज्ञेचा भयो : माहीष्मतीये राज्य करी हयहयो : तेणे प्रसन्न करूनी दत्तात्रेयो : वर लाधला ॥ ऐसा दर्शने भोगमोक्ष : देता न दीसे आणिक : तो एक कैवल्यनायक : श्री दत्तावाचौनि " ( स. व. १३२, १३६, १३७. )

श्रीदत्तात्रेयप्रभूंना निरंतर पारधीचे व्यसन आहे. पण ही आपली क्रीडा ते अदृश्य राहूनच करीत असतात. नेहमी नाना प्रकारचे वेष ते धारण करतात आणि अधिकारी जीवांना मधून मधून दर्शन देतात. श्रीचक्रपाणी-- प्रभूंना त्यांनी वाघाच्या वेषात दर्शन दिले होते. तोच वृत्तांत आपण आता पाहू या.

**श्रीचक्रपाणी**

पुण्याजवळील फलटण नगरात जनकनायक नावाचा एक कऱ्हाडा ब्राह्मण राहत होता. त्याच्या बायकोचे नाव जनकाइसा. हा जनकनायक फारसा शिकलेला नव्हता. पुण्याजवळच्या प्रदेशात व्यापार–उदीम करून तो आपली उपजीविका करीत असे. या दांपत्याला दुर्दैवाने पुत्रसुख नव्हते. पुत्र व्हावा म्हणून जनकनायकाने दुसरे लग्न केले. पण या द्वितीय संबंधापासूनहि त्याला मुलगा झाला नाही. जनकाइसेचे माहेर चाकण येथे होते. तिच्या माहेरच्या मंडळींनी तिला पुत्र व्हावा म्हणून तेथील 'चक्रपाणी' नावाच्या देवतेला नवस केला. जनकनायकाने देखील आपल्याला पुत्र व्हावा म्हणून 'चांगदेव' नामक देवतेला नवस केला. एके दिवशी जनकनायकाला चांगदेवाने स्वप्नात दर्शन देऊन सांगितले की 'तुला पुत्र होईल.' त्या दिवसापासून जनकनायक चांग-देवाची भक्ति विशेष आस्थेने करू लागला. त्याचे फळ म्हणूनच की काय जनकाइसेला गर्भ राहिला आणि नऊ महिन्यानंतर तिला मुलगा झाला. जनकनायकाने, आपल्याला चांगदेवाच्या कृपेने पुत्र झाला म्हणून त्याचे नाव 'चांगदेव' असे ठेविले. जनकाइसा पुढे माहेरी गेली. तेव्हां तिच्या मातापित्यांनी चक्रपाणी देवतेला जो नवस केला होता तो फेडला व मुलाला ते 'चक्रपाणी' या नावाने हाक मारू लागले.जनकनायकाला झालेला हा मुलगा म्हणजेच श्रीचक्रपाणी परमेश्वरावतार होय. वर निर्दिष्ट केलेल्या कारणामुळे त्यांना लहानपणापासूनच चक्रपाणी व चांगदेव अशी दोन नावे पडली. तथापि पित्याने ठेवलेले 'चांगदेव' हेच नाव लौकिकात विशेष प्रसिद्ध झाले.

योग्य वेळी चांगदेवांचे लग्न झाले. त्यांच्या पत्नीचे नाव कमळवदना ऊर्फ कमळाइसा. चांगदेव यांनी आपल्या वडिलांचा व्यापार हाती घेतला आणि चालवला. तथापि वृत्तीने एकंदरीत ते अतिशय विरक्त होते. कमळाइसा

ऋतुस्नात झाली तेव्हां तिला माहेराहून आणण्यासाठी जनकनायक जात होते; पण चांगदेवांनी त्यांना मोडता घातला. तथापि शेवटी तिला आणण्याची परवानगी देऊन ते संसार करू लागले. काही काळानंतर आधी जनकाइसा आणि नंतर जनकनायक मृत्यु पावले. एका वर्षानंतर पित्याच्या श्राद्धाच्या दिवशीच कमळाइसाने त्यांना संभोग-सुखासाठी फार फार गळ घातली. त्यांनी तिची पुष्कळ समजूत केली पण ती ऐकेना. तेव्हांपासून चांगदेवाचे मन तिच्याविषयी उदास झाले. पुढे आणखी एके वेळी एकादशीच्या दिवशी कमळाइसाने आपली इच्छा पुरविण्याचा चांगदेवाजवळ अतिशय आग्रह धरिला. त्या दिवशी तिच्या आग्रहाला बळी पडून त्यांना आपले व्रत मोडावे लागले हे खरे; पण त्यामुळे ते अधिकच उदास झाले. संसारात त्यांचे लक्ष लागेना. काही दिवसानंतर माहूरच्या यात्रेला जाण्यासाठी फलटणहून अनेक लोकांचा थवा निघाला. बायकोला सांगून चांगदेवदेखील त्यांच्याबरोबर निघाले आणि माहूरला येऊन पोचले. तेथील ‘ मेरुवाळा ’ तलावाच्या पाळीवर यात्रा उतरली होती. त्यातच चांगदेवहि उतरले होते. मेरुवाळ्यात स्नान करून श्रीदत्ता-त्रेयाच्या शयनस्थानाकडे दर्शनासाठी जात असतांना एका जाळीच्या खालून श्रीदत्तात्रेयप्रभु व्याघ्राचा वेष धारण करून आले. त्यांनी एक डरकाळी फोडली. जणु श्रीचांगदेवराउळांना त्यांनी ती हाकच दिली होती. त्या वाघाच्या डर--काळीने बाकीचे सगळे लोक भिऊन इतस्ततः पळून गेले. पण चांगदेव मात्र त्याच्याकडे पाहात स्तब्ध उभे राहिले. त्यांनी ओळखले की व्याघ्राच्या रूपाने श्रीदत्तात्रेयच आपल्यासमोर उभे आहेत ! लोकांची पांगापांग होतांच त्या व्याघ्राने आपला एक पंजा चांगदेवाच्या डोक्यावर ठेवला. जणु श्रीदत्तात्रे-यांनी त्यांना आशीर्वाद दिला ! याच वेळी चांगदेवांनी दत्तात्रेयप्रभुपासून उभय शक्तींचा स्वीकार केला. त्यातून त्यांनी पर शक्ति आच्छादली आणि अवर शक्ति प्रगट केली. म्हणून चांगदेवराउळांना आच्छादनीचा अवरदृश्यावतार असे संबोधतात. श्रीदत्तात्रेयप्रभुपासून त्यांनी शक्तिस्वीकार केलेला अस-ल्यामुळे लौकिक दृष्टीने तेच त्यांचे गुरु होत.

श्रीचांगदेवराउळांनी नंतर बरेच दिवसपर्यंत माहूर येथेच अवस्थान केले. तेथे त्यांनी अवधूताचा वेष स्वीकारलेला होता. गावात भिक्षा मागून ते पर्वतावर क्रीडा करीत. पुढे काही दिवसांनी काही यात्रेकरू द्वारावती-

कडे जायला निघाले. त्यांच्याबरोबर श्रीचांगदेवराऊळही गेले. तेथील गोमती नदीच्या तीरावर एका गुंफेत ते राहत. आपल्या उजव्या हातात खराटा आणि डाव्या हातात सूप घेऊन ते द्वारावतीतील रस्ते झाडीत,तो कचरा सुपात भरत आणि ते सूप आपल्या डोक्यावर घेऊन गोमती नदीमध्ये तो कचरा टाकीत. हा त्यांचा तेथील नित्याचा कार्यक्रम होता. आपल्या दर्शनाला येणाऱ्या अधिकारी पुरुषांच्या डोक्यावर आपल्या हातातील सूप किंवा खराटा ते मारीत. त्यामुळे त्यांना देवतांच्या विद्या होत असत. अशा बावन पुरुषांना त्यांनी विद्यादान केले.

द्वारावतीला याप्रमाणे काळ कंठीत असतांना एके दिवशी रिद्धपूरहून यात्रेकरूंचा एक थवा तेथे आला. त्यात गुंडमराऊळ ऊर्फ श्रीगोविंदप्रभू होते. त्यांनी तेथे संन्यासदीक्षा स्वीकारली. त्यावेळी ते यात्रेकरूंच्या बरोबर रिद्धपुरला परत गेले. पण पुन्हा कांही दिवसांनी यात्रेसाठी ते द्वारावतीला आले. एकदा गोमती नदीच्या काठावर ते जप करीत होते.आपला दंड त्यांनी पुढे रोवून ठेवलेला होता. अशा वेळी श्रीचांगदेवराऊळ त्या ठिकाणी आले. आपल्या हातातील सूप त्यांनी श्रीप्रभूच्या डोक्यावर ठेवले आणि वरून खराट्याचा मार दिला. श्रीप्रभुसमोर रोवून ठेवलेला दंड त्यांनी मोडला आणि त्याचे तुकडे करून ते गोमती नदीत फेकून दिले. याच प्रसंगी श्रीगोविंदप्रभूंनी श्रीचांगदेवापासून शक्तिस्वीकार केला. आपल्या उभयशक्तीपैकी त्यांनी अवरशक्ति आच्छादली आणि परशक्ति प्रगट केली. म्हणून श्रीगोविंदप्रभूंना आच्छादनीचा परदृश्यावतार असे संबोधतात अर्थात् लौकिक दृष्टीने श्रीचांगदेवराऊळ हे गोविंदप्रभूचे गुरु ठरतात. शक्तिस्वीकारानंतर ते रिद्ध-पुरला परत गेले आणि आपल्या परशक्तिसामर्थ्याने अनंत जीवांचा उद्धार करीत काळ कंठू लागले.

श्रीप्रभूंना शक्ति दिल्यानंतरदेखील श्रीचांगदेवराऊळ द्वारावतीला बरेच दिवस आपले जीवोद्धरणाचे कार्य करीत होते. विरक्ति त्यांच्या अंगात पूर्णपणे बाणलेली होती. पत्नीचा त्याग करून ते फलटणहून निघाले तेव्हां-पासून त्यांनी जे नैष्ठिक ब्रह्मचर्य स्वीकारले ते काटेकोरपणाने पाळले होते. परमेश्वरावतार असल्यामुळे ते तेथे निर्विकल्पतेने क्रीडा करीत होते. "शूद्राचा घरी आरोगण करीति : तैसेचि अंत्येजाचा घरी क्रीडा करीति :" (श्री चक्र-

पाणिचरित्र पा. ३३ ) यावरून त्यांची सर्वत्र समतेची बुद्धि उत्तम रीतीने दिसून येते. योगसामर्थ्य अंगी असल्यामुळे त्यांनी तेथे अनेक चमत्कार केले. त्यामुळे त्यांची कीर्ति दूरवर पसरली. काउरळी या गावी कामाख्या या नावाची एक हटयोगिनी होती. तिच्या कानावर त्यांच्या योगसामर्थ्याची कीर्ति गेली. त्यांच्याविषयी एक प्रकारची आसक्ति तिच्या मनात निर्माण झाली. ती द्वारावतीला गेली आणि चांगदेवराउळांच्या सान्निध्यसुखाची अपेक्षा करू लागली. आपली इच्छा पूर्ण करण्यासाठी तिने चांगदेवराउळां-जवळ धरणे धरले. पण आपल्या ब्रह्मचर्याच्या प्रवृत्तीमुळे ते तिला अनुकूल होईनात. कामाख्याहि तेथून हालेना. आपण माझी इच्छा पूर्ण केल्यावाचून मी इथून हालणार नाही असा तिने हट्टच घेतला. राउळांच्या गुंफेच्या दरवाजाजवळ ती एकसारखी सात दिवस उभी होती. तेव्हां शेवटी योग-सामर्थ्याने श्रीचांगदेवराउळांनी आपल्या शरीराचा त्याग करून अवतार संपवला आणि त्याच स्वरूपासहित त्याच वेळी भरवस येथे स्मशानात आण-लेल्या हरपाळदेवाच्या मृत शरीरात प्रवेश करून त्यांनी नवीन अवतार धारण केला. तोच श्रीचक्रधर अवतार होय. वरील हकीकतीवरून श्रीचांगदेवराऊळ यांचे श्रीगोविंदप्रभु हे शिष्य असल्याचे आणि श्रीचांगदेवराऊळ आणि श्रीचक्रधरस्वामी एकच असल्याचे दिसून येईल. श्रीचांगदेवराउळाचे शिष्य श्रीगोविंदप्रभु यांच्या चरित्राकडे आता वळू या.

## श्रीगोविंदप्रभु

रिद्धपूरजवळ काटसरे गावी अनंतनायक नावाचा काण्णव ब्राह्मण राहत असे. त्याच्या पत्नीचे नाव नेमाइसा. या दांपत्याला मुले पुष्कळ झाली, पण ती जिवंत राहत नसत. त्यामुळे नेमाइसाच्या दुःखाला पारावार नव्हता. शेवटी त्यांना जो मुलगा झाला तो तरी जिवंत राहावा म्हणून त्याचे नाव 'गुंडो' असे ठेवण्यात आले. वर्षादोनवर्षांच्या अवधीत अनंतनायक आणि नेमाइसा, पुत्रसुखाचा अत्यल्पकाळ अनुभव घेऊन मरण पावली. तेव्हां गुंडोच्या मामाने आणि मावशीने त्याचे पालनपोषण केले व योग्य वेळी मौजीबंधन करून त्या वेळेला शक्य असेल ते शिक्षणहि दिले. लहान-पणापासून गुंडो अतिशय बुद्धिवान होता. किती झाले तरी ईश्वराचा

अवतार होता तो ! त्यांच्या अंगांत विरक्ति बाणलेली होती म्हणून गावातील यात्रेकरूबरोबर प्रथम द्वारकेला गेल्यानंतर तेथे त्यांनी संन्यास स्वीकारला आणि दुसऱ्या वेळी श्रीचांगदेवराउळपासून शक्तिस्वीकार केल्यानंतर रिद्धपूरला परत येऊन जीवोद्धरणाचे कार्य करीत करीत ते दिवस घालवू लागले. आईवडिलांनी त्यांना गुंडो असे नाव ठेवलेले असले तरी त्यांचे सुसंस्कृत नाव 'गोविंद' असे होते. महानुभावपंथात गुंडमप्रभु अथवा गोविंदप्रभु ह्या दोन्ही नावांनी ते प्रसिद्ध आहेत.

श्रीगोविंदप्रभु हे ईश्वरावतार असल्यामुळे त्यांचे आयुष्य अनेक चमत्कारांनी भरलेले आहे. एखाद्या घराला आग लागणार असली तर, एखाद्या घरचे कुणी मरणार असले तर, पुढे एखाद्याचे डोळे काढले जाणार असले तर त्या गोष्टीची सूचना गोविंदप्रभु आधीच देत असत. याशिवाय मेलेल्यांना उठवणे, पर्जन्य बोलावणे, दुरून गाईचे दूध काढणे, पांगळ्यांना पाय देणे, मुक्याला वाचा देणे, सर्पाचे विष उतरविणे असे नानाविध चमत्कार करण्याचे सामर्थ्य त्यांच्या ठिकाणी होते. ते अर्थात् त्यांच्या विभूतिमत्वाला शोभून दिसणारेच आहेत.

## श्रीगोविंदप्रभूची आकृति, वेष, वर्तन वगैरे.

"श्रीगोविंदप्रभूच्या एकंदर आकृतीचे, वेषाचे, बसण्याउठण्याचे वर्णन 'विचार बंद' ग्रंथात एकत्र आलेले असल्यामुळे तेच इथे उध्दृत करतो. "श्रीप्रभु आर्य : हें आर्यनागर : श्रीकृष्ण चक्रवर्ती ते नागर" (विचार सूत्र ८०) या सूत्रावर टीका करतांना बंदकार लिहितो : "आर्य म्हणजे आरिखपण : म्हणजे मनुष्य-व्यवस्थेसीं अनसारखेंपण।...मा तर ते आरिखपण कैसे : ना **उठणें** म्हणजे शीघ्रता : **बैसणें** म्हणजे उकड : तथा श्रीचरणावर श्रीचरण घालौनि : **चालणें** म्हणजे गगनाची वास पाहत : तथा दुडुदुडु धावणें : बोलणें म्हणजे वेंभळ : तेचि कैसे : ना : मेली आली : तथा : मेली गेली : तथा तोचि शद्ब पुन्हां पुन्हां बोलणें : **घेणें** म्हणजे आसडुनि : यथा लाखभाकर : आमलक : तथा बदरीफळें बलात्कारें घेणें : **देणें** म्हणजे टाकुन घालणें : यथा सेंगुळ बुडडें : **नेसणें** म्हणजे सोळा हात वस्त्र मीरीया घालुनि सीर पालव घेणें : **पांगुरणें** म्हणजे सव्य भाग टाकौनि वामांगी पदर घेणें :

जेंचि वेढणें तेंचि पांगुरणें : ऐसा **वेष आरिख** म्हणजे मळवट : कुंकुम भरणें : माथां भांग खोपा जवादि भरणें : कर्णीं मुकडी लावणें : पार्यीं वांकि : गळां सांखळ मुकुटीं तेल : वेणी : नाभिचुंबित खाड (=दाढी) तथा स्मश्रु : श्रीकर भवंडणें : टाका भवरी देणें : विहरण वर्तन आवघें आरिख : हें वेषाचें अंगीकृत : तरि **मूर्ति आरिख** ते कैसी : ना पुराचें (=शरीराचे) सौंदर्य तें नाही : आन मूर्ति शामगौर : आणि वाम नेत्र लावणें : वाम कनिष्ठिका वक्र करणें : हें मूर्तीचें आरिखत्व" यावरून श्रीगोविंदप्रभूच्या ध्यान–मूर्तीची सहज कल्पना येईल.

याशिवाय त्यांच्या सवयी म्हणून आणखी एकदोन गोष्टींचा उल्लेख करणे अवश्य आहे. "आवो मेली जाय" ही शिवी गोविंदप्रभूच्या तोंडी सदैव असायची. आणि कोणतीहि गोष्ट आपल्या मनासारखी झाली म्हणजे "ऐया माझा : आता होए म्हणे" हा आनंदोद्गार त्यांच्या मुखातून नेहमी बाहेर पडायचा. आजकाल मुलींच्या तोंडी "अय्या!" शद्ब फार येतो म्हणून वृद्ध तक्रार करितात. त्यांनी श्रीगोविंदप्रभूच्या तोंडी असलेल्या या शद्बाकडे नीट लक्ष द्यावे म्हणजे झाले! एखाद्याकडून आपले काम करून घेतल्यावर किंवा एखाद्याचे काम आपण करून दिल्यावर किंवा एरवीहि इतरांना उगीचच थापटा मारायचीहि श्रीप्रभूंना सवय होती.

इतरांना उगीचच वेडावून दाखवणे, हातवारे [अनुकार] करणे, गरगरा हात फिरवणे वगैरे सवयीहि त्यांना होत्या. याशिवाय खादाडपणा ही त्यांची आणखी एक मोठी सवय म्हणून उल्लेखिता येईल. .... चरित्र–ग्रंथातील कितीतरी आख्यायिका या सवयीसंबधीच्याच आहेत. एकदा ते गूळ खात होते. तोहि कसा? तर 'श्रीकरें भेली मुखीं घातली : आणि आरोगुं लागले : ते श्रीमुखुनि ओघळु नीगेति : ते खाड (दाढी) माखे : दोंदावरी गळे : ऐसा गुळु आरोगीला" (९७). हा अव्यवस्थितपणाच नव्हे तर काय? या खादाडपणामुळे त्यांचे पोट अनेकदा दुखत असे. शेवटी वृद्धापकाळी त्यांना 'बाहीरीतीचा उपद्रो' म्हणजे हगवण लागली आणि त्यातच त्यांचा मृत्यु झाला. हाहि त्यांच्या या खादाडपणाचा परिणाम दिसतो. सारांश गोविंदप्रभूचा वेष, खाणेपिणे बोलणेचालणे वेड्यापिशाला शोभण्यासारखे होते. आणि असे म्हटल्याबद्दल आश्चर्य वाटायला नको. त्यावेळचे लोकहि त्यांना "राउळ

वेडे : राउळ पीस" (७;९) "वेडे : पीसें" (१५) म्हणत असत. महानुभाव महंतहि गोविंदप्रभु म्हणजे वेडापिसा अवतार म्हणून मानतात, ते त्यांच्या या लोकविलक्षण वर्तनामुळेच.

## स्वभाव-विशेष

तथापि श्रीगोविंदप्रभूंच्या ठिकाणी असलेले हे काही लोकविलक्षण बाह्याचार सोडून दिले तर त्यांच्या ठिकाणी इतर काही आंतरिक सद्गुण असल्याचे आढळते. ते आमृत्यु नैष्ठिक ब्रह्मचारी होते, ही गोष्ट त्यांच्या कडकडीत वैराग्याची द्योतक आहे. नेहमीच्या स्वभावधर्मानुसार त्यांना एकदा बाशिंग बांधून घेण्याची इच्छा झाली. पण तो केवळ क्षणभर खेळ म्हणून. त्यावेळी ईश्वरनायक तर त्यांना आपली मुलगी द्यायलाहि तयार झाला होता. पण त्यामुळे श्रीप्रभु त्याच्यावर रागावले. (२२४). जन्मभर ते अनासक्त वृत्तीनेच राहिले. कुणाच्या पैशाअडक्याचा त्यांनी कधीहि लोभ धरिला नाही. पण याहीपेक्षा त्यांच्या ठिकाणचा महत्त्वाचा गुण सर्वाभूती समानदृष्टि. म्हणूनच हा नीच आणि हा श्रेष्ठ असा भेदभाव मनात न आणता सगळयांच्या घरी भोजन करीत. कुणब्यांच्या घरी (६) ते जेवले; मांगाच्या पार्णपोइतील पाणी ते प्याले; महारांच्या घरचे अन्न त्यांनी भक्षण केले. "राउळ मातांगां माहाराचां घरोघरी वीचरताती : आणि तैसेचि दीक्षीतां ब्राह्मणांच्या घरीं वीचरताती" (४७) ही त्यांची वृत्ति त्यांच्या मनाचा मोठेपणा दाखविते. आता ह्या गोष्टीहि त्यांच्या वेडेपिसेपणाचाच एक प्रकार होय असे म्हणायचे असल्यास गोष्ट निराळी. तथापि त्यांच्या मनात अंत्यजाविषयी "अनुकुंपा" होती यात मात्र शंका नाही (४८). इतरांच्या विषयीहि ते नेहमी सदय असलेले आढळतात. कुणाहि अडल्यापडल्याचे काम श्रीप्रभूंनी करून द्यावे, असे अनेक आख्यायिकावरून दिसते. श्रीप्रभु म्हणजे अनाथ व असहाय स्त्रियांचे माहेरच (१५६). त्यांच्या ठिकाणी उपजत विनोदबुद्धीहि होती. त्यामुळे गमतीने आपल्या परिवारातील भक्तजनांना "नावे" ठेवण्याची "खोड" च त्यांना लागली होती. कुणाचा हात मोडला असला तर तिला त्यांनी 'खोडी' म्हणावे; कुणाचे शरीर स्थूल असले तर त्याला 'कोथळा' म्हणून संबोधावे; आपल्या मठात एखाद्याची फार वरवर होत असली तर त्याला 'जावइ' असे नाव ठेवावे वगैरे अनेक प्रकार आढळतात. नागदेवाचार्याला ते 'हरिमा' म्हणत असत (११६,

२७७,) तर म्हाइंभटाला 'चारुवारु' (२५०) म्हणून हाक मारीत असतें." (गोविंदप्रभु चरित्र. पा. २६, २९.)

## श्रीगोविंदप्रभु आणि श्रीचक्रधर

एका दृष्टीने विचार केला तर श्रीगोविंदप्रभु आणि श्रीचक्रधर यांचे परस्पर-संबंध मोठे गुंतागुंतीचे वाटतात. चांगदेवराऊळ हे श्रीगोविंदप्रभूचे गुरु. श्रीचक्रधरस्वामी म्हणजे चांगदेवराउळांचाच नवीन अवतार असल्यामुळे त्या अर्थाने तेहि गोविंदप्रभूचे गुरु ठरतात. पण या नवीन अवतारात त्यांनी श्रीगोविंदप्रभूपासूनच शक्तिस्वीकार केला असल्यामुळे ते गोविंदप्रभूचे शिष्यहि आहेत. म्हणजे गोविंदप्रभूचे गुरु आणि शिष्य ही दोन्ही नाती श्रीचक्रधरस्वामींच्या ठिकाणी एकवटलेली होती असेच नाही का ? तथापि आपल्या नवीन अवतारामधे आपण द्वारावतीकार चांगदेवराऊळ आहोत असे श्रीचक्रधरस्वामींनी अनेकदा म्हटलेले असले तरी आपण गोविंदप्रभूचे गुरु आहोत असें मात्र त्यांनी कधीच म्हटले नाही. स्वतःला श्रीगोविंदप्रभूंचे शिष्य म्हणूनच त्यांनी म्हणवून घेतले.

आपल्या या सर्व गुरुविषयी श्रीचक्रधरस्वामींच्या ठिकाणी अतिशय आदरभावना वसत होती. या सर्वांची प्रसिद्ध असलेली स्थाने त्यांना स्वतःला वंद्य होती. आपल्या शिष्यांनाहि ते त्या स्थानांच्या दर्शनाला पाठवीत असत. स्वामी ज्या वेळी पंचाळेश्वर येथे होते त्या वेळी तेथे असलेल्या श्रीदत्तात्रेयप्रभूच्या गुंफास्थानाजवळ वारंवार जायचे; आणि "हे श्रीदत्तात्रेयप्रभूचें गुंफास्थान" "हे तिर श्रीदत्तात्रेयप्रभुचा चरणी चरणांकीत" म्हणून आवर्जून आपल्या शिष्यांना दाखवायचे. (ली. च. भा. ४ पा. २८). पंचाळेश्वराला आजहि विशेष महत्त्व आहे. कारण, ते जसे श्रीदत्तात्रेयाचे स्थान आहे तसेच श्रीचक्रधरस्वामींच्या चरणांनीहि पवित्र झालेले आहे. तेथे गेल्याने या दोन्ही परमेश्वरावतारांच्या स्थानांचा लाभ महानुभावांना एकाच ठिकाणी घडतो. जानोपाध्यांना उपदेश करतांना "तुमचिया गावापासि आत्मतीर्थ

---

१. गोविंदप्रभूविषयीच्या मजकुरातील कंसामधील आकडे 'श्रीगोविंदप्रभु चरित्र" या पुस्तकातील आहेत.

असे की : हो जी : तुम्ही तेथ जा : तेथ जाइजे हो : ते आणिका स्थावरा-सारिखे नव्हे : तेथ श्रीदत्तात्रेयप्रभूची प्रतिष्ठा हो : शोधु : पंचाळेश्वरा गेला होतासि : पूसीले : हे ते स्थानी होते : तेथ जाइजे हो : " (ली. च. भा. २. पा. २५) या शब्दात श्रीदत्तात्रेयप्रभूच्या स्थानाला जाण्याला त्यांनी मुद्दाम सांगितले आहे. यात त्यांचे श्रीदत्तात्रेयप्रभूविषयीचे अपार प्रेम दिसून येते. आपल्या शिष्याजवळ प्रसंगोपात्त ते श्रीदत्तात्रेयप्रभूचा महिमा निरूपीत असत. उदा० डखले चांगदेवभटाजवळ ते एकदा श्रीदत्तात्रेयप्रभूच्या महिम्याचे निरूपण करीत बसले होते. (ली. च. भा. २ पा. ३६).

जी गोष्ट श्रीदत्तात्रेयप्रभूविषयी तीच द्वारावतीकार चांगदेव--राउळाविषयीहि आढळते. द्वारावतीकार यांनी अनेक पुरुषांना विद्यादान केले होते. त्यांचे विद्यावंत ज्या ज्या वेळेला स्वामींच्या भेटीला येत त्या त्या वेळेला स्वामी त्यांचे मोठे आदरातिथ्य करीत; इतकेच नव्हे तर बाइसाकडून त्यांची पूजाहि करवीत. (ली. च. भा. २ पा. ३४; भाग ३ पा. ८) महदाइसा जेव्हां यात्रेकरूबरोबर द्वारावतीला जायला निघाली तेव्हां स्वामींनी तिला मुद्दामहून सांगितले, " बाइ कोण्ही कोण्हा स्थाना जाये : तुम्ही द्वारावतीकारा श्रीचांगदेवो राऊळाचीया गुंफास्थाना जाइजे हो. " (ली. च. भा. ३ पा. ५२) या आग्रहाच्या मुळाशी महदंबेचे भले करण्याविषयीच्या आस्थे—बरोबरच स्वामींचे श्रीचांगदेवराउळासंबंधीचे स्वतःचे उत्कट प्रेम दिसून येत नाही काय ?

पण या दोन्ही अवतारापेक्षा श्रीगोविंदप्रभूविषयी स्वामींच्या अंतःकरणात विशेष प्रेम होते असे म्हणता येईल. याचे कारण, श्रीप्रभु हे त्यांचे साक्षात् गुरु होते, आणि ते विद्यमान असल्यामुळे त्यांच्याविषयीचा आपला उत्कट भक्तिभाव दाखविण्याचे प्रसंग त्यांना वारंवार येत. श्रीप्रभूंचे वसतिस्थान असलेल्या रिद्धपुराला स्वामी नेहमी परमेश्वर पुर म्हणून संबो-धीत. (ली. च. भा. २ पा. १४) शक्तिस्वीकार करतांना स्वामींच्या पाठीवर श्रीप्रभूंनी थाप मारलेली होती. ह्या गोष्टीबद्दल त्यांना कितीतरी धन्यता वाटे ! त्यांनी हाणलेल्या त्या थापेचे स्वामी सदैव चिंतन करीत असत. (ली. च. उत्तरार्ध. ३९९) त्यांचा महिमा आपल्या शिष्याजवळ तर ते वारंवार निरूपण

करीत. ( ली. च. भा. २ पा. १८. ) आणि आपल्या शिष्यांना श्रीप्रभूंच्या दर्शनाला आणि सेवेला पाठवीत असत. ( ली. च. भा. ३ पा. ११८; उत्त. २.)

श्रीप्रभूंच्या बाबतीत स्वामींचे वर्तन आदर्श शिष्याप्रमाणे होते. परमेश्वरपुराला गेले म्हणजे दुरून तेथील देवळांचे कळस दिसताक्षणीच आपले दोन्ही हात जोडून ते नमस्कार करीत आणि मग त्यांची स्तुतिस्तोत्रे गात गात नगरामध्ये प्रवेश करीत. श्रीप्रभु वेड्यासारखे वर्तन करीत हे प्रसिद्धच आहे. एकवेळ त्यांनी आपल्या या शिष्याला मोगरीने बडवून काढले. “ चाटेयाची मोगरी सुत बडवीती होती : ते श्रीकरी घेउनि गोसावीयाचीया पुष्टी वीभागावरि बुदबुद करीति : तिन घाये दीधले ” ( ली. च. भा. २ पा. १९ ) हे पाहून बाइसा एकदम ओरडायला लागली “ वडिले बाबेनि धाकुटा बाबा मारिला ! ” तेव्हां स्वामींनी तिला गप्प बसवले. इतकेच नाही तर श्रीप्रभूंना अत्यंत नम्रपणाने म्हटले, “ श्रीकर दुखविती जी : पुरो कीजो जी : ” आपल्या गुरूचा मार निमूटपणे सहन करण्यात स्वामींनी दाखवलेला नम्रपणा आदर्श शिष्य म्हणून त्यांना शोभून दिसतो. आपल्या गुरूच्या सान्निध्यात खरा शिष्य आपली स्वतःची सेवा कधीच करून घेत नाही. त्याने तसे केले तर मग त्याच्या दृष्टीने त्या गुरूचे श्रेष्ठपण शिल्लक राहिले कोठे ? हा नियम श्रीचक्रधरस्वामी काटेकोरपणाने पाळीत. ते जेव्हां रिद्धपुरला जात तेव्हां ‘ मग गोसावीयासी जव तेथ अवस्थान होते तव श्रीप्रभुचाचि ठाइ पुजा करिति : गोसावीयासि नाही ’ ( ली. च. भा. २. पा. १९ ). ते स्वतः श्रीप्रभूची पूजा करीत आणि तेथे असेपर्यंत आपण पूजा करून घेत नसत. आपल्या शिष्यांनाहि त्यांची हीच सूचना असे. उपासने नावाचे शिष्य रिद्धपुरला जाऊन, मठ बांधून स्वतःचा पूजापुरस्कार करून घेऊ लागले असे कळताच स्वामींनी त्याला ताबडतोब निरोप पाठवला की एक तर ते गाव सोडून दुसरीकडे जा किंवा आपला पूजापुरस्कार तरी करून घेऊ नकोस. “ उपासनीए तेथ नसावे : तेथ श्रीप्रभु राज्य करिताति : तेथ आपणया पूजापुरस्कार न करावे : का स्थानत्यागु करावा ” (ली. च. उत्त. १५७ ).

श्रीप्रभूंच्या सान्निध्यात असतांना स्वामी त्यांची सर्व प्रकारे सेवा करीत. ते त्यांना आवडणाऱ्या पदार्थांचा उपाहार देत आणि वस्त्रसमर्पण

करून त्यांची पूजा करीत. ( ली. च. भा. २ पा. १९ ). श्रीप्रभूंच्या अंगावरील वस्त्राविषयी स्वामींना अतिशय आदर वाटत असे. रिद्धपुरला असतांना त्यांनी एक वस्त्र श्रीप्रभूंना अर्पण केले होते. थोडा वेळ नेसून श्रीप्रभूंनी ते सोडून ठेवल्यावर स्वामींनी ते बाइसाच्या हातात दिले. स्वच्छ करण्यासाठी बाइसांनी ते झाडले तेव्हां स्वामी म्हणाले, " हे काइ बाइ : श्रीप्रभूंचे वस्त्र कैसे झाडिते असा." बाइसांनी म्हटले, " बाबा ( हे वस्त्र ) रजें भरले असे." तेव्हां स्वामी म्हणाले, " बाइ श्रीप्रभूंचे वस्त्र आणिक रज ऐसे म्हणत असा : हे रज कैसे : हे ब्रह्मादीका दुर्लभ की " ( ली. च. भा. २ पा. २० )

एकवेळ खडकुली येथे असतांना स्वामींनी श्रीप्रभूंचे वस्त्र घेऊन नमस्करिले होते, ते कसे ? याचे वर्णन मोठे वाचनीय आहे. " बाइसी वस्त्र आणिले : गोसावीयाचा श्रीकरी वोळगवीले : गोसावी दोही श्रीकरी घेतले : नमस्करिले : श्रीमुकुटावर ठेविले : उकलिले : उजवी बूथि घातली : यरीवानी करूनि डावी बूथि घातली : उजवी पालवती घातली : डावी पालवती घातली : मग दुणे केले : चौगुणे केले : मग या श्रीचरणावरि ठेविले : या श्रीचरणावरि ठेविले : डावेया गुडघेयाखालि घातले : उजवेया गुडघेयाखालि घातले : डाविये जानुवरी ठेविले : उजविये जानुवरी ठेविले : या कोपराचिए सांदी घातले : या कोपराचिए सांदी घातले : ये कर्णयुगुळी धरिले : ये कर्णयुगुळी धरिले : मग नमस्करिले :" ( ली. च. उत्त. १५ ) या वर्णनावरून श्रीप्रभूंचे वस्त्र स्वामी किती प्रेमाने नमस्करीत होते हे दिसून येईल. काही कारणामुळे स्वामी एखादे वेळी उदास झाले म्हणजे त्यांचे औदास्य घालवण्यासाठी भटोबास व बाइसा श्रीप्रभूंचे वस्त्र स्वामींच्या पुढे ठेवीत. त्याचा इष्ट तो परिणाम तावडतोब होत असे. ( ली. च. उत्त. १२४ ).

श्रीप्रभूंची सेवा ते स्वतः जितक्या आस्थेने करीत तितक्याच आस्थेने आपल्या शिष्यांना करायला लावीत. हंसराजाला श्रीप्रभूंच्या सेवेसाठी पाठविले तेव्हां तिला स्वामींनी मुद्दामहून सांगितले, " बाइ : तेथ भितरि निद्रा न कीजे : तेथीची प्रवृत्ति भंगो नेदीजे " : ( ली. च. भा. ३ पा. ११८ ). पुढे स्वामींनी आबाइसाला श्रीप्रभूंच्या सेवेसाठी पाठवले त्यावेळीहि त्यांनी सूचना दिल्या की, " बाइ : श्रीप्रभूसि जो पदार्थ वोळगवीजे तो आधी तेथ दृष्टपूत कीजे : आणि तेथची प्रवृत्ती : ऐसे काही न पूसत मुखी न घालिजे :"

( ली. च. उत्त. २८६ ). श्रीप्रभूंच्या सेवेसाठी ते नेहमी कुणाला ना कुणाला तरी पाठवण्याची काळजी घेत. हंसराजाला त्यांची सेवा योग्य तऱ्हेने करता येईना म्हणून ती परत आली. तेव्हां " आता श्रीप्रभूचिए सेवेसि कवण पां योग्य :" म्हणौनि चींता स्वीकरीलि " ( सदर ) अशी त्यांना काळजी लागली होती.

सारांश, आपले गुरु म्हणून स्वामींनी ज्यांचा उल्लेख केला आहे ते उधळीनाथ, श्रीदत्तात्रेय श्रीचक्रपाणी, (= चांगदेवराऊळ ) श्रीगोविंदप्रभु या सर्वांच्याच विषयी त्यांच्या मनात आदरबुद्धी वसत असे. उधळीनाथ हे वस्तुतः एक सामान्य विद्यावंत होते; दुसऱ्या दृष्टीने विचार केला तर ते चांगदेवराउळांचे अनुग्रहीत ( एकांक १० ) असल्यामुळे त्यांच्या विषयी स्वामी सदैव कृतज्ञता भाव मनांत बाळगीत असत, हे त्यांच्या नम्रतेचे आणि उदार अंतःकरणाचे द्योतक नाही काय ? श्रीदत्तात्रेय, श्रीचक्रपाणी, श्रीगोविंदप्रभु व श्रीचक्रधर हे वस्तुतः सर्वच ईश्वरावतार होत; पण इह-लोकांतील त्यांचे परस्परसंबंध लक्षांत घेऊनच त्यांच्यामध्ये असलेला गुरु-शिष्यभाव या ठिकाणी वर्णन केलेला आहे, हे विसरता कामा नये !

# ४

# चरित्राची रूपरेषा

श्रीगोविंदप्रभूपासून शक्ति-स्वीकार करून श्रीचक्रधरस्वामी रिद्धपूरच्या बाहेर पडले. संसाराला व भोगविलासाला ते पूर्वीच विटले होते. आता, श्रीगोविंदप्रभूसारख्या उन्मनस्क परमेश्वरावताराच्या दर्शनामुळे व कृपाप्रसादामुळे त्यांची ती विरक्तावस्था अधिकच बळावली. त्या स्थितींत अमुकच दिशेने जावे अशी त्यांना प्रवृत्तीहि होत नव्हती. पाय नेतील तिकडे जायचे एवढेच. अशा उन्मनस्क विरक्तावस्थेंत आडवाटेने चालत चालत ते जवळच्याच सालबर्डीच्या डोंगरात येऊन पोहचले. तिथे त्यांनी बारा वर्षे क्रीडा केली. बारा वर्षे म्हणजेच 'तप'. अर्थात, श्रीचक्रधरस्वामींची ती तपश्चर्याच (बारा वर्षांची चर्याच) होती. तपश्चर्येचा अर्थ कोणाची तरी भक्ति असा घेऊ नये. कारण श्रीचक्रधरस्वामी हे परमेश्वरावतार असल्यामुळे त्यांनी कोणाची बरे भक्ति करायची ? या तपश्चर्येत त्यांनी सोसलेल्या शरीर-कष्टांचे वर्णन किती करावे ? आपल्या सेवकवर्गाजवळ सर्व वस्त्रालंकार काढून ठेवून ते फक्त दोन वस्त्रानिशी काय ते रिद्धपूरला आले होते. ही दोन वस्त्रें एवढेच काय ते त्यांचे सर्वस्व होते. त्यांची चाफेगौर मूर्ति अनवाणी असल्यामुळे चालतांना त्यांच्या सुकुमार चरणांना खडे रुतत आणि काटे बोचत. मधेच एखाद्या दगडाची ठेच लागून बोटातून रक्त वाहू लागे. पण तिकडे लक्ष होते कुणाचे ? पर्वतावरील दऱ्या-दरकुट्यामध्ये काटेरी झाडाच्या जाळ्या असावयाच्याच. त्यांच्या जवळून जातांना यांच्या अंगावरचे वस्त्र काट्यात गुंतून पडले. ते तसेच टाकून हे पुढे निघाले. कमरेभोवती गुंडाळलेल्या वस्त्राच्याहि काट्यात गुंतून चिंध्या चिंध्या झाल्या. त्यांचे सोन्यासारखे सुंदर शरीर सर्वस्वी

उघडे पडले. पण तशाहि स्थीतींत त्यांचे चालणें सुरूच असायचे. डोक्यावरील केशकलाप काट्यात गुंतले म्हणजे स्वामींनी तेथेच उभे रहावे. वाऱ्यामुळे केस काट्यातून आपोआप मोकळे झाले तरच त्यांनी पुढे चालू लागावे. त्याचे केस काट्यात गुंतलेले असतांना क्वचित एखादा माणूस तिकडे जात असला तर त्याने त्यांच्याजवळ यावे व ते केस मोकळे करावे असेहि कधी कधी घडत असे. शरीरावर वस्त्रप्रावर्ण नसल्यामुळे, चालतांना भोवतालच्या झाडांचे काटे त्यांना बोचत व त्यांच्या अंगावर ओरखडे पडत. त्यासरशी शरीरांतून रक्ताचे बिंदु बाहेर निघत. पण चक्रधरस्वामींनी आपणहून कधी आपल्या हातांनी ते पुसून टाकले नाहीत. ते तिथल्या तिथेच वाळायचे. सोन्याच्या कोंदणातील लाल माणकाच्या लहानलहान खड्याप्रमाणे त्यांच्या गौर देहावर ते रक्ताचे बिंदु शोभून दिसत असत.

अशा स्थितींत सालबर्डीच्या पर्वतावर क्रीडा करीत असतांना एके दिवशी त्याची व मुक्ताबाईची भेट झाली. ही मुक्ताबाई अत्यंत म्हातारी होती. तेराशे वर्षेपर्यंत ती त्या ठिकाणी तपश्चर्या करीत होती. तिच्या अंगावरील केसांचे लांब झुबके तयार झाले होते. डोक्यावरील केसांच्या जटा भुईपर्यंत लोंबत होत्या. हातापायाच्या बोटांची नखे वळून त्यांच्या चुंभळी बनल्या होत्या. मुक्ताबाईला स्वामींचे दर्शन होताच तिने साष्टांग प्रणिपातपूर्वक विनंती करून त्यांना आपल्या पर्णकुटींत नेले. दर्भासनावर बसवून त्यांचे चरण आपल्या केशकलापाने झाडले. वनपुष्पांनी पूजा करून कंदमुळांची आरोगणा त्यांना दिली आणि स्वामींचे दर्शन झाल्यामुळे आपली आतापर्यंतची तपश्चर्या फळाला आल्याबद्दल तिने स्वामीजवळ समाधानाचे उद्गार काढले. मुक्ताबाईबरोबर तिचा बोल्हानामक सेवक होता. त्यालाहि स्वामींचे दर्शन झाले.

सालबर्डीच्या डोंगरावर श्रीचक्रधरस्वामी बारा वर्षे होते. तेथे असतांना त्यांच्या आयुष्यातील एवढाच काय तो उल्लेखनीय प्रसंग नमूद करून ठेवलेला आढळतो. या काळांतील इतर कोणत्याच प्रकारची हकीकत आपल्या शिष्यमंडळीजवळ स्वामींनी सांगितलेली नाही. आणि त्यात त्यांच्या दृष्टीने सांगण्यासारखे असे काय असणार ? जाणून बुजून ते डोंगरात राहत होते. तिथे एखादा मनुष्यप्राणी जाणार तोहि क्वचित आणि कधीकाळी ! तेव्हां तेथील निवासात 'वृक्षवल्ली आम्हां सोयरी वनचरे। पक्षी

ही सुस्वरे आळविती ' ह्याच निसर्गाच्या सान्निध्यात त्यांचा काळ सहज निघून जात असल्यास आश्चर्य वाटायला नको. सालबर्डीचा हा डोंगर मोठा निसर्गरमणीय आहे. तेथील उंचसखल टेकड्यावरील मातीत, चमकणाऱ्या धातूंचे कण इतके मिसळलेले आहेत की त्यामुळे तेथील लहानसान गोटेहि सूर्यप्रकाशात पृथ्वीच्या पोटातील हिऱ्याच्या अंगठ्याप्रमाणे चम्चम् चमकतात. हा सगळा भाग खनिज संपत्तीने चांगला समृद्ध असला पाहिजे हे तेथील लालसर व हिरवट दगडावरूनहि दिसून येते. एकदोन ठिकाणी असलेले ऊन पाण्याचे झरे, पृथ्वीच्या पोटात असलेल्या गंधकाच्या समृद्धीची खूण पटवतात. अशा या प्रदेशातून नदी आपला मार्ग धीरगंभीरपणे चोखाळते. तिच्या दोन्ही काठावर हिरवीगार गर्द झाडी आहे. जवळच एका डोंगरमाथ्यावरील गुहेत शंकराचे लहानसे देऊळ आहे. तेथून दिसणारी नैसर्गिक शोभा तर विशेषच आनंददायक वाटते. तशात, हे ठिकाण अतिशय थंडहि आहे. या स्थानाच्या परिसरात श्रीचक्रधरस्वामींचा काळ जात असावा हे जवळच असलेल्या स्वामींच्या स्थानावरून उघड दिसते. हें स्थान आज उघड्यावर असले तरी भोवतालचा भाग लक्षात घेता तेथे सृष्टीने आपले सौंदर्य पूर्वी ओतून ठेवलेले असले पाहिजे असे सहज अनुमान करता येते. स्वामींच्या या स्थानाला मौनी बाबांचे स्थान म्हणून आज संबोधतात, ते मोठे सूचक आहे. श्रीचक्रधरस्वामी या ठिकाणी असतांना, त्यांनी मौनव्रत धारण केले होते, हेच त्यावरून दिसून होत नाही काय ? अशा स्थितींत त्यांनी मनुष्यांना दर्शन दिले असले तरी मौनावस्थेतच. या विरक्तिपूर्ण मौनव्रतामुळे स्वामींच्या आयुष्यातील या बारा वर्षांच्या कालखंडातील फारसे प्रसंग उपलब्ध नाहीत यात आश्चर्य नाही.

विरक्तिपूर्ण मौनावस्थेत या पर्वतावर बारा वर्षे घालविल्यानंतर ते बाहेर पडले आणि ठिकठिकाणी भ्रमण करू लागले. फिरता फिरता ते कांति (सध्याचे ' काटोल ', जि. नागपूर) नगराला येऊन पोचले. तेथे उधळिनाथांनी त्यांना ' वयस्तंभनी ' विद्या दिली. (मागे पा. २७ व २८ पहा.) त्या विद्येच्या योगाने अखंड तारुण्य प्राप्त झालेला त्यांचा देह अत्यंत सुंदर दिसत असे. स्वामींचे मौन कायमच होते. विरक्ती तर पराकोटीला पोचलेली होती. जवळजवळ अर्धनग्न स्थितीत एक प्रकारच्या आध्यात्मिक

विदेहावस्थेत ते रंगून गेलेले असत. त्यामुळे आपण काय करतो, कुठे जातो याचे त्यांना जणु भान राहात नसे. पण त्याचमुळे त्यांच्यावर काही 'प्रसंग' ओढवत. स्वेच्छेनुसार भ्रमण करता करता ते आंध्र देशातील एका गावात अगदी प्रातःकाळी जाऊन पोचले. एका घरासमोरील अंगणात बाजेवर एक तेलीण निजली होती. तिच्या खाटेवर जाऊन स्वामी पडले आणि तिची पासवडी त्यांनी आपल्या अंगावर पांघरून घेतली. त्यामुळे ती बाई भिऊन उठली आणि आरडाओरडा करू लागली. नदीवर गेलेल्या तिच्या नवऱ्याला हे कळताच तो तातडीने आला आणि हातात खड्ग घेऊन बाजेजवळ गेला. स्वामींच्या तोंडावरचे पांघरूण त्याने फरकन ओढले. वार करण्यासाठी त्याचा हात वर गेला; पण स्वामींचे दर्शन होताच त्याच्या मनातील रोषबुद्धी एकदम नाहीशी झाली. त्याच्या हातातील खड्ग गळून पडले. त्या पतिपत्नींनी स्वामींना अभिवंदन करून त्यांची पूजा केली. त्यांना भोजन घातले. रात्री स्वामी तिथेच झोपले. मधेच त्यांना तहान लागली. पण मौनपूर्ण विरक्तावस्थेमुळे त्यांनी कुणाला पाणीसुद्धा मागितले नाही. त्या तेली दांपत्याने नेसवलेली वस्त्रे स्वामींनी सोडून ठेविली आणि आपली वस्त्रे घेऊन ते तुंगभद्रा नदीवर पाणी प्यायला रात्रीच गेले. मातीच्या पेंडावर बसून पाणी पिऊ लागले तो मधेच तो पेंड खचला. स्वामी नदीत पडले व प्रवाहाबरोर वाहत जाऊ लागले. त्यांनी आपणाला वाचवण्याचा किंवा काठावर निघण्याचा प्रयत्नहि केला नाही. दुसरे दिवशी सकाळी सहज–गत्या जेव्हां ते प्रवाहाबरोबर थडीला लागले तेव्हां जमिनीवर येऊन ते पुढे चालू लागले. ( ली. च. एकांक ११ ).

वरंगळ प्रदेशात परिभ्रमण करीत असतांना एका गावी ते पाणीपात्र करीत होते. त्यांना पाहून एका ब्राह्मणाने त्यांना आपल्या घरी ठेवून घेतले. घराच्या माडीवर स्वामी राहत. त्या ब्राह्मणाची बहीण त्यांचे सेवादास्य करीत असे. ते तेथे बरेच दिवस होते. गावातील लोक स्वामी आणि त्या ब्राह्मणाची बहीण यांच्या संबंधी नाही नाही ते बडबडू लागले. म्हणून त्या ब्राह्मणाने एके दिवशी मुद्दाम त्यांच्यावर पाळत ठेवली. स्वामींचे चरण–संवाहन करता करता त्या बहिणीला झोप लागली. तिला स्वामींच्या अंथरुणावर पाहून त्या ब्राह्मणाला संशय आला आणि म्हणून क्रोधसंतप्त होऊन तो खड्ग काढून

त्यांच्या अंगावर चालून गेला. पण स्वामींनी जेव्हां कृपादृष्टीने त्याच्याकडे पाहिले तेव्हां त्याचा राग नाहीसा झाला. स्वामींनी त्याच्या ठिकाणी चार कळिकांचे प्रेम संचरले. तो ब्राह्मण स्वामींचा अनन्य भक्त बनला. त्यानंतर तो स्वामींच्या सन्निधानात दोन महिने होता. एक वेळ स्वामींनी त्याला नदीच्या अलीकडील गावी ठेविले आणि आपण स्वतः पलीकडच्या गावी राहिले. पण हा विरह त्या भक्ताला सहन होईना. पलीकडच्या गावातून भिक्षेसाठी येणाऱ्या एका ब्राह्मणाला तो भक्त दररोज स्वामींची कुशल वार्ता विचारीत असे. एके दिवशी त्या ब्राह्मणाला वाटले, "वा, स्त्रीला पुरुषाचा वेध नसेल इतका या पुरुषाला त्या पुरुषाचा वेध दिसतो, हे कसे काय?" म्हणून त्याने त्या दिवशी त्या भक्ताला खोटेच सांगितले की "स्वामी सर्पदंश होऊन मृत्यु पावले!" ही वार्ता ऐकतीच भक्ताला अत्यंत दुःख झाले. त्याने पुनः पुन्हा तीन वेळ त्या ब्राह्मणाला 'ही गोष्ट सत्य आहे काय' म्हणून विचारले. त्याने तिन्ही वेळ 'सत्य आहे' असेच उत्तर दिले. तेव्हां भक्ताला विरह असह्य होऊन उभे असतांनाच त्याने देहत्याग केला. ते पाहून त्या ब्राह्मणाला भीति वाटली. त्याने परत जाऊन स्वामींना सगळा वृत्तांत सांगितला. स्वामी म्हणाले "हां भटो, ऐसा सत्यही अर्थु संगीजे : न बोलिजे : मा एसणे असत्य कैसेनि तुम्हां बोलाविले." स्वामींनी त्या ब्राह्मणाकडून त्या भक्ताचा निक्षेप करवला. भक्ताच्या विरहामुळे स्वामींनाहि मग तेथे राहणे असह्य झाले. ते पुन्हा इतस्ततः भटकू लागले. (ली. च. एकांक १४)

वरंगळ येथे असतांना तिथल्या एका श्रीमंत मल्लाने स्वामींची पूजा करून त्यांना पांच हजारांची रत्ने जडलेला एक जोगवटा अर्पण केला. पण पुढे स्वामींनी तो जोगवटा एका ब्राह्मणाला देऊन टाकला. (ली. च. एकांक १५.)

या कालखंडात श्रीचक्रधरस्वामींच्या आयुष्याशी संबद्ध असा दुसरा एक प्रसंग अतिशय महत्त्वाचा आहे. तो त्यांच्या द्वितीय विवाहाविषयीचा होय. हे वाचून वाचकांना थोडे आश्चर्य वाटेल. कारण एकीकडे चक्रधरस्वामी अत्यंत विरक्त वृत्तीने मौन धारण करून, नग्न स्थितींत परिभ्रमण करीत होते म्हणून पूर्वी सांगितले. तेव्हां त्या विरक्त वृत्तीशी विसंगत असा हा विवाहाचा प्रसंग कसा काय घडून आला ही

जिज्ञासा निर्माण होणें स्वाभाविक आहे ! त्याचे असे झाले की, स्वामी आंध्र प्रदेशात भ्रमण करीत असतांना एकदा वरंगल येथे गेले होते. त्या नंतर काही दिवसांनी ते भटकत भटकत पुन्हा त्याच प्रदेशात आले. एका गावी आपले विकाऊ घोडे घेऊन पुष्कळ हेडाऊ आले होते. सहजगत्या स्वामी तेथे जाऊन पोहचले. त्यांनी घोड्यांच्या जातींची जी वर्णने केली त्यावरून त्यांना अश्वपरीक्षा फार चांगली करता येते असे त्या व्यापाऱ्यांच्या लक्षात आले. ते स्वामींना मोठ्या मानसन्मानाने आपल्या तंबूत घेऊन गेले. तेथे त्यांना उत्तम स्नान घातले. उंची वस्त्रें अर्पण केली. बसायला एक घोडा दिला. सर्व हेडाऊंनी स्वामींना आपले मुख्य नायक केले आणि ते सगळे जण वरंगळ येथे येऊन पोहचले. तेथे स्वामींच्या मध्यस्थीमुळे त्यांचे घोडे फार चांगल्या किंमतीला विकले गेले. हा क्रयविक्रयाचा व्यापार चालू असतांना तेथे आलेल्या एका व्यापाऱ्याने स्वामींना म्हटले, "महाराज, मला एक मुलगी आहे. ती अतिशय सुंदर आहे. तिच्यासाठी मी पुष्कळ स्थळे शोधली. पण तिला अनुरूप असा एकहि वर मला कुठेच सापडला नाही. आपण मात्र तिला अनुरूप आहात. तेव्हां स्वामींनी माझ्या मुलीला आपली दासी करून घ्यावे. माझ्या विनंतीचा आपण स्वीकार केला म्हणजे मी कृतार्थ होईन. आजपर्यंत तिच्यासाठी केलेल्या श्रमाचे मला योग्य फळ मिळाल्या-सारखे होईल." ही विनंती ऐकून स्वामी म्हणाले, "पण मला ना जात ना गोत,ना घर ना दार !" व्यापाऱ्याने लागलीच उत्तर दिले. "आपणच जात आणि आपणच गोत; आपणच घर नि आपणच दार ! आपल्या ठिकाणी हे सर्व समावलेले आहे." यावर स्वामींनी पुन्हा हासून म्हटले, "अहो पण मी इतका दरिद्री की लग्न करण्याइतपत देखील माझ्याजवळ कांही नाही !" व्यापारी म्हणाला, "त्याची काळजी आपण करू नका. लग्नाची सर्व तयारी माझ्याजवळ आहे." हे ऐकताच ते हेंडाऊ एकदम म्हणाले, "स्वामींच्या जवळ कांही नाही, असे कसे म्हणता ? अहो हे आमचे सगळे द्रव्य वगैरे स्वामींचेच आहे !"

झाले, अशा रीतीने सहज बोलता बोलता लग्न जुळल्यासारखे झाले. तथापि लग्न निश्चित होण्यापूर्वी आपल्या नातेवाइकांनी वर पाहिलेला बरा असे वाटून तो व्यापारी स्वामींना गावात घेऊन गेला. सर्व नातेवाइकांनी वर

पाहिला. सर्वांना तो पसंत पडला हे काय सांगायला पाहिजे ? लग्न ठरले. योग्य दिवस पाहून गोरज मुहूर्तावर लग्न लागलेहि. चार दिवस लग्नाचा व वऱ्हाड्यांचा सोहळा चालू होता. तो आटोपल्यानंतर हेडाऊ स्वामींची परवानगी घेऊन निघून गेले. आणि चक्रधरस्वामी आपल्या या नूतन–परिणीत वधूबरोबर आनंदाने कालक्रमणा करू लागले. त्यांच्या या पत्नीचे नांव हंसांबा असे होते. स्वामी तिच्याबरोबर नेहमी सारीपाट खेळून मनोविनोदन करीत असत.

एके दिवशी ते असेच माडीवर सारीपाट खेळत होते. खेळता खेळता मधेच त्यांनी रस्त्यावर नजर फेकली तो त्यांना तिथे एक अवधूत दिसला. तो अवधूत म्हणजे वैराग्याचा मूर्तिमंत पुतळा होता. त्याने संसाराला लाथ मारली होती आणि आता तो भिक्षा मागत रस्त्यातून हिंडत होता. त्याचे दर्शन झाल्याबरोबर श्रीचक्रधरस्वामींना काय वाटले कोणास ठाऊक, पण, हंसांबेकडे पाहून ते एकदम उद्गारले, "आता आम्हीहि या अवधूताप्रमाणेच होणार. संसारावर लाथ मारून भिक्षा मागत हिंडणार !" त्यांच्या मुखातून बाहेर आलेले हे शब्द कानावर पडताक्षणीच हंसांबेला आपणावर जणु वज्राघात होत आहे की काय असा भास झाला आणि ती तात्काळ मूर्च्छित होऊन खाली पडली. तिची ती अवस्था पाहून स्वामींनी तिला हात देऊन लागलीच उठवले, आपल्या हाताने तिचे डोळे पुसले, इतकेच नव्हे तर तिच्या डोळ्यांना पाणी लावून तिला सावध केले. त्यावेळी हंसांबेच्या डोळ्यात पाण्याबरोबर मूर्तिमंत कारुण्य उभे राहिले असल्यास नवल कोणते ? तिचे समाधान करण्याकरता स्वामींनी तिला म्हटले, "अग, मी तुला फसवत होतो. नुसती तुझी थट्टा करीत होतो. मी अवधूत होऊन भिक्षा मागत हिंडणार म्हणून जे म्हटले ते तुला खरे वाटले की काय ?" स्वामींच्या आश्वासनाने हंसांबेला किती समाधान वाटले असेल म्हणून सांगावे ? स्वामींनी हंसांबेचे समाधान केले असले तरी ते आता त्या संसार-पाशात गुंतून पडणार होते असे थोडेच आहे ? त्यांनी हंसांबेच्या ठिकाणी स्थित्यानंदाचा संचार केला. त्या आनंदात जणु स्वामी आपल्या जवळच आहेत असा तिला भास होत होता. त्या स्थित्यानंदांत तिला सोडून चक्र-धरस्वामी तेथून बाहेर पडले आणि त्यांनी पुन्हा आपली भ्रमंती सुरू केली.

एकांकातील या विरक्तावस्थेत हंसांबेशी चक्रधरस्वामींनी विवाह करणे हें विसंगत वाटणे साहजिक आहे; तथापि, महानुभाव महंतांच्या मंते स्वामींनी केलेल्या या विवाहामागे आध्यत्मिक कारण आहे. स्वामींनी जे अखंड परिभ्रमण सुरू केले होते त्यातील मुख्य हेतु ज्ञानाला व प्रेमाला पात्र झालेल्या अधिकारियांना ज्ञान व प्रेम देऊन उद्धरणाच्या मार्गाला लावणे हा होता. तदनुसार वरंगळच्या भक्ताला त्यांनी प्रेमसंचार केला होता. विषयप्रेम हाहि प्रेमाचा एक प्रकार आहे. परमेश्वरावताराचे विषयप्रेम मोठ्या प्रयासांनी प्राप्त होते. त्यासाठी कांही विशिष्ट अधिकार जोडावे लागतात त्यालाच विषयप्रेमाची चाल म्हणतात. हंसाबेच्या बाबतीत ही विषयप्रेमाची चाल चालू होती. तिच्या पूर्वसंचिताप्रमाणे या देहात तिला परमेश्वराचे पत्नीपद प्राप्त होऊन, तिच्या विषयप्रेमाची चाल वाढायची होती. यामुळे कालांतराने रुक्मीणीप्रमाणे तिला परमेश्वराची पट्टराणी होऊन त्याचे मुख्य प्रेम प्राप्त व्हायचे होते. तेव्हां तिची विषयप्रेमाची चाल वाढवण्यासाठी स्वामींना तिच्याशी विवाह करणे हे तिच्या आध्यात्मिक अधिकारानुसार अवश्य होते. ( महा. तत्त्व. पाने २९४, २९५, २९८ पहा ).

स्वामी वरंगळहून निघाले व भ्रमण करीत करीत महाराष्ट्रात आले. प्रवासात त्यांना घोडाचुडीचे शिष्य भेटले. त्यांच्याबरोबर असतांना त्या शिष्यांच्या हातावर एका बाईने कढत आंबील टाकल्यामुळे त्यांनी तो सगळा गाव पेटवून दिला. हे पाहून स्वामींना त्यांची घृणा आली व ते तडक रितपुरला श्रीप्रभुजवळ आले. आणि पुन्हा भ्रमण करू लागले. मार्गात ते कधी गमतीने द्यूत खेळत, कधी गुराख्याबरोबर राहत. काही दिवस विंध्यपर्वतात ते गोंडांच्या वस्तीतहि राहिले. एकवेळ त्यांनी पारध्यांच्या तडाख्यातून एक सशाचे संरक्षण केले. भटकता भटकता स्वामी रामटेकला आले. तेथे ते सुमारे दहा महिने तरी होते. पुढे मनसरहून ते भंडाऱ्याला गेले. तेथे नीळभट भांडारेकर नावाचा एक शिष्य त्यांना मिळाला. स्वामींच्या जवळ राहू लागलेला असा हा पहिलाच शिष्य म्हणायला हरकत नाही. स्वामी नांदेड येथे गेले असतांना तेथे या नीळभटाचा मृत्यु झाला. ( एकांक २७ ते ३२ ). भ्रमणामधे स्वामींना एक वेळ अळजपूरचा राम–

दरणा भेटला. तो त्यांना अळजपूर येथे घेऊन गेला. तेथेहि स्वामी १० महिने राहिले. या रामदरण्याच्या उमादेवी नावाच्या कन्येशी चक्रधरस्वामींनी तिसरा विवाह केल्याची हकीकत कै. वि. ल. भावे यांनी 'महाराष्ट्रसारस्वतात' (भाग १. पा. ५८) नमूद करून ठेवली आहे. 'लीळाचरित्रा' च्या वाइंदेशकर पाठातच काय ती या प्रकारची हकीकत आढळते. इतर कोणत्याहि पाठात ती नाही. रामदरण्याबरोबर चक्रधरासारखा सुंदर व तरुण पुरुष आलेला पाहून लोकात साहजिकच तर्कवितर्क सुरू झाले. 'गावीचा लोकू गोसावियाते देखौनि म्हणे : रामदरणेयाते लेकी वाढत असे : हे जावाइ करावेया आणिले असति :' (एकांक. ५५) हीच लोकवार्ता बहुतेक पाठांनी नमूद करून ठेवली आहे. तळेगावकरांच्या पाठातहि 'हा हो : हे राजपद काइ होति : कोण्ही म्हणति जामात : कोण्ही म्हणे हे रायाचे गुरु' एवढाच उल्लेख आहे. यापैकी कोणत्याहि पाठात स्वामींनी या ठिकाणी विवाह केल्याचा उल्लेख नाही. यावरून स्वामींचा तिसरा विवाह झाला होता असे वाइंदेश-करांच्या पाठात जे म्हटले आहे ते बरोबर वाटत नाही.

अळजपूरहून निघाल्यावर स्वामी वडनेर येथे आले. तेथे रामदेव नावाच्या विद्यावंताला त्यांचे दर्शन झाले. दर्शनीय शिष्यांपैकी रामदेव हा प्रथम शिष्य होय. स्वामींच्या प्रयाणकालापर्यंत हा अधूनमधून नेहमी त्यांच्या दर्शनाला जात असे. वडनेरहून स्वामी पातुरडीमार्गाने मेहेकरला गेले. तेथे बोणेबाई नावाची एक विरक्त म्हातारी भिक्षान्नावर निर्वाह करून ईश्वरसेवेत काळ कंठीत होती. तिच्या आग्रहावरून स्वामी बाणेश्वराच्या मंदिरात बरेच दिवस राहिल्यानंतर सिंहस्थ यात्रेच्या निमित्ताने पैठणकडे जायला निघाले. (ली. च. एकांक ७२) त्यांच्यासाठी यात्रेची तयारी म्हणून बोणेबाईने आंगीटोपरे शिवले व वहाणाबांधून घेतल्या. विरक्त वृत्तीने राहणाऱ्या स्वामींना अंगीटोपऱ्यांचा संस्कार प्रथम बोणेबाइमुळेच झालेला दिसून येतो. लोकसमूहाबरोबर यात्रा करीत करीत स्वामी बोणेबाइसह पैठणला येऊन पोचले.

त्यांच्या आयुष्यातील आणखी एक महत्त्वाचा प्रसंग यावेळी घडून आला. भोगावती नावाच्या स्थानी यात्रेकरूबरोबर बोणेबाई आणि स्वामी उतरले होते. पैठणलाच नागुबाई नावाची एक विरक्त म्हातारी राहत होती. बोणेबाई तिच्याकडे दर्शनार्थ गेली. प्रसंगानुरोधाने तिने

नागुबाईला आपल्याबरोबर आलेल्या स्वामींच्या अनेक गोष्टी सांगितल्या. त्या ऐकून नागुबाईच्या मनात स्वामींच्या दर्शनाविषयी इच्छा उत्पन्न झाली. दुपारी आपले पयोव्रती गुरु वामदेव यांच्याकडे ती जात असतांना रस्त्यात अनायासे स्वामींची व तिची गाठ पडली. तिने ओळखले की बोणेबाईने ज्या पुरुषाचे वर्णन केले ते हेच असले पाहिजेत. ती त्यांना घेऊन आपल्या गुंफेकडं परत गेली. आपले नेहमीचे पायपुसणे तिने स्वामींना बसायला दिले. आणि आपली शिष्या हासुबाइकडून त्यांना भोपळ्याच्या पात्रांत पाणीभात वाढला. स्वामींनी तो सेवन केला. ते तेथेच भोगनारायणाच्या देवळात झोपले. (ली. च. एकांक ७६) इकडे, स्वामी परतले नाहीत म्हणून बोणेबाईला काळजी लागली होती. ती दुसरे दिवशी सकाळी त्यांना शोधीत शोधीत नागुबाईच्या गुंफेत येऊन पोचली. स्वामींना तिने तेथे पाहिले आणि ती त्यांना त्र्यंबकेश्वराच्या यात्रेसाठी पुढे चालण्याची तयारी करायला सांगू लागली. पण स्वामींनी जावे असे नागुबाईला वाटेना. ती म्हणाली, "अग, महात्म्यांना कुठले आले त्र्यंबकेश्वर ! हे जेथे राहतील तेच तीर्थस्थान होय." नागुबाईचे हे बोलणे ऐकून बोणेबाई तिच्यावर रागावली; आणि स्वामींना आपल्याबरोबर घेऊन ती पुढे निघाली. नदीच्या काठापर्यंत स्वामी तिच्याबरोबर गेले. पण मग बोणेबाई नदी ओलांडून पुढे गेली तरी हे पुढे पाऊल टाकीनात. बोणेबाई म्हणाली, "चाला बा मुनिंदेया" तेव्हां स्वामी बोलले, "आता मी येत नाही. तुम्हीच माझ्यासाठी एवढासा त्र्यंबक घेऊन या"–स्वामींचा कल पाहून शेवटी बोणेबाई म्हणाली, "ठीक आहे. मग आम्ही परत येतो तोपर्यंत येथेच रहा. मग बरोबरच गावी परत जाऊ." असं म्हणून बोणेबाई यात्रेकरूबरोबर पुढे निघाली आणि स्वामी नागुबाईच्या गुंफेत गेले. (ली. च. भा. २ पा. २) त्यांना परत आलेले पाहून तिला आनंद झाला. पण पुन्हा तोच कालचा प्रकार. स्वामींना तिने पायपुसणेच बसायला दिले आणि पाणीभात वाढला तोही भोपळ्याच्या पात्रात ! ती आपण स्वतः मात्र हासुबाईकडून आपली पूजा करून घेत असे. पण तिसऱ्या दिवशी तिच्या वृत्तीत फरक पडला. नागुबाई स्वामीकडे टक लावून पाहू लागली आणि स्वामी तिच्याकडे टक लावून पाहू लागले. आपल्या दृष्टिक्षेपाने त्यांनी नागुबाईचे दोष नाहीसे करून

तिच्या ठिकाणी एका कळिकेच्या प्रेमाचा संचार केला. त्यासरशी नागुबाई स्वामींच्या चरणाशी गडबडा लोळून आपल्या अपराधाबद्दल त्यांची क्षमा मागू लागली. स्वामींनी तिचे सांत्वन केले. तेव्हांपासून नागुबाई स्वामींची स्वतः सेवा करू लागली. त्यांना भोजन स्वतः देऊ लागली आणि त्यांचे चरणतीर्थ घेऊ लागली. लौकरच नागुबाईची शिष्या हासुबाई ही स्वामींची भक्त बनली. पांडे नावाचा तिचा शिष्य होता तोहि स्वामींचा सेवक बनला. ( ली. च. भा. २. पा. २, ३ )

हीच नागुबाई, नागांबिका या नावानेहि प्रसिद्ध आहे. हिलाच ‘ बाइसा ’ असे सर्व जण म्हणत. स्वामींचा हा दुसरा भक्त होय. पहिला भक्त त्यांच्या बरोबर फार नव्हता. पण बाइसा मात्र जवळ जवळ स्वामींच्या प्रयाणकाळापर्यंत त्यांची सेवा करीत होती. स्वामींच्या मृत्यूच्या खोट्या वार्तेने ज्याप्रमाणे त्यांच्या पहिल्या शिष्याने प्राणत्याग केला त्याप्रमाणे पुढे बाइसांनीहि प्राणत्याग केला. पैठणला घडलेला हा प्रसंग नागांबिकेला प्रेम-दान करण्याचा प्रसंग म्हणून ओळखला जातो. येथेच स्वामींच्या आयुष्याचा ‘ एकाकी ’ अथवा ‘ एकांक ’ काळ संपतो आणि ‘ पूर्वार्ध काळ ’ सुरू होतो. बाइसाला प्रेमदान करण्यापूर्वी स्वामी विरक्त वृत्तीने नेहमी एकटे फिरत असत. त्यांना एकांकीचा भक्त, नीळभट वगैरे शिष्य त्या काळात लाभले तरी ते फार दिवस त्यांच्या बरोबर नव्हते. त्यामुळे तो काळ त्यांच्या ‘ एकाकी ’ पणा-चाच होता यात शंका नाही. या नंतरच्या काळाविषयी मात्र तसे म्हणता येत नाही; कारण यानंतर बाइसा ही नेहमी त्यांच्या बरोबर त्यांच्या सेवेसाठी होती.

याच वेळी चक्रधरस्वामींनी पैठण येथे ‘ दीक्षा ’ स्वीकारली म्हणजे संन्यास स्वीकारला, अशी महानुभावांची समजूत आहे; आणि ती बरोबर आहे. वस्तुतः लीळाचरित्राच्या पिढीपाठात या दीक्षा-विधीचे कोठेहि वर्णन नाही. बोणेबाईबरोबर मेहेकरहून पैठणला आल्यानंतर स्वामींची आणि नागुबाईची भेट होऊन ती त्यांना आपल्या गुंफेत घेऊन गेली असे ‘ एकांक ’ विभागाच्या शेवटी वर्णन आहे, तर पूर्वार्धाच्या प्रारंभी स्वामींनी नागुबाई-च्या ठिकाणी दृष्टिद्वारा प्रेमसंचार केल्याचा प्रसंग वर्णन केलेला आहे. त्यानंतर स्वामी पैठणला अनेक दिवस होते. त्यावेळच्या बऱ्याच आख्यायिका पूर्वा-

र्धाच्या प्रारंभी नमूद करून ठेवलेल्या आहेत. पण दीक्षा--स्वीकाराचा हा महत्त्वाचा प्रसंग मात्र वर्णन केलेला नाही हे आश्चर्य होय ! तळेगावकरांच्या पाठातहि हा प्रसंग मला आढळला नाही.

लीळाचरित्राच्या वाइंदेशकर पाठात मात्र या दीक्षास्वीकाराची हकीकत विस्ताराने दिलेली आहे. ' प्रतिष्ठानी भोगावतीये मार्गदीक्षा स्वीकार ' या आदीच्या लीळेत ती आलेली आहे. ( वि. शा. वि. श्रीचक्रधर चरित्र भूमिकापर ऐतिहासिक दृष्टी. पृ. ७ ). तिच्यावरून असे दिसून येते की पैठणला येऊन ' भोगावती ' स्थानी बिऱ्हाड ठेवल्यावर बोणेबाई नगरात गेली. त्यावेळी भोगावतीच्या पटिशाळेत स्वामी चौकटीच्या सोंडेवर असले असतांना अनेक देवदेवता, विद्यावंत, ज्ञानी वगैरे त्यांच्या सेवेसाठी तेथे आले. दत्तात्रेयप्रभूंनी चक्रधरांना विनंती केली की " जी जी आचार्यत्व स्वीकरावे : आता प्रकटियें उद्धरण करावे : यतिमुनीचा वेषु अंगीकरावा " : चक्रधरांनी दत्तात्रेयाच्या विनंतीला मान देऊन त्यांचे चरणवंदन केले आणि सर्वांना प्रेमाने निरोप दिला. ' मग भोगावतियेचा घाटी क्षौर केलें : तै लागौनि यतिमुनिचा वेषु : ब्रह्मचर्याची प्रवृत्ति स्वीकरीली ' म्हणजे क्षौर करून संन्यास घेतला आणि ब्रह्मचर्यव्रत धारण केले. यातील देवदेवतांच्या, ज्ञानि--यांच्या वगैरे भेटीचा पौराणिक वृत्तांत दृष्टिआड केला तर स्वामींच्या क्षौराचा प्रसंग हाच काय तो महत्त्वाचा प्रसंग दिसतो. इतर पाठात तो नसला तरी वाइंदेशकर पाठातील हा वृत्तांत खरा असावा. कारण, सर्व महा--नुभावांची तशी दृढ श्रद्धा आहे. शिवाय ' स्थानपोथी'त हा वृत्तांत मला आढळला. पूर्वार्धे-स्थाने नमूद करतांना ' भोगावतीए आसन ॥ घाटी क्षेऊर ॥ बाइसा भेटि ॥ भोगनारायणि अवस्थान मास १० ॥ ' ( स्था. पो. पा. १३ ) असा आरंभीच उल्लेख आहे आणि तो सर्व पोथ्यात आहे. त्यावरून पैठणला आल्यावर क्षौर व बाइसांची भेट हे दोन महत्त्वाचे प्रसंग प्रारंभीच घडून आले असे स्पष्ट दिसते.

---

१ 'मूर्तिप्रकाशा'त स्वामींच्या मूर्तीचे वर्णन करतांना त्यांच्या ओठांचे वर्णन केल्यानंतर मिशांचेहि वर्णन आहे. ' तैसा मिसुर भिन्नला बरवा । कृष्णवर्णु ' [पुढे—

तेव्हां चक्रधरस्वामी पैठणला येऊन त्यांनी संन्यास--दीक्षा घेतल्यावर आणि नागुबाई ऊर्फ बाइसाला प्रेमदान दिल्यावर त्यांच्या आयुष्याचा नवीन कालखंड सुरू झाला यात शंका नाही. पूर्वी ते एकाकी विहरण करीत होते, आता त्यांच्याबरोबर शिष्यपरिवार राहू लागला; पूर्वीच्या कालखंडात ते एकंदरीत विरक्तवृत्तीने वावरत असले तरी त्यांनी ब्रह्मचर्यव्रत स्वीकारलेले नव्हते, म्हणूनच हासुबाईबरोबर त्यांनी विवाह केला; पण आता त्यांनी व्रत म्हणून ब्रह्मचर्यप्रवृत्तीचा स्वीकार केला. एकांक काळात ज्ञानदानाचे कार्य त्यांनी फारसे केले नाही; पण आता जीवोद्धरणाच्या प्रवृत्तीमुळे ते निरंतर ज्ञानदान करू लागले. त्यासाठी ते गावोगावी जाऊन अधिकारी पुरुषाचा शोध करू लागले आणि त्याला ब्रह्मविद्येचे निरूपण करू लागले. त्यामुळे त्यांचा शिष्यपरिवार वाढू लागला आणि त्यांची कीर्ति सर्वत्र पसरू लागली.

पैठणला येऊन दीक्षा स्वीकारल्यापासून तो नागदेवाचार्यांच्या अनुसरणापर्यंतचा काळ हा चक्रधरस्वामींच्या आयुष्यातील पूर्वार्ध काळ म्हणून संबोधला जातो. आणि नागदेवाच्या अनुसरणापासून तो स्वामींच्या प्रयाणापर्यंतचा काळ उत्तरार्ध म्हणून संबोधला जातो. या पूर्वार्ध आणि उत्तरार्ध काळांच्या मर्यादा व त्यात स्वामींची महाराष्ट्रातील परिभ्रमणाची प्रमुख स्थाने यांचा विचार करणे आवश्यक आहे.

---

चालू ] आणि या मिशाहि केव्ढ्या ? तर 'तो सकळपुरुषार्थ सबळ। मिसिया घाली वळ' 'तो तरी निराभिमानु निर्विकारु : पर अपुलिया कारणे मिसियावरि ठेवी श्रीकरू' (१७४७–१७५०) म्हणजे पीळ घालता येण्याजोग्या मोठ्या ! 'ज्ञानप्रबोधा'तहि 'सकळ पुरुषार्थी अळंकारू : तो सुरेख मिरवे मिसरू : जयाचिया दर्शना संसारू । शंके जीवी' (४७३) असे वर्णन आहे. त्यावरून स्वामीनी संन्यास–क्षौर केले होते की नाही याविषयी शंका घेण्यास जागा होते. पण ही वर्णने स्वामींच्या एकांक मूर्तीची असावीत; संन्यासस्वीकारानंतरच्या मूर्तीची नव्हेत. दुसरे असे की 'एकांका'त त्यांच्या केशकलापाचा जसा उल्लेख आहे तसा एकांकानंतर नाही. उलट 'आठा दीसा क्षौर' असे क्षौराचे अनेक उल्लेख पूर्वार्ध व उत्तरार्ध विभागात आहेत. त्यावरूनहि स्वामींनी दीक्षा घेतली होती हे स्पष्ट होते.

## पूर्वार्धकाळ—

श्रीचक्रधरस्वामींच्या पूर्वार्ध व उत्तरार्ध काळाची गणना प्राचीन पोथी लेखकांनी करून ठेवलेली आहे. स्थूल मानाने ती बरोबर आहे आणि म्हणून ग्राह्य मानायला हरकत नाही. या दोन्ही कालगणना मूळ स्वरूपातच वाचका-समोर ठेवतो. त्यावरून कालगणनेप्रमाणेच स्वामींच्या परिभ्रमणाची मुख्य मुख्य स्थानेहि सहज लक्षात येऊ शकतील. पिढीपाठाच्या एका पूर्वार्ध चरित्राच्या पोथीत शेवटी मला पुढील कालगणना आढळली:—

" आतां पूर्वार्धी लीळाकाळाचा नेम : पुसमासीं सर्वज्ञें ( =श्रीचक्र-धरस्वामींनी ) प्रतीष्ठानासि बीजें केलें : बाइसांची भेटि : तेथ : १० : भोगनारायणीं गुंफें अवस्थान केलें : तेथ एक चातुर्मासि जाली : मग दीवाळी जालेयां कार्तीकमासीं परमेश्वरपुरा ( = रितपुरला ) निघाले : मासा एका परमेश्वरपुरा बीजें केलें : तेथ दीस २० अवस्थान केलें : मग मासा एका पुसामध्यें एळापुरा बीजें केलें : तेथ मास सा अवस्थान जालें : मग तेथौनि श्रीनगरा संपतेनि जेष्ठें बीजें केलें : तेथ एक चातुर्मासि जाली : चैत्र जाला : मास दाहा अवस्थान जालें ॥ मग तेथौनि त्र्यंबक सारूनि संपतेनि उन्हाळें बीडा बीजें केलें : तेथ एक चातुर्मासि जाली : मास ४ अवस्थान जालें : मग दीपवाळी जालेयां घाटावरौनि एलौरावरूनि तल्हाटीस बीजें केलें : भडगाग्री सीमगा जाला : मग घाटावरि पाउसाळां करंज वेडीं हीव-रळीए ऐसी एकि चातुर्मासि जाली : मग दीपावळीचीये तीजे तेथौनि बीजें केलें तें गंगातीरें : मासा ती दीसा बारा संगमेश्वरा बीजें केलें : तेथ माहोमासीं सूद्ध चतुर्दसीचेनि अनूमानें भटां बोध जाला : मग खडकाळिये अवस्थान : पूढां उत्तरार्ध लीळा : ऐसा अवघा पूर्वार्धकाळ वर्षे ४ आन मास दीढ ॥ एवं काळाची संख्या ॥

## उत्तरार्ध काळ—

गोपीराज-ग्रंथ-संग्रहालयातील एका उत्तरार्ध चरित्राच्या पोथीच्या शेवटी कालगणनेचा पुढील मजकूर आहे:—

॥ श्री ॥ सीउबासां मार्गां हें दुसरें शोधन : पीढीपाठ उत्तरार्धींचें ॥ आतां उत्तराधींचा काल नेमु ॥ माघमासींचीए वदि एकादशी पासौनि

खडकाळीए अवस्थान जालें ॥ तेथ पाउण मासां भट अनुसरले : मग अनुमानें दीस ७ सात : ५ : सन्निधानीं : सवेंचि औदास्य : मग परमेस्वरपुरां पाठवीलें : गोसावी सवेंचि प्रतिष्ठांनीं गणपति मढां बीजें केलें : गेलेया दीसा पासौनि भट सा मासां अढैचा राहाटगांवाचेनि मार्गें भेटी आले : वैसाखमासीं ॥ मग तो पाउसाळा प्रतिस्थानींचि गेला : एक मागौता : ढोरेस्वरूहि असे : मग दीपवाळी जालेयां मागुतें छीन्नपापावरुनि स्याळां खडकाळीए बीजें केलें : मग वरिली लीळा भटांसहिता : मग केतुलेनि येकें काळें भट बाइसें परमेश्वरपुरा पाठवीली : गोसावी प्रतिष्ठानवरि बीजें केलें : बोळवीत : मग ढोरेस्वरीं राहीले : तीयें परतीं परमेश्वरपुरां गेलीं : तेथहि अनियत वासु जाणावा : मग मासा दीढाचेनि मानें : भटबाइसें आलीं : ढोरेस्वरींचि भेटि जाली : जेष्ट मासीं । मागौती जेष्ट मासीं खडकाळी : तयांतुचि एतांजातां छीन्नपाप । तथा जोगेश्वरी : मग खडकाळीएहुनि मागौतीं जोगेस्वरी : सवेचि छीन्नपाप : तो गोकुळ अष्टमी पर्यंत । मग तेथौनि डौमेग्रामु : राजमढु : मागिलांहिं एरझारांतु जाणावें । एथ अखतृतीया : हें इत्यादि मागिला एरझारांतु जाणावें ॥ इतुलेनीचि काळें माहादाइसें वाराणसी गेली : तेणेंचि काळें गोसावी प्रतिष्ठाना बीजें केलें : तेथ गणपतिमढीं अवस्थान जालें : तवं श्रीप्रभुपासौनि हंसराज आलीं : तेणेंचि काळें आबाइसें श्रीप्रभूचीए सेवेसी पाठवीलीं : मग हंसराजासहित डोंबेग्राम : तथा निधिवासेया बीजें केलें : मग बाहुल्यें स्याळां निधीवासें : येथ उष्णकाळीचीया लीळा तिया मागिला एरझारांतुला जाणावीया । मग स्याळेयाचि दीसां घाटावरि बीजें केलें । निधिवासाहुनि नीगालेयां पाउणा दों मासांचेनि अनुमानें अरण्यग्रामीं साधांची चणकशाक । मग घाटावरुनि अवघा उन्हाळा क्रमुनि मागुतें प्रतिष्ठानावरूनि जोगेस्वरीसि बीजें केलें : तेथ भींगारीचेनि पुढारें साधां भेटि दीधली । तेथ अवस्थान जालें । मग छीन्नपापा बीजें केलें । सवेंचि गदोनाएकाची वीनति : नेउरगावां विळिचां बीजें केलें । तेथ मास दी देव्हारचौकीए अवस्थान जालें : माहापुजा जाली : मग मागौतें छीन्नपापीं अवस्थान । सवेचि संतोषाचीए सुश्रुषे हंसराज डांगरेश ठेवुनि मग वासनांतरें निधिवासेयावरुनि सुरेगांवावरूनि पेहेरा संगमा बीजें केलें : मग क्रमेंचि गणपति मढां संपतां जेष्टीं बीजें केलें : तेथ अवस्थान

जालें । मग सवेंचि ढोरेस्वरीं जालें । मग तेथौनि मागुतीं भटबाइसें परमेस्वरपुरां पाठवीलीं । मग अनएतवासांचीं स्थानें । यांतु एकु पाउसाळा गेला । तो अर्ध एकु अधिकचि पाउसाळा कमिलसां माइंतेयाचीए आवारीं परमेस्वरपुरीहुनि भटबाइसें माहादाइसें आलीं । वाराणसी गेलेयां हे माहादाइसांची भेटि । मग मागौतें गणपति मढीं अवस्थान जालें । मागौतें सवेंचि ढोरेस्वरींचि जालें । संपतां जेष्टीं वृधासंगमा बीजें केलें : तेथ आउसाचे आंबे आरोगीले : मास तीन अनुमाने पाउसाळा गेला : मग मागौतें प्रतिष्ठान । सवेंचि बीजें केलें । कमेंचि तेथौनि नागार्जुन तेथ भटां मादणें : तें दीपवाळीएचें । मग एकवीरे अवस्थान : मग कार्तीक पूर्णिवा पावतां तेथौनि बीजें केलें । मासा एका बेलोपुर : तेथ दोनि मास अवस्थान जालें : मग बीजें केलें ॥ शकें ॥ ११९४ ॥ श्रीमुख संवत्सरू गोसावी माहोमास शुद्ध चतुर्थी सोमवारी ॥ ऐसा अवघा उत्तरार्ध वर्षें ४ ॥ भटां सन्निधान वर्षें आउठ । सा मास रुद्धिपुरीचेया तीं एरझारांतु गेले । इतुका उतर काळु ॥ ० ॥

चक्रधरस्वामींच्या पूर्वार्ध व उत्तरार्ध काळांचा अवधि आणि त्यांच्या परिभ्रमणाची स्थाने यांची कल्पना यावी म्हणूनच वरील दोन उतारे या ठिकाणी घेतले आहेत. त्यावरून स्थूल मानाने पूर्वार्ध काळ ४ वर्षांचा व उत्तरार्ध काळ ४ वर्षांचा असल्याचे दिसून येते. चक्रधरस्वामींनी निरनिराळ्या गावी किती दिवस अवस्थान केले यासंबंधी महानुभावांच्या प्राचीन पोथ्यात इतकी मतमतांतरे आहेत की त्यातून कोणते मत निश्चित मानावे हे कळेनासे होते. म्हणून ऐतिहासिक घटनांच्या अनुरोधाने पूर्वार्ध व उत्तरार्ध काळांचा निर्णय करणे आवश्यक ठरते. याचा विस्तृत विचार पुढे एका स्वतंत्र प्रकरणात केलेला आहे. त्यावरून पूर्वार्ध काळ साडेतीन वर्षांचा व उत्तरार्ध काळ तीन वर्षे अकरा महिन्यांचा ठरतो. म्हणजे एकांक काळानंतर चक्रधरस्वामींनी सात वर्षे व पाच महिने इतका काळ महाराष्ट्रात परिभ्रमण करून ज्ञानदानात घालवला आणि नंतर त्यांनी प्रयाण केले असे दिसून येते.

## परिभ्रमणाची स्थाने

पैठण येथे दीक्षा स्वीकारल्यानंतर जीवोद्धरणासाठी महाराष्ट्रात अखंड परिभ्रमण करणे हेच त्यांच्या जीविताचे मुख्य ध्येय होते. जीवोद्धरणा-

साठी अधिकारी व्यक्तींना त्यांच्या पात्रतेनुसार ज्ञान किंवा प्रेम देणे, जे ज्ञानाला किंवा प्रेमाला अजून पात्र झाले नसतील त्यांना ती पात्रता यावी म्हणून त्यांच्या कडून अनेक पुण्यकृत्ये करवून घेणे, ईश्वराव्यतिरिक्त अन्य जीवदेवतांच्या भजनी लागलेल्यांना त्यापासून सोडवून परमेश्वरसेवेला लावणे, त्यासाठी आपल्या तत्त्वज्ञानाचा उपदेश करणे, या अनेकविध कार्यासाठी त्यांनी आपले सर्व आयुष्य वेचण्याचे ठरविले. आणि आपले जीवितकार्य म्हणून निश्चित केलेल्या ध्येयाच्या परिपूर्तीसाठी ते सर्वसामान्य जनतेत अधिकाधिक हिंडू फिरू लागले. त्यासाठी महाराष्ट्रभर त्यांनी पायी दौरे काढले असेच का आजच्या भाषेत म्हणा ना ? आपल्या कार्याच्या निमित्ताने ते गावोगावी कमीअधिक दिवस राहत असत; पण पैठण येथे त्यांचा मुक्काम विशेष होत असे. म्हणूनच त्यांना 'प्रतिष्ठानीचे चांगदेवराऊळ' या नावाने महानुभाव महंत संबोधीत असतात. पैठण हे जणु त्यांच्या कार्यक्षेत्राचे प्रमुख केंद्र होते. आणि त्याबद्दल आश्चर्य वाटायला नको. कारण पैठण हे त्या वेळच्या महाराष्ट्राचे धर्मक्षेत्र होते. महाराष्ट्राची राजधानी देवगिरी फार दूर नसल्या-मुळे पैठणचे महत्त्व अन्य दृष्टींनीहि वाढले होते. त्यामुळे कोणत्याहि नव-विचारप्रवर्तकाला आपल्या कार्याचे बीजारोपण या क्षेत्रात करणे अपरिहार्य होऊन बसले होते. महाराष्ट्रातील निरनिराळ्या गावचे विद्वान त्या ठिकाणी गोळा होत, सामान्य लोक धर्मकृत्यासाठी दक्षिण-गंगा गोदावरीच्या काठावरील या पुण्यपावन नगराकडे असंख्य समुदायाने लोटत, राजकार्याच्या निमित्ताने देवगिरीला आलेले पुरुषहि पैठणचे दर्शन घेतल्यावाचून परतणे सहसा शक्य नव्हते. या सर्व प्रकारच्या जनतेसमोर मांडलेल्या तत्त्वज्ञानाचा महाराष्ट्रभर प्रसार होण्यास आपोआपच मदत होत असल्यामुळे अन्य विचारप्रवर्तका प्रमाणे श्रीचक्रधरस्वामींनीहि आपल्या आयुष्याचा सर्वात अधिक काल पैठण येथे घालविला असल्यास आश्चर्य नाही !

पूर्वार्ध काळाच्या प्रारंभी पैठणला जवळ जवळ १० महिने राहिल्या-नंतर चक्रधरस्वामी गोविंदप्रभूच्या भेटीसाठी रितपुरला गेले व तेथे सुमारे २० दिवस राहिल्यानंतर परत येऊन वेरूळ येथे त्यांनी मुक्काम केला. पैठणहून रितपुरला जातांना राहाटगाव, कडेठाण, सेंदुर्जन, मेहकर, आलेगाव, पातुरडी सिंगणापूर, खोलापुर, वाकी, थूगाव, रामागाव, तळवली व खैराळा मार्गाने

ते गेले व जवळजवळ त्याच मार्गाने ते परत आले. परततांना सेंदुर्जनहून फुलंब्री आणि तेथून ते वेरूळला गेले. पैठणप्रमाणेच वेरूळ हेहि त्यावेळचे एक महत्त्वाचे नगर होते. बारा ज्योतिर्लिंगापैकी घृष्णेश्वराचे मंदिर वेरूळ-जवळच आहे. हिंदु, जैन व बुद्ध धर्मांच्या अनुयायांनी खडकातून कोरून काढलेली जगप्रसिद्ध लेणी त्यावेळी तेथे विद्यमान होतीच. गोमटदेव, शंकर-लेणे, जळसेनाचे लेणे, राजविहार, कोकसवाढयाचे लेणे, समचवाक्य लेणी अशी त्यांची कांही नावे नमूद करून ठेवलेली आढळतात. लेण्यांच्या आवती-भोवती इतर अनेक देवळे होती. पण आज ती तेथे अस्तित्वात नाहीत. चक्रधरस्वामींच्या प्रयाणानंतर काही वर्षांनी देवगिरी मुसलमानांच्या ताब्यात गेल्यामुळे तेथील सुलतानांच्या राजवटीत ती नष्ट झाली असावीत. ते काहीहि असले तरी त्यावेळी वेरूळ हेहि एक प्रसिद्ध क्षेत्र असले पाहिजे यांत शंका नाही. यादवांची राजधानी जी देवगिरी तिच्यापासून हे अगदीच जवळ असल्यामुळेहि त्याचे महत्त्व त्यावेळी विशेष असावे असे म्हणण्यास हरकत नाही.

वेरूळ येथे स्वामी असतांना, देवगिरीला महादेवराव यादव राज्य करीत होता. त्याने स्वामींचे दर्शन घेण्याचा अनेकवार प्रयत्न केला. पण तो यशस्वी झाला नाही. वेरूळहून चक्रधरस्वामी श्रीनगर ( सिन्नर ) येथे गेले. तेथे सुमारे दहा महिने राहिल्यानंतर ते नाशिक-त्र्यंबकेश्वर करून आडगाव, सुकेणे, निफाड, सुरेगाव मार्गाने येऊन पुणतांबे येथे काही दिवस राहिले. नंतर डोंबेगावला काही दिवस काढून त्यांनी बीड येथे चार महिने मुक्काम केला. पाटवध, साकद-सेवता, रामदरा, पात्रकवळी, वाकी ही बीड जिल्ह्या-तील अतिशय रमणीय स्थाने आहेत. त्यांना भेटी देत देत भिंगार, वामोरी वगैरे गावावरून ते पुन्हा वेरूळला परत आले. पैठण शहर केंद्र कल्पिले तर महाराष्ट्राच्या या हृदयाला चक्रधरस्वामींनी घातलेली ही प्रदक्षिणाच होय असे म्हणायला हरकत नाही. या प्रदक्षिणेनंतर आजच्या खानदेशातील वाघळी कानसे, भडगाव, सेंदुर्जन, पाचोरा व चांगदेव वगैरे स्थाने आपल्या संचाराने त्यांनी पवित्र केली. करंजखेड आणि हिवरळी ( म्हणजे आजचे जालना ) येथे चातुर्मास काढल्यावर बीड जिल्ह्यातून पुन्हा एक फेरफटका करून ते परत पैठणला येऊन पोचले. नंतरच्या काळात पैठणच्या आसपास फिरत फिरत

ते संगमेश्वर येथे गेले. तेथून जवळच जोगेश्वरीपाशी खडकुली नावाचे स्थान आहे. त्या ठिकाणी चक्रधरस्वामींनी जवळ जवळ तीन-साडेतीन महिने मुक्काम केला. या ठिकाणीच नागदेवाचार्य दीक्षा स्वीकारून स्वामींना अनुसरले.

नागदेवांच्या अनुसरणापासून चक्रधरांच्या आयुष्याचा उत्तरार्ध काळ सुरू होतो. पूर्वार्ध काळात त्यांच्याबरोबर बाइसा नेहमी असत. तर उत्तरार्ध काळात बाइसा आणि नागदेव हे दोघेहि असत. स्वामींच्या प्रयाण काळापूर्वी बाइसांनी नदीत उडी टाकून आत्महत्त्या केली. तदनंतर अर्थात नागदेवच काय ते स्वामींच्या बरोबर होते. मध्यंतरी स्वामींनी नागदेवांना रितपूर येथे श्रीगोविंदप्रभूच्या सेवेसाठी पाठवले होते. तो काळ वगळला तर नागदेव हे अखेरपर्यंत स्वामींच्या सान्निध्यात राहून त्यांची सेवा करीत होते असे दिसून येईल.

या उत्तरार्ध काळातहि स्वामींचे अखंड परिभ्रमण चालूच होते. पण त्याची क्षेत्रमर्यादा मात्र संकोचली होती. पूर्वार्ध काळात ज्याप्रमाणे ते महाराष्ट्रभर हिंडलेले दिसतात तसे उत्तरार्ध काळाचे नाही. आपल्या आयुष्याचा हा काळ त्यांनी उभय-गंगा-तीरावर म्हणजे गोदावरीच्या दोन्ही काठावरील निरनिराळ्या गावी घालविला. पुणतांबे ते पैठणपर्यंत गोदावरीचा प्रदेश, त्यातहि विशेषेकरून दक्षिण तीरावरील प्रदेश हा त्यांच्या परिभ्रमणाचा प्रांत झालेला दिसतो. आजच्या अहमदनगर जिल्ह्यातील नेवासे, अहमदनगर व काही प्रमाणात पारनेर या तीन तालुक्यांच्या विभागात त्यांचा उत्तरार्ध काळ व्यतीत झाला असे म्हटले तर चुकीचे होणार नाही. खडकुली येथे तीन साडेतीन महिने काढून स्वामी डोंबेगावला येऊन पोचले. तेथील गोदावरीच्या तीरावर गुंफा तयार करून ते तेथे चार महिने राहिले. स्वामींचे हे स्थान छिन्नपाप अथवा छिन्नस्थळी म्हणून महानुभावात आज प्रसिद्ध आहे. कारण, स्वामींच्या निवासाने पवित्र झालेले हे स्थान ‘छिन्न’ म्हणजे फोडून काढलेले आहे. तेथील संबंधी पाषाण महानुभावांना अजूनहि वंदनीय वाटतात. या छिन्नस्थळीच्या गुंफेत स्वामींनी चार महिने काढल्यावर मग ते डोंबेगावात राहू लागले. तेथेहि त्यांनी सहा महिने काढले. म्हणजे दहा महिन्यांचा काळ त्यांनी डोंबेगावला काढला असे म्हणायला हरकत

नाही. तेथून त्यांनी पुन्हा परिभ्रमण सुरू केले. नेवाशाला ते चार महिने राहिले. त्यानंतर रांजणगाव, मिरेगाव, मढपिंपळगाव, मढपिंपरी, नारायणडोह वगैरे गावांना भेटी देत देत जांबगाव, नेउरगाव, सुरेगाव मार्गाने ते प्रवरा-संगमाला आले आणि तेथून पुन्हा पैठणला गेले. पैठणला काही दिवस राहून परत जोगेश्वरीला येऊन पोचले. तेथून घोटणी, चापडगाव, आंबा या मार्गाने पारेगाव, खरवंडीवरून ते एळी, भोकरी वगैरे ठिकाणी गेले. आणि शेवटी बेलापूरला येऊन पोचले. बेलापूर हे त्यांच्या परिभ्रमणाचे शेवटचे स्थान होय. कारण येथूनच त्यांनी ' उत्तरा पंथे प्रयाण ' केले असे महानुभाव महंत मानतात. यामुळेच बेलापूरला पंथीयांच्या दृष्टीने फार महत्त्व प्राप्त झालेले आहे.

चक्रधरस्वामींच्या परिभ्रमणाचा स्थूल आराखडा वर दिलेला आहे. त्यावरून त्यांच्या कार्यक्षेत्राची स्पष्ट कल्पना येईल. एकांक, पूर्वार्ध आणि उत्तरार्ध या तिन्ही कालखंडातील सर्व स्थानावरून दृष्टि फिरवली म्हणजे उत्तरेकडे सालबर्डीचा डोंगर, पूर्वेकडे भंडारा, दक्षिणेकडे पारनेर आणि पश्चिमेकडे त्र्यंबकेश्वर या चतुःसीमांनी त्यांच्या परिभ्रमणक्षेत्राच्या मर्यादा आखता येतील. एकांक काळात ते आंध्र देशात देखील पुष्कळ दिवस राहिले. पण महाराष्ट्रापुरता विचार केला तर भंडारा, नागपूर, चांदा, अमरावती, अकोला व बुलडाणा हे विदर्भातील जिल्हे; पश्चिम खानदेश, पूर्व खानदेश, नाशिक व अहमदनगर हे मुंबई इलाख्यातील जिल्हे; आणि औरंगाबाद, नांदेड व बीड हे मराठवाड्यातील जिल्हे मिळून होणाऱ्या प्रदेशात त्यांचा संचार होता असे दिसून येते. चक्रधरांना अभिप्रेत असलेला महाराष्ट्र एवढाच होता काय ? ' महाराष्ट्री असावे ' असा विधि त्यांनी आपल्या अनुयायांना घालून दिला आहे. तेव्हां संपूर्ण महाराष्ट्र यांनी आपल्या संचाराने पवित्र करून सोडलेला असावा अशी कल्पना मनात येणे साहजिक आहे. पण सध्याच्या महाराष्ट्रात अंतर्भूत होणाऱ्या कोकण, पुणे, सातारा, सोलापूर कोल्हापूर या जिल्ह्यात मात्र चक्रधरांनी भ्रमण केलेले आढळत नाही. असे का ? मला हा नुसता योगायोग वाटतो. हा प्रदेश महाराष्ट्रात अंतर्भूत होत नव्हता असे नाही. तसे पाहिले तर पुण्याला लागून असलेल्या फलटण संस्थानातील ' फलटण ' नगरात चक्रधरस्वामींचे पूर्वावतार द्वारावतीकार चांगदेव-

राऊळ यांनी अवतार घेतला होता. माहूरला ते अनेक दिवस राहिले होते. पण या आपल्या पूर्वावतारातील स्थानांनाहि चक्रधरस्वामींनी कधी भेट दिली नाही. उलट, माहूर हे एकवीरा देवतेचे भोगस्थान असल्यामुळे ' मातापुरा न वचावे ' असे त्यांनी स्पष्ट म्हटले आहे. मातापुराप्रमाणेच देवतेचे भोगस्थान असलेले कोल्हापूर हेहि त्यांनी आपल्या साधकासाठी निषिद्ध म्हणून निर्देशिलेले आहे. ही स्थाने ज्या प्रदेशात आहेत तो ' महाराष्ट्र ' असल्यामुळेच विशिष्ट कारणासाठी त्यांना हे अपवाद सांगावे लागले. फलटण हे महानुभावांचे अजूनहि अत्यंत पवित्र क्षेत्र मानले जाते. तेव्हां चक्रधरस्वामी तिकडे गेले नाहीत याचे कारण तो भाग महाराष्ट्रात नव्हता असे नाही. ते तिकडे गेले नाहीत हा केवळ योग म्हटला पाहिजे. महाराष्ट्राच्या पश्चिमेला व दक्षिणेला असलेले हे काही प्रदेश सोडले तर बाकीच्या सगळ्या महाराष्ट्राला त्यांनी धर्मक्षेत्र करून सोडले यात संशय नाही. या परिभ्रमणात त्यांना अनेक अनुयायी मिळाले. त्यातील काहींची ओळख आपण पुढील प्रकरणात करून घेऊ.

# ५

# स्वामींचा परिवार

## रामदेव विद्यावंत ऊर्फ दादोस

स्वामींना भेटलेल्या व्यक्तीपैकी अनेक दृष्टींनी महत्त्वाची व्यक्ति म्हणजे रामदेव विद्यावंत ऊर्फ दादोस ही होय. हा मूळचा वडनेर येथे राहणारा. याच्या आईचे नाव राणाइसा (उत्त. २७२). याच्या वडिलांना वाटेत चोरांनी ठार मारल्यानंतर त्याला सुतक असतांनाच वडनेर जवळील आंबजयेच्या देवळाजवळ स्वामींचे त्याला दर्शन झाले. रामदेवाला सुतक असूनहि त्याने आणलेला दहीभात स्वामींनी प्रेमाने खाल्ला. स्वामींच्या विषयी त्याच्या मनात श्रद्धा उत्पन्न झाली. पातुरडी येथे स्वामींचे त्याने दर्शन घेतले तेव्हां तर त्यांच्या सान्निध्यामुळे त्याला आपल्या जेवणाचीहि आठवण राहिली नाही. स्वामींच्या ईश्वरावतारत्वाविषयी श्रद्धा दृढ होऊन तो यापुढे त्यांचे वारंवार दर्शन घेऊ लागला.

रामदेव हा स्वतः विद्यावंत होता. आपल्या विद्येच्या क्षुद्रानंदातच तो खुश असे. स्वामी उपदेशीत असलेल्या ब्रह्मविद्येचे श्रेष्ठत्व मान्य असूनहि तिचा स्वीकार करण्याची मात्र त्याची तयारी नव्हती. त्याला विद्यामार्गाचेच निरूपण आवडत असे. (उत्त. ३९१). त्याची विद्या ही शिल्पा देवतेची विद्या होती; कारण तिला तूटसांद होती. आपली विद्या अतूट व्हावी म्हणून त्याने एकदा स्वामींना विनंती केली. पण त्यांच्या आज्ञेप्रमाणे जाडी तुणण्याचे काम त्याला विरक्त परिस्थितीत करता न आल्यामुळे त्याची विद्या अतूट होऊ शकली नाही. (ली. च. भा. ३ पा. ८९). या विद्याप्रियतेमुळेच

ब्रह्मविद्या प्राप्त करून घेऊन स्वामींना अनुसरण्याची बुद्धी त्याला कधी झाली नाही. अनुसरणाला मुळी तो तयारच नव्हता. (उत्त. १५४).

तथापि, स्वामींच्या श्रेष्ठतेवर त्याची श्रद्धा मात्र फार होती. त्यांना तो आपले गुरु म्हणून मान देत असे. जे एखादे काम आपल्याकडून होईल किंवा होणारहि नाही म्हणून त्याला वाटत असे ते आपल्या गुरूकडून म्हणजे स्वामींच्या कडून निश्चित होईल अशी त्याला खात्री असे. म्हणूनच ग्रह सारंगपाणीचा ग्रह फेडण्याच्या हेतूने त्याला घेऊन आपणाकडे आलेल्या त्याच्या आईला त्याने स्वामीकडे पाठविले (भा. २ पा. ५). जोमाइसाची लेकरे वाचत नसत. म्हणून काही उपाय करण्याची विनंती तिची आई वैजाइसा हिने रामदेवाला केली तेव्हांहि तो त्यांना घेऊन स्वामींच्याकडेच गेला. (भा. ४. पा. ३०). यावरून श्रीचक्रधरस्वामींच्या सर्वकर्तृत्वावरील त्याची श्रद्धा सहज दिसून येईल. म्हणूनच ईश्वराप्रमाणे त्यांची तो नेहमी पूजा करायचा. एकदा श्रीगोविंदप्रभूंचे दर्शन घेऊन तो मग रितपूरहून स्वामींच्या दर्शनासाठी निघाला. तेव्हां तर त्याने संकल्पच केला होता की स्वामींचे दर्शन आजच्या आज घ्यायचे. त्यावाचून तोंडात पाणीहि घ्यायचे नाही. कानसा येथे मळ्यात भेट झाल्यावरच तो पाणी प्याला. दर्शनानंतर स्वामींना शंभर दंडवते घालणे, त्यांची पूजा करणे वगैरे विधि तो मोठ्या आस्थेने करी. परततांनाहि स्वामींचे दर्शन होईपर्यंत तो मागे एकसारखा वळून पहायचा. कोणतीहि वस्तु विकत घ्यायची असली तर एक आपल्यासाठी आणि एक स्वामीसाठी अशा दोन वस्तु नेहमी घेत असे. (उत्त. २७२).

हे सगळे खरे असले तरी अंगच्या अहंकारामुळे त्याच्या या श्रद्धेत अनेकदा कमीपणा निर्माण होत असे. नागदेवाचार्य, त्यांची आई आबाइसा, बहीण उमाइसा, महदाइसा वगैरेंचा तो पूर्वाश्रमीचा गुरु होता. यांनी फक्त आपलीच पूजा करावी व आपलाच प्रसाद घ्यावा असे त्याला वाटे. श्रीचक्र-धरस्वामींची पूजा करायची असली किंवा त्यांना वस्त्र वगैरे अर्पण करायचे असले तर ते आपल्याकडून झाले पाहिजे, आपल्या शिष्याकडून परभारे होता कामा नये, तसे झाल्याने आपला मान कमी होतो अशी त्याची समजूत होती. श्रीचक्रधरस्वामी हे माझे गुरु आहेत, म्हणून त्यांच्या

प्रसादाचा तांबूल मीच घेईन, तू घेऊ नकोस असे त्याने नागदेवाला स्वामीकडे पहिल्या प्रथम नेतांनाच बजावले होते. (भा. २. पा. ५१). अनुसरणापूर्वी नागदेवाने एकदा दोन वस्त्रे विकत घेतली. एक आपले गुरु रामदेव यांच्यासाठी आणि दुसरे स्वामीसाठी. रामदेवाला विधिपूर्वक वस्त्र अर्पण करून नागदेव दुसरे वस्त्र घेऊन स्वामीकडे जाऊ लागले. पण त्याला रामदेवाने मोडता घातला. 'स्वामी तुझे कोण लागतात ? ते माझे गुरु आहेत. तेव्हां काही अर्पण करायचे असले तर ते तुम्ही मला अर्पण करा आणि मी ते स्वामींना अर्पण करीन' असे त्याने नागदेवाला सांगितले आणि ते दुसरेहि वस्त्र आपल्याच ठिकाणी अर्पण करून घेतले. नंतर तेच वस्त्र त्याने स्वामींना वाहिले. पण स्वामींनी आपल्या पायाच्या अंगठ्यानेच ते दूर लोटले. (भा. ३. पा. २). महदाइसेच्या मनात एकदा स्वामींची वस्त्रपूजा करावी असे आले. पण रामदेवाने तिला मोडता घालण्याचा प्रयत्न केला. स्वामींना हे कळतांच त्यांनी तिला साह्य करून तिच्या वस्त्रपूजेचा स्वीकार केला. इतकेच नाही तर भावपूर्वक अर्पण केलेले ते वस्त्र 'आन लेख लाहे' म्हणजे अमोल आहे असे ते म्हणाले. नागदेव, महदाइसा वगैरेंनी आपलेच शिष्य म्हणून रहावे, त्यांनी स्वामींना अनुसरू नये असे त्याला या अहंकारामुळेच वाटत असे. म्हणूनच स्वामींच्या इच्छेविरुद्ध त्याने महदाइसेला द्वारावतीला व वाराणसीला पाठवले. (भा. ३ पा. ५२ व उत्त. १२५). नागदेवाने स्वामींना अनुसरू नये म्हणूनहि त्याने फार प्रयत्न केले, स्वामीजवळ त्याच्या विरुद्ध त्याने आधीच तक्रारी केल्या (उत्त. १) आणि नागदेवाचार्य अनुसरल्यानंतर त्यांच्याकडे त्यांची पत्नी गंगाइसा हिला पाठवण्याचा आगलावेपणाहि त्याने करून पाहिला. याच्या मुळाशी देवतेच्या क्षुद्र विद्येमुळे अंगी आलेला गुरुत्वाचा ताठा होता एवढेच. आणि म्हणूनच, एरवी स्वामीवर अपार श्रद्धा असूनहि रामदेवाकडून त्यांची अप्रत्यक्ष अवहेलना होत असे. (उत्त. २६९).

ते कांहीहि असले तरी रामदेवाकडून घडलेले एक कार्य फार मोठे आणि महत्त्वाचे आहे. नागदेवासारखा पट्टशिष्य स्वामींना लाभण्याला अप्रत्यक्षपणे रामदेवच कारणीभूत झाला हे विसरता येत नाही. नागदेवा–

दिकांच्या मनात स्वामीविषयी आवड प्रथम त्यानेच निर्माण केली आणि नंतर एकदा नव्हे तर अनेकदा त्यांना तो स्वामींच्या दर्शनाला घेऊन गेला. त्याचा परिणाम असा झाला की नागदेवाचार्यांचे चित्त रामदेवावरून उडाले, ते स्वामींच्या ठिकाणी जडले, त्यांना बोध होऊन शेवटी ते अनुसरले. नागदेवाचार्यांनी केलेली स्वामींची सेवा आणि त्यांच्या अविद्यमानी महा–नुभावपंथाच्या संघटनेचे, प्रचाराचे आणि प्रसाराचे त्यांनी केलेले महान् कार्य लक्षात घेतले म्हणजे असा थोर शिष्य स्वामीजवळ येण्यास अप्रत्यक्षपणे कारणीभूत झालेल्या रामदेव विद्यावंताबद्दल महानुभावांच्या मनात आदर व कृतज्ञताबुद्धि उत्पन्न झाल्यावाचून राहणार नाही.

केवळ नागदेवच नव्हे तर नागदेवाचा सगळा परिवार चक्रधर-स्वामींना अनुयायी म्हणून लाभला याला अप्रत्यक्षपणे रामदेवच करणीभूत झाला. म्हणूनच त्याची आणि स्वामींची भेट झाली हा दोघांच्याहि आयुष्यातील एक महत्त्वाचा योग मानला पाहिजे. रामदेवाच्या द्वारा नागदेवाचा सगळा परिवार स्वामींच्या सेवेला कसा लागला हे पाहणे मोठे उद्बोधक होईल.

## नागदेवाचार्य

नागदेवाच्या घराण्याचे एक मूळ पुरुष वामनाचार्य होते. त्यांच्या पत्नीचे नाव महदाइसा. या दांपत्याला महेश्वरपंडित नावाचा मुलगा होता. त्याला वैजाइसा नामक पत्नीपासून दोन मुले झाली. वडील मुलाचे नाव माधवभट आणि धाकट्याचे नाव वायनायक. माधवभटाच्या पत्नीचे नाव आबाइसा आणि वायनायकाच्या पत्नीचे नाव कामाइसा. माधवभटाला आबाइसेपासून चार मुले झाली. सारंगपाणी, नागदेव, वैजोबा आणि उमाइसा नावाची मुलगी. वायनायक आणि कामाइसा यांना एकूण नऊ मुले झाली. त्यांची नावे महादाइसा, आपलो, सायित्री, गावित्री, मदळसा, म्हाळसा, ललिताइसा, जाखाइसा आणि वेल्हाइसा. अर्थात ह्यांना आपलो हाच काय तो मुलगा होता. बाकी सर्व म्हणजे आठ मुली होत्या. माधवभट आणि आबाइसा आपल्या मुलाबाळासहित गोदावरीच्या काठावरील पुरी नावाच्या गावात

(आजचे नाव 'पांढरी'. ता. गेवराई ; जिल्हा बीड. हैद्रा. सं). राहत असत. वायनायक आणि कामाइसा यांचे घर रावसगाव (रामसगाव. जि. औरंगाबाद. हैद्रा. सं.) येथे होते. दुर्दैवाने माधवभट फार अल्प वयात मृत्यु पावले. त्यामुळे आबाइसावर दुःखाचा डोंगर कोसळला. पण तिच्या दुःखात वायनायकांनी आपल्या वहिनीला चांगलीच मदत केली. त्यांनी आबाइसाच्या मुलांचे मौंजीबंधन करून विवाहहि करून दिले. आपली स्वतःची मुलगी महदाइसा आणि आबाइसाची मुलगी उमाइसा यांचेहि त्यांनी विवाह उरकले. पण आबाइसाचा संसार अशा रीतीने सावरला जात असतांना तिच्यावर आणखी संकटामागून संकटे येऊ लागली. विवाह झाल्यावर लौकरच उमाइसेवर वैधव्याचा प्रसंग आला. तिकडे वायनायकाची महदाइसाहि विधवा झाली. दुर्दैवाच्या ह्या आघाताने आबाइसा पोळून निघाली असतांनाच तिचा वडील मुलगा सारंगपाणीभट याला एके दिवशी वाटेत चोरांनी लुटले आणि ठार मारले. ही वार्ता ऐकताच तिला केवढे दुःख झाले असेल याची कल्पनाच करावी. राहिलेल्या दोन मुलांपैकी मोठा मुलगा नागदेव हा व्यसनी निघाला. त्यामुळे ती त्रस्त होऊन गेली. रावसगावलाच गोदावरीच्या काठावर एक गुंफा बांधून त्यात ती विरक्त वृत्तीने राहू लागली. तिच्या बरोबर तिची विधवा मुलगी उमाइसाहि राहात असे.

देवधर्म करीत काळ कंठणाऱ्या या विधवा मायलेकींनी रामदेवाला आपले गुरु केले. विधवा महदाइसेनेहि त्यांचा उपदेश घेतला. नागदेव हा पुरी येथे राहून मधूनमधून रावसगावला आईकडे येत असे असे दिसते. एके दिवशी तो आबाइसाला भेटायला आला तो त्याला गुंफेबाहेर पुरुषाच्या वहाणा दिसल्या. त्यामुळे त्याला आपल्या आईविषयी संशय आला. त्याने आत प्रवेश केला तो त्याला तेथे रामदेव दिसला. त्यामुळे नागदेवाचा संशय बळावून तो क्रोधसंतप्त झाला. त्याने रामदेवाच्या वाहाणा बाहेर फेकून दिल्या. बिचारे रामदेव ! नागदेवाचा तो अवतार पाहून ते गुपचुप आपले घोंगडे घेऊन बाहेर पडले आणि एका वडाखाली जाऊन बसले. इकडे नागदेव आपल्या आईला टाकून बोलू लागला, 'निके करीत असा हो आबै : याचि कारणे तुम्ही येथे गुंफा केली की !' आबाइसा म्हणाली 'हे काइ नागदेया ? दादोस निके माहात्मेयापासौनि आनंदु होए'

यावर नागदेव उपहासाने म्हणाला 'होईल मा काइ : रूपैयेसि (= महदाइसेला) उमैयेसि होइल : हे तरुणे धारे : याही तरुणीया धारीया : आस्त्रीयेसि पुरुषापासौनि होइल आणि काइ!' आबाइसेने म्हटले 'ऐसे कैसे म्हणत असति?' तेव्हां नागदेवाने विचारले 'मग मला यांच्यापासून आनंद होइल? मला आनंद होइल तर मग मी विश्वास ठेवीन.' आबाइसा म्हणाली 'अवश्य होईल.' तेव्हां नागदेवाने दादोसाला गुंफेत बोलावून आणले... त्यांना सर्वांनी भोजन घातले. भोजनानंतर दादोस गंगेवर गेले. आबाइसाच्या सांगण्यावरून नागदेवहि दादोसाकडे गंगेवर गेला व म्हणाला 'तुमच्यापासून आनंद प्राप्त होतो असे म्हणतात?' दादोसांनी उत्तर दिले 'आमच्यापासून आनंद होतोहि आणि होतहि नाही. पण आमचे गोसावी श्रीचक्रधरस्वामी यांच्यापासून मात्र आनंद निश्चित होतो.' चक्रधराचे नाव ऐकताच नागदेवाला स्थित्यानंद झाला. तो आनंद उतरल्यावर नागदेवाने आपणहून दादोसाचे घोंगडे उचलले. ते दोघे गुंफेकडे परत निघाले. आता नागदेवाच्या अंःतकरणात दादोसाविषयी आदरभाव निर्माण होऊन स्वामींच्या दर्शनाची त्याला उत्कंठा लागली. त्याने विचारले ' 'तुमचे गोसावी आता कुठे आहेत?' दादोस म्हणाले, 'यावेळी ते सिन्नरला आहेत.' नागदेव म्हणाला, 'मग मला त्यांच्या दर्शनाला न्याल का?' दादोसांनी ते मोठ्या आनंदाने कबूल केले. आणि लागलीच काही दिवसांनी आपल्या बरोबर आबाइसा, उमाइसा, महदाइसा इत्यादींना घेऊन दादोस व नागदेव सिन्नरला आले. पण स्वामींचे दर्शन प्रथम घेतले ते उमाइसा व महदाइसा यांनी. दादोस व नागदेव विडासुपारी आणण्यासाठी गावात गेले तो इकडे स्वामींच्या दर्शनासाठी उतावीळ झालेल्या महदाइसा व उमाइसा ह्या स्वामीकडे गेल्याहि. स्वामी त्यावेळी अंगणात फेऱ्या घालीत होते. त्यांना पाहून उमाइसा तर त्यांची मूर्ति एकसारखी पाहतच राहिली. स्वामींनीहि त्यांची चौकशी केली. तेवढ्यात दादोस व नागदेव तेथे येऊन पोचले. सर्वांनी स्वामींना दंडवते घातली. बाइसांनी सर्वांना स्वामींचा तांबूल प्रसाद म्हणून दिला. स्वामींनी तांबूल दिला तरी तो घेऊ नकोस म्हणून दादोसांनी आधी सांगितले होते तरीहि स्वामी खरोखरच ईश्वरपुरुष आहेत काय याचा प्रत्यय घ्यावा म्हणून नागदेवांनी तो तांबूलाचा प्रसाद स्वीकारला व भक्षण केला. त्यामुळे नागदेवाला स्थित्यानंद झाला. तो

ओसरल्यावर चक्रधरस्वामींनी नागदेवाला विचारले, 'तुम्हा माहात्मेया पासौनि सुखस्वास्थ्ये आति ?' नागदेव म्हणाला, 'जी जी : सांपे कणु एकु आधिक.' यावर स्वामी उद्गारले, 'ते नव्हे : हे स्थित्यांतर : एथौनि तुम्हा स्थित्यांतर गा' (ली. च. भा. २.)

आणि खरोखरच तेव्हांपासून नागदेवाच्या आयुष्यात फार मोठे स्थित्यंतर घडून आले. पूर्वी 'मोकळा कासवटा' आणि 'आडवी वेणी' घालून 'अनेका ढांडोळात' (=व्यसनात) लोळणारा नागदेव आता विरक्त वृत्तीने राहू लागला. दादोसाप्रमाणेच स्वामींच्या विषयीहि त्याच्या मनात श्रद्धा उत्पन्न झाली. स्वामी हे ईश्वरपुरुष आहेत असा त्याला अनुभव आला. त्याच्या अंतःकरणातील स्वामीविषयीची श्रद्धा उत्तरोत्तर अधिकाधिक वाढतच गेली. तो त्यांची वारंवार भेट घेऊ लागला. सिन्नर येथे झालेली ही पहिली भेट. यानंतर स्वामी बीड येथे असतांना दुसरी भेट झाली. यावेळी अंतःकरणातील श्रद्धेने प्रेरित होऊन त्याने स्वामींना वाहण्यासाठी एक मूल्यवान वस्त्र मुद्दाम विणून आणले होते. पण अहंकारी रामदेवाने ते आपल्या स्वतःच्याच ठिकाणी अर्पण करून घेतलें (ली. च. भा. ३. १). तीनचार महिन्यानंतर स्वामी पाटवध येथे असतांना महदाइसेला बरोबर घेऊन नागदेवांनी पुन्हा स्वामींचे दर्शन घेतले. ती त्यांची तिसरी भेट. त्यांची चौथी भेट कानसे (कनाशी) येथे आणि पांचवी भेट करंज–खेडला झाली. आता स्वामींचा आणि नागदेवाचा परिचय वाढला होता. पूर्वी महदाइसेने स्वामींना अर्पण केलेल्या वस्त्राची आंगी शिवून ती प्रथम स्वामींनी स्वतः परिधान केली आणि नंतर ती नागदेवाला अर्पण केली. त्यावेळी त्याला केवढा आनंद झाला ! आंगीचा प्रसाद मिळताच नागदेवांनी ती घेतली, अंगात घातली आणि स्वामींना नमस्कार केला' (भा. ३-८३). रामतीर्थाकडे विहरण करीत असतांना स्वामी एकदम अदृश्य झाले व मग थोड्या वेळाने प्रगट झाले. हा चमत्कार नागदेवाला तेथे पाहावयास सापडला. नागदेव आता स्वामींची सर्व सेवा करू लागला होता. स्वामींच्या साठी गुंफा करायची होती म्हणून झाडावर चढून त्याने फाटे मोडले. त्याचे वानरासारखे उड्या मारणे पाहून स्वामींनी त्याला 'वानरा' हे नाव गमतीने ठेवले. (३-८७). येथे असतांनाच स्वामींनी त्याला मुद्दाम देवगिरीला पाठवले. तेथे

गेल्यावर महादेवरायाच्या घरी पितराप्रीत्यर्थ चाललेल्या श्राद्धाच्या वेळी नागदेवांना मुख्य पितर करतील म्हणून स्वामींनी सांगितले आणि खरोखर तसेच झाले. (३-९१). याच भेटीत एके दिवशी स्वामींनी नागदेवांना दीक्षा घेण्याची (क्षौर करण्याची) सूचना केली. दोनचार दिवसांनी नागदेवांनी आपली इच्छा व्यक्त करताच स्वामी म्हणाले, "आता तुमचे परमेश्वरपुरा जाणे होत असे : तेथे तुमचेया प्रत्यया ये ते करा : तेथौनि या : मग क्षेउर करा" (भा. ३. पा. ११४). स्वामीवरील श्रद्धेमुळे स्वामींचे गुरु श्रीगोविंदप्रभु यांच्याहि दर्शनाला जावे असे महदाइसा व नागदेव यांना वाटले होते. त्याप्रमाणे रामदेवाबरोबर ते तेथे गेले. तिकडून परत आल्यावर जोगेश्वरी येथे या तिघांनीहि स्वामींची भेट घेतली. नागदेवांची ही सहावी भेट.

या सहाव्या भेटीतच चक्रधरस्वामींनी नागदेवांना बोध दिला. स्वामी जोगेश्वरीजवळील संगमेश्वराच्या देवळात गेले होते. तेथे एके दिवशी रात्रीचा पूजावसर आटोपल्यावर नागदेवांना त्यांनी मुद्दाम बोलावून आपल्या समोर बसवले, त्यांना श्रीप्रभूच्या लीळा विचारल्या आणि मग प्रश्न केला की "श्रीप्रभु, आम्ही आणि दादोस यावर आता तुझी प्रतीति कशी आहे?" नागदेव एकदम म्हणाले, 'सारखीच!' हे ऐकताच जवळ असलेली बाइसा नागदेवावर रागावली. पण तिला शांत करून स्वामींनी नागदेवांना पुन्हा विचारले, "श्रीप्रभुची केळि क्रिडा देखिली : माहात्मेयाचे चेष्टत देखिले : येऱ्ह विचारिता काही अंतर न दिसे?" हा प्रश्न ऐकून नागदेवांना जणु नवीन दृष्टि आली. ते मनात विचार करू लागले तेव्हां त्यांना वाटू लागले की, स्वामींच्या व श्रीप्रभूंच्या लीळा अगाध आहेत, उलट दादोसाचे वर्तन म्हणजे कुचेष्टा होत. स्वामींनी पुन्हा निरूपण करावयास सुरवात केली आणि श्रीप्रभु म्हणजे निर्गुण ब्रह्म, निर्मुक्त वस्तु, श्रीप्रभु ते आत्माराम, बद्ध जीवांना सहज मुक्त करणारे श्रीप्रभु आहेत असे पटवून दिले. स्वामींच्या या उपदेशाचा परिणाम नागदेवावर इतका झाला की आपल्या बिऱ्हाडी गेल्यावर रात्रभर त्यांना झोप आली नाही. स्वामींच्या निरूपणाचे ते एकसारखे चिंतन करीत होते. स्वामींनी सकाळी पुन्हा बोलावले तेव्हां आपण रात्रभर विचार करीत होतो हे नागदेवाकडून कळताच ते म्हणाले,

"मग विचार काही पटतो काय ?" नागदेव म्हणाले "होय." तेव्हां स्वामी बोलले, "हे जावो नेदीजे" असे म्हणून त्यांनी पुन्हा रात्रीचेच निरूपण केले. ईश्वरविभागाचे प्रवचन केले. ते ऐकून नागदेवांना श्रीप्रभु आणि स्वामी यावर ईश्वरप्रतीति आली आणि बोध झाला.

तेव्हांपासून नागदेवांच्या अंतःकरणात चक्रधरस्वामीविषयी अपार आवड निर्माण झाली. ते पाहून रामदेवाला वाटले की आपला शिष्य झालेला हा नागदेव आता चक्रधराला गुरु करणार असे दिसते! म्हणून तो मुद्दाम नागदेवांना करंजखेडला घेऊन गेला. तेथे तीन आठवडे ते राहिले. पण स्वामीवरील नागदेवांची श्रद्धा कमी न होता ती अधिकच वाढली. आबाइसाला सांगून नागदेवाचे मन फिरवण्याचा प्रयत्न दादोसाने केला. पण काही उपयोग झाला नाही. तेव्हां दादोस खडकुळी येथे स्वामीकडे आला, आणि म्हणाला, "मज एकांतु देयावा." स्वामी म्हणाले, "एथ कोण गा लोकांतु असे?" तथापि दादोसाने फार आग्रह केल्यामुळे ते दोघेहि गुंफेपासून जरा दूर गेले. तेव्हां दादोस स्वामींचे कान भरू लागला : "जी जी : हा नागदेवो गोसावी आपणयापासी राहो नेदावा : हा नीका नव्हे : हा अनेगा धांडाळीचा असे : गोसाव्रियांचे ऐकेल आणि पैन्हा जाउनि भडभडील." यावर स्वामींनी उत्तर दिले, "तैसे एथ काइ गा असे : मा पैन्हा जाउनि भडभडील तैसे एथ काहीं असे ?" स्वामींनी दादोसाला स्पष्ट सांगितले की, "नागदेव आता पूर्वीचा राहिलेला नाही. तथापि आमच्याजवळ राहणाराला आम्ही जा म्हणणार नाही आणि जाणाराला राहा म्हणणार नाही." या उत्तराने दादोसाचा उपाय खुंटला. दुसरे दिवशी सकाळी दादोस, नागदेव, आबाइसा, उमाइसा वगैरे सर्व जण परत जायला निघाले. थोडी वाट चालून गेल्यावर काही निमित्त करून नागदेव स्वामीकडे परत आले. स्वामींनी परत येण्याचे कारण विचारले तेव्हां नागदेव म्हणाले, "मी गोसावियापासि सात पाच दीस राहीन." स्वामी बोलले, "तैसे एथ राहो नेदिजे की... तुम्हां असो आवडैल तव असाल : जावो आवडैल तेहवळि जाल : तैसे एथ राहो नेदिजे की : एथुनि पाठविजैल तेव्हळि जावे : एथौनि बोलाविजैल तेहवळि यावे : तैसे तरि एथ राहो दीजैल." यामुळे नागदेव पुन्हा मनात विचार करू लागले. वर्षाने किंवा सहा महिन्यांनी दीक्षा घ्यावी असे त्यांना वाटले. इकडे स्वामी चुटकी

वाजवून पुन्हा, म्हणाले, " चांग विचारा : नीके विचारा : सांघात दूरि पावत असे. " स्वामींनी असे तीन वेळ म्हटले. तेव्हां नागदेवांनी निश्चयपूर्वक सांगितले, " जी जी : गोसावी जव असो देती तव असैन : पाठविती तेव्हळि जाईन." यावर स्वामींनी नागदेवांना भाखेचे पोफळ ( शपथेची सुपारी ) दिले आणि अशा रीतीने नागदेव स्वामींना अनुसरले; ते त्यांचे शिष्य बनले.

नागदेवाचार्यांच्या अनुसरणाचा हा वृत्तांत या ठिकाणी मुद्दामच विस्ताराने वर्णन केला. कारण एक तर चक्रधरस्वामींचे प्रमुख शिष्य म्हणून तो माहीत करून घेण्याची जिज्ञासा वाचकांना असणार; आणि दुसरे असे की त्यावरून स्वामी अधिकारी पुरुष पाहून त्याला बोध कसा देत, त्याचे मन ते कसे वळवीत याची थोडीफार कल्पना येऊ शकते. अनेक व्यसनात मग्न असलेल्या नागदेवाला आपल्या अलौकिकत्वाने वेधून त्यांनी आपल्याकडे आणले, वारंवार उपदेश करून त्याची पात्रता वाढवली व शेवटी ईश्वरप्रतीति आणून देऊन त्याला बोध दिला. व्यसनमग्नाला सन्मार्गावर आणून त्याची आध्यात्मिक उंची स्वामी कशी वाढवीत असत याचे हे उत्तम उदाहरण आहे. अनुसरणानंतर सहा महिनेपर्यंत श्रीप्रभूच्या सेवेसाठी रितपूरला–म्हणजे आपल्यापासून दूर पाठवून स्वामींनी नागदेवांची परीक्षा घेतली आणि त्यांची आर्त वाढवली. त्यानंतर मात्र हे नागदेवाचार्य स्वामींच्या सदैव सान्निध्यात होते. रितपूरहून परत आल्यावर नागदेवांना स्वामीपासून दूर करून पुन्हा आपणाकडे ओढून फोडण्याचा प्रयत्न रामदेवाने केलाच. नागदेवांची पत्नि गंगाइसा हिला त्याने उचकविले. ती स्वामीकडे येऊन नागदेवांना उद्देशून म्हणू लागली की " ज्याच्या बायकोला अन्नवस्त्र मिळत नाही अशा पुरुषांच्या जीवनाला धिक्कार असो. त्याला लाज कशी वाटत नाही." स्वामी तिला म्हणाले " अशा शिव्या का देतेस ? याने असे काय वाईट केले ? याच्यामुळे अजून तू सुवासिनी आहेसच ना ?" गंगाइसा म्हणाली," या मिळमिळीत सौभाग्यापेक्षा वैधव्य आले असते तर मी एकदाची निसूर तरी झाले असते."थोड्या वेळाने असे दिसून आले की निजलेले नागदेव अगदी मृतवत् होऊन पडले. त्यांची ती स्थिति पाहून गंगाइसा जोरजोराने रडायला लागली. स्वामींनी विचारले, " आता का रडतेस ? " गंगाइसा म्हणाली, " यांच्यामुळेच तर मी सुवासिनी होते. आता मी कसे करू ? " स्वामींनी नागदेवांना उठवले तेव्हां

तिला आनंद झाला. स्वामींनी नागदेवांना गंगाइसाबरोबर पाठवले. तिची व्यवस्था करून देऊन " ते म्हणति ते करा : प्राणिया एकु वादु पाहात असे " अशी त्यांना आज्ञा केली. अनुसरणानंतर नागदेवांना गंगाइसापासून मुलगा झाला. त्याचे नाव स्वामींनी वैराग्यदेव असे ठेवले.

यानंतर नागदेवाचार्य नेहमी स्वामींची सेवा करू लागले. स्वामींची कोणतीहि आज्ञा पाळण्यात ते अत्यंत तत्पर असत, स्वामींचा त्रिकाल पूजावसर करीत आणि निरूपणाला नेहमी उपस्थित राहत. त्यामुळे त्यांची पात्रता फार वाढली. ही पात्रता नागदेवाचार्यांनी स्वामींच्या अखंड सेवेने प्राप्त करून घेतली होती. ईश्वरप्राप्तीची त्यांना निरंतर तळमळ लागलेली असे ( उत्त. ३७ ). एक वेळ पांगळ्याचा वेष घेऊन त्यांनी स्वामींची स्तुति-स्तोत्रे गाइली. ( उत्त. २६ ). दुसऱ्या एका प्रसंगी ' निर्वचन ' प्रकरणाच्या आधारे त्यांनी स्वामींची स्तुति केली ( उत्त. १३७ ). स्वामींची सेवा नाग-देवाचार्य आजारातहि अत्यंत आज्ञाधारकपणाने करीत. ( उत्त. ७१; १०६ ). स्वामींच्या शास्त्रात ते इतके तरबेज झाले की " तुझेनि मुखे अशास्त्रीय न नीगे की " ( वि. १६०; ली. च. उत्त. २८० ) असे स्वामींनी त्यांना प्रशस्तिपत्रक दिले. बाइसाजवळहि स्वामी एकदा म्हणाले, " बाइ : हा काही आपुले बोलैल : हा एथीचेचि बोलैल की " ( वि. १७१ ). स्वामींनी आपले शास्त्र संपूर्ण पण थोडक्यात नागदेवांना उपदेशिले होते आणि त्यामुळे नागदेवाचार्य स्वतः इतरांना उपदेश द्यायला पात्र झाले होते. ( वि. १५३ ). आपल्या यथार्थ उपदेशामुळे नागदेवांना केवढा अधिकार आला याची कल्पना स्वामींनी त्यांना उद्देशून "तैसा तूं परतारकु आचार्या नव्हेसि की गा : तूं प्राणियाते अनिष्टापासौनि काढौनि इष्टी लाविता आचार्या की " ( वि. १५८ ) काढलेल्या या उद्‌गारावरून स्पष्ट दिसून येते. स्वामींच्या सन्निधानाने, नाग-देवाचार्यांना मिळालेले शाब्दज्ञान चरितार्थ होऊन त्यांना किंचित 'अपरोक्ष' दिसू लागले होते. ( वि. १५५). त्यांना स्वामींचे आणखी काही संनिधान लाभले असते तर अपरोक्ष ज्ञान होऊन याच देही मुक्ति मिळाली असती.

स्वामींच्या प्रयाणानंतर नागदेवाचार्य स्थूल मानाने छत्तीस वर्षे हयात होते. आणि या काळातच त्यांनी खरेखुरे महत्त्वाचे कार्य केले. त्यांची सगळ्यात महत्त्वाची कामगिरी म्हणजे स्वामींच्या लीळांचे संशोधन, लेखन व

त्यांची व्यवस्थित मांडणी म्हाइभटाकडून करवून घेणे ही होय. लीळाचरित्राचा उत्तरार्ध जवळ जवळ सर्वच नागदेवाचार्यांनी म्हाइभटाला निवेदन करून लिहवून घेतलेला आहे. तेव्हां त्या ग्रंथाच्या कर्तृत्वाचे श्रेय नागदेवाचार्यांकडे जाते असे म्हटले पाहिजे. स्वामींच्या ह्या सर्व लीळा शिष्य-वर्गाकडून गोळा करून आणल्यावर नागदेवाचार्यांनी स्वतः त्यांचे संशोधन केले. श्रीमुखीचे शब्द कोणते आहेत, कोणते नाहीत वगैरेंची शहानिशा करून त्यांना व्यवस्थितपणा आणला. केसोबासांनी 'रत्नमाला स्तोत्र' लिहिल्यावर त्याचेहि संशोधन त्यांनी याच रीतीने केले. लीळाचरित्राच्या लेखनाप्रमाणेच स्वामींच्या तत्त्वज्ञानाची पद्धतशीर मांडणी केसोबासाकडून करवून घेण्याचे कार्यसुद्धा नागदेवाचार्यांनीच केले. आज महानुभावांच्या तत्त्वज्ञानाविषयक ग्रंथांची जी अत्यंत व्यवस्थित रचना आढळून येते तिच्या मुळाशी नागदेवाचार्यांची प्रेरणा होती हे विसरता येत नाही. तिसरी महत्त्वाची गोष्ट अशी की, स्वामींचे हे तत्त्वज्ञान संस्कृतमध्ये ग्रथित करण्याचा केसोबासाचा विचार होता, त्याला मोडता घालून सर्वसाधारण जनतेच्या उपयोगासाठी चक्रधरस्वामींनी योजलेल्या मराठी भाषेतच ग्रंथरचना करण्याचे महत्त्व नागदेवाचार्यांनी आपल्या शिष्यवर्गाच्या मनावर बिंबविले; इतकेच नव्हे तर त्याचा आग्रह धरला. यामुळे महानुभावांची ग्रंथरचना साधारणपणे मराठीतच होऊ लागली. त्यामुळेच आज प्राचीन मराठी गद्य वाङ्मयाचे दालन इतके समृद्ध झालेले आढळून येते. नागदेवाचार्यांच्या या कार्याचा कोणत्याहि मराठी भाषाभिमान्यास विसर पडणे शक्य नाही.

स्वामींच्या प्रयाणानंतर त्यांच्या तत्त्वज्ञानाचा जनतेत अधिकाधिक प्रसार करण्याचेहि कार्य नागदेवाचार्यांनीच केले. हे कार्य आधुनिक पद्धतीप्रमाणे पाहता त्यांनी प्रत्यक्षपणे केलेले दिसत नाही हे खरे. तथापि हे कार्य त्यांच्या अलौकिकत्वामुळेच झाले असे म्हणायला हरकत नाही. इतरांना वेधून घेण्याचे त्यांचे सामर्थ्य लक्ष्यात घेऊनच त्यांना 'वेधवंती नागदेव' असे नाव पडले होते. या गुणाबरोबरच ब्रह्मविद्याशास्त्राच्या व्युत्पत्तिव्युत्पन्नतेने अन्यमार्गियांना चर्चेत जिंकण्याचे व त्यांना आपल्या मार्गाचे अनुयायी करून सोडण्याचेहि त्यांचे कौशल्य वाखाणण्यासारखे होते. त्यामुळेच पूर्वाश्रमीचे वेदविद्यापारंगत असे अनेक शिष्य त्यांना मिळाले. आणि त्यांच्या

द्वारे स्वामींच्या विशिष्ट तत्त्वज्ञानाचा प्रचार होऊ शकला. या सर्व कर्तृत्वाच्या मुळाशी नागदेवाचार्य होते. इतके की त्यामुळेच स्वामींच्या या मार्गाला त्यावेळी लौकिकात 'भटमार्ग' हे नाव पडलेले होते. कारण 'भट' 'भटोबास' ही नागदेवांचीच अन्य नावे होती. चार-पाच वर्षेपर्यंत घडवून मढवून तयार केलेल्या या आपल्या शिष्याच्या कर्तृत्वाचे हे दृश्य पाहून श्रीचक्रधरस्वामींना अत्यंत आनंद होत असेल यात शंका नाही.

## आबाइसा व उमाइसा

नागदेवाचार्यांच्या अनुसरणानंतर लौकरच त्यांची आई आबाइसा आणि चुलत बहीण महदाइसा या दोघींनी स्वामीजवळ दीक्षा घेतली. त्यांची बहीण उमाइसा ही मात्र स्वामींच्या प्रयाणानंतर अनुसरली. या सर्व जणी आरंभी बहुधा दादोसाबरोबरच स्वामींच्या दर्शनाला जात. स्वामी जवळपासच्या गावी असले म्हणजे त्यांच्या मठात आबाइसा रंगमाळिका (रांगोळ्या) भरत असे (४-६०). क्वचित ती त्यांना चौपद्या गाऊन दाखवीत असे (उत्त.'१५८). स्वामींच्या आज्ञेवरून एक वेळ आबाइसा रितपुरला श्रीप्रभूंच्या सेवेसाठी गेली होती (उत्त. २८६). स्वामींच्या प्रयाणानंतरहि तिने श्रीप्रभूंची सेवा रितपुरला राहून अत्यंत निष्ठेने केली. आबाइसा आणि उमाइसा या दोघी 'मासोपवासिनी' होत्या, म्हणून स्वामी त्यांना याहि नावाने कधीकधी संबोधीत. (३-५३, १०२; ४-७, ४७). आबाइसाला ते 'वृद्धाबाइसा' म्हणूनहि म्हणत. या दोघींनाहि त्यांनी अनेकदा निरूपण केले होते. उमाइसाला केलेले 'निरयनिरूपण' आणि आबाइसाला केलेले 'अनंत निरूपण' (३-१३) प्रसिद्ध आहे. उमाइसानेहि एक वेळ 'बापूरे मेरी अवस्था लो' ही चौपदी स्वामींना गाऊन दाखविली. त्यानंतर स्वामींनीहि एक चौपदी म्हटली (उत्त ३२१). मासिक धर्मामुळे विटाळ पाळण्याची काही आवश्यकता नाही अशा आशयाचे निरूपण स्वामींनी उमाइसालाच उद्देशून केले होते (उत्त. ३४७). महदाइसा स्वामींची सेवा एकनिष्ठपणाने करीत होती ते पाहूनच उमाइसा देखील त्यांची सेवा करू लागली (उत्त. ३४९). तथापि स्वामींच्या प्रयाणापूर्वी ती त्यांना अनुसरली नाही, एवढे मात्र खरे.

**महदाइसा**

या कुटुंबापैकी महदाइसा ही अत्यंत प्रसिद्ध व्यक्ति होय. अगदी पहिल्या भेटीपासूनच स्वामींची हिच्यावर विशेष कृपादृष्टी होती असे दिसून येते. म्हणून पहिल्याच भेटीत तिला त्यांनी राहविण्याचा प्रयत्न केला. ( २–५३ ). हिवरळी येथे असतांना तिची आर्त पाहून स्वामींनी तिला मुद्दाम बोलाऊ पाठवले होते ( ३–९७ ). महदाइसाहि स्वामींच्या सौंदर्याने वेधली होती. 'आमचे गोसावी कैसे नागर' ( उत्त. ३७२ ); 'कैसे गोसावीयांचे डोळे बरवे जी' ( उत्त. ३९० ) यावरून हे दिसून येईल. तिने पूजा करून स्वामींना वाहिलेल्या वस्त्राचे मोल 'हे वस्त्र आन लेख लाहे : यासि कव्हणी मोल करू नेणे' ( ३–५१ ) असे स्वामींना वाटत होते. ही दादोसाची शिष्या होती. महदाइसेची स्वामीवर बसत चाललेली अधिकाधिक श्रद्धा पाहून तिला निवृत्त करण्याच्या हेतूने दादोसाने तिला द्वारावतीच्या यात्रेला पाठवले एकदा. ( ३–५२ ). त्यावेळी स्वामींनी फारसा प्रतिबंध केला नाही. पण पुढे दादोसाने तिला वाराणसीलाहि पाठवले. त्यावेळी मात्र 'तीर्थ क्षेत्रे अमोचके : ईश्वरसंनिधान मोचक' हे नाना रीतींनी पटवून देऊन वाराणशीला जाण्यापासून तिला परावृत्त करण्याचा स्वामींनी प्रयत्न केला. स्वामींच्या सांगण्यावरून महदाइसेने आपला बेत रद्द करावा पण दादोसाने तिला पुन्हा तयार करावे असे याच प्रसंगी दोनतीनदा झाले. शेवटी महदाइसेने जाण्याचा निश्चय केलाच. तेव्हां, तेथे गेल्यावर कसे वागावे याचा स्वामींनी तिला सुंदर उपदेश केला. ( उत्त. १२५ ). पुढे तिला याबद्दल अत्यंत पश्चात्ताप झाला. वाराणसीला मनकर्णिका पाहताच तिला वाटले 'येथे आहे काय ! उदकासारिखी उदके : पाषाणासारिखे पाषाण : झाडासारिखी झाडे : माणुस' असे म्हणून ती धाय मोकलून रडू लागली. तिला स्वामींचे सन्निधान अंतरले होते; आणि ते दादोसामुळे. म्हणून वाराणसीला असतानाच 'हे तीलांजलि जातिगोत्रासि : हे दादोसासि' असे म्हणून तिने सर्वस्वाचा त्याग केला व ती अंतःकरणाने स्वामींना अनुसरली. वाराणशीहून परतल्यावर स्वामींच्या भेटीत ती अनुतप्त अंतःकरणाने कोपऱ्यात बसली असतांना "म्हातारी का गा ऐसी बैसली असे ?" असे स्वामींनी विचारले तेव्हां "जी जी : द्वारावतीएसी गेली : वाराणसीसि

गेली : आता मलिनाथा काही केदारा जावे असैल म्हणौनि चींता करीत असेति " असे नागदेवांनी उपालंभपूर्वक उत्तर दिले. तेव्हां स्वामी म्हणाले, " आता म्हातारी तैसी नव्हे गा : आता म्हातारी आन एक होउनि आली असे "( उत्त. ३५९ ). पुढे तर ती दादोसाबरोबर भांडलीहि ( उत्त. ४३२ ).

महदाइसा जशी अत्यंत विरक्त होती तशीच ती जिज्ञासूहि होती. स्वामींना नाना प्रकारचे प्रश्न विचारून ती आपली जिज्ञासा तृप्त करीत असे. त्याचमुळे स्वामींनी तिला निरय ( उत्त. १०२ ), ब्रह्मानुभूति ( उत्त. २७७ ), कलिधर्म ( उत्त. ३०९ ), संन्यास ( उत्त. ४४१ ), जीवप्रपंच व ईश्वर ( उत्त. ४८९, ४९० ) इत्यादींचे निरूपण केले. अशा निरूपणप्रसंगीच स्वामींनी महदाइसेला 'डोळेयाचा' ( उत्त. २७८ ), दीक्षितकन्येचा, कर्मचांडाळाचा ( उत्त. १२५ ) वगैरे अनेक दृष्टांत सांगितले. नागदेवाचार्यांच्या खालोखाल अधिक दृष्टांत स्वामींनी महदाइसेलाच निरूपण केले होते. या जिज्ञासू वृत्तीमुळेच तिने स्वामींना त्यांच्या एकांकीच्या अनेक लीळा विचारून घेतल्या. किंबहुना चक्रधरस्वामींचे पूर्वचरित्र त्यांच्या मुखावाटे आपणाला उपलब्ध करून देण्याला महदाइसेची जिज्ञासाच कारणीभूत झालेली आहे असे म्हटले तर चुकीचे होणार नाही. ती जशी जिज्ञासू होती तशीच चर्चकहि होती. पुराण वगैरे ऐकल्यावर ती स्वामीबरोबर नेहमीच चर्चा करीत असे. म्हणून स्वामींनीच " म्हातारी जीज्ञासकः म्हातारी चर्चकः म्हातारी एथ काही पूसतचि असे " ( उत्त. ४९१ ) असे उद्गार तिच्याविषयी काढलेले आहेत. स्वामींच्या प्रयाणानंतर नागदेव, केसोबास, म्हाइभट वगैरे बरोबरहि ती नेहमी चर्चा व धर्मवार्ता करीत असे. ती स्वामींची अनन्यभक्त बनली होती. 'चक्रधर' हे नाव ऐकताच तिला अवर्णनीय आनंद होई ( स्मृ. स्थ. ६२ ). स्वामींच्या प्रयाणानंतर श्री गोविंदप्रभूंचीहि सेवा तिने तितक्याच निष्ठेने केली. त्यांच्या मागे चक्रधरस्वामींच्या चिंतनात व त्यांच्या धर्माच्या प्रसारात काळ कंठून तिने स्वामींचे स्मरण करीत करीत नौगाव येथे देह ठेवला. ( स्मृ. स्थ. २५३ ) आद्य मराठी कवयित्री या नात्याने तिचे काव्यकर्तृत्व प्रसिद्धच आहे. 'धवळ्या' च्या पूर्वार्धाचे कर्तृत्व तिच्याचकडे जाते. पण याशिवाय कांही स्फुट ओव्याहि तिने लिहिलेल्या असाव्या असे दिसते. चक्रधरस्वामी पैठणला असतांना त्यांच्या उपाहारासाठी सोजी कांडता कांडता

गोमतीए तीरीं : निळेया गूढरा : राजेया गुजरा : कृष्णराया
नीळा गुढरू : राजा गुजरू : माणीकी मंडपीं : श्रीचक्रधरु
गोमटें मांजीटें : आरव कुंडीचें : राजेया डौंडीचे : चक्रधरा
गोरे अंग बाहीया : डवरीया चंदनें : श्रीचक्रधरा झणें : दीठी होए

बापु म्हणे की भाइया : माझेया साजणी : गोत तो साजणीचाही यावो. अशा ओव्या गात होती. यात 'बापु म्हणे की भाइया' असा उल्लेख असल्यामुळे हे कर्तृत्व महदाइसेचे नसावे असे वाटण्याचा संभव आहे. पण [illegible] ओव्या ऐकून "बाइ : ऐसिया वोविया बापां भाऊवासि गाइजति की" या स्वामींच्या प्रश्नाला "जी जी : गोसावीचि बापु : गोसावीचि भाऊ : गोसावीचि साजणी गोत" हे तिने दिलेले उत्तर पाहिले म्हणजे या ओव्या महदाइसेनेच रचल्या असल्या पाहिजेत असे दिसते. शीघ्र काव्यरचना करून चक्रधरस्वामींचे आर्ततेने चिंतन करणे हा महदाइसेच्या स्वभावाचा विशेष स्वामींच्या प्रयाणानंतरहि दिसून येत होता. "नागदेवाचेया खांदावरि करू : राजा चक्रधरु बीजे करी । सोनेसळी सेला : नेसला मालगंठी : म्हाइया आला भेटी : प्रभूचीये" (स्मृ. स्थ. १२३) अशी चक्रधराची काव्यात्मक स्मरणे ती नेहमी करीत असे.

## एल्हाइसा ऊर्फ साधे

नागदेवाचार्य आणि त्यांचे नातेवाईक यांच्याप्रमाणेच एल्हाइसा ऊर्फ साधे ही एक अनन्यश्रद्धेची शिष्या चक्रधरस्वामींना अनुसरलेली होती. नागदेवाप्रमाणे तीहि प्रथम रामदेव ऊर्फ दादोस विद्वांताबरोबरच स्वामींच्या दर्शनाला गेली होती. ही मूळची चारठाणे येथे राहणारी. चारठाणे गाव त्यावेळो वऱ्हाडात अंतर्भूत होत असले पाहिजे. म्हणूनच 'ये साधें वराडीची की' असे रामदेवाने तिची स्वामीशी ओळख करून देतांना म्हटले होते. साधे ही रामदेवाची चुलती (ली. च. भा. ३ पा. ३५). हिच्या आईचे नाव लाहामाइसे. रामदेवाकडून श्रीप्रभूचे नाव ऐकताच हिला स्थिति झाली. तदनंतर रामदेवाबरोबरच ही स्वामींच्या दर्शनाला निघाली. कानसे येथील मळ्यात तिला स्वामींचे दर्शन झाले आणि ती त्यांच्याकडे पाहातच राहिली. स्नान केल्यावर दवणा वाहून तिने स्वामींची

पूजा केली आणि दोन्ही हात जोडून म्हटले, " जी जी : संसारी जन्मलेयाचे फळ आजि जाले." ( भा. ३ पा. ३६ ). साधे बिचारी भोळी होती. त्यामुळे दवणा वाहतांना तो व्यवस्थित रीतीने न वाहता तिने मुळासकटच वाहिला. पुढे एके दिवशी त्रिसंदीच्या फुलांनी तिने स्वामींची पूजा केली; तीहि स्वामी झोपले असतांना त्यांच्या तोंडावरील पांघरूण काढून आणि वक्षस्थळांवर फुले वाहून ! तथापि तिच्या या अज्ञानाबद्दल बाइसा रागावली तरी स्वामी रागावले नाहीत. उलट त्यांनी " साधे व्हो : भेवो नको : तुम्ही जाणा नां : जाणा तरि ऐसे का कराल : आणि अनवसरी का याल " ( भा. ३ पा. ५१ ) या शब्दांनी तिचे सांत्वन केले. तिने एक वेळ रिंगणीची फुले वाहून स्वामींची पूजा केली तेव्हां स्वामींनी " साधे हो : देवो सुवर्ण-फुली पूजिजताए ! " असे उद्‌गार काढले आणि फुले रिंगणीची असली तरी त्यामागील " भावो अपूर्व की " असा तिच्या श्रद्धेचा गौरव केला. स्वामीवर तिची श्रद्धा खरोखरच अपूर्व होती. स्वामी जोगेश्वरी येथे असतांना ती लाहामाइसा आणि रत्नमाणिके यांच्याबरोबर दर्शनाला आली. दर्शन झाले तेव्हां तिला बोलायला मिळाले नाही म्हणून ती एकसारखी तळमळत होती. आपल्या बिऱ्हाडी असतांना सकाळ झाली या कल्पनेने रात्री ती दोनतीनदा उठली आणि तिने स्वामींच्या दर्शनाला चालण्याविषयी आईला विनंती केली. शेवटी, आई लौकर निघत नाही असे पाहून ती स्वतःच मोठ्या पहाटे स्वामींच्या दर्शनाला निघाली. केवढी ही तळमळ ! स्वामींच्या बरोबर वाट चालत असतांना त्यांच्या अंगावर धूळ जाऊ नये म्हणून ती वहाणा घालत नसे. ( उत्त. २०७ ). त्यांची वाट झाडून स्वच्छ करीत असे. प्रवासात पुढील गावी जाऊन स्वामींचा मठ झाडून ठेवणे, तेथे त्यांच्यासाठी उष्णोदक तयार ठेवणे, त्यांची पूजा करण्यासाठी पुष्पमाळा गुंफून ठेवणे यात तिला धन्यता वाटत असे. ही तिची अवस्था पाहून " साधे व्यासारे असेति " म्हणून स्वामी बाइसाजवळ तिचे कौतुक करीत. ( उत्त. २०९ ). स्वामींच्या दर्शनाला आल्यावर त्यांच्या मठासमोर सडासंमार्जन करून ती रंगमाळिका भरीत असे. ( उत्त. १५० ). स्वामींची वाट पाहत असतांना त्यांचे दुरून दर्शन होताच ही दंडवत घालूं लागायची ! ( उत्त. २०९, २१२ ). स्वामींनी एक वेळ चणे खाण्याची इच्छा व्यक्त करताच

तिने शेतातून चणा आणला, त्यातील अर्धा सोलून, शेतकऱ्याजवळून मीठ-मिरे घेऊन त्याला फोडणी दिली; व अर्ध्या चण्याचे पीठे केले. हे पाहून "बाई : साधे सप्रयोजके असेति" म्हणून स्वामींनी पुन्हा तिचा गौरव केला. आध्यात्मिक दृष्टीने देखील ती श्रेष्ठ होती. स्वामींनी एक वेळ तिला विचारले, "साधे हो : श्रीप्रभुवरि : एथ : महात्मेयावरि (रामदेवावर) कैसी बूधि ?" तेव्हां तिने अत्यंत समर्पक उत्तर दिले. ती म्हणाली, "जी जी : गोसावी ईश्वरु : श्रीप्रभु आत्मप्रकाश : राम तो आमचा सोइरा :" हे उत्तर ऐकून स्वामी संतुष्ट झाले. एक वेळ त्यांनी तिला काही वर मागायला सांगितले. तिने 'पुनःसंबंध' मागितला. तेव्हां स्वामी गौरवपूर्वक म्हणाले, "साधे हो : नेणौनि जरि ऐसे मागितले तरि जाणतीति तरि काई ?" (उत्त. १६३). तिच्या या आध्यात्मिक उंचीमुळे स्वामी तिच्यावर नेहमी प्रसन्न असत. म्हणूनच त्यांनी एकवेळा तिला जलक्रीडेसाठी बोलाविले. (उत्त. १४२). आपली 'आंगी' तिला प्रसाद म्हणून देऊ केली; पण 'गोसावीयासी बरवी साजताए' असे म्हणून तिने ती घेतली नाही. (उत्त. १४३). एक वेळ स्वामींनी आपल्या विड्याचा अर्धा भाग साधेला प्रसाद दिला. (उत्त. ६२). तिच्या पायाला काटा बोचला तेव्हां तो त्यांनी नागदेवाकडून काढविला. (उत्त. १४९). साधेने रिंगणीच्या फुलांनी पूजा केल्यावर स्वामींनी तिला भोजन द्यायला बाइसांना आज्ञा केली. त्यावेळी त्यांनी स्वतः आपल्या हातांनी खीर, तूप वगैरे पदार्थ मोठ्या आग्रहाने वाढले. (उत्त. २८३). दुसऱ्या एका वेळी तर आपल्या मुकुटात खोवलेली कडु लिंबाची पाने गोड करून साधेला खाण्याला दिली. (उत्त. २८४). यावरून ती स्वामींच्या कृपाप्रसादाला कशी पात्र झाली होती हे दिसून येईल. यामुळे साधेने सहानुभूति दाखविताच काउळगावच्या माळिणीचा जिव्हारोग स्वामींनी नाहीसा केला.

स्वामींच्या प्रयाणानंतर साधे श्रीगोविंदप्रभूची सेवा करू लागली. त्यांचा मृत्यु झाल्यावर नागदेवादि इतर गुरुबंधूबरोबर तीहि परतली. कालांतराने वयोमानानुसार ती अत्यंत अशक्त झाली, म्हणून निंबा येथे मठ करून राहू लागली. (स्मृ. स्थ. ६५). दिल्लीच्या सुलतानाने दक्षिण हिंदुस्थानावर स्वारी केली तेव्हां सर्वत्र हलकल्लोळ उडाला. त्यावेळी आपल्या-

सारख्या इतर अनेक अशक्त महात्म्यांना बरोबर घेऊन साधे परळी वैजनाथला राहिली व तिने श्रीचक्रधराच्या कृपेने सर्वांचे संरक्षण केले. स्वारीचा उपद्रव नाहीसा झाल्यावर ती पुन्हा निंब्याला परतली. (स्मृ. स्थ. ८४, ८७). तेथेच तिचा मृत्यु झाला असावा.

**इंद्रभट**

हा रामदेवाचा शिष्य होता आणि त्याच्याचबरोबर प्रथम कानडे येथे स्वामींच्या दर्शनाला आला होता. बरोबर त्याची तरुण पत्नी गौराइसा हीहि होती. श्रीकृष्णचक्रवर्तीप्रमाणे स्वामीपासून अकृत्रिम आनंद होतो असे ऐकल्यामुळे तो आनंद उपभोगण्यासाठी आपण स्वामींच्या दर्शनाला आलो, असे त्याने सांगितले. 'मग बरोबर पत्नीचे लोढणे कशाला ?' असे विचारताच इंद्रभट म्हणाला, "धर्मेचि अर्थेचि कामेचि नातिचरितव्या : नातिचरामि" स्वामींनी म्हटले, "मोक्षेचि नाही की ?" तेव्हां इंद्रभट म्हणाला, "हो जी : हिलाहि येण्याची उत्कंठा होती. आपले कल्याण साधण्यासाठीच हीहि आली." (ली. च. भा. ३ पा. ३७). या पहिल्या भेटीतच इंद्रभटाची स्वामीवर श्रद्धा बसली. पुढे तो आणि त्याची पत्नी स्वामींच्या दर्शनाला वारंवार येऊ लागली. बुद्धमंदिरात जाणे ब्राह्मणांना निषिद्ध असले तरी केवळ स्वामीबरोबर म्हणून तो तेथेहि जात असे. (भा. ३ पा. ४३). 'भावासि काइ रावो राणा असे' या भावनेने तो स्वामींचे उष्टे तांबूल घेई, तुळशी-फुले वाहून त्यांची पूजा करी. (भा. ३ पा. ४४). स्वामींच्या निरूपणाच्या प्रसंगी क्वचित गौराइसा खुशाल झोपत असे. त्यावरून "हां गा : मुक्तीचिया चाडा आणि खुंटदावे सांभाळणे" अशा शब्दात स्वामी त्याच्यावर रागावले (भा. ३ पा. ४७). गौराइसा त्यावेळी गर्भवती होती. तरी तिला इंद्रभट आपल्या बरोबर घेऊन येई. या आसक्तीतून इंद्रभटाला सोडवण्याचा स्वामींनी पुष्कळदा प्रयत्न केला. त्यांनी त्याला अनुसरण्याचा उपदेश केला. पण काही उपयोग झाला नाही. स्वामींच्या सान्निध्याने त्याचा विकार मात्र हळूहळू नष्ट होत होता. म्हणूनच अवधूताने मागून आणलेले भिक्षान्न स्वामींच्या आशेवरून त्याने सेवन केले. (भा. ४-४३). त्याच्या सेवेने प्रसन्न होऊनच स्वामींनी एक वेळ त्याला आपला 'फुटा' प्रसाद म्हणून दिला. (उत्त. १५). स्वामी नेऊरगावला

गेले असतांना इंद्रभटाला मुद्दाम बोलावून आणून त्यांनी त्याला भेट दिली. श्रद्धापूर्वक स्वामींची सेवा-पूजा वगैरे करण्याव्यतिरिक्त इंद्रभटाला शास्त्रज्ञान वगैरे काही विशेष झाले होते असे दिसत नाही. एल्हंभट हा इंद्रभटाचा सासरा होता असे दिसते. ( उत्त. ५३ ).

**बाइसा**

एकांक काळाच्या शेवटी शेवटी स्वामींना भेटलेला रामदेव आणि त्याच्यामुळे पुढे स्वामींच्या भोवती गोळा झालेल्या शिष्यपरिवारातील काही ठळक व्यक्ति यांचा वृत्तांत आपण पाहिला. एकांक काळानंतर पूर्वार्ध काळाच्या आरंभीच चक्रधरस्वामींना मिळालेला दुसरा शिष्य म्हणजे बाइसा होय. तिच्या अनुसरणाची हकीकत आपण पूर्वी पाहिली आहे. ही वामदेवाची शिष्या होती. पण स्वामींनी तिचे त्रिदोष नाहीसे करून तिच्या ठिकाणी प्रेमसंचार केल्यानंतर ती त्यांची अनन्य भक्त बनली. बाइसाची योग्यता एका दृष्टीने नागदेवाचार्याहूनहि अधिक आहे. कारण नागदेवाचार्य नुसते ज्ञानी होते, तर बाइसा भक्त होती. नागदेवांना उत्तरार्ध काळात केवळ साडे-तीन वर्षे स्वामींचे सन्निधान लाभले होते, तर बाइसाला जवळ जवळ सात साडेसात वर्षांचे सन्निधान होते. मध्यतरी स्वामींनी त्यांना श्रीप्रभूच्या सेवेसाठी रितपुरला पाठविले होते. तेवढा कालावधि सोडून दिला तर बाइसा आपल्या मृत्युपर्यंत स्वामींची सेवा अनन्यभावाने करीत होत्या. स्वामींच्या मठाची, पूजेची, उपाहाराची वगैरे सर्व व्यवस्था त्याच प्रामुख्याने पाहत. स्वभावाने तशा त्या तामस होत्या. स्वामींच्या ईश्वरावतारित्वाबद्दल कुणी शंका घेतली किंवा त्यांना इतराहून हीन लेखले तर बाइसा लागलीच संतापून त्याला शिव्या देण्याला कमी करीत नसत. त्यांच्या तामसी स्वभावामुळेच मठात राहणाऱ्या इतर बायाबरोबर मधून मधून त्यांची भांडणेहि होत. ( उत्त. १३६; १३९ वगैरे ). पण या सगळयांच्या मुळाशी स्वामीवरील त्यांची अनन्य श्रद्धा होती. काही दिवसपर्यंत का होईना पण श्रीप्रभूंच्या सेवेसाठी त्या रितपुरला म्हणजे स्वामीपासून दूर होत्या. त्यामुळे त्यांचे ' देह तुटले ' होते. त्यांना तेथे ' समाधान नसेचि ' ( उत्त. ३५७ ). " बाइसे तिये एथिचेनि सन्निधानेवीण रोडैली " असे स्वामींनीच उद्गार काढले. बाइसांनी आत्महत्या केल्यानंतरहि " म्हातारी तमाचा मोटळा गा : परि

एकचि नीके : जे एणे वीण गतीन्चि नाही" (उत्त. ३९५) असे प्रशंसापर उद्गार स्वामींनी काढले होते. त्यावरून तिच्या स्वभावाची चांगली कल्पना येऊ शकेल.

पण रामदेवामुळे व नागदेवाचार्यामुळे स्वामींना त्यांच्या सन्निधानात व असन्निधानात जसे अनेक श्रेष्ठ प्रज्ञावंत शिष्य मिळाले व त्यांचा परिवार वाढला तसे बाइसामुळे फारसे काहीच घडलेले दिसत नाही. बाइसांच्या अनुसरणानंतर त्यांचे पूर्वाश्रमीचे शिष्य पांडे व हासुबाई हे स्वामींचे सेवक बनले हे खरे ; पण त्यांचे कर्तृत्व कोणत्याहि प्रकारे लक्ष्यात घेण्यासारखे नाही. बाइसाबरोबर मठात राहून ही स्वामींची सेवा करी. कधीकधी श्रीप्रभूंच्या सेवेसाठी स्वामी तिला पाठवत. (उत्त. २८६). एक वेळ 'संतोष' नावाच्या महात्म्याच्या शुश्रुषेसाठी स्वामींनी तिला मागे ठेवले (उत्त. २५५). बाइसांच्या मृत्युनंतरहि ती स्वामींची सेवा करीत असावी असे दिसते. म्हणूनच आपल्या प्रयाणापूर्वी रितपुरवरून म्हाइभटाला बोलावण्यासाठी स्वामींनी या हासुबाईला पाठवले होते. बाइसामुळे स्वामींना लाभलेल्या परिवारातील हासुबाईचे व्यक्तित्व एवढ्यापुरतेच मर्यादित होते. 'पांडे' च्या बाबतीत तर तेंहि आढळत नाही.

## मार्कंड

बाइसामुळे त्यांचा भाचा मार्कंड हा स्वामींच्या परिवारात आला होता. त्याचे मूळचे नाव 'भास्कर.' पण स्वामी यालाच 'मार्कंड' 'मार्तंड' असे संबोधीत. एकंदरीत हा अगदीच सामान्य मनुष्य होता असे म्हणावे लागते. आपल्या आध्यात्मिक उन्नतीची याला कोणतीच तळमळ नव्हती. खोटे बोलणे, चोरी करणे या गोष्टी यांच्या अंगवळणी पडल्या होत्या. यामुळे स्वामी याच्यावर नेहमी रुष्ट असत. पण केवळ बाइसाच्या भिडेमुळे ते त्याला हाकून देत नव्हते. बाइसांना नेहमी असे वाटायचे की स्वामी इतर सगळ्यांचे इतके भले करतात, पण आपल्या मार्तंडाकडे मात्र लक्ष देत नाहीत. एके दिवशी स्वामींनी त्याला सांगितले, "मार्तंडा जा : भिक्षा करूनि या : भिक्षा संपादा : तुमचे अठरा रोग धाडीजती." मार्तंड निघाला. पण त्याने केले काय ? गावात आपल्या मामीच्या घरी जाऊन

स्नान भोजन करून तो मस्त झोपला. परततांना शिळया भाताच्या ढेपा झोळीत घालून स्वामीजवळ आला. त्यांनी त्याचे कर्तृत्व ओळखलेच होते. ते म्हणाले " मार्तंडा : हे अन्न एके घरिचें ऐसे दिसत असे. " मार्तंडाचे उत्तर तयारच होते. " ना : जी : गावी एकचि पेव काढीले : सारिखिचि जोन्हळे : अवघां घरी सारिखाची भातु. " त्याच्या या बोलण्यावर बाइसाचा विश्वास बसला. ती त्याची बाजू घेऊन म्हणाली, " बाबा : एथ काई याची मायबहिण असे : मा ते घालील? बापुडे भिक्षा उदास भिक्षा करुनि आले. " हे बाइसाचे बोलणे ऐकून स्वामी गप्प राहिले. पण थोड्याच वेळात मार्कंडाची मामी तेथे आली आणि तिने सगळा वृत्तांत सांगितला. त्यामुळे त्याचे सगळे बिंग बाहेर पडले. (ली. च. भा. ३ पा. ७६ ). असे नेहमीच होत असे. द्वारकेला जाण्यासाठी तो निघाला तेव्हां बाइसाने त्याला काही पैसे दिले होते. पण द्वारकेला न जाता मधूनच हा परतला व पैसे त्याने पुरून ठेवले. स्वामींना आणि बाइसाला मात्र त्याने थाप मारली की, 'वाटेत चोरांनी आपणाला लुबाडले' म्हणून. स्वामींनी त्याने पुरून ठेवलेले द्रव्य नागदेवाकडून उकरून काढून त्याचे हेहि बिंग बाहेर काढले आणि म्हटले, " बाई : ऐसा असे मार्कंड : हा नीका नव्हे : हा दवडा " ( ली. च. उत्त. १७८ ). स्वामी-साठी तयार करून ठेवलेले लाडू हा चोरून खात असे ( उत्त. १९२ ). तथापि, स्वामींच्या सान्निध्यामुळे याला काहीच लाभ झाला नव्हता असे नाही. स्वामींच्या आज्ञेवरून हा पंचाळेश्वर येथे जाऊन मौन्य भिक्षा करीत असतांना काही देवता याच्या सेवेसाठी आल्या होत्या (ली. च. भा. ४ पा. ३९ ). काही काम करीत असतांना याची अंगुळी रगडली गेली. ती बांधण्यासाठी याने स्वामींची पडदणी ( अंगवस्त्र ) फाडली. तेव्हां याला प्रकाश-दर्शन झाले. स्वामींनी त्यावेळी त्याला म्हटलेहि की " हां तुम्ही म्हणा आम्ही रिते : आम्हां काहीचि नाही : एथौनि जडा पार्थिवा जरि ऐसे : तरि तुम्ही कैसे गा रीते : एथौनि तुम्ही केसणें जाले : असा ऐसे कांही नेणा होए " ( उत्त. २७ )

विद्यावंत रामदेव ऊर्फ दादोसामुळे नागदेव आणि त्याचे काही नातेवाईक स्वामींच्या परिवारात आले. ते बहुतेक आध्यात्मिक तळमळीचे होते. बाइसामुळे असे तळमळीचे कोणतेच पुरुष स्वामींना लाभले नाहीत.

काही शिष्य स्वामींना स्वतंत्र रीतीनेहि मिळाले. त्यात देमाइसा आणि आउसा या दोन स्त्रिया व म्हाइंभट या महत्त्वाच्या व्यक्ति होत.

## देमाइसा

ही मूळची पैठणची. 'गुरुवाचून गति नाही' असे पुराणात ऐक- ल्यामुळे गुरु करण्याची तिला तळमळ लागली होती. प्रथम ही वामदेवाकडे गेली. पण त्याचे नागवेपण पाहून परतली. तेव्हां लखुबाइसाने तिला स्वामींच्या दर्शनाला पाठविले. स्वामींची दृष्टभेट होताच हिला स्थिति झाली आणि पुढे लौकरच हिने त्यांचे शिष्यत्व स्वीकारले. स्वामींनी हिला अनेकदा निरूपण केले. प्रथम भेटीत विनम्रतेने का होईना पण ही स्वामींच्या सन्मुख न बसता 'आडवांगी' बसली होती. म्हणून "राजागुरु देवता यासि पाठि देवो नये" असा त्यांनी तिला उपदेश केला. (भा. २-१२). आपला मार्ग हा 'प्रतीति पंथ' म्हणजे अनुभवाचा मार्ग आहे हेहि त्यांनी देमाइसा- लाच सांगितले. (३-२५). ईश्वर कशानेहि मिळणार नाही. 'तो जीयापरी होआवा तेयाचिपरी होईल की' असे स्वामींनी सांगताच देमाइसा म्हणाली, "मग भिक्षान्न वगैरे खाऊन दुःख सोसण्यापेक्षा बापाभावाच्या घरी तूपरोटी खाऊन सुखाने का असू नये?" स्वामींनी सांगितले की, "देमती : जोन्हळे नाही तरि काइ पेवि अमेध्यु घालु एइल : अन्न नाही तरी काइ विख खाओ एइल' (उत्त. ३७). असेच एक वेळ तिला स्वामींनी आपल्या गावी परत जाण्यास सांगितले त्यावेळी "आपुले सकळै सांडुनि गोसावीयांचेया दर्सना एइजे आणि गोसावी पाठऊचि लागति : काही अपूर्व नीरूपीती ना" असे म्हटले. तेव्हां स्वामींनी तिला विचारले, "बाइ : तू त्याग असा कोणता केला? तुझा एक मुलगा होता तो तर मरून गेला. विधवा असल्यामुळे तुला वस्त्र-दागिने घालतांच येत नाहीत. भावाच्या घरी स्वयंपाकपाणी करून घासभर खायला मिळते. त्यापेक्षा आमची आज्ञा पाळणे वाईट आहे काय?" आणि मग त्यांनी तिला एका कुष्ट रोग्याची गोष्ट सांगून "देवो माझा : मी देवाचा" अशा रीतीने राहण्याचे तिला निरूपण केले.

देमतीची स्वामीवर फार श्रद्धा होती. ती नेहमी अत्यंत तळमळीने त्यांच्या दर्शनासाठी येत असे. तिची श्रमनिवृत्ति करण्यासाठी एकदा स्वामींनी

तिला घोड्यावर बसायला सांगितले, दुसऱ्या प्रसंगी तर खास बाइसाकडून तिची भ्रम-निवृत्ती केली. (उत्त. ३०४). बाइसाबरोबर भांडण केल्यामुळे एकदा स्वामींनी देमाइसाला आपल्याजवळून निघून जाण्याची आज्ञा केली. तेव्हां आर्ततेने ती विनंती करू लागली:—

पाउले म्हणीतले न करिति हरि : कवणी परी जावो आम्ही ?

तुझां चरणी रंगले मन : काइसेया कान्हा पाठवीसी ?

तुझेनि वेधे असो संभ्रमिते : निर्विकार जोगीयाचे वो कैसे निष्ठुर चित्त ?

ही तिची आर्तता पाहून स्वामींनी तिला मठात राहण्यास परवानगी दिली (उत्त. ३१२). देमाइसाची निर्विकारता पाहूनच "ए भींतीचा ठाइ वीकारु होआवा तरि देमतीचा ठाइ होआवा" (उत्त. ३११) असे प्रशंसोद्गार स्वामींनी काढले होते. त्यांनी एकवेळ तिला विचारले की, "हे रावो होइल : तरि तुम्ही काइ होआल ?" देमाइसाने म्हटले, "जी जी : मी उचिताचा पाइक होईन." या उत्तरावरूनसुद्धा स्वामीवरील देमाइसाची आत्यंतिक श्रद्धा स्पष्टपणे दिसून येते.

**नाथोबा**

नाथोबा हाहि स्वामींना अनुसरलेला एक महत्त्वाचा शिष्य होता. स्वामींच्या जवळ असतांना स्वामींना तिथिवार सांगण्याचे व इतरांना टिळे लावण्याचे काम याच्याकडे होते. याला वारंवार 'स्थिति' होत असे. आणि त्या भरात हा कधी 'कुंडलिनी उकलल्या' ची गोष्ट करीत असे, तर कधी पुरात उडी घालीत असे. (भा. २-४१, ४२). एकवेळ स्थितीच्या भरात याने एवढ्या मोठ्याने हाक दिली की गावच्या लोकांना आपल्यावर शत्रु चालून आले की काय अशी भीति वाटली. (उत्त. ३३२). दादोस तर एक वेळ म्हणाला की 'खातिए जेवतीए वेळे यासि हेचि (=स्थिति) येवो कैसे.' (उत्त. ३३१). स्थितीच्या भरात स्वामींनी त्याच्याकडून योगाचे नानाविध चमत्कार करवून एका जोग्याचा पराभव केला (उत्त. २१८). एरवीहि हा बराच धाडसी असावा असे दिसते. म्हणूनच स्वामींनी याच्याकडून एक वेळ एक मोठा सर्प आणि दुसऱ्यांदा एक नागीण धरवली. मठातील कामे लौकर व्हावी म्हणून हा मोठ्या पहाटे शेणी वेचून आणी.

एकदिवस त्या शेणीतूनच नागीण निघाली. म्हणून स्वामींनी त्याला दिवसा शेणी आणण्याची आज्ञा केली. स्वामींनी एका बाईचे बाळंतपणहि त्याच्याकडून करवून घेतले ( उत्त. १३३ ). हा अनुसरलेला असला तरी 'हृदयशून्य' होता. म्हणून स्वामींचे निरूपण, याला नागदेवाने विचारले तेव्हां ते त्याला मुळीच आठवेना. 'हृदयशून्या धर्मी अधिकारू नाही' असे स्वामींनी म्हटले ते यालाच उद्देशून. आरंभी आरंभी, लौकर भिक्षा न मिळाली तर आपले टिळेजानवे धारण करण्याचा मोह याला वारंवार होई ( भा. ४-४२ ) भिक्षा मागतांना एक बाई याच्याशी गोष्टी करीत बसे. चांगल्या भिक्षेच्या आशेने हाहि तेथे गोष्टी करीत असे. एके दिवशी भोजनोत्तर त्याने खरकटे खुशाल नालीत टाकले. पण स्वामींनी आज्ञा केल्यावर मग त्याची शिते वेचून घेतली. ( उत्त. १७० ). जेवतांना ईश्वरस्मरण करण्याचीहि वृत्ति नव्हती. म्हणूनच स्वामींनी "तुम्हां शयनासनी भोजनीं परमेश्वरू होआवा की गा" असा याला उपदेश केला. ( उत्त. १४५ ). याच्या या हृदयशून्यतेमुळेच बहुधा "मंडलिका : हे तुम्हा काळे करूनि वस्त्रतुल्य होईल गा : वस्त्र देखिलेया पूर्वी आम्ही ऐसे एक वस्त्र पांगुरलो होतो" असे उद्गार स्वामींनी काढले असावे. या उपदेशाचा परिणाम नाथोबावर चांगला झाला. म्हणूनच स्वामींच्या प्रयाणानंतर नागदेवाचार्यांच्या सान्निध्यात तो ईश्वरस्मरणपूर्वक अत्यंत विरक्तीने काळ कंठीत होता. कटक देमाइसा आणि वंकी यांना त्याने 'श्रवण केले' म्हणजे ब्रह्मविद्या निरूपिली. पण शिष्य म्हणून त्या दोघांनाहि त्याने नागदेवाचार्यांच्या स्वाधीन केले. ( स्मृ. स्थ. ९३ ). कालांतराने राक्षसभुवन येथे नाथोबाचा मृत्यु झाला. नागदेवाचार्य पुढे राक्षसभुवनाला आल्यानंतर, ज्या ठिकाणी नाथोबाचा देह गेला होता तेथे मुद्दाम अंथरूण घालून बसले कारण 'ते भूमिका सत्त्वस्थ : तेथ गोसावी बीजे केले असे : माझेया हृदयासि देवो येईल' ( स्मृ. स्थ. २२४ ). यावरून पुढेपुढे नाथोबाने आपली योग्यता किती वाढविली होती याची यथार्थ कल्पना येईल.

**चांगदेवभट**

नाथोबाचाच जावळा भाऊ ( भा. २ पा. ५७ ) चांगदेवभट हा स्वामींना त्यांच्या प्रयाणानंतर अनुसरलेला एक श्रद्धावंत शिष्य होता. पूर्वार्धे

काळात स्वामी पैठणहून प्रथम श्रीप्रभूंच्या दर्शनासाठी गेले, तेव्हां आपल्या आईची परवानगी घेऊन हा त्यांच्याबरोबर गेला होता. वयाने लहान असल्यामुळे स्वामी त्याला आपल्याबरोबर निजवीत व आपली पासोडी त्याला पांघरायला देत. निजतांना आपले पाय स्वामींना लागणार नाहीत अशी काळजी घेण्यास चांगदेवभट चुकत नसे. ( भा. २-१८ ). रितपूरहून परततांना ' मांगरूळ ' येथील नदीवर खेळतांना ओल्या वाळूची दोन घरे ( पायावर ) बांधून ' हे गुंफा श्रीगुंडम राउळा गोसावियाची : हे गुंफा चांगदेवो राउळा गोसावियाची : गोसावियाचे चरणशरण ' असे म्हणत तो दोन्ही देवांचे स्मरण करीत होता. ( भा. २. पा. २२ ). यावरून त्याची या दोहोंवरील श्रद्धा दिसून येते. चांगदेवराउळाची याला शपथ घातली तर कोणतेहि काम करायला तो तयार होई. म्हणूनच एकदा काही लबाड व्यापाऱ्यांनी स्वामींची शपथ घालून त्याजजवळून आपली धोत्रे धुवून घेतली. ( भा. ३-७ ) स्वामी याला नेहमी ' बटिका ' म्हणून संबोधीत असत.

## जानोपाध्ये

चांगदेवभटाबरोबर जाऊन स्वामींचे दर्शन घेणारा जानोपाध्ये हाहि स्वामींचा असन्निधानी अनुसरलेला शिष्य होता. पैठण येथील पहिल्याच भेटीत याने ' सहस्रशीर्षाः '–हा मंत्र म्हणून स्वामींची यथाविधि पूजा केली, आणि लोकांच्या आक्षेपांची पर्वा न करता, ' आपुलेया भलेया ' म्ह. कल्याणासाठी स्वामींचा उष्टा तांबूल याने आपणहून घेतला. ( भा. २ पा. ८, ९ ). याच भेटीत स्वामी म्हणजे द्वापरीचे कृष्ण अशी त्याला प्रतीति आली. ( भा. २ पा. १० ). नंतर तो वारंवार स्वामींच्या दर्शनाला जाई. वेरुळच्या भेटीत, स्वामींचे दर्शन स्पष्ट व्हावे म्हणून दिव्याच्या प्रकाशाची याने मनात इच्छा करताच " ईश्वरू काइ गा अन्यप्रकाशकू : तो स्वयंप्रकाशू की " असा स्वामींनी त्याला उपदेश केला. ( भा. २. पा. २४ ). जेवायच्या वेळी याला तब्बल दीड भाकर लागत असे, म्हणून स्वामी याला थट्टेने ' दीड पुरुष ' म्हणत. ( भा. २ पा. २६ ). स्वामींच्या प्रयाणानंतर जानोपाध्याने नागदेवाचार्याजवळ ' भिक्षा केली ' म्हणजे दीक्षा घेतली आणि तो रावसगाव येथे राहू लागला. ( स्मृ. स्थ. १८२ ). तेथेच त्याचे देहावसान झाले. तत्पूर्वी, पिंपळगाव येथे आजारी होऊन पडलेल्या रामदेव ऊर्फ दादो–

साच्या शुश्रूषेसाठी तो त्या गावी गेला होता. पण मृत्युसमयी दादोसाला स्वामींचे नावहि आठवत नव्हते हे पाहून तसाच निघून आला होता. (स्मृ. स्थ. २२०, २२१).

## आउसा

नागदेवाचार्यांच्याहि पूर्वी स्वामींना स्वतंत्रपणे अनुसरलेली आउसा ही महत्त्वाची व्यक्ति होय. ही पूर्वी जोगीण होती. आपणाला परिस प्राप्त व्हावा म्हणून वींझवासिनी देवीची आराधना करीत असतांना इला दृष्टांत झाला की 'गंगातीरा जाए : मग तेथ तुज परिसु सिधैल.' त्याप्रमाणे ती गंगातीराला काउळगाव येथे आली. जवळच्या जोगेश्वरीला स्वामी होते. एका ब्राह्मणाच्या सांगण्यावरून ही स्वामींच्या दर्शनाला गेली. स्वामी त्यावेळी आरोगणा करीत होते. ती आटोपल्यावर ते अंगणात वेढे घालू लागले. तेव्हां ही स्वामींना पाहू लागली. स्वामींनी तिला आत बोलावले. त्यांची दृष्टादृष्ट होताच आउसाला स्थिति झाली. ती भंगल्यावर स्वामी म्हणाले, "आता बिढारी जाल ना?" तेव्हां आउसा बोलली, "पृथ्वी–पर्यटन केले : उकरडा पुंजे भुरू कीसिता जन्म गेले : स्वप्नी विंझया म्हणीतले तु गंगातिरा जाए : मग तुज परिसू सीधैल : तो मज परिसु सीधला : आता के जाये जी : आता या चरणाचि पासी बीढार." स्वामींनी तिची चीजवस्त्र आणवून त्यातील देवता पाण्यात सोडविल्या. तिचा जोग्याचा वेष काढवून तिला संन्यास दिला. पहिल्याच भेटीत चक्रधरावर श्रद्धा बसून अनुसरलेल्या स्त्रीचे म्हणून हे उदाहरण अपूर्व होय.

आउसा ही 'दीक्षिताची कन्या : उपासनीयाची सून' असल्याचे तिनेच म्हटले आहे. त्यावरून आपल्या पतीला सोडून किंवा त्याच्या मृत्यु-नंतर हिने प्रथम जोग घेतला असावा असे दिसते. त्यामुळे आधीच तिचे शुचि–अशुचिपणाचे विकल्प नाहीसे झाले होते; स्त्रीत्वाची भावनाहि उडून गेली होती. म्हणूनच स्वामींच्या आज्ञेवरून तिने एका नग्न मुनीला विवस्त्र होऊन आलिंगन दिले; आणि सर्व शिष्यांसमोर नग्न होऊन नृत्य केले. हे लक्ष्यात घेऊनच स्वामींनी "पोरी आउवेसि मी स्त्री ऐसी बुधिही नाही : पुरुषु ऐसीचि बुधि : स्त्रीत्व हे उछेदौनि गेले" (उत्त. ४३४–४३७) असे

नागदेवाचार्याजवळ उद्‌गार काढले. याच कारणामुळे ते आउसाला 'नायका' म्हणून संबोधीत. (उत्त. ९, ६५, ८१ वगैरे). तिची भीति घालविण्यासाठी एकवेळ तिला स्वामींनी नागदेवाकडून नग्न करून स्मशानात बसविले होते. (उत्त. ४३३). स्वामींच्या पहिल्याच भेटीत संन्यास-स्वीकारानंतर तिने आपले हात, स्वामीसाठी भिजत घातलेल्या तांदळाच्या मडक्यात घालून त्यातील पाण्याने चूळ भरली. त्यामुळे बाइसा तिच्यावर रागावली, तेव्हां "हे रे : आम्हुइं तुझे चोख मैळे न फीटे" असे ती म्हणाली. यावरून 'शुचि-अशुचित्वा'संबंधी तिची कल्पना काय होती ते दिसते. पुढे एकदा ती शौचाहून आली तेव्हां समोर स्वामी उभे होते. पण हातपाय धुतलेले नसल्यामुळे तिने स्वामींना नमस्कार केला नाही. तिने कारण सांगितले "हे काइ जी जगन्नाथा : बापुडा अशुचि असे." त्यावर स्वामी म्हणाले, "मनिचे अभिलाष निवर्तले तरि शुचि अशुचि ये दोन्ही नाही की नायका" (उत्त. ४३८). यावरून प्रत्यक्ष स्वामीशी वर्तन करतांना लौकिकाचार ती पाळीत होती असेच दिसून येते.

वृत्तीने ती थोडी तामस होती. मठात असतांना एके दिवशी काही द्वांडग्या मुलांना तिने 'खाइन रे खाइन' म्हणून भिववले. एकवेळ तिने इंगळी मारली; दुसऱ्या एकावेळी कुत्र्याला मारले. या तिन्ही वेळी स्वामींनी तिला "तुम्ही माहात्मे की : सर्वाभूता अभय देयावे की" (उत्त. ३९) अशा आशयाचा उपदेश केला. या तामस वृत्तीमुळेच प्रसंगी ती चक्रधरस्वामीशी भांडायलाहि कमी करीत नसे. अनेकदा त्यांच्यावर रागावून ती मठातून निघून जाई. पण पुन्हा परत येत असे. विस्तव आणण्यावरून एक वेळ तिचे व बाइसांचे भांडण झाले. त्यामुळे ही दुसऱ्या गुंफेत जाऊन बसली. दुसऱ्या दिवशी स्वामी तिकडे गेले तेव्हां त्यांना तेथे आउसा दिसली. तिने चक्रधरांना नमस्कार केला नाही. ती आढ्यतेने म्हणाली "कवणे कवणाते नमावे जी : स्वामी जगन्नाथा : सर्व विष्णुमयं जगत्."हे ऐकून नागदेव म्हणाले, "ए आउवेसि देहसीध आली." तेव्हां स्वामींनी थट्टा केली की "काई गा : सामान्यस्त्रीया देहसीधी नसेति?" आपली तुलना वेश्येबरोबर केल्यामुळे किंवा अहंकार जागा होऊन "...नाही येणे देवे चाड : काढीन आपुला जोगु" असे ती रागावून म्हणाली आणि स्वामींना सोडून सरळ येथे

जाऊन राहिली. तिथे ती सहा महिने होती. स्वामींना ती पूर्णपणे विसरली. पुढे एके दिवशी काही बाया तिच्याकडे आल्या. जेवल्यावर त्यांनी चक्रधराचे नाव उच्चारतांच "है रे : तुम्ही माझेया चक्रधरु स्वामीचिया रे : मांझा चक्रस्वामी : माझा चक्रस्वामी" करीत करीत ती तळमळू लागली; आणि दुसरे दिवशी स्वामीकडे परत गेली. (उत्त. १३६). तिला स्वच्छ वस्त्रे चापूनचोपून नेसण्याची सवय होती. एक वेळ तिचा हा वेश पाहून स्वामी म्हणाले, "लीसि पुसि कीजे हे वेश्याचे धर्म की नायका : जोगिया तो मसीघसी लीतला होआवा की नायका" या वेळीहि स्वामींनी तिची तुलना वेश्येबरोबर केल्यामुळे ती मागच्या सारखीच रागावली व दुसऱ्या गावी जाऊन राहिली. तिला परत तर यायचे होते. पण अभिमानामुळे तसे करवेना. हे जाणून स्वामीच तिच्याकडे गेले. तेव्हां ती रडू लागली आणि "जी जी स्वामी जगन्नाथा : स्वामीचेनि जाणे : स्वामीचेनि ऐणे : बापूडा दुखिया होतु असे जी : हा केहि न पाठवावा" अशी विनंती करू लागली. (उत्त. ३४०). बाइसाच्या परवानगीवाचून एका शिष्याला अन्न वाढल्यामुळे पूर्वी स्वामींनी तिला मठाबाहेर घालवले होते त्यावेळीहि तिने अशीच विनंती केली होती. कारण, तिचे स्वामीवरील नितांत प्रेम! त्यांच्या श्याम आणि गौर मूर्तीचे आपणाला नेहमी दर्शन व्हावे असा तिने वर मागितला होता. (उत्त. ३१९). नागदेवांना स्वामींची अनन्यभावाने सेवा करतांना पाहून आपण स्वतः नागदेव असतो तर बरे झाले असते असे तिला वाटले आणि "आउवेचा नागदेवो कीजे" अशी तिने स्वामींना विनंतीहि केली होती. (उत्त. ३०७). एक वेळ स्वामी तिच्यावर उदास झाले त्यामुळे आता जिवंत राहून तरी काय उपयोग, या कल्पनेने तिने आत्मघाताचा मनात विचार केला. तो ओळखून स्वामींनी तिला "पिंडहनन केलेया ब्रह्मांडहनन होए : अहंतेचे मूळ सकंदी उपडावे नाएका : एरवी अंकुर नीगती ना : मग शांतीचे रोप लावावे : आत्मघातकीयासि कव्हणी ठावो नाही नाएका :" असा उपदेश करून तिला आपल्या निश्चयापासून परावृत्त केले. स्वामींची स्तुतिस्तोत्रे ती निरंतर गात असे. गणपति आपयोजवळ तिने "है रे : चक्रस्वामीचा ठाइ मानमान्यता नाही : आव्हानवीसर्जन नाही : तेथ रायारंका सरी रे"; "गोसावी कामधेनु : गोसावी कल्पतरु :

गोसावी चिंतामणी" अशी स्वामींची प्रशंसा केली. आता, तिने स्वामींना ( =ईश्वराला ) उद्देशून वापरलेली उपमाने तुच्छ असल्यामुळे त्यांनी " कामधेनु ते एकाचीए दारीचे ढोर : तैसा काई परमेश्वरु : कल्पतरू ते एकाचीए दारीचे झाड : तैसा काइ परमेश्वरु : के अचिंत्यानंत परमेश्वरु आणि के चिंतामणी कामधेनु " अशा शब्दात तिची कानउघाडणी केली ही गोष्ट निराळी. स्वामींना ती नेहमी "जी जी स्वामी जगन्नाथा" म्हणून संबोधीत असे. श्रीप्रभूंना 'गोविंदस्वामी' आणि नागदेवाला 'नागणा' म्हणून म्हणत असे.

स्वामींच्या प्रयाणानंतर ही रितपुरला येऊन राहिली. गोविंदप्रभूंच्या मृत्युनंतरहि ही तेथेच राहिली. नागदेवादि गुरुबंधुबरोबर ती गंगातीरावर गेली नाही. कारण " चक्रस्वामीविण ते गंगातीर तांब्रा जाळि जळताये रे " ( स्मृ. स्थ. १९१ ) असे तिला वाटत असे. यावरून तिला स्वामींचा विरह कसा जाळीत होता याची कल्पना येईल. तिचे श्रेष्ठत्व ओळखल्यामुळेच नागदेवांची सर्वांना आज्ञा होती की रितपुरला गेल्यावर सर्वांनी तिला नमस्कार करायला जात असावे. एकदा तिचे भोजन स्वीकारण्याचे म्हाइभटांनी नाकारले. ते ऐकून नागदेवाचार्य त्याला रागावून म्हणाले, " हां गा : जे आउ पुढा पळे आणि गोसावी बुझावेया पाठी लागती : आउवेचे अन्न स्वीकरीलेयावीन आरोगण न करीति : येसी लाळिली ताळिली : ते आउवेचे नेघीजे तरि देवाचेंचि नेघीजे म्हणा' ( स्मृ. स्थ. १९६ ). यावरून आउसाची श्रेष्ठता उत्तम रीतीने कळते.

### डांगरेश

पूर्वीपासून आउसाने एक कुत्रा पाळला होता. त्याचे नाव 'डांगरेश.' आउसा स्वामींची शिष्या झाल्यावर हे मुके जनावर देखील त्यांची अनन्यभावाने सेवा करू लागले. स्वामींच्या सान्निध्यात असतांना त्यांच्या प्रसादावाचून हा जेवीत नसे. एखाद्या महात्म्याप्रमाणे स्वामी त्याचीहि चौकशी व स्वागत करीत. ( उत्त. २५४ ). एके दिवशी स्वामी आपल्या भक्तजनावर रागावले म्हणून त्या सर्वांना त्यांनी आपल्या जवळून निघून जायला सांगितले. त्याप्रमाणे सगळे जण गेले. पण डांगरेश बसलाच होता. स्वामींनी

"डांगरेश : तुम्हीहि जा " असे म्हटल्यावर तोहि गेला. आणि त्याने गंगेच्या काठी प्राण सोडला. काही वेळाने सर्व भक्त परत आले. पण त्यात डांगरेश नव्हता. शोध केल्यावर त्याने देहत्याग केल्याचे कळले. स्वामी त्याच्या प्रेतापाशी गेले आणि सगद्गद होऊन 'डांगरेश' म्हणून त्याच्या अंगावरून त्यांनी हात फिरवला. त्याचा निक्षेप केल्यावर ते भक्तांना म्हणाले, "तुम्हापसि वरि हे सुने चांग : एथिचेनि वियोगे जीवो न शकेचि" (उत्त. ३०५). डांगरेशाच्या अनन्य भक्तीचा हा यथार्थ गौरव नाही काय ?

**म्हाइभट**

अनुसरलेल्या शिष्यांपैकी म्हाइभट हा आणखी एक महत्त्वाचा शिष्य होय. याने श्रीगोविंदप्रभूजवळ जाऊन दीक्षा स्वीकारली असली तरी त्याला चक्रधरस्वामींचाच शिष्य म्हटले पाहिजे, आणि तसे महानुभाव महंत मानतातहि (स्मृ. स्थ. २). कारण त्याला बोध व ईश्वरप्रतीति चक्रधरस्वामीपासूनच झाली होती. अहमदनगर जिल्ह्यातील 'सराळे' गावी राहणाऱ्या या षट्शास्त्रसंपन्न ब्राह्मणाला आपल्या विद्वत्तेचा अत्यंत गर्व झाला होता. त्यावेळचे दुसरे एक विद्वान ब्राह्मण गणपति आपयो यांनी त्याला म्हटले, "तुमचेया वाचलेयापणाचे फळ तै होए जै श्रीचांगदेवो राउळां गोसावीयां दरूसन होए." या सूचनेमुसार पुढे काही दिवसांनी म्हाइभट डोंबेगावला स्वामीकडे आला. बरोबर असलेल्या पिंपळेवामनभटाने स्वामींना दंडवते घातली. म्हाइभटाने नुसता कायाप्रणाम केला. पण स्वामींना पाहताच म्हाइभटावर विशेष परिणाम झाला यात शंका नाही. कारण रस्त्याने येतांना, 'आपण चक्रधराबरोबर अशी चर्चा करू, त्यांना असे अडवू, त्यांच्या अमुक प्रश्नाला असे उत्तर देऊ' म्हणून त्याने जे विचार केले होते ते तो सर्व विसरला. त्याला स्वामीजवळून उठावेसे वाटेना. थोड्या वेळाने स्वामींनीच त्याला विचारले, "आत्यंतिक संसृतिछेदु होए ऐसी काइ प्रतीति आति" आणि यानंतर मग त्यांच्यात चर्चा सुरू झाली. कर्माने अंतःकरण शुद्ध होते; शुद्ध अंतःकरणात वैराग्य उपजते; वैराग्यामुळे ज्ञान होते आणि ज्ञानाने मोक्ष मिळतो असे म्हाइभटाने म्हटले. तेव्हां स्वामींनी 'नित्य नैमित्यिके कर्मे तियें प्रतिदिनीचेया परीहारा' आणि 'कामिक कर्मे' फळांच्या उपयोगीं जात असल्यामुळे कर्मांनी अंतःकरण शुद्ध होत नाही, मग कुठलें

वैराग्य आणि कुठले ज्ञान ? असे सांगून 'अविद्यायुक्त जीवा स्वता ज्ञान न संभवे' 'सृष्टीमध्ये जीव जेतुलेही करी तेतुलेनि काइसेनही मूचेना : एक वाचौनि' आणि ते म्हणजे श्रीकृष्ण, श्रीदत्तात्रय, श्रीचांगदेवराउळ, श्रीगोविंदप्रभु किंवा आपण ( म्हणजे चक्रधरस्वामी ) यांच्यासारख्या ईश्वरावताराचे दास्य. स्वामींच्या या निरूपणामुळे म्हाइभटाला बोध होऊन चक्रधरस्वामीवर 'हा ईश्वरू' अशी प्रतीति आली. तो उठला आणि स्वामींना त्याने दंडवते घातली. ( उत्त. १११ )

पुढे सुमारे एक वर्षानंतर भावे द्वादशीच्या दिवशी शौचविधि आटोपून हातपाय धुण्यासाठी मातीचे ढेकूळ घेऊन तो गंगेवर गेला. तेव्हां पाण्याचा थेंब पडताच विरघळू लागलेल्या त्या ढेकळाप्रमाणे आयुष्याची अशाश्वतता त्याच्या लक्ष्यात आली. त्याने सर्वसंगपरित्याग करून अनुसरण्याचा निश्चय केला. पण अनुसरावे कुणाला ? चक्रधरस्वामी म्हाइभटाच्या गावाच्या आसपासच राहत असत. पण त्यांना अनुसरले तर आपले सासरे आपणाला त्यांच्या जवळून काढून नेण्याचा प्रयत्न करतील, असे त्याला वाटले. म्हणून रितपुरला जाऊन त्याने गोविंदप्रभुजवळ अनुसरण केले. तेथेच राहून तो त्यांची सेवा करू लागला.

श्रीचक्रधरस्वामी 'आंब' या गावी असतांना हासुबाई रितपुरला गेली. तेव्हां तिच्याबरोबर निरोप पाठवून स्वामींनी म्हाइभटाला तातडीने बोलावून घेतले. 'एळी' गावाजवळ त्यांची भेट झाली. स्वामींनी म्हाइभटाला त्याच्या अनुसरणाचा वृत्तांत विचारला. तो त्याने वरीलप्रमाणे सांगितला. त्यावर स्वामींनी निरूपण केले, की संपूर्ण उभयदृश्या परमेश्वरावताराचे दास्य हे अधिक लौकर मोक्ष प्राप्त करून देणारे असते. म्हणून 'इतुके दीस तुम्ही तेथे होतेति तेचि जरि एथ असतेति तरि आन एक होतेति.' अजूनहि, आतापर्यंत श्रीप्रभूंच्या सेवेसाठी जितके द्रव्य तुम्ही खर्च केले तितके आमच्या ठायी वेचले तर 'मग तुमचे संनिधान चरितार्थ कीजैल'( उत्त. ४७१ ) असे स्वामींनी सुचवले. कारण, म्हाइभटासारख्या सत्पात्र ज्ञानियाचे शाब्दज्ञान लौकर चरितार्थ व्हावे अशी त्यांना तळमळ होती. स्वामींनी त्याजवळ गीतेच्या दोन श्लोकांचे या निमित्ताने निरूपण केले. स्वामींची सूचना ऐकून म्हाइभट द्रव्य आणण्यासाठी सराळे

येथे गेला. काही दिवसांनी स्वामींनी त्याला बोलावून घेऊन येण्यासाठी नागदेवाला सराळे येथे पाठविले. पण स्वामींच्या सेवेसाठी आवश्यक ते द्रव्य घरच्या लोकांनी न दिल्यामुळे व्यवहारात अडकून पडलेला म्हाइभट स्वामीजवळ ताबडतोब येऊ शकला नाही. थोड्याच दिवसांनी स्वामींचे 'उत्तरापंथे प्रयाण' झाले. यानंतर इतर भक्तजनाबरोबर म्हाइभटहि रितपुर येथे राहिला. तेथे असतांनाच नागदेवाचार्यांच्या अनुज्ञेने स्वामींच्या सर्व लीळा त्याने गोळा करून लिहून काढल्या; आणि 'लीळाचरित्रा'ची पोथी तयार केली. यासाठी त्याने केलेले परिश्रम अभिनव होते. स्वामींची ही 'वाङ्मय-मूर्ति' निर्माण करून म्हाइभटाने महानुभवपंथात आणि मराठी साहित्यात आपली कीर्ति अजरामर करून ठेवली आहे यात शंका नाही.

स्वामीवर ज्याप्रमाणे म्हाइभटाची अपूर्व श्रद्धा होती त्याचप्रमाणे म्हाइभटाच्या योग्यतेविषयी स्वामींनाहि आदर होता. म्हणूनच "बाइ: ब्राह्मणु कैसा नीका असे : जया तया अर्था आइतचि असे : एथ जव होता तव पुसतचि होता : तुम्ही देखतीति तरि तुम्हा सुत्र होते" ( उत्त. ४८५ ) असे उद्‌गार त्यांनी महादाइसाजवळ काढले होते. आरंभी नागदेवाविषयी म्हाइभटाला फारसा आदर वाटत नव्हता. चक्रधरांच्या सेवेत असलेल्या नागदेवाला तो 'सुंठदेव' समजत असे. त्यामुळे तो त्याला नमस्कार देखील करीत नसे. पण स्वामींनी एके दिवशी म्हाइभटासमोर नागदेवाला अपूर्व स्फूर्ति देऊन त्याजकडून आपल्याबरोबर अद्वैत चर्चा करविली. ती ऐकून म्हाइभटाचा गर्व नाहीसा झाला. नागदेवाविषयी त्याला आदर वाटू लागला आणि तेव्हांपासून तो त्यांना नमस्कारहि करू लागला. (उत्त १३५ ). नागदेव आचार्य झाल्यानंतर त्यांच्या नेतृत्वाखाली उरलेले आयुष्य विरक्ततेने घालवून त्याने रितपुर येथे देह ठेवला.

## दाइंबा

हा स्वामींचा बोधवंत शिष्य होता. हा मूळचा बळ्हेगावचा. स्वामींचे प्रथम दर्शन याला येळापूर येथे घडले. त्यावेळी झालेल्या स्थितीच्या भरात 'आडवे जाणे' 'सुरंग मिरवणे' इत्यादि विचित्र गोष्टी याने इतक्या केल्या की पुढे अनेकदा स्वामी त्याला त्यांची आठवण करून देत. अशाच एका

प्रसंगी स्वामींनी त्याला 'अन्यव्यावृत्ति' निरूपिली; आणि बोध दिला. त्यामुळे स्वामीवर ईश्वरप्रतीति येऊन त्याची श्रद्धा वाढली. स्वामीहि त्याच्याशी प्रेमाने वागत. एकदा त्याला 'सराउ' म्ह० लाठीकाठीचे खेळ खेळायला लावून आणि दुसऱ्या प्रसंगी वरवर हाणायला सांगून त्यातील उणीवा दाखवल्या. ( भा. ३ पा. ११ ). एकदा स्वामींना दाइंबाने उपाहार दिला. ऐनवेळी दुसऱ्या एका भक्ताचा अधिक चांगला उपाहार आला असताहि स्वामींनी दाइंबाचाच उपाहार, त्याची प्रशंसा करीत करीत सेवन केला. ( उत्त. १९१ ). एकवेळ 'भोजा पर्वालागौनि न पवे तरी न वर्ते ऐसे जाणावे' अशी त्याने स्वामीजवळ पैज घेतली आणि त्याप्रमाणे तो बळ्हेगावाहून निघून सायंकाळच्या सुमारास आणि रातोरात जोगेश्वरीला गेला. पण तेथे स्वामी नव्हते. दुसऱ्या दिवशी मोठ्या पहाटे खडकुलीला पर्वकाळी जाऊन त्याने स्वामींचे दर्शन घेतलेच. पूजावसर झाल्यानंतर रात्री लागलीच तो आपल्या गावी परत जाण्याला निघाला. त्या दिवशी भूतचतुर्दशी होती. रात्री देवतांचा संचार सर्वत्र चालू होता. तथापि, स्वामींच्या आज्ञेनुसार वाट न सोडता प्रमाद चुकवून गेल्यामुळे तो घरी सुखरूप पोचला. ( उत्त. ११ )

दाइंबाच्या प्रथम पत्नीचे नाव प्रेमाइसा होते. तिचे माहेर पैठणचेच होते. स्वामींच्या सांगण्यावरून हीहि भिक्षा मागत असे; पण ते दाइंबाला आवडत नसावे असे दिसते. ( उत्त. ९१ ). तिच्या मृत्युनंतर दाइंबाने लागलीच 'पोमाइसा' नावाच्या स्त्रीबरोबर दुसरा विवाह केला. त्यावरून हा बोधवंत असला तरी फारसा विरक्त नव्हता असे दिसते. आणि ते खरेच आहे. कारण अनुसरणाची सूचना स्वामींनी त्याला दोनतीनदा केली; पण त्याने ती मनावर घेतली नाही. एकवेळ आधाड तरूकडे अंगुलिनिर्देश करून 'एथ अनुसरा : ना तरि ऐसेया अधोपरीचेया वृक्षां होइजैल : मग अनंतकाळ दुःख भोगीत असिजैल' ( उत्त. ९३ ) असे स्वामींनी सांगितले. दुसऱ्या एका प्रसंगी डखल्याचा 'कारटा' म्ह० और्ध्वदेहिक विधि दाखवून अनुसरण्याची सूचना केली. पण 'ते दाइंबा नुमटेचि' ( उत्त. ३४२ ). तत्पूर्वी तर एकदा 'भोजेया : तुम्ही सीखासूत्राचा त्यागु करा गा : एथ अनुसरा' असे स्वामींनी म्हटले, तेव्हां 'मज इंद्रिया एकाचा उपद्रो' असे त्याने स्पष्ट सांगितले. यावरून त्याच्या विषयासक्तीची कल्पना सहज येते.

असे असले तरी स्वामीवर त्याची श्रद्धा मात्र निरतिशय होती. त्यांच्याजवळ तो अनेकदा चर्चा करीत असे. 'गोसावी तरि ईश्वरू'–त्याची जवळीक आम्हाला मिळाल्यामुळे आम्हाला काही गोमटे होईल की नाही, असे त्याने एकवेळ स्वामींना विचारले. ( उत्त. ३४८ ). स्वामींच्या मृत्यूची खोटीच वार्ता ऐकून बाइसांनी गंगेत प्राणत्याग केला. तर तिला या 'आत्मघाता'बद्दल काही भोगावे लागेल काय? असाहि प्रश्न त्यानेच विचारला होता. त्यावरून, ईश्वरवियोगामुळे आत्मघात करणारास "पींडहनन मळ लागे : परि वाया न वचे" ( उत्त. ४९९ ) असे स्वामींनी निरूपण केले. "भोजेया : हा जनु अवघा ठकला असे गा : परि मी ठकला ऐसे कव्हणी न म्हणे"– हे सुंदर निरूपणहि त्याच्याजवळ केलेले आहे. आउसेविषयी दाइंबाला फारसा आदर नव्हता. पण गंगोदकाचा दृष्टांत देऊन तिचा विटाळ न मानण्याविषयी स्वामींनी त्याला उपदेश केला. ( उत्त. ६८ ). दाइंबाहि स्वामीबरोबर नेहमी गोष्टी करायचा. एकवेळ त्याने स्वामींना भोजराजाची गोष्ट सांगितली. तेव्हांपासून स्वामी त्यालाच 'भोजा' या नावाने हाक मारू लागले. दाइंबा आणि त्याची पत्नी यांना एकवेळ स्वामींनी श्रीप्रभूच्या सेवेसाठी रितपुरलाहि पाठविले होते. ( उत्त. २८६ ).

## पद्मनाभी

रामदेव ऊर्फ दादोसाबरोबर स्वामींच्या दर्शनाला आलेले त्याचे अनेक शिष्य त्याला सोडून पुढे स्वामींचे अनुयायी झाले हे आपण पाहिले. असे अनेकांच्या बाबतींत होत असे. पैठणला सारस्वत भट नावाचे एक सत्पुरुष होते. ते स्वामींच्या दर्शनाला वारंवार येत. त्यांच्या बरोबर त्यांचा शिष्य पद्मनाभी हाहि असे. तो जरा चळवळ्या होता. स्वामींच्या मठात गेल्यावर बाइसांची कामे तो करू लागत असे. हळूहळू तो स्वामींकडे ओढला गेला; आणि सारस्वत भटांना सोडून स्वामींच्याच जवळ राहू लागला. या गोष्टीचे सारस्वत भटाला फार वैषम्य वाटत असे. ( भा. २. पा. ६१ ).

पद्मनाभी हा रेमनायक आणि गौराइसा या दांपत्याचा मुलगा. जोगनायक हा पद्मनाभीचा वडील भाऊ. पद्मनाभी स्वामींजवळ राहू लागल्याचे ऐकताच जोगनायक त्याला तेथून काढून नेण्यासाठी आला. पद्मनाभीची

जाण्याची इच्छा नव्हती ; पण स्वामींनी त्याला ' आता तत्र जाए गा ' अशी आज्ञा करून पाठवले. घरी त्याच्यावर सक्त पाळत होती. तरीहि काही दिवसांनी त्याने ' दुर्गासि सोल लावीली : वोहणिचिये पाठीवरि पाये देउनि चढला : मग सोला उतरला ' आणि तो स्वामीकडे आला. आपले सगळे कुटुंब जर स्वामींचे भक्त बनले तर आपणाला स्वामींजवळ निरंतर राहता येईल असे त्याला वाटले. ( भा. ३ पान २९, ३० ). पद्मनाभीचा एकंदर स्वभावच उतावळ्या होता. म्हणूनच त्याने क्षौर करण्याची म्ह० अनुसरण्याची इच्छा प्रगट केली; तरीहि स्वामींनी त्याला तसे करू दिले नाही. पद्मनाभी संन्यास घेईल की काय ही भीति गौराइसालाहि वाटत असे. ( भा. ३ पा. ५६ ). काही दिवसांनी रेमनाइकाचा मृत्यु झाला. तेव्हां स्वामीजवळ येऊन ती पद्मनाभीला घेऊन गेली. आणि पुढे तो आपल्या प्रपंचात इतका रमला की स्वामींचा त्याला पूर्णपणे विसर पडला.

### छर्दोबा

स्वामींच्या परिभ्रमणात त्यांच्या भोवती गोळा होणाऱ्या शिष्यपरिवारात पद्मनाभीप्रमाणे मागाहून त्यांना विसरून जाणारे इतरहि अनेक शिष्य असत. छर्दोबा हा त्यापैकीच एक होय. हा नक्की कोण व कुठला याचा स्पष्ट निर्देश सापडत नाही. तथापि त्याच्या विषयीची दोन सूत्रे ( आचार. २०२ व आ. मा. २३२ ) सूत्रपाठात आलेली आहेत. त्यावरून असे कळते, की हा एक अत्यंत विरक्त महात्मा होता. प्रत्यक्ष श्रीचक्रधरस्वामींच्या मुखाने त्याला बोध झाला होता. श्रीचक्रधरस्वामींच्या विद्यमानीच पण त्यांच्या असन्निधानात स्मरण करतांना तो अतिशय दुःख करीत असे. निर्वेद, अनुताप, अनुशोच, आर्त वगैरे करण्यांत निरंतर काळ कंठीत असे. शरीरावरची त्याची आसक्ति उडाली होती. देशत्याग करून तो उत्तम चर्या करू लागला. एके दिवशी तो भिक्षेला निघाला. त्यावेळी रस्त्यात त्याला कुणाची तरी ओकारी आढळली. जणु आपणासाठी हे ओकारीचे अन्न ईश्वरानेच पाठवले आहे, आता आपण पुढे गेल्यास आपल्या स्मरणविधीला बाधा येईल, असा सारासार विचार करून त्याने ती ओकारी म्हणजे ते ' छर्दितान्न ' भक्षण केले. म्हणूनच पुढे त्याला ' छर्दोबा ' असे नाव पडले. सारांश, छर्दितान्न

भक्षण करण्याइतपत त्याची घृणा नष्ट झाली. इतके कडक वैराग्य त्यांच्या अंगी बाणले. पण...

पण या छर्दोबाला स्मरणानिमित्त एकाच झाडाखाली बसण्याची सवय लागली. त्यामुळे तो मलिन झाला. त्याचे असे झाले, की त्याला एकाच झाडाची सवय लागल्यामुळे पुढे ते झाड ज्या शेतात होते त्या शेतकऱ्याची व त्याची ओळख झाली. त्याच्याबरोबर बोलण्याचालण्याची त्याला सवय लागली. त्या प्रीतीमुळे तो शेतकरी छर्दोबाला गावात घेऊन गेला. आणि अशा रीतीने देशाच्या शेवटी झाडातळी राहूनच मरू इच्छिणारा छर्दोबा रानमहात्मा होता तो गावमहात्मा झाला. गावातील लोक त्याचा पूजापुरस्कार करू लागले आणि तो ती स्वीकारू लागला. कालांतराने तो शेतकरी मेला. तेव्हां त्याच्या स्त्रीने काकुळतीला येऊन छर्दोबाकडून आपला स्वीकार करविला. छर्दोबाने मोठ्या प्रेमाने तिचा स्वीकार केला. तो विषयप्रमादी बनला. इतकेच नव्हे, तर चांगदेव राऊळ हे नावहि तो विसरला. सृष्टिक्रमानुसार छर्दोबाला मुलगा झाला. एकदा काही कारणासाठी त्याला गाव सोडून जावे लागले. तेव्हां त्याच्या डोक्यावर मुलाचा पाळणा, हातात मुलाच्या दुधासाठी एक शेळी व तिच्यासाठी कडबा वगैरे घेऊन तो पुढे चालू लागला; आणि हातात लेकरू व डोईवर पाटी घेऊन त्याच्या मागे ती शेतकरीण चालू लागली. छर्दोबा स्वामींच्या समोरून चालला होता. पण त्याला त्यांची ओळखहि पटली नाही. स्वामीजवळ आउसा होती. स्वामींच्या सांगण्यावरून तिने पुढे होऊन छर्दोबाला विचारले 'तू कोणाचा शिष्य?' तेव्हां त्याने 'नागदेव राउळाचा' असे उत्तर दिले. ते स्वामीजवळ सांगताच त्यांनी आउसेला छर्दोबाची सगळी हकीकत सांगितली आणि विरक्त पुरुषहि एकाच झाडाच्या सवयीमुळे कसा मलीन होतो याचे निरूपण केले. छर्दोबा यावेळी स्वामींचे नावहि विसरून गेला होता हे लक्ष्यात येईलच. (महानुभावांचा आचारधर्म. पा. १८०-१८१).

## सारंगपंडित

स्वामींना न अनुसरलेल्या दर्शनी शिष्यांपैकी सारंगपंडित ही महत्त्वाची व्यक्ति होय. हा स्वतः पुराणिक होता. यादवराजांचे भांडारी गदोनायक यांच्याकडे तो पुराण सांगत असे. त्यामुळे राजदरबारी याची

थोडीशी ओळख असावी म्हणूनच वैजाए राणीने वैजनाथाचे देऊळ बांध-- ल्यावर ज्या ब्राह्मणांना वृत्ति दिल्या त्यात सारंगपंडितहि एक होता. (भा. २. पा. ७). पहिल्या बायकोच्या मृत्युनंतर याने उमाइसा नावाच्या तरुणीशी विवाह केला. तिच्या पासून सुमारे बारा वर्षानंतर याला धानाइसा नावाची मुलगी झाली. स्वामी पैठणला असतांनाच देइभटाच्या तोंडून स्वामींची कीर्ति ऐकल्यावर सारंगपंडिताने त्यांचे दर्शन घेतले. स्थिति झाल्यामुळे स्वामीवर त्याची थोडीफार श्रद्धाहि बसली. त्याने स्वामींना आपल्या घरी नेऊन मर्दना-मादने देऊन उपाहार दिला. पुढे स्वामी अनेकदा त्याच्या घरी जात व धानाइसाबरोबर कधी खेळ खेळत तर कधी तिला एखादी कहाणी सांगत. (२-१३). सारंगपंडित अनेकदा स्वामींच्या दर्शनाला जाई व त्यांना उपा- हार अर्पण करी. लखुमिया आणि गोंदो धावत असतांना गोंदोच्या पायी खडा कुसकरून तो पडला तेव्हां त्याच्या जवळ धावून गेलेल्या स्वामींना पाहून, शरपंजरी पडलेल्या भीष्माची चौकशी करण्याकरता गेलेल्या श्रीकृ- ष्णाचे स्मरण सारंगपंडिताला झाले (उत्त. ८५). गाईंना लागलेला स्वामींचा वेध पाहूनहि त्याला द्वापरीच्या श्रीकृष्णाची पुन्हा आठवण झाली. (उत्त. ३३६). स्वामीच्या प्रसादाचे वस्त्र आपणाजवळ असावे म्हणून त्याने आपल्या पासो- डीचे आसन त्यांच्यासाठी रचले. पूजा करून स्वामींना त्याने दुसरी पासोडी अर्पण केल्यावर स्वामींच्या आसनाची पासोडी स्वतः पांघरून तो बाहेर पडला. तेव्हां स्वामींनी त्याला विचारले, "माझी पासोडी का घेतली ?" सारं- गपंडित म्हणाला, "ती प्रसादाची पासवडी करून घेण्यासाठीच आणली होती." तेव्हां स्वामी म्हणाले, "प्रसादु तो काइ ऐसा : देवो दे तो प्रसादु की." मग स्वामींनी प्रसन्न होऊन आपली उंची पासोडी त्याला दिली. (उत्त. २२). स्वामींच्या भेटीसाठी तो चांगली पानसुपारी घेऊन जात असे. त्यातील सुपाऱ्यांनीच स्वामी त्याजबरोबर एकवेळ 'तारांगुळ' नावाचा खेळ खेळले. (उत्त. २७५; ३६६). यावरून स्वामीविषयीची त्याची आदरबुद्धि दिसून येते. निरूपण-प्रसंगीहि स्वामीभोवती स्त्रिया नकोत, आपणच असावे असे त्याला एकदा वाटले ते यामुळेच (उत्त. ८४).

पण हा आदरभाव फार वरवरचा असावा असे वाटते. गदोनायक पकडले गेले असतांना त्यांची सुटका व्हावी म्हणून विनंती करण्यासाठी

सारंगपंडित स्वामीकडे वेरूळ येथे अगदी रिक्त हस्ताने गेला. त्याच्या दुसऱ्याच दिवशी रोटी, तूप, केळी वगैरेंचे जेवण आधी स्वतः जेवून मग उरलेले, म्हणजे एका अर्थाने उष्टे जेवण तो स्वामीसाठी घेऊन गेला. (भा. २ पा. ४४, ४५). स्वामीविषयीच त्याच्या मनात फारसा आदर नव्हता, मग स्वामींच्या परिवारावर तरी कुठून असणार ? म्हणूनच स्वामींच्या बरोबर भोजनाला आलेल्या नागदेवाला तूप वाढतांना त्याने एकदा किंचित आढ्यता धारण केली. त्यामुळे रागावलेल्या स्वामींनी दुसऱ्या वेळेस त्याच्याकडे जेवायला न जाण्याबद्दल आपल्या शिष्यांना सांगितले. सारंगभटाने फक्त स्वामींनाच आमंत्रण केले. स्वामींचा पूजावसर पाहण्यासाठी आलेल्या नागदेवादिकांना त्याने ऐन वेळी भोजनाबद्दल विनंती केली. पण त्यापैकी कोणीचं उठेना. स्वामींच्या कडूनहि सांगून पाहिले. पण ते उठेनात. स्वामींनी स्पष्टीकरण केले की "हे सर्व आमचा पूजावसर पाहण्यासाठी आले. एरवी यांना तुमच्या अन्नाची अपेक्षा आहे असे नाही." त्यावेळी सारंगपंडिताने "न या जा : होइल माझेया भोइयासि" असे आढ्यतापूर्वक तुच्छतादर्शक उद्गार हळूच काढले. ते ऐकल्यामुळे मठात परतल्यानंतर बाइसा स्वामींना म्हणाली, "बाबा : पांडयासि परिवारावरि इतुलीहि बूधि नाही." स्वामी म्हणाले, "बाइ : आधी : एथ बूधि होआवी : मग एथचिया परिवारावरि होआवी." (उत्त. २८९). यावरून काय दिसून येते ? पुढे पुढे तर स्वामींच्या वरील त्याची श्रद्धा अगदीच नाहीशी झाली. म्हणूनच की काय, आपल्या घरी आलेल्या पाहुण्याजवळ बोलतांना "स्वामींच्या ठिकाणी काही सामर्थ्य नाही. पण ते आपणाला ईश्वर मात्र म्हणवतात" असे तिऱ्हाइतपणाचे उद्गार त्याने काढले. पाहुण्यामुळे स्वामींना उपाहार पाठवायला उशीर लागल्याबद्दल त्याला यत्किंचितहि खेद वाटला नाही. उलट त्या निमित्ताने सारंगपंडिताला उद्देशून "पांडेया : देवो होता आणि भगतु होता : आता देवो असे : भगतु नाही" असे स्वामींनी म्हणताच "नाही कैसा जी : आम्ही असो नव्हे : तरि देवोचि नाही" (उत्त. ३४३) असे म्हणण्याला तो मुळीच कचरला नाही. शेवटी शेवटी तर एकदा 'मला गोसाव्याइतके आणखी कोणीच प्रिय नाही' असे जेव्हां तो म्हणाला तेव्हां "पांडेया : हे तुम्हा दारिचेया खुंटेया इतुके न पढिए

गा" (उत्त. ३८८) असे स्वामींनी त्याला स्पष्टपणे म्हटले त्याचेहि कारण हेच असावे.

सारंगपंडित जरा कामुक वृत्तीचाच होता. म्हणूनच उमाइसासारख्या तरुणीशी त्याने पुन्हा विवाह केला. ती ऋतुस्नात असतांनाहि याची उपभोग-वासना जागृत असायची. (विचारबंद). स्वामींनी त्याला अनुसरणाची सूचना दोनदा केली; पण "ना : जी : मज तुप भात : तांबूळ : बाज सुपवती होआवी" असे त्याने न संकोचता सांगितले. म्हणूनच "पांडेयासि तरुणि आणि वृत्ति दोन्ही न संडेति' असे उद्‌गार स्वामींनी काढले होते. (उत्त. २९३,३३७)

उमाइसाला मात्र स्वामीविषयी फार आदर वाटे. स्वामी तिच्या घरी प्रथम उपाहाराला गेले तेव्हां तिच्यासाठी 'प्रसाद' उरला नव्हता; म्हणून तिला फार वाईट वाटले. (भा. २ पा. ७). दुसऱ्या प्रसंगी तिने स्वामींना श्रद्धा-पूर्वक साखरभात उपाहारासाठी दिला आणि स्वतः त्यांना तूप वाढले. (भा. २ पा. ११). दुसऱ्या एका वेळी सारंगपंडिताने स्वामींची मर्दनामादनपूर्वक पूजा केली, तेव्हां मध्येच डोळा लागल्याने उमाइसाला तो पूजावसर दिसला नाही. त्यामुळे ती सारंगपंडितावर (त्याने तिला न उठवल्याबद्दल) फार रागावली. त्याचमुळे की काय, दुसऱ्या दिवशी सारंगपंडिताला कळू न देता रोटांचे वाण ती स्वामीसाठी घेऊन आली. (उत्त. ३०२, ३०३). उमाइसाची स्वामीवरील श्रद्धा हीहि सारंगपंडिताच्या मनात स्वामीविषयी अनुदार भावना निर्माण व्हायला कारणीभूत झाली असावी. ते काहीहि असले तरी उमाइसाची श्रद्धा मात्र वाढतच गेली. म्हणूनच स्वामींच्या प्रयाणानंतर सारंगपंडिताचा मृत्यु होताक्षणीच त्याच्या प्रेताची विल्हेवाट होण्याचीहि वाट न पाहता ती धानाइसाला घेऊन नागदेवाचार्याजवळ आली आणि त्या मायलेकींनी 'भीक्षा केली' (स्मृ. स्थ. २१६) म्हणजे महानुभावपंथाची दीक्षा घेतली.

# ६

# ईश्वरावतारित्व

श्रीचक्रधरस्वामी हे ईश्वरावतार आहेत अशी सर्व महानुभावांची श्रद्धा आहे. खास त्यांच्या काळात देखील केवळ त्यांच्या अनुयायांचीच नव्हे तर इतर अनेकांची तशी समजूत होती. स्वामींच्या ठिकाणी अलौकिक सामर्थ्य होते. त्यापासून होणाऱ्या चमत्कारामुळे काही जण त्यांना तात्काळ 'देव' म्हणू लागत. उदा : स्वामी एकाकी असतांना गोवळ्यांच्या पाठीवर बसून त्यांना त्यांनी स्थित्यानंद दिला. ते निघून गेल्यावर "कैसा गा देओ : कैसे आम्हासि सुख दीधले" म्हणून ते त्यांची स्तुतिस्तोत्रे गाऊ लागले. (ए. ३३). त्यांचे बोलणे ऐकून वाटेने जाणाऱ्या संन्याशाने त्यांना विचारले, "हा रे गोपाळ हो : तुम्ही काइ बोलत असा ?" तेव्हां ते म्हणाले, "देवो एकु आम्हातु खेळो आला : तो जेयाचीए पाठीवरि बैसे तेयासि सुख होए" (सदर). ते गोंडांच्या वस्तीत होते त्यावेळी त्यांना 'दैवन्य' म्हणून आळवणारे गोंडहि स्वामींना देवच समजत. गाई राखतांना स्वामींच्याकडे पाहूनच तृप्त झालेल्या गाई अपार दूध देतात हे पाहून एका ब्राह्मणाला "आमचेया गाइ राखे तो साक्षात् श्रीकृष्णू" वाटत होते. (ए. ४०) स्वामी श्रीप्रभूंच्या दर्शनासाठी रिद्धपुरला गेले तेव्हां एके दिवशी ते भैरवाच्या देउळात बसले असतांच तेथे श्रीप्रभु आले. तेथील केशवाच्या मूर्तीवर बोट ठेवून ते म्हणाले, "तु देओ : मेला जाए : नव्हेसि : हा देओ नव्हे." लागलीच ते स्वामीपुढे आले. त्यांच्या शरीरावयवांना हात लावून "हा कान, हा डोळा, हे नाक" असे म्हणू लागले. मग त्यांनी स्वामींच्या भाळस्थळावर बोट ठेवले आणि म्हटले, "हा वो : तु देवो म्हणे : नव्हे म्हणे : हा देवो होय म्हणे" (ली. च. भा. २ पा. २१). यावरून श्रीप्रभूंनी स्वामींना 'देव' म्हटल्याचे स्पष्ट दिसून येईल.

स्वामींच्या दर्शनासाठी येणाऱ्या अनेक व्यक्तींना स्वामी ईश्वर आहेत असेच वाटत असे. डोडविहिराचे राघवदेव स्वामींना 'गोमटदेव' म्हणून आळवीत ते ईश्वरबुद्धीनेच (भा. २ पा. २३) हे आपण पाहिलेच आहे. ब्रह्मसानूने मत्सरप्रेरित होऊन आपल्या शिष्याबरोबर विषाने माखलेली सुपारीची खांडे स्वामीकडे पाठवली. ती स्वामींनी खाल्ली; पण त्यांचा त्यांच्यावर काही परिणाम झाला नाही. यामुळे ब्रह्मसानूच्या शिष्यांना श्रीचक्रधर-स्वामी म्हणजे 'ईश्वपुरुषु होति' (ली. च. भा. २ पा. ३५) असा प्रत्यय आला. स्वामीबरोबर खेळ खेळणाऱ्या डखल्याला उद्देशून दादोसाने काढलेले "मर मरा डखलेया : जेणे जेणे नरका जा ते तेचि करीत असा : गोसावी ईश्वरू : गोसावीयासि खेळु काइसा" हे उद्‌गार (भा. २ पा. ५२), तसेच "गोसावी ईश्वरू" (उत्त. २६९) हे महादाइसाजवळ त्यांनी काढलेले उद्‌गार दादोस स्वामींना ईश्वरावतार मानीत हेच दाखवीत नाहीत काय? महदाइसेच्याहि तोंडी पुढील उल्लेख आलेले आहेत. "गोसावी ईश्वरू : ईश्वरी काइ आवडि नावडि" (भा. ३ पा. १४); तिक्वनायकाने स्वामींना उपाहार पाठवण्यास उशीर केला तेव्हां तिने म्हटले, "केसे काइ : गोसावी ईश्वरू आणि काइ?" (सदर. पा. १०५); याशिवाय "हे काइ दादो : गोसावी कैसे नेणेति : गोसावी ईश्वरू : गोसावी मनिचे जाणेति" (उत्त. २७३) हे रामदेवाजवळचे उद्‌गार, आणि "गोसावी ब्रह्म होए आणि आम्ही अनुभवित असो नव्हे" (उत्त. २७७) हे तिने स्वामीजवळ काढलेले उद्‌गार चक्रधरस्वामीवरील तिच्या ईश्वरबुद्धीचे निदर्शक आहेत. "माझ्याकडे तू कोणत्या दृष्टीने पाहतेस, माझ्यावर तुझी बुद्धि कोणती आहे?" असे स्वामींनी विचारले तेव्हां "जी : जी : गोसावी ईश्वरू"... म्हणून साधेने उत्तर दिले. (उत्त. १५०). दाइंबा तर स्वामीजवळ एक वेळ बोलले की "जी जी : गोसावी तरि ईश्वरू आणि ईश्वरी तरि अदए नाही : आणि आम्ही तरि ईश्वरी जवळिक पातलो असो"—(उत्त. ३४८) वगैरे अनेक उल्लेख आहेत. यांच्या भरीला बाइसा आणि भटोबास या दोघांच्या तोंडी असलेले पुष्कळ उद्‌गार घालता येतील. स्वामींच्या शिष्यपरिवारातील सर्वश्रेष्ठ 'भक्त' म्हणून बाइसाची व 'ज्ञानी' म्हणून भटोबासाची गणना होते. त्यांची स्वामीवर ईश्वरबुद्धि होती हे निराळे सांगण्याची गरजच नाही.

यावरून स्वामींचा शिष्यपरिवार त्यांना ईश्वरावतार मानीत असे याविषयी काहीहि शंका नाही.

स्वामींच्या ठिकाणी असलेल्या अद्‌भुत सामर्थ्यामुळे त्यांना ईश्वर म्हणून म्हणणारी सर्वसामान्य मंडळी असणे साहजिक आहे. तसेच वेधामुळे आणि ज्ञानामुळे त्यांच्याकडे ओढल्या गेलेल्या शिष्यपरिवाराची त्यांच्यावर ईश्वरबुद्धि असणे हेहि साहजिक आहे. यावरून खास स्वामींच्या काळी ईश्वर म्हणून त्यांची लौकिकात पुष्कळ प्रसिद्धि व मानमान्यता झालेली होती या-विषयी शंका राहत नाही. पण या बाबतीत खुद्द स्वामींचे म्हणणे काय आहे हे पाहिले पाहिजे. लोक त्यांना ईश्वर म्हणत असले तरी ते स्वतः आपल्याला काय म्हणवीत असत; लोकांची त्यांच्यावर जी ईश्वरबुद्धि होती ती स्वतःला त्यांना मान्य होती काय; निराळ्या आणि स्पष्ट शब्दात बोलायचे म्हणजे आपण ईश्वर अवतार आहोत असे ते स्वतः म्हणवून घेत होते काय ?

काही उल्लेखावरून स्वामी स्वतः आपल्याला ईश्वर म्हणवून घेत असावेत असे म्हणण्याला जागा आहे. उदाः वाडेगाव येथील माळी सर्पदंश होऊन मरण पावला तेव्हां तेथे गोळा झालेल्यापैकी एकाने म्हटले, " हा रे : खडकुलिएसि जे पुरुषु असत ते आपणयाते ईश्वरपुरुष म्हणवीत असत : तेथ नेउनि घाला." (ली. च. उत्त. १०). यावरून काय दिसून येते बरे ? सारंग-पंडिताचे म्हणणेहि याच अर्थाचे आहे. एकवेळ त्याच्याकडे पाहुणे आले होते आणि त्याचदिवशी त्यांनी स्वामींच्यासाठी उपाहार पाठविण्याचे ठरवले होते. पण उपाहार लौकर येईना म्हणून देमाइसा सारंगपंडिताच्या घरी गेली. तिच्या बोलण्यावरून उपाहार म्हणून कुणाकडे तरी ताट पाठवायचे आहे हे पाहु-ण्यांना कळले. त्यांनी सारंगपंडितांना विचारले, " ताट कुणासाठी पाठवायचे ? " सारंगपंडित म्हणाले, " चांगदेवराउळासाठी. " पाहुणे म्हणाले, " श्री चांग-देवराउळ कोण ? द्वारावतीकार की काय ? " सारंगपंडित म्हणाले, " होय. " पाहुण्यांनी पुन्हा विचारले," द्वारावतीकार चांगदेवराउळ ज्यांच्या डोक्यावर सूप हाणीत त्यांना मार्ग प्रगट होतसे आणि ज्यांना खराट्याने हाणीत त्यांना विद्या होत असे. ते काही यांच्या ठिकाणी आहे की नाही ? " सारंगपंडितांनी उत्तर दिले, " नाही, तसे तर काही दिसत नाही. परि आपणेयासि ते ईश्वर म्हण-विताति " (उत्त. ३४३.). या दोन्ही उल्लेखावरून स्वामी आपणाला ईश्वर

म्हणवून घेत असत असे म्हणतां येईल. पण ही गोष्ट पूर्णांशाने खरी नाही; ते अर्धसत्य आहे. उत्तरार्ध काळात रामटेकची बाई दर्शनाला आली तेव्हां रामटेक येथील आपल्या काही स्मृति स्वामी सांगू लागले. त्यावेळी ते म्हणाले, " बाई पूर्वी हे रामी होते : तै एथ पाणीभाताची आरोगणा देति : तै हे दीगंबर होते : तै एथ मौन्य होते : तै याते नम्रदेव नम्रदेव ऐसे म्हणती : आता सातापाचा मिळौनि याचा देवो केला असे. " (उत्त. १९). यावरून आपल्याला इतर लोक देव म्हणतात पण आपण देव नाही असेच स्वामींना नम्रतेने सुचवायचे होते की काय ?

स्वामी पाटवधा येथे असतांना केदाराच्या देवळात उतरले होते. तेव्हां केदारनाथाच्या दर्शनाला आलेल्या राहीनायकाने त्यांना पाहिले आणि त्यांचे अलौकिक स्वरूप पाहून विचारले, " गोसावी रावो होती का देवो होती ? " म्हणजे " आपण राजे आहात की प्रत्यक्ष देव आहात ? " त्यावर स्वामींनी उत्तर दिले, " हे रावो नव्हे : हे देवो नव्हे : हे महात्मे "–मी राजा नाही आणि देवहि नाही, मी एक महात्मा म्हणजे संन्यासी आहे. (भा. ३ पा. १२). तिकवनायकाने महदाइसेजवळ स्वामींच्या ईश्वरत्वाबद्दल शंका दाखवली होती. तेव्हांहि स्वामींनी असेच उत्तर दिले, " बाइ, नाएक म्हणत असती ते साचचि : ऐसे हे काइ जाणति ......... हे काइ ब्राह्मण : की क्षेत्री : की वैश्य : की शूद्र हे नेणिजे की बाइ " (भा. ३ पा. १०५). यातहि एका अर्थाने आपण ईश्वर नसल्याचे नम्रपणे सुचविले आहे. प्रज्ञासागर यतींच्याजवळ तर " नाहं मनुष्यो नच देवयक्षौ । न ब्राह्मण–क्षत्रियवैश्यशूद्राः ॥ न ब्रह्मचारी न गृही वनस्थो भिक्षुर्न चाहं निजबोधरूपः" (गो. प्र. च. पा. १३४; वि. मा. २०३) असे त्यांनी स्पष्ट म्हटले होते. ह्यात आपण देव नसल्याचे त्यांनी सूचित केले नाही काय ? आचार बंद–कारानेहि एके ठिकाणी अशी ग्वाही दिलेली आहे की " श्री दत्तात्रेयप्रभु ऐसे न म्हणतीचि आम्ही श्रीदत्तात्रेयप्रभु हो : आमचे गोसावी ऐसे न म्हणतीचि हे ईश्वर होय " (आचारबंद १७९) म्हणजे आम्ही श्रीदत्ता–त्रेयप्रभु आहोत असे श्री दत्तात्रेयप्रभु कधीच म्हणत नव्हते आणि मी ईश्वर आहे असे गोसाव्यांनी म्हणजे श्रीचक्रधरस्वामींनी कधी म्हटले नाही.

वरील सर्व उल्लेखात स्वामींनी आपण ईश्वर नसल्याचे सूचित केलेले असले तरी तेहि त्यांचे खरे मत असावे असे दिसत नाही. त्यातील उद्‌गारात जी नम्रता आहे त्या नम्रतेच्या पोटीच, एका अर्थाने, आपण ईश्वर आहोत या समजुतीला त्यांनी मान्यता दिलेली आहे. तिकवनायक आणि प्रज्ञासागर यांच्याजवळ काढलेल्या उद्‌गारांचा तर खरा अर्थ असा आहे की, ब्राह्मण-क्षत्रिय-वैश्यादि सगळ्यांच्या पलीकडे मी आहे; अर्थात् मी सर्वश्रेष्ठ आहे; म्हणजेच प्रत्यक्ष ईश्वर आहे ! पण या बाबतीत नुसत्या अर्थलापनिकेवर विसंबून राहण्याचे कारण दिसत नाही. आपण ईश्वर आहोत ही गोष्ट खुद्द स्वामींनी अनेकदा प्रत्यक्षाप्रत्यक्ष रीतीने सूचित केलेली आहे. वेरूळ येथे चतुर्विद्याच्या मठात स्वामी बसले असतांना जानोपाध्ये त्यांच्या भेटीला गेले. मठात अंधार होता. त्यामुळे स्वामींचे दर्शन नीट होत नव्हते. उपाध्ये मनात म्हणाले, "बाइसा जर वात लावतील तर मला गोसाव्यांचे स्पष्ट दर्शन तरी होईल." इतक्यात स्वामींच्या मूर्तीवर एकदम लख्ख प्रकाश पडला. जानोपाध्याला स्वामींचे दर्शन झाले. स्वामींनी त्याला म्हटले, "ईश्वराला दिव्याच्या प्रकाशाने पाहता येणे शक्य आहे ? तो आपले दर्शन आपणहून देईन तेव्हांच ते होऊ शकेल." "ईश्वरो काइ गा अन्यप्रकाशकु : तो स्वयंप्रकाशु की" (भा. २ पा. २४). ह्यात आपण ईश्वर असल्याचे त्यांनी स्पष्टपणे सूचित केले नाही काय ? पाटवधा येथे असतांना महदाइसेला स्वामीसाठी उपाहार करायचा होता. तिने सामान आणून बाइसाजवळ दिले. पदार्थ काय करावेत याचा विचार करतांना बाइसा आणि महदाइसा ह्यांच्या-मध्ये मतभेद झाला. बाइसाचे म्हणणे होते की स्वामींना तांदळाची खीर आवडते म्हणून ती करावी. महदाइसेचे म्हणणे होते, "गोसावी ईश्वरु : ईश्वरी काइ आवडी नावडी असे ?" पुढे आरोगणेच्या वेळी स्वामींनी बाइसाला विचारले, "बाइ, ही म्हणत होती तसे तुम्ही का केले नाही ?" त्यावर महदाइसाच एकदम बोलली, "महाराज, मला आपली प्रवृत्ति ठाऊक नाही. ती प्रवृत्ति बाइसाच जाणतात." त्यावर स्वामी संमतिपूर्वक म्हणाले, "बाइ, तुम्ही म्हणते होतीति ते तैसेचि : ईश्वरी आवडी नावडी असे : परि ईश्वरीची प्रवृत्ति बाइसेचि जाणती. (भा. ३ पा. १५). ह्यातहि (हिराइसा पाठाच्या मते) स्वामींनी स्वतःला ईश्वर म्हटलेले आहे. स्वामी

काय करीत आहेत हे पाहण्यासाठी एक वेळ दादोसाने एल्हाइसाला पाठविले. त्यावेळी स्वामींचा स्नानविधि चालू होता.पद्मनाभीदेव वगैरे त्यांचे आंग चोळीत होते. साधाने दार उघडून पाहिले तेव्हां स्वामी म्हणाले, "देवो एथ असे : साधे हो देवो पाते असा : या देवो एथ असे" (भा. ३ पा. ३८). ह्या लीळेतहि तोच प्रकार आढळत नाही काय ? म्हाइभटाची आणि स्वामींची पहिली भेट झाली त्यावेळी ईश्वरदास्याने मोक्ष मिळेल असे स्वामींनी प्रतिपादन केले. त्यावर म्हाइभटाने विचारले, "परमेश्वराचे सन्निधान ते कसे ?" स्वामी म्हणाले, "ते हे असे" आणि असे म्हणून त्यांनी "आपणयाकडे श्रीकरे दाखविले." (उत्त. १११). यावरून ज्याचे सन्निधान करायचे तो ईश्वर म्हणजे आपण असेच त्यांनी सांगितलेले आहे. त्यामुळे स्वामी ईश्वर आहेत अशी म्हाइभटाला प्रतीति आली आणि ईश्वर म्हणून स्वामींना त्याने दंडवते घातली. नेऊरगावला असतांना इंद्रभटाकडून होत असलेल्या पूजेच्या वेळी स्वामींनी म्हटले, "काइ इंद्रेया देवो सुवर्ण फुली पूजिजताए" (उत्त. २४६). आपला प्रयाणकाल आला असे सुचवितांना महदाइसेजवळ "पोरे हो देवो आपणयाते राखो न सके : मा तुमते काइ राखैल" ? (उत्त. ४८२) असे उद्‌गार काढलेले होते. स्वामी स्वतःला ईश्वर म्हणवीत असत याविषयी हे सर्व पुरावे साक्ष देतीलच.

लीळाचरित्राचे अनेक पाठ आहेत. त्यातील काही पाठात चक्रधर-स्वामींनी स्वतःला ईश्वर म्हणवून घेतल्याचे उल्लेख आहेत हे खरे. परंतु इतर पाठात ते त्यांच्या तोंडी नसावेत असे दिसते. उदा. भा. २ पा. २४ वर जी आख्यायिका आली आहे तिच्यातील आवश्यक मजकूर पुढीलप्रमाणे : "सर्वज्ञे म्हणितले : बटिका हे काइ दीवेन देखीजे : हे आपणेयाते दाखवी : तेव्हळीसिची देखीजे की ॥ दुसरी वासना : ईश्वरु काइ गा अन्यप्रकाशकु तो स्वयंप्रकाशु की :" यात काही पाठात स्वामींचे तोंडी ईश्वर हा शब्द नाही असे दिसते. भा. ३ पा. १५ मधील हिराइसा पाठातील अवतरण वर उद्‌धृत केलेले आहे. मूळ मजकूर असा, "ते कीरू तैसेचि : एथ काइ आवडी नावडी असे : परि एथचि प्रवृत्ति बाइसे जाणती :" उत्तरार्ध २४६ ह्या लीळेतील मजकूर असा, 'सर्वज्ञे म्हणितले "काइ इंद्रेया देवो सुवर्ण फुली पूजिजताए ? मा : एकी वासना : सुवर्णपुष्पी पुजिजताए" : तसेच उत्तरार्ध

४८२ च्या लीळेतील मजकूर असा, " बाई : हें आपणयाते राखो न शके मा तुमते काइ राखैल : एकी वासना : पोरे हो देवो आपणयाते..." इत्यादि. यावरून असे दिसते की स्वामींनी आपणासाठी 'एथ' हा शब्द जेथे वापरला आहे तेथे काही पाठकारांनी त्याऐवजी देव शब्द वापरलेला आहे. हे सगळे खरे असले तरी इतर लीळांवरून स्वामी आपल्याला ईश्वर म्हणवून घेत होते असे स्पष्टपणे दिसून येते.

नुसते सर्वसामान्य अर्थाने 'आपण ईश्वर आहोत' इतकेच नाही तर 'आपण द्वापरीचे श्रीकृष्ण आहोत' असेहि त्यांनी एकदोन वेळा सूचित केलेले आहे. कास्ते हरिदेवपंडिताजवळ बोलतांना स्वामींनी त्यांना गोपाळमंत्राचे भेद किती आहेत म्हणून विचारले. तो म्हणाला, " १०-२० आहेत; ह्यापैकी दोनचार मला येतात." त्यावर स्वामी म्हणाले, " गोपाळमंत्राचे शेकडो हजारो भेद आहेत, पण ते भेद आता कुठे आहेत ? विशेषतः त्यातील एक भेद तर कुणालाच ठाऊक नाही.-" रुक्मिणीदेवीप्रति श्रीकृष्णचक्रवर्ती निरूपिला : म्हणौनि रुक्मिणीदेवि जाणे का श्रीकृष्णचक्रवर्ती जाणती : आणिक कव्हणिचि नेणती " ( भा. २ पा. १० ). पण ही गोष्ट स्वामींना तरी ठाऊक कशी ? कारण, आपण स्वतःच पूर्वी श्रीकृष्ण होतो, असे त्यात सूचित झाले नाही का ? हरिदेवपंडिताला देखील " प्रतीति बैसली : द्वापरीचे ते हे गोसावी"-द्वापरीचे श्रीकृष्ण ते हेच असा त्याला प्रत्यय आला. ह्यासंबंधी पुढे जानोपाध्याबरोबर संभाषण चालू असतांना आपण पूर्वी श्रीकृष्णावतार होतो हे स्वामींनी जवळजवळ मान्य केल्यासारखे दिसते. जानोपाध्याला स्वामींनी विचारले, " तुम्ही याते काइ म्हणा ? " तो म्हणाला, " जी जी श्रीकृष्ण म्हणो." " स्वामी म्हणाले ते का म्हणून ?" उपाध्याने उत्तर दिले, " ना जी : गोसावी कास्ता हरिदेवो पंडिताप्रति गोपाळमंत्राचे भेद निरूपीले : एकु भेद तो श्रीकृष्णचक्रवर्ति जाणति का रुक्मीणि देवी जाणे : आणिक कवणीचि नेणे : ऐसे सर्वज्ञे म्हणितले यातव जी : " ( भा. २. पा.२४ ).अर्थात् गोपाळमंत्राचे भेद निरूपण करतांना 'आपणच श्रीकृष्ण' ही गोष्ट स्वामींनी सूचित केल्याचे आणि तशीच ती इतरांनी धारण केल्याचे स्पष्ट दिसते.

चक्रधरस्वामी संगमेश्वराहून नांदोराकडे प्रवास करीत असतांना उपाध्याच्या खांद्यावर आपला हात ठेवून एका नदीच्या काठावर गेले. तेव्हां

त्यांची सावली पाण्यामध्ये पडली. आणि जणु त्यामुळेच पाण्याच्या तळाशी असलेले जलचर प्राणी वर आले व स्वामींच्याकडे टक लावून पाहू लागले. तेव्हां स्वामी उपाध्याला म्हणाले, "पूर्वी श्रीकृष्णचक्रवर्ती यमुनेच्या काठावर जेव्हां जात तेव्हांहि त्यांच्या मूर्तीचे दर्शन घेण्यासाठी जलचर प्राणी असेच वर येत." ("द्वापरी श्रीकृष्णचक्रवर्ती येमुनेचेनि तीरे बीजे करीति : मग तळ घेऊनि जलचरे असति : ते वरुति ऐति : श्रीमूर्ति पाहाति :" (ली. च. भा. ४ पा. १७). या लीळेत त्यांनी आपला आणि श्रीकृष्णचक्रवर्तीचा अभेद स्वतःच सुचविला नाही काय? जणु त्यांनी आपल्या द्वापरीच्या अवतारातील स्मृतीच या हकीकतीच्या रूपाने उपाध्यांना सांगितली आहे. काळदासभटाने स्वामीवर दोषारोप केले तरीहि त्याला शाक्तेयांची 'स्तीति' होऊन मोठा आनंद वाटला. त्यामुळे दुसऱ्या दिवशी स्वामींच्या जवळ असलेल्या इंद्रभटाला उद्देशून तो म्हणाला, "इंद्रभटो : आमचे गोसावी साक्षात् श्रीकृष्ण चक्रवर्ती : आराधीता मूक्ति का वीरोधीलेया मूक्ति :" त्याचे हे वाक्य इंद्रभटाने स्वामींच्या जवळ सांगितले तेव्हां "गोसावी उगेचि होते" (भा. ४ पा. १८). स्वामी म्हणजे साक्षात् श्रीकृष्ण असे काळदासभटाने सुचवले तेव्हां "स्वामी उगेचि होते" याचा अर्थ काय? 'मौनं संमतिलक्षणम्' या न्यायाने काळदासभटाच्या म्हणण्याला मान्यता देऊन आपण खरोखरच श्रीकृष्णचक्रवर्ति आहोत असेच त्यांनी या ठिकाणी सुचविले आहे. आणखीहि असाच एक प्रसंग आहे. पैठण येथे असतांना एके दिवशी सायंकाळी स्वामी विहरणासाठी गेले. बरोबर सारंगपंडित होते. तितक्यात अनेक गाई हंबरत हंबरत तिकडे आल्या, आणि स्वामींना पाहून वेध लागल्याप्रमाणे तटस्थ उभ्या राहून स्वामींची श्रीमूर्ति पाहू लागल्या. हे दृश्य सारंगपंडित जणु भक्तिपूर्ण अंतःकरणाने पाहू लागले. स्वामींनी सारंगपंडिताला विचारले, "पांडेया काय पाहत आहा?" सारंगपंडित म्हणाले, "जी जी : द्वापरी श्रीकृष्णचक्रवर्तीचिये श्रीमूर्तिवेध ध्वनि घेता न पुरेचि : ते आता घेति असेति" यावर स्वामी म्हणाले, "काय पांडेया, फार वक्तृत्व चालवलेले दिसते?" त्यांच्या या कौतुकोद्गारामधेहि सारंगपंडिताच्या म्हणण्याला त्यांनी संमतीच भरलेली दिसते. ह्या सर्व लीळा लक्ष्यात घेतल्या म्हणजे श्रीचक्रधरस्वामी स्वतःला ईश्वर तर म्हणवून घेत होतेच पण श्रीकृष्णावतारहि म्हणवून घेत होते असे स्पष्टपणे दिसून येते.

आणि याला आणखी एक उपोद्बलक पुरावा सादर करता येण्यासारखा आहे. मेहेकरला असतांना गोकुळअष्टमीच्या दिवशी तेथील बोणेबाईने मातीचे गोकुळ केले, त्यात मातीचा कृष्ण आणि मातीची देवकी बसवली, ते पाहून स्वामी तिला म्हणाले, "बाई : श्रीकृष्ण काइ मातीयेचा : देवकी देवी काइ मातीयेची : हे असो देया :" अर्थात् या मातीच्या श्रीकृष्णदेवकीची पूजा करण्याचे काही कारण नाही असे त्यांनी सांगितले. बोणेबाई म्हणाली, "तर मग मी काय करू ?" स्वामी म्हणाले, "हे श्रीकृष्ण होईल : तुम्ही देवकी देवी होआ :" आणि मग बोणेबाई देवकी झाली आणि स्वामी श्रीकृष्ण म्हणून तिच्या मांडीवर बसले. गोकुळअष्टमीचा सण योग्य रीतीने साजरा झाला. ह्यात मातीच्या श्रीकृष्णाऐवजी स्वतःच श्रीकृष्ण होण्याच्या आग्रहातील कोणता भाग सूचित होतो ? आपण श्रीकृष्णचक्रवर्ति आहोत हाच नाही का ? सारांश, श्रीचक्रधरस्वामी स्वतःला श्रीकृष्णावतार समजत होते असे उघड दिसते. आणि लोकांचीहि त्यांच्यावर तशीच श्रद्धा होती केवळ स्वामींच्या वेधाने उमाप दूध देणाऱ्या गाईच्या उदाहरणावरून एका ब्राह्मणालाहि "साक्षात् श्रीकृष्णु" म्हणून प्रतीति आली होती हे आपण पूर्वी पाहिलेलेच आहे !

आपण ईश्वर आहोत या भावनेनेच ते आपल्या शिष्यमंडळीबरोबर वागत असत. याचे एक महत्त्वाचे प्रत्यंतर असे की शिष्यसमुदायाकडून ते ईश्वराप्रमाणे आपली पूजाअर्चा करवून घेत. बाइसा त्यांचा त्रिकाळ-पूजावसर करीत असे. सकाळी, दुपारी व सायंकाळी त्यांना त्यांच्या निवासस्थानी मंगळार्ती व धूपार्ती होत असे हे त्यांच्या दिनचर्येवरून स्पष्ट दिसते. स्वामी उपाहारासाठी म्हणून जेव्हां जेव्हां इतरांच्या घरी जात तेव्हां तेव्हां तेथेहि त्यांना पूजा, धूपार्ती, मंगळार्ती वगैरे होत असे. ही पूजाअर्चा, स्वामी नको नको म्हणत असतांना भक्तजन करीत, असे दिसत नाही. आपल्या शिष्यांनी आपली पूजा करू नये असे त्यांनी कधीच म्हटले नाही. उलट काही प्रसंगी त्यांनी मुद्दामहून आपली पूजा करवून घेतली आहे. उदा : एकाकी असतांना भांडारेकर यांना त्यांनी 'करणीय वीहीले' म्हणजे आपली पूजा करण्याची आज्ञा केली. भांडारेकराजवळ पूजाद्रव्ये नव्हती. तितक्यात पंचोळीची स्त्री धानाबाई हिने स्वामींना आपल्या घरी बोलावले. तेथे उत्तम पूजाद्रव्ये आणून

ती स्वामींची पूजा करू लागली. तेव्हां स्वामी तिला म्हणाले, 'तुम्ही यांचा हाती वोपा : हे एथ पूजा करीति' (एकांक. ३०) मग भांडारेकरांनी स्वामींची पूजा केली. नंतर ती पूजा स्वामी धानाबाईला परत देत होते, तेव्हां ती म्हणाली, "जी जी : ईश्वरी अर्पीले ते माघौते कैसे घेयावे?" यावर स्वामी म्हणाले, "एथौनि तुम्हा देइजत असीजे" (सदर). यावरून स्वामींनी आपली पूजा करवून घेतली, इतकेच नाही तर धानाइसाला उत्तर देतांना आपले 'ईश्वरत्व' मान्य केले हे स्पष्ट आहे. भटोबासांनाहि त्यांनी एके दिवशी असेच 'करणीये' सांगितले होते. ते म्हणाले 'एथ पूजा करावी आणि उपाहारू करावा :' आज्ञेप्रमाणे भटोबासांनी पूजेची तयारी केली. 'मग गोसावी भटोबासाकरवि अनसारीखी पुजा करवीली : धूपार्ती केली : मंगळार्ति केली' (उत्त. ११७). बाइसांना देखील त्यांनी एक वेळ "बाइ : एथ धूपार्ति करा" (उत्त. १७५) अशी आज्ञा केली होती. आपल्या भक्तांना ज्या ज्या वेळी काही विशेष दान देण्याची स्वामींची इच्छा असे त्या त्या वेळी ते त्यांना अशा रीतीने आपला विशेष पूजावसर करण्याला सांगत असत. अशी पूजा करवून घेण्याच्या मुळाशी 'आपण ईश्वर आहोत' ही भावना आहे, हीच गोष्ट प्रामुख्याने या ठिकाणी स्पष्ट करायची आहे.

याच दृष्टीने स्वामी उपदेश, निरूपण वगैरे करीत असत. ईश्वराच्या ठिकाणी ज्या गोष्टी करणे इष्ट आहेत म्हणून तात्त्विक दृष्टया त्यांनी सांगितले त्या गोष्टी ते आपल्या ठिकाणी करवून घेत. याची पाहिजे तितकी उदाहरणे देता येतील. निरंतर स्मरण करावे ते फक्त ईश्वराचेच, पण चांगदेवभट आपल्या मातापित्यांना भेटण्यासाठी जातांना स्वामींनी त्याला उपदेश केला की "एक दोनि वेळा याते (= मला) आठवीजे : परि वंध्यु दिवसु जावो नेदिजे" (आ. ३२). यावरून 'ईश्वर' = 'हे, हा', असेच समीकरण निघत नाही काय? "पोरे हो : ते तुमचिया कडौनि तुम्हासि काइ न होआवे : एथौनि तुम्हा सकळही होआवे की" (आ. १२५). "ऐसे कइ होईल पोरा जीवा जे एथिचे (माझे) ते आपुले" (आ. १२७); "एथीच्चिया (माझ्या) कथावार्ता कीजेति" (आ. १३३); "एथीचेया (माझ्या) संबंधा गेले तेतुले ओटे गोटे आदिकरौनि तुम्हा नमस्करणीये की गा"

( आ. १८६ ); " आपुले सकळही निरोध परिहरौनि एथीचेया संबंधीयांचेया संबंधा जाइजे " ( आ. १८७ ); " बाइ : आर्ति करौनि एथीची ( माझी ) दसीचि धरली पुरे " ( आ. २१२ ); " पांडेया : एथ ( माझ्या ठिकाणी ) अनुसराल तरि ऐसेचि काढीजैल " ( आ. २१४ ); " एथौनि ( मी ) वारिले ते न कीजे की " ( आ. २५३ ); " तुम्हा एथौनि भणीतले ते करणीये की गा ( आ. २५४ ); " भोजेया : एथ ( माझ्या ठिकाणी ) अनुसरीजे ना तरि ऐसेया अधोपरीचेया वृक्षा होइजैल : मग अनंतकाळ दुःख ते भोगिजतचि असीजैल " ( आ. २५६ ); " बाइ एथिचेया होइजे तैं चुकेति : ( आ. २५७ ); " एथ अधीनु होइजे एथौनि भणितले कीजे ते अनुसरण ( आ. २८३ ); अशी अनेक वचने सूत्रपाठात विखुरलेली आहेत त्यावरून श्रीचक्रधरस्वामींनी आपल्या शिष्यांनी आपल्याला अनुसरावे, आपल्याला नमस्कार करावा, आपली पूजा अर्चा करावी, आपली आज्ञा पाळावी, आपण सांगितलेले निषेध चुकवावे, अशा कितीतरी आज्ञा सांगितलेल्या आहेत. ह्याच्या मुळाशी आपण ईश्वरावतार आहोत हे त्यांनी गृहीत धरलेले आहे. आणि म्हणूनच परमेश्वराचे अनुसरण करायचे म्हणजे आपले ( चक्रधराचे ) अनुसरण करायचे, परमेश्वराची सेवा करायची म्हणजे चक्रधरस्वामींची सेवा करायची, असे सर्वत्र प्रतिपादन केलेले आहे. यावरून चक्रधरस्वामी स्वतःला ईश्वर म्हणवीत होते याविषयी शंका बाळगण्याचे कारण नाही. ते ईश्वर असल्याचे सामान्य लोक, त्याचप्रमाणे म्हाइभटासारखे विद्वान लोक ह्यांच्याहि प्रतीतीला आलेले होते.

एखाद्या व्यक्तीने स्वतःला ईश्वर म्हणवून घेण्याची ही वृत्ति चक्रधरस्वामींच्याच ठिकाणी दिसत होती असे नाही. श्रीमद्‌भगवद्गीतेवरून तिचा आपल्याला पूर्वीपासून परिचय आहे. गीतेत भगवान श्रीकृष्णांनी स्वतःला ईश्वर म्हणवून घेतलेलेच आहे की नाही ? आपल्या विभूति-योगामध्ये " अहमादिर्हिदेवानां महर्षीणां च सर्वश : ।। यो मामजमनादिंच वेत्ति लोकमहेश्वरम् ।। " वगैरे श्लोकात आपले ईश्वरत्व त्यांनीच स्पष्ट सांगितलेले आहे. अर्जुन म्हणतो, " हे श्रीकृष्णा, तुला " परं ब्रह्म परं धाम पवित्रं परमं भवान् । पुरुषं शाश्वतं दिव्यमादिदेवमजंविभुम् " असे " आहुस्तामृषय :— " असे तुला सर्व ऋषि म्हणतात : इतकेच नाही तर " स्वयं चैव ब्रवीषि मे "—तू स्वतः

मला तसे सांगतोस, ह्या आणि इतर अनेक श्लोकांवरून भगवान् श्रीकृष्ण स्वतःला सर्वश्रेष्ठ ईश्वर म्हणत होते हे स्पष्ट दिसून येते. इतकेच नाही तर "भजस्व माम् ॥ मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु" (अ० ९, ३३-३४) "मामेकं शरणं व्रज (अ. १८, ६६) अशा प्रकारे आपली सेवा वगैरे करण्यासाठी आपल्या शिष्याला म्हणजे अर्जुनाला त्यांनी आदेश दिलेला आहे. तेव्हां चक्रधरस्वामींनी स्वतःला ईश्वर म्हणवून घेतले, स्वतःची पूजाअर्चा करायला सांगितली, हे काही नवीन नाही. श्रीकृष्णाच्या बाबतीत आपल्याला ह्याचा परिचय झालेला आहे.

# ७

# स्थित्यानंद व विज्ञान

## स्थिति म्हणजे काय

स्थिति अथवा स्थित्यानंद हे एक प्रकारचे सुख असून त्याचा संचार अधिकारी, युक्त मनुष्यजीवांच्या ठिकाणी, सामान्यतः देवताकडून म्हणजे देवतांच्या ब्रह्मांडस्थाकडून आणि त्यांच्या ज्ञानविग्रहाकडून होत असतो. अर्थात्, देवतांच्या ठिकाणी असलेले हे सामर्थ्य परमेश्वराच्याहि ठिकाणी असतेच. इतकेच नाही तर परमेश्वराचा उभयदृश्यावतार हा अयुक्त मनुष्यदेहियांना व पशुतिर्यंचांनाहि स्थितीचा संचार करू शकतो. मग त्या जीवांनी ती जोडलेली असो किंवा नसो. अनार्जितदातृत्व हा तर परमेश्वरावताराचा विशेष आहे. तथापि परमेश्वराकडून स्थिति-संचार होण्यासाठी त्याची कणव मात्र जीवाने जोडलेली असावी. परमेश्वरावताराकडून होणारा हा स्थित्यानंद सामान्यतः अतूट असतो आणि तो कोणालाहि, फार काय पण गर्भात असलेल्या जीवांनाहि होऊ शकतो.

## स्थितीची कार्ये

अधिकारी जीवाला एखाद्या देवतेची 'विद्या' झाली म्हणजे त्या विद्येची पंचविध कार्ये त्याच्या ठिकाणी प्रगट होतात. त्याला आपल्या देवतेची पिंडस्था प्रकाशित होते, ती प्रकाशलेली पिंडस्था आवडीपूर्वक धारण करण्याचा धर्म त्याच्या अंगी बाणतो, त्याला त्या पिंडस्थेचा वेध लागतो, भूतभविष्याचे ज्ञान होते आणि त्याच्या ठिकाणी आवेश, अवस्था व स्थिति या अवस्था प्रगट होतात. हे सर्व 'विद्ये' मुळे होते. उलट 'स्थिति' ही

पिंडस्थ-प्रकाशक नसल्याने तिच्यामुळे वर वर्णिलेली विद्येची पहिली तीन कार्ये होणे शक्य नाही. पण बाकीची दोन कार्ये म्हणजे भूतभविष्याचे ज्ञान व आवेश, अवस्था व स्थिति ही कार्ये मात्र तिच्यामुळे प्रगट होतातच. सामान्यतः देवतेच्या विद्येचे आयुष्य जितकी वर्षे असेल तितक्या वर्षांचे ज्ञान विद्या-वंताला व अर्थात् स्थितिमंताला होते. त्यातील अर्ध्या काळाचे भूतकालीन ज्ञान व अर्ध्या काळाचे भविष्यकालीन ज्ञान होते. विद्येमुळे आणि अर्थात् स्थितिमुळे प्रकट झालेल्या आवेशामुळे जीव पर्वताच्या कड्यावरून धावतो, देवळांच्या कळसावर वानरासारखा उडून जातो, त्यांच्यासारखा बुभुकार देखील करतो. क्वचित तो स्त्रियांच्या आकृति रचतो, इतरांच्या घरादारांची जाळपोळ करतो. थोडक्यात म्हणजे तो नाना प्रकारचे चमत्कार करतो. अवस्था प्रकट झाल्याने त्याची स्थिति वेड्यापिशासारखी होते. ( महा. तत्त्व. पा. ३७५, ३७६ पहा ).

## चक्रधरस्वामीकडून स्थित्यानंद

श्रीचक्रधरस्वामी हे उभयदृश्यावतार होते. पर आणि अवर अशा दोन्ही शक्ति त्यांनी स्वीकारल्या होत्या; इतकेच नाही तर त्या दोन्ही त्यांनी प्रगट केलेल्या होत्या. त्यांच्या उभयदृश्यावतारित्वामुळे वर वर्णन केलेले, पशुतिर्यंचासहित सर्व युक्तायुक्त मनुष्यदेहियांना कोणत्याहि काळी अर्जित व अनार्जित स्थित्यानंद देण्याचे सामर्थ्य त्यांच्या ठिकाणी होते. इतकेच नव्हे तर इतर सर्व अवतारापेक्षा त्यांच्या ठिकाणी हे सामर्थ्य विशेषत्वाने होते. " श्रीचक्रधरस्वामींच्या दर्शनाला अनुकूल नसलेला पण प्रतिकूलहि नसलेला उदास पुरुष गेला तरी त्याला दर्शनासरशी शिल्पेची स्थिति होत असे. आणि शिल्पेची स्थिति श्रीचक्रधरापासून झालेली असल्यामुळे तिला तूटसांद नसे. ती जात नसे ( अर्थात्, परमेश्वराने आकर्षण केल्याखेरीज, तसेच त्या स्थितिमंताच्या आग्रहाने किंवा त्याने स्वेच्छेने अविहित आचार वगैरे केले तर मात्र ती स्थिति जात असे. पण हा जीवाचाकड, परमेश्वराचाकड नव्हे ). उलट, इतर अवतारापासून झालेल्या स्थितीला तूटसांद असे. उदाः शुकाचार्याला गर्भातून बाहेर येण्यासाठी श्रीकृष्णाने चैतन्यविद्येची स्थिति दिली होती. शुक गर्भाबाहेर आल्याबरोबर ती गेली. परीक्षिति गर्भात असतांना त्यालाहि स्थिति दिली होती. त्यामुळे

त्याच्या मातेला बाण लागत नसत. पण परिक्षिति गर्भाबाहेर आल्यावर ती स्थिति नाहीशी झाली. श्रीकृष्णविरहाने दग्ध झालेली, गोकुळातील गोप गोपिकांची अंतःकरणे श्रीकृष्णाच्या पुनर्दर्शनानेहि शांत न होता जळतच होती. तेव्हां त्यांना शांत करण्यासाठी श्रीकृष्णाने स्यमंतपंचकाच्या वेळी त्यांना चैतन्यविद्येची स्थिति संचरली. त्यामुळे त्यांना आल्हाद वाटला. पण नंतर श्रीकृष्णाने ती स्थिति आकर्षून घेतली. सारांश, श्रेष्ठ युगातील, उत्तम काळातील भावविशिष्ट सेवकांना श्रीकृष्णाने दिलेली स्थिति भावाच्या कणवेइतकीच असे, जास्त नसे. उलट कलियुगासारख्या हीन काळातहि श्रीचक्रधरापासून उदास पुरुषांनाहि स्थिति होत असे. आणि ती त्याने आग्रहाने किंवा अविहित आचरणाने गमावल्याशिवाय जात नसे. हा श्रीचक्रधरावताराचा विशेष होय." ( महा. तत्त्व. पा. २८२ ).

## दर्शन होताच स्थिति

श्रीचक्रधरस्वामींचे दर्शन झाल्याबरोबर लोकांना 'स्थिति' होत असे याची अनेक उदाहरणे त्यांच्या चरित्रात विखुरलेली आहेत. एक वेळ ते एका गावाहून दुसऱ्या गावी जात होते. रस्त्यात एक पाणपोई होती. तेथे ते आसन घालून बसले असतांना चांभाराचे एक जोडपे बाजारहाट करून परतत होते. ते पाणी पिण्यासाठी तेथे थांबले. स्वामींना पाहून त्या चांभाराने त्यांना दंडवते घातली. त्यांच्या तो पाया पडला. आपल्याजवळील चंचीतून सुपारीची खांडे त्याने स्वामींना अर्पण केली आणि तो स्वामींचे सौंदर्य अवलोकन करू लागला. तो त्यांच्याकडे पहातच राहिला. मागाहून त्याची बायको आली. ती आपल्या नवऱ्याला म्हणाली, " उठा ना, चला, गावाला परत जाऊ." तो हा म्हणाला, " थांब, जरा थांब." तिने तीनतीनदा त्याला उठण्यासाठी विनवणी केली, पण तो उठेना. शेवटी ती एकटीच निघून गेली. इकडे त्या चांभाराला स्वामीपासून स्थिति झाली. त्यामुळे त्याचे देहभान हरपले. आपण कोण होतो, हे तो विसरला. आपण देव आहोत अशी त्याला भावना झाली. तसाच तो अनेक गावी भटकू लागला. भटकता भटकता तो खोलनायकाच्या आंबेजोगाइला आला. त्याला देव मानून गावातील लोक आपापल्या घरी नेत, त्याची पूजा करीत आणि त्याला जेऊ

घालीत. कर्मधर्मसंयोगाने त्यावेळी त्याच्या गावचे काही चांभार तेथे बाजाराला आले. त्यांनी त्याला पाहिले आणि ते एकदम म्हणाले, " अरे, हा तर आमच्या गावचा चांभार आहे. इथे बेटा देव बनला आहे! त्याने सगळा गाव बाटवला ! " हे लोकांनी ऐकले तेव्हां त्यांनी त्या स्थितिमंत चांभाराला गावातील अधिकाऱ्यासमोर नेऊन त्याच्या विरुद्ध तक्रार केली. जगळदेव आणि विंझदेव हे तेथील अधिकारी होते. त्यांनी स्मृति जाणणाऱ्यांना बोलावून धर्मग्रंथात या पापाला प्रायश्चित्त कोणते ते विचारले. त्यांनी सांगितले की, याला चुन्याच्या खड्यात बसवा आणि वरून पाण्याच्या पखाली त्यात रिचवा. जगळदेव-विंझदेवांनी त्या चांभाराला चुन्याच्या खड्यात बसवले व वरून पाण्याच्या पखाली सोडल्या. ही शिक्षा पाहण्यासाठी तेथे लोकांचा मोठा समुदाय जमला होता. तितक्यात तिथे दुसरीकडून एक माणूस आला. त्याने विचारले, " येथे काय चालू आहे ? " लोकांनी त्याला हकीकत सांगताच तो म्हणाला, " अरे, तुम्ही त्याला काय शिक्षा देता ? तो तर पलीकडे बाजारात गळयात माळ घालून व तोंडात तांबूल घेऊन खेळत आहे ! " हा वृत्तांत ऐकून सगळयांना अतिशय आश्चर्य वाटले. चक्रधरस्वामींच्या स्थितीमुळे त्याला कोणाहिकडून काहीच अपाय होणे शक्य नव्हते. ( एकांक १२ )

दुसऱ्या एका प्रसंगी चक्रधरस्वामी एका बाजारामधे गेले. तेथे एक तेलीण तेल विकीत होती. तिने स्वामींना पाहिले आणि म्हटले, " आगा ए बरवीया जोगीया : येई : जावो माझेया घरा " असे म्हणून स्वामींचा हात धरून त्यांना ती आपल्या घरी घेऊन गेली. घरी तेली घाणा खेटीत होता. त्याला स्वामींनी म्हटले, " अरे बाबा, हे पहा, तुझ्या बायकोने मला ह्या ठिकाणी कशाला आणले ? " तो म्हणाला, " महाराज, माझ्या पापांचा नाश व्हावा म्हणून तिने आपणाला या ठिकाणी आणले. " असे म्हणून त्याने आपल्या घाण्यावरून उडी मारली. खाटेवर पासोडी अंथरली. त्यावर स्वामींना बसवले. आपण त्यांच्या पायाशी बसला. तिकडे तेलीण स्वामींच्या उपाहाराची तयारी करीत होती. नंतर त्या दोघांनाहि स्थिति झाली. ते दोघेहि देव आणि देवी होऊन राहू लागले. आपल्या स्थित्यानंदांत ते इतके दीर्घकाल मग्न होते की, श्रीचक्रधरस्वामी पुन्हा

त्या मार्गाने ज्या वेळेला गेले त्या वेळेला त्यांनी स्वामींना ओळखले देखील नाही. ( एकांक १८ )

सेंदुर्णी गावी नारायणाच्या देवळात काही मासोपवासिनी होत्या. स्वामी तेथे गेले. तेव्हां त्यांनी दरवाजातून आत डोकावून पाहिले. आणि मग बाहेरच ते ओस्र्यावर आसन करून बसले. आतून एक मासोपवासिनी बाहेर आली. तिने स्वामींच्या तोंडातील विडा प्रसाद म्हणून मागितला. स्वामींनी तिला विडा दिला आणि त्यामुळे तिला एकदम स्थिति झाली. बारा वर्षेपर्यंत तिने अन्नपाणी देखील स्वीकारले नाही, इतकी ती स्वतःला पूर्णपणे विसरून गेली. तिच्या बापाभावाला वाटले, तिला वारेच लागलेले आहे. त्यांनी पुष्कळ औषधपाणी केले, पण ती भानावर येईना. बारा वर्षानंतर ती किंचित् सावध झाल्यासारखी झाली, आणि तिने म्हटले की, " आता माझ्यासमोर होते ते पुरुष कोठे आहेत ? त्यांचे मला दर्शन होईल तरच मी जिवंत राहू शकेन." वडिलांनी विचारले, " ते पुरुष कसे आहेत ? " तेव्हां ती म्हणाली, " आताच नाही का ते इथून गेले ? " तिच्या वडिलांना फारच आश्चर्य वाटले. त्यांनी तिच्याजवळून स्वामींच्या खाणाखुणा विचारल्या आणि ते स्वामींच्या शोधासाठी निघाले. सुदैवाने स्वामी त्या सुमारास त्याच प्रदेशात भ्रमण करीत होते. त्यांना विनंती करून ते त्यांना त्या मासोपवासिनीकडे घेऊन गेले. स्वामींचे दर्शन होताच ती त्यांच्या पाया पडली. त्यामुळे तिची स्थिति विशेषच भराला पोचली. ( ए. २४ ).

अशाच प्रकारची स्थिति बाइसा, हासूबाई, सारंगपंडित, देमाइसा इत्यादि अनेकांना अनेक वेळा झाली होती. पूर्वार्ध काळात आरंभी आरंभी चांगदेवभट स्वामींच्या बरोबर असे. त्याला वारंवार स्थिति होत असे. कोंडेश्वरी असतांना त्याला स्थिति झाली तेव्हां त्याचे आसन त्याच्यासहित आकाशात उडून तो तेथील देवळाच्या कळसापर्यंत पोचला. तेथून तो देव--ळाच्या कळसाकळसाने जाऊ लागला. स्वामींच्या निरोपावरून घाटे हरिभटांनी ज्या वेळेला त्याला हटकले तेव्हां त्याची स्थिति भंगली. ( भा. २ पा. १६ ). एके दिवशी चांगदेवभट भिक्षा करून आले. झोळी काठीवर घालून ती काठी त्यांनी टेकून ठेवली, इतक्यात त्यांना स्थिति झाली. त्यामुळे चार प्रहरपर्यंत

ते त्यांच्याभोवती एकसारखे फिरत होते. (भा. २ पा. १७). स्वामींचे उपासनी या नावाचे एक शिष्य होते. एके दिवशी त्यांना स्थिति झाली. त्याच भरात ते रातांजन गावाला भिक्षेसाठी गेले. भिक्षा करीत असतांना ते नागवे होते. स्थितीच्या भरात कुणा एकाची वाटी त्यांनी उचलली, तर दुसऱ्याच्या चुलीतील जळते लाकूड घेऊन ते कुंपणावर टाकले. त्यामुळे ते कुंपण जळाले. अशी त्यांची सात दिवसपर्यंत स्थिति होती. (भा. ३ पा. २०). दुसऱ्या एका प्रसंगी सकाळची आरोगणा आटोपून स्वामी झोपले असतांना या उपासनीला स्थिति झाली. त्यासरशी ते उठले आणि तेल्याची लाठी घेऊन आले. त्या लाठीने स्वामींना बडवायचा त्याचा विचार होता. पण बाइसाने त्याचे निवारण केले. (भा. ३ पा. २२)

काकोस या नांवाचा एक शिष्य होता. तो एकदा द्वारावतीला जायला निघाला. त्यांच्याकडे पाहून स्वामींनी म्हटले, "आजच्या दिवस राहा, मग जा." असे म्हणून त्यांनी काकोसाचा हात धरून त्याला बसवले. त्यामुळे काकोसाला एकदम स्थिति झाली. त्या स्थितीच्या भरात त्याला काय दिसले ! सोन्याची द्वारका, तेथे सिंहासनावर सगळया यादवासहित जणु चक्रधरस्वामीच बसलेले आहेत असे त्याला दिसले. काही काळाने त्याची स्थिति भंगली. या स्थितिमुळे श्रीचक्रधरस्वामी म्हणजे श्रीकृष्णच होत अशी त्याला प्रतीति आली. (भा. ३ पा. ५३)

नाथोबा नावाचा एक शिष्य स्वामीजवळ बसला असतांनाच त्याला स्थिति झाली. त्याने आपले धोतर फाडले. स्वामींचे चरण आपल्या माथ्यावर धरून तो म्हणाला, "चक्रधरस्वामी, आता मी जातो बरे" असे म्हणून तो नदीकडे धावला. जवळ आउसा नांवाची शिष्यीण होती. ती म्हणाली, "थांब बाबा नाथोबा, जाऊ नकोस रे" म्हणून ती त्याच्या मागोमाग धावली, तो नाथोबा नदीच्या पाण्यात शिरला आणि आउसेला बोलावू लागला. थोड्या वेळाने त्याची स्थिति उतरली. (उत्त. ४२). एक वेळ ह्या नाथोबाला बाइसांनी चुलीत जाळ करायला सांगितले आणि ती स्वतः कामाला गेली. काम करून परत येते आणि पाहते तो काय ! नाथोबाला स्थिति झालेली असून तिच्या भरात त्याने आपले पाय चुलीत घातलेले

आणि चूल धडधडा पेटलेली ! बाइसा ओरडून म्हणाल्या, "अरे पोरा, हे तुला झाले तरी काय ? जळत्या चुलीत पाय काय घालून बसला आहेस ?" पण त्यांच्या म्हणण्याकडे नाथोबाचे लक्ष होते कुठे ? तेव्हां त्यांनी स्वामींना सगळी हकीकत सांगितली. स्वामी म्हणाले, "हे सगळे स्थितिमुळे झालेले आहे. जा, माझे नाव घेऊन त्याला बोलवा." स्वामींचे नाव घेऊन नाथोबाला हाक मारताच त्याची स्थिति भंगली. ( उत्त. ५४ ). बाकी येथील मठात स्वामी असतांना स्वामीजवळ हा नाथोबा होताच. तेथे एक जोगी आला, आणि जोगाचे भरमसाट महत्त्व वर्णन करू लागला. तेव्हां स्वामींनी म्हटले, "नाथोबा, हा जोगी काय म्हणतो ?" हे ऐकतांच नाथोबाला स्थिति झाली. तो म्हणाला, "अरे जोग्या, तुला मी आसन करून दाखवूं ?" नाथोबाने सुंदर रीतीने असे आसन करून दाखविले की जे त्या जोग्याला माहीतहि नव्हते. तरी तो म्हणाला, "अरे हे काय साधन आहे ? या जवळच्या डोहात 'देवता धाणा असे : धवळा बैलु असे : या डोहाआतु रीगे तो महात्मा." हे ऐकताच नाथोबाने त्या जोग्याचे पाय धरून त्याला उचलले आणि म्हटले, "चल दाखव मला," असे म्हणून त्याने त्याला फरफटत ओढीत नेऊन त्याच्यासहित डोहात उडी घातली आणि पुन्हा म्हटले, "दाखव कुठे आहे धवळा बैल, देवता ?" असे म्हणून तो त्याला बुचकळ्या देऊ लागला. स्वामींनी म्हटले, "नाथोबा पुरे आता." तेव्हां त्याची स्थिति भंगली आणि तो परत आला. ( उत्त २१८ ) स्वामींच्यापासून स्थिति झालेल्यांची अशी अनेक उदाहरणे आहेत.

## स्थानामुळे स्थिति

स्वामींच्या प्रत्यक्ष दर्शनानेच स्थिति होत असे असे नाही, तर त्यांच्या स्थानामुळेहि ती होत असे. रामटेक येथे असतांना स्वामी एका ओट्यावर बसत. तेथून निघून गेल्यानंतर तेथील पुजारी त्या ओट्याला धूपर्ती करीत असे. एके दिवशी एक ब्राह्मण त्या ओट्यावर बसला तोच त्याला स्थिति झाली. त्यामुळे पुजाऱ्याला विचारून स्वामींचा मार्ग काढीत काढीत तो त्यांच्या दर्शनासाठी निघाला. मनसरला स्वामींचे त्याला दर्शन झाले. आणि दर्शनामुळे त्याची स्थिति अधिकच उत्कर्ष पावली. ( एकांक २६ ).

## नामामुळे स्थिति

- स्थानाप्रमाणेच स्वामींच्या नावामुळेहि लोकांना स्थिति होत असे. नावामुळे स्थिति होणें म्हणजे स्वामींचे नाव ऐकताच संचार होऊन देहभान हरपणें. या प्रकाराचीहि अनेक उदाहरणे आढळतात.

लखुदेवोबा हे काही कामासाठी कटकदेवगिरीला जात असतांना करजाळे येथे आले. आणि नागदेवाच्या घरी गेले. पण नागदेव त्या वेळेला घरी नव्हता. घरात असलेल्या सामकोसाला त्याने विचारले, " काय ग, नागदेव कुठे गेला ?" तिने म्हटले, " तो गोसावियांच्या जवळ आहे." लखुदेवोबांनी विचारले, " हे गोसावी कोण ?" सामकोसाने सांगितले " गोसावी म्हणजे श्रीचांगदेवराऊळ. ते हल्ली हिवरळी येथे आहेत." श्री चांगदेवराउळाचे नाव ऐकताच लखुदेवोबाला स्थिति झाली. स्थितीच्या भरात स्वामींच्या मूर्तिसारखी मूर्ति एकसारखी त्याला आपल्या डोळ्यासमोर दिसत होती. तो तसाच निघाला आणि अहोरात्र वाट चालून हिवरळी येथे स्वामींच्या दर्शनाला गेला. दर्शन झाल्यानंतर मग त्याची स्थिति भंगली. (एकांक २५).

स्वामी वेरूळला असतांना महादेवराव जाधवाच्या दरबारातील सगळेच लोक त्यांच्या दर्शनाला जात असत. एके दिवशी महादेवराव दरबारात आला आणि पाहिले तो महत्त्वाचा असा एकहि दरबारी त्या ठिकाणी हजर नव्हता. त्याला आश्चर्य वाटले. त्याने रागावून विचारले, " तुम्ही सगळे नेहमी कुठे जात असता ?" दरबारी म्हणाले, " वेरूळला जे पुरुष येऊन राहिलेले आहेत त्यांच्या दर्शनाला." महादेवरायाने विचारले, " त्यांचे नाव काय ?" " चांगदेवराऊळ " असे उत्तर मिळताच, नाव ऐकताक्षणीच महादेवरायाला स्थिति झाली. (भा. २. पा. ४७).

महदाइसेचे वडील वायनायक हे उमाइसेला भेटायला गेले. गावी पोचल्यावर ते पाय धुवू लागले. एक पाय धुवून झाला. दुसरा धुणार तोच उमाइसाने म्हटले, " रूपैचे (महादाइसेचे) गुरु श्रीचांगदेवराऊळ आलेले आहेत." स्वामींचे नाव ऐकताच त्यांना एकदम स्थिति झाली. त्यासरशी उमाइसाच्या हातून आपला पाय ओढून घेऊन ते तसेच धावत

निघाले. बाजारात गेले. पानसुपारी आणि फुलांची माळ विकत घेऊन स्वामींच्या दर्शनाला ते जाऊं लागले. हे सगळे सामान त्यांनी धोतरात घेऊन ते हातांनी धरले होते. लोक विचारीत, " नाईक, हे काय ? अशी घाई का ?" वायनाईक उत्तर देत, " अहो, रूपैचे गुरु आले आहेत, चांगदेवराऊळ आले आहेत त्यांना मी भेटायला जात आहे. " असे म्हणून त्या दिशेकडे हात दाखवतांना गडबडीने आपले धोतरच ते वर करीत असत. स्वामींच्या दर्शनानंतर त्यांची स्थिति भंगली. ( ली. च. भा. ३ पा. ९६ ). वायनायकाचा एकुलता एक मुलगा ( महदाइसेचा धाकटा भाऊ ) आपलो एके दिवशी द्यूतात द्रव्य गमावून घरी आला तेव्हां त्याच्या आईने उद्वेगाने म्हटले की, " जाए का ऐसा : जैसी रूपै गेली श्रीचांगदेवो राउळापाठी : तैसा तूं जाए का : " चांगदेवराउळांचे म्हणजे स्वामींचे नाव कानावर पडताच आपलोला स्थिति संचरली आणि तिच्या भरात तो लागलीच ' हिवरळी ' येथे स्वामींच्या दर्शनाला गेला. ( भा. ३ पा. १०१ ).

स्वामींच्या दर्शनामुळे, स्थानामुळे आणि नामामुळे स्थिति कशी होत असे याची या उदाहरणांवरून चांगली कल्पना येईल. ही स्थिति पुरुषांनाच होत असे असे नाही तर स्त्रियांनाहि होत असे. ती जशी प्रौढांना होत असे तशीच लहान मुलांनाहि होत असे. डखले चांगदेव हा लहान मुलगाच होता. ही स्थिति ब्राह्मणासारख्या श्रेष्ठ वर्णांतीलच व्यक्तींना व्हायची असेहि नाही. ती तेली, तांबोळी, महार, चांभार, सर्वांना होत असे. तसेच ती फक्त मनुष्यप्राण्यांनाच होत असे असेहि नाही तर पशूंनाहि होत असे. एलिचपूर येथे असतांना स्वामी गरुडघोड्यावर बसून देवळाकडे जात असत. स्वामी पाठीवर बसलेले असल्यामुळे त्या गरुडघोड्याला स्थिति होत असे आणि त्या स्थितीतच तो धावत असे. ( एकांक ३९ ). एकवेळ चांगदेवीहून स्वामी सावळदेवाकडे जात होते. रस्त्यात एका वाघाने त्यांना पाहिले आणि

---

१. स्वामींच्या प्रयाणानंतर हा आपलो मोठा कर्मठ देवताभक्त बनला होता. मोठा देव्हारा करून राहणे घालणे ( अंगात आणणे ) हा त्याचा नित्यक्रम असे. पण पुढे महदाइसेच्या तोंडून ' श्रीचक्रधराचे नाव ऐकल्यावर याने देवता पाण्यात सोडल्या व तो नागदेवाचार्याजवळ अनुसरला. ( ली. च. उत्त. ५ ).

त्यासरशी त्याला एकदम स्थिति झाली. स्थितीच्या भरात तो स्वामींना सामोरा आला. बाइसा भ्याल्या. स्वामींनी त्यांना ‘भिऊ नका’ म्हणून सांगितले. बराच वेळपर्यंत तो त्यांच्या मागे मागे आला. शेवटी स्वामींनी त्याला सांगितले, “महात्मा, आता आपण जा.” तेव्हां तो गेला. यावरून मनुष्याप्रमाणेच पशूंनाहि स्वामींच्याकडून स्थिति कशी होत असे याची कल्पना येईल. (भा. ३ पा. ६७).

## मृत्यूवर नियंत्रण

श्रीचक्रधरस्वामी परमेश्वरावतार असल्यामुळे मृत्यूवर त्यांचे नियंत्रण असणे स्वाभाविक आहे. नागदेवाचार्यांचा मृत्यु त्यांनी चुकवला होता असे महानुभाव लोक मानतात. नागदेवाचार्यांच्याकडून पंथाचे कार्य त्यांना करवून घ्यायचे होते. त्यासाठी त्यांना जिवंत ठेवायचे होते म्हणूनच त्यांनी हे केले. भांडारेकर स्वामींच्या बरोबर होते तेव्हां त्यांच्या आयुष्याच्या अंतिम घटिकेला स्वामींनी त्याला विचारले की, “भटो काळवंचना करु?” म्हणजे “तुझा मृत्यु मी चुकवूं का?” भांडारेकरांनी ‘नाही’ म्हटल्यामुळे मृत्यु चुकवण्याचा प्रश्नच निर्माण झाला नाही ही गोष्ट निराळी. पण यावरून त्यांच्या ठिकाणी असलेल्या सामर्थ्याची कल्पना येईल. (एकांक ३२).

पण ही कल्पना येण्यासाठी मृत्यूवर त्यांचें नियंत्रण असल्याचे सूचक असे हे अप्रत्यक्ष प्रसंगच कशाला पाहिजेत? त्यांनी मृत्यु चुकविल्याची, नव्हे–मृतांना जिवंत केल्याची उदाहरणेहि त्यांच्या आयुष्यात घडलेली आहेत. एकाकी भटकत असतांना स्वामी एक वेळ रावेरला होते. त्याच गावात वामन पेंदी या नांवाचा एक ब्राह्मण राहात होता. एके दिवशी त्याची बायको मेली. तिरडीवर बांधून तिचे प्रेत स्मशानांत आणले. त्यावेळी वामन पेंद्याने सहज दृष्टि टाकली तो त्याला स्वामींचे दर्शन झाले. तो धावत धावत स्वामीजवळ गेला. त्यांच्या पाया पडला आणि म्हणाला, “महाराज, आपली दासी मेली हो. आपल्याला ती पाणीपात्र भिक्षा घालीत असे. ती आता गेली हो.” हे ऐकून स्वामी तिच्या प्रेताजवळ आले आणि म्हणाले, “बाई, मी आलो आहे. मला भिक्षा वाढा पाहूं.” स्वामींच्या

मुखातून हे शब्द बाहेर पडताच वामन पेंद्याची बायको जिवंत झाली. सगळी मंडळी घरी गेली आणि तेथे स्वामींनी वामन पेंद्याकडून भिक्षा स्वीकारली. ( एकांक ४५ ).

दुसऱ्या एका प्रसंगी स्वामी खडकुळीला असतांना जवळच असलेल्या वाडेगावच्या एका माळ्याला सर्पदंश झाला. त्याचे विष उतरविण्याचा अनेकांनी प्रयत्न केला. पण काही उपयोग न होता शेवटी तो माळी मेला. तेव्हां जवळ असलेल्या लोकांपैकी एकाने म्हटले, "अरे, खडकुळीला जे पुरुष आहेत ते स्वतःला ईश्वरपुरुष म्हणवतात. त्यांच्या पायावर याला नेऊन घाला. त्यांच्यात खरोखरच काही सामर्थ्य असेल तर ते याचे अजूनहि रक्षण करतील." ही सूचना ऐकताच त्या माळयाला निंबाच्या पानात गुंडाळून स्वामींच्या मठाकडे आणले. त्याचवेळी नागदेवाचार्य आणि लखुदेवोबा हे भिक्षेला निघाले. त्या लोकांना पाहून नागदेवाचार्य म्हणाले, "लखुदेवा, स्वामी आता याचे कसे संरक्षण करतील ?" ते दोघेहि भिक्षेला निघून गेले. त्याचवेळी आउसा गुंफेबाहेर जात होती. तिला गाठून मृत माळ्याच्या स्त्रीने म्हटले, "आई, स्वामींना आपण सांगा की सर्पदंश होऊन मेलेल्या या माळ्याला आपण जीवदान द्या. मुलाबाळांनी भरलेल्या माझ्या घराला आग लागली हो. आता मी कसे करू ?" असे म्हणून ती रडूं लागली. आउसाला तिची कीव आली, ती लागलीच स्वामीजवळ गेली आणि म्हणाली, "जी जी स्वामी जगन्नाथा, गरीब बिचाऱ्या माळ्याला सर्प चावला आहे, त्याला इथे आणलेले आहे बिचारी माळीण खूप आकांत करते. मुलाबाळांनी गजबजलेल्या तिच्या घराला आग लागली असे म्हणते. तरी जगन्नाथा, तिचे आपण रक्षण करा." स्वामींनी म्हटले, "पलीकडून एक वाटी घेऊन या." आऊसा वाटी घेऊन आली. तिच्याकडून आपले चरणक्षाळण करवून ते चरणोदक स्वामींनी आउसाजवळ दिले आणि म्हटले, "तोंडावर शिंपा, उरावर शिंपा, पाठीवर शिंपा." आउसा वाटी घेऊन बाहेर आली. तिने ते प्रेत सोडायला सांगितले आणि स्वामींनी सांगितल्याप्रमाणे त्याच्या अंगावर स्वामींचे चरणोदक शिंपडले तोच माळी जिवंत झाला. तो डोळे उघडून पाहू लागला. त्यावेळी सगळयांना आनंद झाला हे काय सांगायला पाहिजे ! ( उत्त. १० )

काउळगावला एक माळीण राहात असे. तिच्या जिभेला काही रोग झालेला होता आणि त्यामुळे ती मेली. तिला आणून एकवीरेच्या देवळात घातले. साधे जेव्हां त्या देवळाकडे गेली तेव्हां तिने पाहिले तो त्या माळिणीच्या तोंडातून तिची जीभ बाहेर आली होती. आणि जिभेला पुष्कळ माकोडे आणि मुंगळ्या लागलेल्या होत्या. ते पाहून साधे स्वामीजवळ आली आणि म्हणाली, "जी जी, बिचाऱ्या माळिणीची जीभ एवढी तोंडाबाहेर निघाली आहे. तिला माकोडे मुंगळ्या लागलेल्या आहेत." साधेने असे म्हटले, पण माळिणीला जिवंत करण्यासाठी स्वामींना विनंती करण्याचा धीर तिला होईना. पण तिचा मनोभाव जाणून स्वामींनी तिला एक वाटी आणायला सांगितली. त्या वाटीत तोंडातील तांबूलाची पीक टाकून म्हटले, "यातील एक एक थेंब तिच्या जिभेवर घाला." साधेने त्याप्रमाणे करताच माळीण जिवंत झाली. डोळे उघडून पहायला लागली. तिची जीभ तोंडात गेली. पण तिला बोलता मात्र येईना. साधेने स्वामींना पुन्हा विनंती केली. तेव्हां स्वामींनी पाणीभाताचा प्रसाद तिच्याजवळ दिला आणि तो थोडा थोडा तिच्या तोंडात घालायला सांगितला. त्याचा परिणाम म्हणून ती माळीण पूर्णपणे दुरुस्त झाली आणि बोलूहि लागली. ( उत्त. ५९ ). या तिन्ही प्रसंगावरून स्वामींच्या ठिकाणी मृतांना संजीवनी देण्याचे सामर्थ्य कसे होते याची कल्पना येईल.

## रोगपरिहाराचे सामर्थ्य

ज्यांच्याजवळ मृतांना जिवंत करण्याचे सामर्थ्य होते ते रोगपरिहारादि इतर गोष्टी सहज करू शकत हे सांगायलाच नको. आपल्या परिभ्रमणामध्ये स्वामींना जिथे जिथे दुःख आढळले तिथे तिथे ते नाहीसे करण्याचा प्रयत्न त्यांनी केला. एखाद्या गावी ते जाऊन पोचले म्हणजे आपल्या रोगदुःखादिकांची गाऱ्हाणी घेऊन लोक त्यांच्या चरणापाशी यायचे आणि त्यांच्या दयामृताची अपेक्षा करायचे. स्वामींनी अनेकांच्या अंगी असलेल्या भूतबाधा किंवा ग्रहपीडा नष्ट केल्या. एकाकी असतांना ते एका व्यापाऱ्याच्या घरी पाणीपात्राला गेले. त्या व्यापाऱ्याच्या मुलाला ग्रहबाधा झालेली होती. त्याची सुंदर मूर्ती सारवळदंडांनी एका खांबाला

आवळली असून त्यावर तेल ओतलेले आहे, असे दृश्य त्यांना दिसले. त्याची ग्रहबाधा काढण्यासाठी अनेक पंचाक्षऱ्यांनी प्रयत्न केले, पण कुणालाहि त्यात यश आले नाही. आरंभी आरंभी तो मुलगा खूप बोलायचा; पण कांही दिवसानंतर तर त्याचे बोलणेहि बंद झाले. अशा स्थितीत असतांना स्वामी तेथे पाणीपात्रासाठी गेले. समोरच्या बाजूला मोरी होती म्हणून ते मागच्या बाजूला गेले. त्या ग्रहाने स्वामींना पाहिले; आणि तो एकदम म्हणू लागला, "अरे, मला सोडा रे. मला या स्वामींच्या जवळ जाऊ द्याल तर मी तुमच्या मुलाला सोडीन. आणि मीहि ह्या ग्रहत्वापासून सुटेन." घरातील लोकांनी विचार केला की, मुलगा इतके दिवस मुळी बोलेचना. आता हा बोलायला लागला आहे तर याच्या म्हणण्याप्रमाणे याला एकवेळ सोडू या. आपण इतके जण या ठिकाणी असतांना हा पळून जातो कुठे ? असा विचार करून त्यांनी त्याला सोडले. एवढ्या वेळात स्वामी भिक्षान्न घेऊन नदीतीरावर गेले आणि आरोगणा करू लागले. इतक्यात तो ग्रह तेथे गेला, स्वामींच्या पाठीमागे बसला, आणि म्हणाला, "जी जी, मला आपला प्रसाद द्यावा जी. आपला उच्छिष्ट प्रसाद मला द्याल तर माझे पाप तरी नष्ट होईल." असे म्हणून त्याने आपल्या पूर्वीच्या पापांचा इतिहास स्वामींना सांगितला. तेव्हां स्वामींनी आपल्या आरोगणास्थानी उच्छिष्ट प्रसाद मुद्दाम ठेवला. स्वामी तेथून निघून गेल्यानंतर त्याने त्या प्रसादाचे शीत न् शीत वेचून खाल्ले तेव्हां स्वामी त्या व्यापाऱ्याला म्हणाले, "आता तुम्ही तुमच्या मुलाला पकडा, नाही तर हा एकदम खाली पडेल." ग्रहाने उच्छिष्ट प्रसाद खाल्ल्याबरोबर तो मुक्त होऊन त्या मुलाचे शरीर सोडून गेला. (एकांक १९).

## भुताखेतांचा परिहार

स्वामी पैठण येथे असतांना (ग्रह)सारंगपाण्याची भूतबाधा त्यांनी नाहीशी केली. त्याचे असे झाले की, रामदेवाचा सोयरा सारंगपाणी ह्याला भुताने पछाडले होते. त्याच्या आईने रामदेवाला म्हटले, "रामा, तुला जर काही माहीत असेल तर या सारंगपाण्याच्या आंगची भूतबाधा तरी काढ बाबा !" रामदेव म्हणाला, "हे काम माझ्याकडून होईलच असे नाही; पण पैठणला भोगनारायणाच्या देवळात उतरलेले आमचे स्वामी

श्रीचक्रधर हे मात्र खात्रीने त्याची भूतबाधा काढतील. तेव्हां बळद्दे गावाहून सारंगपाणी, त्याची आई, चांगदेवभट वगैरे सगळी मंडळी पैठणला स्वामींच्या दर्शनासाठी आली. स्वामींचे दर्शन घेऊन त्यांनी आपले गाऱ्हाणे त्यांच्यासमोर मांडले. तेव्हां स्वामी बाइसाला म्हणाले, "बाई, थोडा पाणीभात शिल्लक असेल तर त्याच्या तीन मुदा करून याच्यावरून ओवाळा पाहू!" बाइसाने सारंगपाणीकडे पाहिले आणि म्हटले, "बाबा, हा तर अगदी सावध दिसतो. याच्या अंगी कुठला आला आहे ग्रह?" स्वामी म्हणाले, "एकच नाही, तीन ग्रह याला लागलेले आहेत. आमच्या दर्शनाला त्यांना येणे शक्य नव्हते म्हणून ते महारवाड्याच्या बाजूला काटेरी झाडावर बसून राहिलेले आहेत." बाइसांनी स्वामींच्या सांगण्याप्रमाणे पाणीभाताच्या तीन मुदा करून सारंगपाण्यावरून त्या ओवाळून टाकल्या. आणि तेव्हांपासून त्याची भूतबाधा कायमची नष्ट झाली. ( भा. २ पा. ५ ). अशाच रीतीने आपला उच्छिष्ट प्रसाद देऊन स्वामींनी शांतिबाइसाच्या जसमाइसा नावाच्या मुलीचे कावरे फेडले ( भा. २ पा. ३९ ), आपेगावच्या अनंतदेव नावाच्या ब्राह्मणाचे जारणमारणापासून संरक्षण केले ( भा. ४ पा. २८ ), लक्ष्मीदेवाच्या अंगातील ग्रह नुसते दर्शन देऊनच दवडला. ( भा. ३ पा. २३ ). अशा अनेक कथा आहेत.

### ज्वर-परिहार

इतरांचा ज्वर नाहीसा करण्याचीहि कृपा स्वामींनी अनेकदा केली. कित्येकदा ते दुसऱ्याचा ज्वर स्वतः घेत असत. एका गावी एका म्हातारीचा मुलगा गाई राखण्याचे काम करीत असे. त्या गावी स्वामी एका झाडाखाली बसले होते. त्या दिवशी त्या गुराख्याला ताप आला. त्याची आई स्वामीकडे येऊन म्हणूं लागली, "जी जी, माझ्या मुलाला ज्वर आलेला आहे. राखणीसाठी आमच्याकडे असलेली गुरे मालक आता दुसऱ्याच्या स्वाधीन करतील म्हणजे आम्ही मेलोच." तिची ती अनुकंपनीय दशा पाहून स्वामी तिच्या घरी गेले. आंगावर पांघरूण घेऊन ते स्वतः त्या मुलाप्रमाणे पडून राहिले. त्याचा ताप त्यांनी आपल्या अंगी घेतला व त्या मुलाला गुरे राखायला पाठवून दिले. त्यांचे ते कृत्य पाहून त्या म्हातारीला अतिशय आनंद झाला. काही दिवसांनी यांच्या अंगचा ताप निघून गेला. ( एकांक ३५ )

कधी कधी आपल्या चरणोदकाने ते इतरांचा ज्वर नाहीसा करीत. रेई-नायकाला एकवेळ ताप आला. नऊ दिवस त्याला उपवास पडले; पण ताप जाईना. नागोबा नांवाच्या त्याच्या मुलाने स्वामींचे दर्शन घेतले तेव्हां रेई-नायकाचा ज्वर नाहीसा करण्यासाठी स्वामींनी त्याजबरोबर आपले चरणोदक पाठविले, ते प्यायला सांगितले, त्याने आंग शिंपायला सांगितले आणि दुसऱ्या दिवशी त्यानेच आंघोळ करायला सांगितली. नागोबा ते चरणोदक घेऊन घरी गेला. त्याने आपल्या वडिलांना चरणोदक पाजले. त्यामुळे रेईनायकाच्या अंगातील ताप गेला. नंतर त्याने ते पाणी त्याच्या अंगावर शिंपडले. त्यामुळे वरील ताप नाहीसा झाला. उरलेले चरणोदक दुसऱ्या दिवशी स्नानाच्या पाण्यात घालून त्याने आंघोळ केली. त्यामुळे तो खडखडीत बरा झाला. इतका की तो स्वतः स्वामींच्या दर्शनाला जाऊ शकला. ( उत्तरार्ध ७४ )

मंडळिकाला ज्वर आला त्या वेळेला तर त्याच्यावरून पाणीभाताच्या मुदा ओवाळून टाकून स्वामींनी तो घालवला. त्याचे असे झाले की, एकवेळ काही कामासाठी नाथोबा एका गावाला गेले होते. दोन प्रहरच्या वेळी ते देवळात गेले. पण तेथे देवता असल्यामुळे त्यांना तेथे राहता येईना. त्या रागाच्या भरात त्यांनी देवतांना शिव्या दिल्या आणि त्यामुळेच त्यांना ताप आला. देवतांनी हे गाऱ्हाणे चक्रधरस्वामीपाशी नेले. तितक्यात तिकडून नाथोबाहि तापलेल्या अंगाने परत आले. तेव्हां स्वामींनी त्यांना म्हटले, "नाथोबा, असा एकदम ताप का आला ?" नाथोबा म्हणाले, "जी जी, ते मी नेणे." स्वामी म्हणाले, "तूं देवतांना शिव्या दिल्यास का ?" नाथोबांनी आपला अपराध कबूल केला. स्वामी म्हणाले, "त्यामुळेच तुला ताप आला आहे." मग त्यांनी बाइसाला सांगितले, "बाई, याते पाणीभाताची मूद करूनि वोवाळा." बाइसांनी तसे करताच त्याचा ज्वर गेला. (उत्त. १९३ ).

कित्येक प्रसंगी ज्वरपीडिताकडून स्वामी काही काम करवून घेत आणि अशा रीतीने त्यांचा ज्वर नाहीसा करीत. पूर्वार्धकाळात ते डोमेग्रामी असतांना एकवेळ दाइंभागवताला ताप आला. त्याने आपला ताप नाहीसा करण्याविषयी स्वामींना विनंती केली. तेव्हां स्वामी म्हणाले, "आधी

आमच्यासाठी एक ओटा तयार कर. मग तुझा ताप घालवीन." दाइंभागवताने स्वामींच्या आज्ञेप्रमाणे ओटा तयार करताच तो खडखडीत बरा झाला. ( भा. २ पा. ६१ ). दुसऱ्या एका वेळी ह्याच दाइंभागवताला ताप आला होता आणि तो काही केल्या जाईना. तेव्हां स्वामींनी त्याला ओट्यावर चणा पिटायला सांगितला आणि त्याचा ताप घालवला. ( भा. २ पा. ). ज्वराप्रमाणेच इतर रोगांचाहि परिहार स्वामी आपल्या सामर्थ्याने तांबूळ वगैरे देऊन करीत असत. एका बाईला पोटशूळ झाला होता. नाना प्रकारची औषधे देऊनहि तो बरा होईना. स्वामींनी आपल्या मुखातील तांबूळ तिला दिले. ते तिने सेवन केले आणि त्यामुळे तिचा पोटशूळ गेला. ( भा. ३ पा. ४७ ).

महदाइसेचाहि पोटशूळ त्यांनी केवळ आपल्या कृपेने घालविला. पोटशूळ उठल्यामुळे आपल्याला उडदाचे अन्न सहन होत नाही असे तिने सांगताच स्वामींनी तिला मुद्दाम उडदाचे वडे तयार करायला सांगितले. ते स्वतः स्वीकारले आणि त्या दिवसापासून महदाइसेला वडेच काय पण इतर सगळे पदार्थ सहन होऊ लागले. ( भा. ३ पा. ९८ ). लाहीभट नावाच्या गृहस्थाला टिळा व तांबूळ सहन होत नसत. टिळा लावला म्हणजे याचे कपाळ दुखायचे आणि तांबूळ घेतला म्हणजे त्याला वांती व्हायची. तो स्वामींच्या दर्शनाला आला असतांना त्याने ही गोष्ट त्यांना सांगितली. तेव्हां स्वामींनी नागदेवाला म्हटले, "वानरेया : यासि टीळा लावा : तांबोळ देया :" लाहीभटाने म्हटले, "जी जी, मला हे सहन होणार नाही." स्वामींनी म्हटले, "ह्या वेळी तर घेऊन पाहा. सहन होणार नाही तर पुन्हा घेऊ नका." नागदेवाचार्यांनी त्याला टिळा लावला आणि तांबूळ दिला. पण त्यामुळे लाहीभटाला काहीहि झाले नाही. त्या दिवसापासून त्याला दोन्ही गोष्टीपासून त्रास होईनासा झाला. ( उत्त. २४ ). अशाच रीतीने स्वामींनी पानुनायकाचा ताप नाहीसा केला व त्याची दीपनशक्ति वाढविली. ( भा. ३ पा. ७६ ).

गौराइसाचे पोट दुखणे त्यांनी आपले यज्ञोपवीत बांधून थांबवले. एके दिवशी आबाइसा, गौराइसा, इंद्रोबा यांनी स्वामींना यज्ञोपवीत अर्पण

करून त्यांची पूजा केली. तेथून ते आपल्या गावी जायला निघाले. वाटेत गौराइसाचे पोट दुखायला लागले. तेव्हां आबाइसाने इंद्रभटाला स्वामीकडे पाठवले. गौराइसाच्या पोट दुखण्याची हकीकत कळताच स्वामींनी आपल्या कंठातील यज्ञोपवीत त्याजजवळ दिले आणि ते गौराइसाच्या पोटावर बांधायला सांगितले. त्यामुळे तिची उदरव्यथा ताबडतोब थांबली. (भा. ३ पा. १९२)

## इतर काही चमत्कार

कोण्या एका गावी असतांना स्वामी एका देवळात उतरले होते. तेथील पुजारणीचे नाव लळिताइसे. तिच्या पायाला काळस्फोट झाला. त्यामुळे ती रात्री एकदम विव्हळायला लागली. काही केल्या तिला त्या काळस्फोटाचे दुःख सहन होईना. पहाटच्या वेळी स्वामींनी तिचा तो फोड पाहिला. तिचा पाय आपल्या हाताने धरून त्या फोडावर त्यांनी "पीक घातली." त्यासरशी तिची व्यथा होती ती नाहीशी झाली आणि तिला गाढ झोप लागली. नंतर बाइसांनी विचारले, "बाबा, हिचा फोड तर लहान होता; आणि ही बाई त्यामुळे रात्री चार प्रहरपर्यंत एकसारखी विव्हळत का होती?" स्वामी म्हणाले, "फोड लहान असला तरी तो काळफोड होता. आमच्या लक्ष्यात जर ही गोष्ट आली नसती तर बिचारीचा प्राण गेला असता." सारांश, एवढी प्राणांतिक तीव्र व्यथा स्वामींनी नुसती पिंक टाकून बरी केली. (भा. ४ पा. ५७). एल्हाइसाच्या आग्रहाने ज्या वेळेला ते तिच्या घरी राहिले त्या वेळेला त्यांनी तिला एक अट घातली की, आपणच गहू दळून, सोजी काढून, सेव वळून आणि ते तळून त्याचे लाडू बांधशील तर आम्ही राहू. एल्हाइसाने ते कबूल केले आणि त्याप्रमाणे ह्या सगळ्या गोष्टी तिने एकटीने केल्या. त्यामुळे तिचे दोन्ही हात फोडांनी भरून गेले, कुंकवासारखे लाल झाले. ते पाहून बाइसा म्हणाल्या, "बाबा, बटिकीचे दोन्ही हात फोडी भरिले असतीः" तेव्हां स्वामींनी तिच्या हातावर आपल्या मुखातील पीक घातली आणि दोन्ही हात तिला घासायला सांगितले त्यामुळे हाताची व्यथा नाहीशी होऊन फोड बसले. (भा. ३ पा. १२०)

स्वामींच्या तांबूळाचे सामर्थ्य दाखविणारीहि एक आख्यायिका उपलब्ध आहे. एकाकी भटकत असतांना स्वामी दोन गावामधील एका

झाडाखाली आसन घालून बसले होते. एकाच्या शिवारात गुरे चारण्यावरून दोन्ही गावच्या दोन गुराख्यामधे भांडण झाले. ते भांडण पुढे पुढे इतके वाढले की, कितीहि निवारण केल्याने ते गुराखी आटोपेनात. तेव्हां स्वामींनी एका गुराख्याला चाडकन हाणले. त्यामुळे त्याचा एक डोळा खाली पडला. तदनंतर त्यांचे भांडण शांत झाले. मग स्वामींनी खाली पडलेला डोळा घेऊन जागच्या जागी बसवला. आणि त्यावर " श्रीमुखीचेया तांबोळाची पींक बांधली " त्यामुळे डोळा पूर्णपणे बरा झाला. ( एकांक २७ ).

स्वामींच्या ठिकाणी असलेले हे अलौकिक सामर्थ्य आणखी दोन तीन आख्यायिकावरून दिसून येते. एक वेळ स्वामी सकाळच्या वेळी नदीवर विहरणासाठी गेले होते. नदी दुथडी भरून वाहात होती. त्यावेळेला त्यांनी नागदेव आणि नाथोबा ह्यांना पुरात उड्या घालायला सांगितले. त्याप्रमाणे त्यांनी उड्या घातल्या. पुरातून नागदेवाचार्य सरळ थडीवर आले; पण नाथोबा मात्र पुरातून वाहून जात होता. तेव्हां स्वामींनी त्याला आपल्या अलौकिक सामर्थ्याने वाचवले. त्यांनी आपल्या हातातील वस्त्र नुसते गरगर फिरवल्याने नदीतील पाणी कमी होऊन नाथोबाला आपण गुडघ्याएवढ्याच पाण्यात उभे आहोत असे वाटले आणि तो काठावर सुखरूप येऊन पोचला. ( उत्त. ७९ ). दुसऱ्या एका वेळी देइगावची एक स्त्री पिंपळ शिंपण्यासाठी आली. तेव्हां दुरून तिला स्वामी दिसले. त्यांचे दर्शन घेण्याची तिला इच्छा झाली. तो समोर नदी दुथडी भरून वाहत होती. तथापि दर्शनाच्या तीव्र उत्कंठेमुळे ती नदीतून स्वामीकडे येऊ लागली. आणि येता येता ती वाहून जाते की काय असे पाहणारांना वाटू लागले. पण स्वामींच्या कृपेने ती नदीकाठावर सुखरूप येऊन पोचली.

जात्यंधाला दृष्टि देण्याचेहि सामर्थ्य स्वामींच्या ठिकाणी होते. पैठ-णला नागनाथाच्या देवळात ते बसले होते. तिथला शंख वाजवणारा जात्यंध होता. तो स्वामींच्याजवळ येऊन बसला. तेव्हां स्वामी त्याला म्हणाले, " जा पिंपळेश्वराची पूजा पाहून या. तो गेला. आश्चर्याची गोष्टी अशी की गेल्याबरोबर त्याला दृष्टि आली. त्याला तेथील देऊळ दिसले, नदी दिसली, त्याने येऊन त्या समळ्या पूजेचे वर्णन स्वामींच्या समोर केले. एवढे

झाल्यावर त्याची दृष्टि कायमच राहिली. ( उत्त. ३७३ ). स्वामी वेरूळला असतांना ब्रह्मसानु याने त्यांना विषमिश्रित सुपारीची खांडे देण्याचा प्रयत्न केला. पण आपल्या अलौकिकत्वामुळे स्वामींना ही गोष्ट आधीच कळल्याने त्यांनी त्या सुपारीच्या खांडाकडे नुसते पाहून तेथील विष नाहीसे केले. ( भा. २ पा. ३५ )

सारांश, परमेश्वरावतार श्रीचक्रधरस्वामी आपल्या ठिकाणी असलेल्या विज्ञानादि अनेक सामर्थ्यामुळे नाना प्रकारची लीळा-चरित्रे करीत महाराष्ट्रात परिभ्रमण करीत असत. लौकिक दृष्टीने पाहिल्यास दुःखितांचे दुःख निवारण करणे, त्यासाठी आपल्या सर्व शक्ति कामी लावणे हेच या संतपुरुषाचे जीवितकार्य होते. त्यासाठीच महाराष्ट्रात त्यांचे अखंड परिभ्रमण चालू होते.

# ८

# स्वामींच्या मठात

## अखंड परिभ्रमण

स्वेच्छेने अखंड परिभ्रमण करीत राहणे हा स्वामींच्या जीवन-चरित्रातील एक अत्यंत महत्त्वाचा विशेष होय, हे आपण पाहिले. आपल्या इच्छेला येईल त्यावेळी ते ग्रामांतर करीत. कधी कधी एखाद्या भक्ताने त्यांना आपल्या गावी येण्याबद्दल विनंती करावी, तर क्वचित्, त्यांना ग्रामांतराची इच्छा झाल्यानंतर तेथील मंडळींनी त्यांना आग्रहाने ठेवून घ्यावे, असे होत असे. हिवरळीहून निघण्याची तयारी झाल्यानंतर ( गोसावी-यासि गावा निगावीयाची प्रवृत्ति : गोसावी बाइसाकरवि आइत करवीली ) त्यांना 'अवधीचि राहावीते होती'-राहण्याचा सर्व जण आग्रह करू लागले. 'परि गोसावियासि निगावयाची प्रवृत्ति :' शेवटी येल्हाइसाने 'फुटेया पीळा घेतला'-स्वामींच्या फुटयाला पीळ देऊन आग्रह केला, त्यावेळी ते राहिले. ( भा. ३ पा. ११९ ). पण नेहमी ते अशा आग्रहाला बळी पडत असतच असे नाही. एकदा पाटवधा गावाहून ते माभाकवळीकडे जात असतांना मधेच बाइसांनी त्यांना जांबलेड्याकडे चालण्याची विनंती केली. स्वामींनी उत्तर केले, "बाइ : एथ प्रवृत्ति नाही." "बाबा, नाही म्हणू नका-जांबलेड्याला चला" अशी बाइसांनी पुन्हा विनंती केली. तेव्हां स्वामींनी निग्रहाने सांगितले, "एथ प्रवृत्ति नाही : आग्रहो न करा" आणि आग्रह कराल तर,-समोरून धावणाऱ्या हरणाच्या कळपाकडे बोट दाखवून ते पुढे बोलूं लागले, "या हरणापैकी एखादे हरिण आम्ही होऊ. मग तुम्ही

कुणाच्या पाठीमागे धावाल ?" यामुळे बाइसाच्या अंतःकरणात 'गजबज जाली' आणि त्यांनी आपला आग्रह सोडून दिला ( भा. ३ पा. १८ ). सारांश, स्वामी ग्रामांतर करीत, किंवा परिभ्रमण करीत ते पूर्णपणे स्वेच्छेने. इतरांच्या इच्छेचे बंधन त्यांना सहन होत नसे.

## ग्रामांतराच्या वेळा

स्वामी ग्रामांतर करीत ते बहुधा सायंकाळी, रात्री किंवा सकाळी. वाट चालण्याच्या दृष्टीने ह्याच वेळा सोयीस्कर असतात हे सांगायला नको. 'गोसावी उदीयाचि असूटिये बीजे केले' (भा. ३. पा. १९ ); 'गोसावी पाडीवेयाचा दीसी बीजे केले : थोरी पाहाटे प्रयाण केले' भा. ४. पा. ११ ) वगैरे उल्लेख प्रातःकालीन ग्रामांतराचे आहेत. 'मग गोसावी वीळिचा वेळी मिरेगावासि बीजे केले ' ( भा. ४ पा.१५ ); 'मग वीळीचा वेळी गोसावी आइत करवीली...' (सदर. पा. ५६ ) वगैरे उल्लेखावरून ते सायंकाळीहि प्रयाण करीत असत असे दिसून येईल. रात्री चांदण्यात ग्रामांतर करण्याची त्यांना विशेष आवड होती. नवगावला असतांना, इंद्रभटाचा हात धरून स्वामी आंगणात फिरत होते. त्यावेळी 'निर्मळ शुभ्र' चांदणे पडले होते. त्यांना ग्रामांतराची प्रवृत्ति झाली आणि त्यांनी म्हटले, "यवढेया ग्रामांतर कीजे तरि काइ" आणि बाइसाकडून तयारी करून ते तेथून लागलीच निघाले. ( भा. ४. पां. ४० ). डोमेग्रामला असतांनाहि रात्रीचा पूजावसर आटोपल्यावर स्वामी आंगणात फिरत होते. त्यावेळी 'पीठ ऐसे चांदिणे पडले असेः ' ते पाहून स्वामी म्हणाले, "चांदणे नीके ना गा : ऐसा चांदिणा ग्रामांतर कीजे तरी काइ...बाइसाकरवि आइत करवा :" आणि तयारी करून खरोखरच ते ग्रामांतराला निघाले. (उत्त. १२९ ). उत्तरार्धातील १३० व १७१ या आख्यायिकात देखील स्वामींच्या, चांदण्यातील ग्रामांतराचीच हकीकत आलेली आहे. यावरून चांदणे पडले असतांना प्रवासाला निघण्याची व चांदण्यात वाट चालण्याची त्यांची विशेष आवड दिसून येते. ती त्यांच्या प्रसन्न अंतःकरणाची आणि रसिकतेचीहि द्योतक आहे.

## उतरण्याची ठिकाणे

ग्रामांतर करून, अर्थात् एका गावाहून निघून स्वामी जेव्हां दुसऱ्या गावी जाऊन पोचत तेव्हां तेथे ते एखाद्या देवळात, मठात किंवा एखाद्याच्या घरी उतरत. आपल्या शिष्यमंडळीसहित एखाद्याच्या घरी उतरल्याची उदाहरणे फारच थोडी आहेत. उदाः स्वामी करंजखेडी गेले तेव्हां पानना-यकाच्या एका घरी उतरले होते. (भा. ३. पा. ७६). पण ते घर, तेथे देवता राहत असल्याच्या समजुतीमुळे रिकामे होते, हे लक्षात घेतले पाहिजे. एखाद्याच्या घरी, विशेषतः गहत्या घरीं न उतरण्यामध्ये स्वामींचे व्यावहारिक धोरण चांगल्या रीतीने दिसून येते. स्वतंत्र वृत्तीच्या पुरुषाला परगृहवास पसंत पडत नाही हे तर आहेच. पण शिवाय तसे केल्याने त्या यजमानाची फार मोठी गैरसोय होते. त्याने तरी एखाद्या बुवाचा, त्याच्या शिष्यपरिवारासहित सांभाळ करायचा तो किती ? तशात लौकिक दृष्टीने विचार केला तर कोणत्याहि बुवाने एखाद्या गृहस्थाच्या घरी न उतरणेच इष्ट व योग्य असते. बहुधा अशाच कारणामुळे स्वामी कुणाच्याहि घरी उतरत नसावे असे वाटते. पण त्यातहि ‘ स्वातंत्र्य हा मोक्ष ’ असे प्रतिपादन करणारे स्वामी आपणाला कुणाचेहि बंधन नको याच दृष्टीने गृहस्थाच्या घरी उतरत नसावेत.

देवळे आणि मठ हे उतरण्याच्या दृष्टीने सोयीचे असतात म्हणून स्वामी बहुधा त्याच ठिकाणी उतरत. लीळाचरित्रातील आख्यायिकावरून वरवर दृष्टि फेकली तरी ही गोष्ट सहज दिसून येईल. देऊळ आणि मठ यात जवळजवळ फरक नाहीच. देवळात एखाद्या देवतेच्या मूर्तीची प्रतिष्ठापना झालेली असते. क्वचित्, तेथे पालापाणी वाहणे बंद झालेले असल्यास देवतेने अभिमान सांडलेला असणे शक्य आहे. मठातहि बहुधा देवतामूर्ति असतातच. उदाः स्वामी सिन्नर येथे भीलमठात उतरले होते. तेथे ‘ भीलमढीये आतु देवतेपूर्वे उत्तरामूख आसन : ’ ( भा. २ पा. ४९ ) त्यांचे आसन होते. प्रतिष्ठानला ते ‘ गणपति मढी ’ उतरले होते. ( उत्त. २६८ ). या मठाच्या नावावरूनच ते ‘ गणपति ’ देवतेचे स्थान असावे असे दिसते. तथापि काही मढातून ‘ देवता ’ नसणे

शक्य आहे. अनेकदा देवळाच्या जवळपास सत्पुरुषांना राहण्यासाठी म्हणून काही मठ बांधून ठेवलेले असतात. ते कसेहि असले तरी देवताधिष्ठित 'देवळे' आणि 'मठ' स्वामींना वर्ज्य नव्हते. आपल्या शिष्यांना मात्र त्यांनी 'देवताधिष्ठित' स्थानी न उतरण्याची आज्ञा केली आहे. पण त्यातील हेतु शुद्ध आहे. शिष्य मंडळी किंवा असन्निधानीची महात्मे मंडळी देवळात उतरली तर त्यांच्या उठण्याबसण्याने धूळ वगैरे उडून देवतांचा अपमान होण्याचा संभव असतो. तो टळावा व देवतांचा यथायोग्य मान राखला जावा म्हणूनच स्वामींनी तशी आज्ञा केली आहे. ते स्वतः परमेश्वरावतार असल्यामुळे त्यांच्याकडून देवतांचा अनादर होण्याचा संभवच नव्हता. त्यांचे चरणरज देवतामूर्तीवर उडाले तरी त्यामुळे देवतांना धन्यताच वाटणार ! तथापि, असे असले तरी त्यांनी कोणत्याहि देवळात देवतांचा अनादर, अपमान, उपहास किंवा इतर दृष्टींनी विडंबन होईल असे काहीहि केलेले आढळत नाही. उलट काही ठिकाणी तर लौकिक रूढीला अनुसरून देवतांना त्यांनी विडाहि अर्पण केलेला आढळतो. उदाः स्वामी आपेगावला गेले तेव्हां त्यांनी तेथील विज्ञानेश्वराच्या लिंगाला विडा अर्पण केला ( भा. ४ पा. २१ ); त्र्यंबकेश्वर येथेहि 'गोसावी त्रीयंबका बीजे केले : त्रीयंबका वीडा वोगळवीला' ( भा. २ पा. ५४ ) वगैरे उल्लेखावरून ही गोष्ट स्पष्ट होईल.

केवळ हिंदूंच्याच देवळात ते उतरत असेहि नाही. जैनांच्या 'विषए'त म्हणजे देवळातहि ते उतरीत. 'वीष्रये वसति : वीष्रयेसि देउळा गोसावी बीज केले' ( भा. २. पा. १५ ); 'वसैए अवस्थान' 'एकु दीसी गोसावीयासि वसैए अवस्थान' ( भा. ३. पा. ४१ व ४३ ) वगैरे आख्यायिका हेच दाखवितात. या शेवटच्या आख्यायिकेत तर 'हस्ति वेंद्म देवो आलेयाही परि ब्राह्मणासि वसैए आतु रिगो नये' हा वैदिक ब्राह्मणांचा जैनांच्या देवळात प्रवेश न करण्यासंबंधीचा आग्रह आपल्याला अमान्य असल्याचे त्यांनी स्पष्ट सूचित केलेले आहे. तेव्हां स्वामींना स्वतःला वसतीसाठी जैनांची देवळेहि निषिद्ध वाटत नव्हती हे उघड दिसते.

## गुंफेत अवस्थान

स्वामी जसे देवळात किंवा मठात उतरत तसेच ते ' गुंफे'तहि उतरत. ' गुंफा ' म्हणजे एखाद्या सत्पुरुषाने आपल्या निवासासाठी बांधलेली पर्णकुटिका. पैठण येथे नागुबाइ ( = बाइसा ) पूर्वी गुंफा करूनच राहत. वामदेव, ब्रह्मचारीदेव वगैरे साधूंच्याहि त्या ठिकाणी गुंफा होत्या. ( भा. २. पा. १, ३, ४ पहा ). नाशकाला पंचवटीतील एका गुंफेत स्वामी दहा दिवस उतरले होते. ( सदर. पा. ५४ ); वशिष्ट देवाच्या विनंतीवरून त्यांच्या एका गुंफेत स्वामी उतरले होते. ( उत्त. २५८ ); अरण्यग्रामीहि ते गुंफेत उतरले होते. ( उत्त. १३८ ). असे उल्लेख अनेक आहेत.

सर्व भक्तमंडळीसहित उतरण्याला सोयीचे असे देऊळ किंवा मठ नसला तरच मग स्वामींना गुंफेत उतरावे लागे. अर्थात् अशी एखादी गुंफा आधीच कोणाची तयार असली आणि ती उतरण्यासाठी त्यांना मिळाली तर प्रश्नच नसे. नाही तर आपल्या शिष्यजनाकडून ते गुंफा तयार करवून घेत. ते अरण्यग्रामी गेले तेव्हां त्यांना गावातच उतरायचे होते. पण तेथे बिऱ्हाडाची सोय नसल्यामुळे ते एका मळयात आले ' तव तेथ गुंफा असे : ' भटोबासाकडून ती गुंफा उघडवून झाडवली व स्वामी तेथेच राहिले. स्वामी छिन्नपापीला गेले तेव्हां ' तेथ एकि पूर्वाभिमुख गुंफा होती : तेथे गोसावीयासि अवस्थान ' ( उत्त. ७० ). मागे उल्लेखिलेल्या वशिष्ट देवादिकांच्या गुंफा आधीच बांधलेल्या होत्या. पण कधी कधी सोयीसाठी किंवा स्वामींना इच्छा होत असे म्हणून ते नवीन गुंफा करायला लावीत. ते करंजखेड्याला असतांना एके दिवशी रामतीर्थाकडे फिरावयास गेले. तेव्हां ' गोसावीयासि गुंफा करावेयाचि प्रवृत्ति जाली : ' मग काय ! रामनाथाच्या वायव्य कोणात ' पौळी भितरि गुंफा करविली ' ती कशी ? तर ' भिंती घालविलिया : धाबे करावेया भट पींपळावरि फाटे मोडावेया वळघले ' वगैरे. ( भा. ३ पा. ८७ ); पंचाळेश्वरी असतांनाहि त्यांना प्रवृत्ति झाल्यामुळे त्यांनी गुंफा करून घेतली होती. ( भा. ४ पा. २९ ). जोगेश्वरी येथे स्वामी गुंफा करूनच एक महिनाभर राहिले होते. ( सदर. पा. ४६–४७ ). ते खडकुळीला गेले तेव्हांहि ' कपाटासि भिंती घातलीया : दोनि

गुंफा केलीया : पूर्वामुखे गुंफे आसन ' ( सदर. पा. ६२ ). पारनेरी असतांनाहि त्यांनी गुंफा करून घेतली होती. ( उत्त. २३२ ).

यावरून आणखीहि एक गोष्ट दिसून येईल की एखाद्या ठिकाणी बरेच दिवस पर्यंत राहण्याचा विचार असला म्हणजे स्वामी दोन गुंफा तयार करून घेत. एक स्वतःसाठी आणि दुसरी शिष्यपरिवारासाठी. खडकुळी येथे त्यांनी दोन गुंफा करवल्या होत्या त्यातील प्रयोजन हेच दिसते. तेथे त्यांचे अवस्थानहि बरेच दिवस होते. छिन्नपापी येथे गेले तेव्हां तेथे एक गुंफा पूर्वीचीच होती हे आपण पाहिले. त्याच आख्यायिकेत ' मग दुसरी गुंफा भक्तजनालागि गोसावी करविली ' ( उत्त. ७० ) असे म्हटले त्यावरून हे स्पष्ट होते.

एका गावाहून दुसऱ्या गावी जायचे असले म्हणजे स्वामी सगळ्यांना बरोबर घेऊनच निघायचे. इष्ट गावी पोचल्यानंतर मग तेथे देऊळ, मठ किंवा गुंफा पाहून उतरत. कधी कधी पूर्वपरिचित स्थळ असले तर आधी कोणाला तरी पुढे पाठवून व्यवस्था करायला सांगत. स्वामींना खांडेगावाहून पिंपळगावला जायचे होते. तेव्हां ' साधे हो : तुम्ही पुढा पींपळगावासि जा ' म्हणून त्यांनी आज्ञा केली. त्याप्रमाणे ' साधे पुढा गेली : मढु झाडिला : वाटे गोवर होता : तेयाएवरि वाट केली : गुरुवाते भरणुके मागितले : तेथ उष्णोदक ठेविले '... ( उत्त. २०८ ); चींचौडीला जाण्यापूर्वीसुद्धा याच साधेला स्वामींनी पुढे पाठविले होते. ( सदर. २१२ ). स्वामींना चाचरमुदीहून नेवाशाला जायचे होते, तेव्हां आपल्या बरोबरच्या मार्कंडेयाला त्यांनी पुढे पाठवले, आणि सांगितले की, " तुम्ही बडुवेयाचेया घरा जा : कुचि टाळे मागा : मढू उघडा : मढू चोखटू करां " त्याप्रमाणे मार्कंडेय पुढे गेला आणि त्याने ' मढु आतु बाहिरि धुतला : कापडे करूनि अवघा मढु दाटिला ' म्हणजे पुसून स्वच्छ केला. ( उत्त. १७४ ).

## प्रवासाची तयारी

प्रवाला निघण्यापूर्वी बाइसा तयारी करीत. पण ही तयारी म्हणजे काय ? खाण्यासाठी जे थोडेसे धान्य जवळ ठेवायचे तेच पोत्यात नीट

बांधले म्हणजे झाली तयारी. एकांक काळात तर हीहि आटापीट स्वामी करीत नसत. मेहकरहून बोणेबाइबरोबर सिंहस्थ यात्रेनिमित्त जेव्हां ते त्र्यंबकेश्वराकडे निघाले तेव्हां त्यानी बोणेबाइला मुद्दाम सांगितले, "बाइ : ओझे काही घेवो नोको : मार्गी काइ मीळैल'." "रस्त्यात लहानशा गावी शिधा-आटा मिळत नाही म्हणून थोडे घेते" असे तिने म्हणताच "हे पुढा जोडैल" असे त्यांनी उत्तर दिले. अर्थात् तिला बरोबर काहीहि घेऊ दिले नाही. रस्त्याना स्वामींना नगरजन कणिक, तांदुळ, तूप वगैरे देत. ते बोणेबाई बिऱ्हाडी घेऊन जात. त्यावेळीहि स्वामींचे सांगणे असे "आवघे वेचा : ठेवा ना." (एकांक. ७२, ७४). यात संग्रह न करण्याची जशी वृत्ति आहे तसेच प्रवासात फारसे ओझे जवळ न बाळगण्याचे धोरणहि आहे. पुढे बाइसा स्वामींचे सेवादास्य करू लागल्या. त्यावेळीहि आरंभी हीच वृत्ति होती : प्रवासाला निघाले म्हणजे रस्त्यात लागेल त्याप्रमाणे कणिक, डाळ वगैरे विकत घ्यायची. (भा. २ पा. १५). पण ती घेण्यासाठीहि त्यांच्याजवळ कधी कधी पैसा नसे. मग काय करायचे ? स्वामींना सुपारी खाण्याची सवय होती. म्हणून सुपारी फोडण्यासाठी त्यांच्याजवळ आडकित्ता नेहमी असायचा. तो अडकित्ता गहाण ठेवून ते शिधाआटा विकत घ्यायला लावीत. रितपूरवरून परततांना बाइसाच्या जवळ वाटखर्चासाठी तीन 'रुके' उरले होते. ते वाटेत संपले. तेव्हां बाइसांनी स्वामींना म्हटले, "बाबा : वेचावया काही नाही" त्यावर "पोफळ-फोडना गाहाण ठेवा" असे स्वामींचे उत्तर ठरलेले. (भा. २ पा. १५). वेरूळहून श्रीनगरकडे जातांना देखील असाच प्रसंग आला होता. तेव्हांहि स्वामींच्या सांगण्यावरून 'पोफळ-फोडना, गाहाण ठेवीला : वेचु आणिला : उपाहारू निफजवीला : आरोगणा जाली' (सदर. पा. ४८). या दोन्ही प्रसंगी त्यांच्या प्रवृत्तिमुळे व सामर्थ्यामुळे त्यांना त्यांचा पोफळ-फोडणा ताबडतोब परत मिळाला ही गोष्ट निराळी. बाकी या गावी असतांना त्यांच्या मठात चोर शिरले. स्वामींच्या दर्शनाने त्यांची बुद्धि पालटली आणि तेच स्वामींना म्हणाले की, "जी जी : हे रान : एथ नसावे" स्वामी म्हणाले, "एथ काइ नसे : मा : काइसेया नसावे : फाळुकी दोनि एक असेति ते तुम्ही नेया : यासि आणिक कव्हणी देइल" (भा. ३ पा. १९). यावरून

आरंभी आरंभी एकदोन फडक्यावाचून त्यांच्याजवळ फारसे काही सामान नसे असे दिसते. पुढे पुढे मात्र त्यांच्या उपाहारासाठी म्हणून बाइसा थोडेसे धान्य जवळ ठेवू लागल्या. चाचरमुदीला जातांना स्वामींच्या सांगण्यावरून बाइसांनी तयारी केली ती कोणती ? तर 'कणिकीचे पोते : तादुळाचे पोते : आवघे वळिवट एकवट केले : ते एकएक पोते' आणि ती पोती 'गोसावी एक एक पोते पोरीया एकएका भक्तजनाच्या हाती दीधले : मग गोसावी बीजे केले' (उत्त. १२९). यावरून या सामानाची कल्पना येईल. यातील एकेक पोते हे भक्ताकडून 'हाती' नेण्याएवढे म्हणजे अगदी हलके असे, हे मात्र लक्षात ठेवले पाहिजे. तुपाचे व तेलाचे एकेक 'कोंढळे' (उत्त. ६) व दिव्याचे 'टौळ' हेहि सामान बरोबर असे. यात स्वामींच्या अंथरूण-पांघरुणाची भर घातली म्हणजे त्यांची 'मात्रा' सिद्ध झाली, असे समजायला हरकत नाही.

## मठाची व्यवस्था बाइसांच्या आधीन

एवढ्याशा या सामानासहित भक्तमंडळाबरोबर एखाद्या गावी स्वामी येऊन पोचले म्हणजे ते पूर्वी सांगितल्याप्रमाणे एखाद्या देवळात, मठात किंवा गुंफेत उतरायचे. स्वामी, बाइसा आणि भटोबास हे एका मठात राहत व जवळच्याच पडशाळेत किंवा गुंफेत बाकीची भक्त मंडळी उतरत. स्वामींच्या मठाची सर्व व्यवस्था प्रामुख्याने बाइसाकडे असे, हे सांगायला नकोच. मठाची झाडझूड करणे, स्वामींचे आसन तयार करणे, हातपाय धुण्यासाठी व मुखमार्जनासाठी त्यांना पाणी तापवून देणे व स्वामींच्या आरोगणेसाठी उपाहार निपजविणे ही जणु बाइसांची राखीव कामे होती. त्यानिमित्त करायचा बाजारहाट आरंभी बाइसाच करीत असे. 'बाइसे वेसजू वेसरू घेयाविया गेली' (भा. २ पा. १५). कधी कधी त्या इतरांना पाठवीत. 'मग चांगदेवोभट गेले...आठा दामाचा वेचु आणिला;' 'बाइसी डखले तेला धाडले होते' (भा. २ पा. २१ व ३५). स्वयंपाक करीत असतांना एकवेळ बाइसांनी देमाइसाला आले धुऊन आणायला सांगितले. देमाइसाने ते धुतले, तेव्हां त्याच्यावरचा कोंडा निघाला. पाणीभाताबरोबर खाण्यासाठी म्हणून तिने तो पदरात बांधला. ही गोष्ट स्वामींच्या लक्षात आली. त्यांनी देमाइसाला म्हटले, "देमती, पालवात काय

बांधले आहे ?" ती म्हणाली, "जी, हा कोंडा आहे." स्वामींनी प्रश्न केला, "बाइसाला विचारले काय ?" तिने, अर्थात्, नाही असे म्हटले. तेव्हां स्वामींनी तिला निक्षून बजावले की, "येथील कोणतीहि जिन्नस वाया गेली तरी चालेल; पण विचारल्यावाचून घ्यायची नाही." आणि विचारायचे तेहि कोणाला ? तर "एथचे ते बाइसाते पुसौनि घेयावे : जा : बाइसाते पुसा : मा : घेया." (भा. ३. पा. २१). यावरून मठातील व्यापार बाइसाच्या आधीन कसा होता याची चांगली कल्पना येईल. दुसऱ्या एका प्रसंगी स्वामींनी भटोबास व आउसा यांना आपली आंगी शिवून आणण्यासाठी शिंप्याकडे पाठवले. शिंप्याला नीट समजावून सांगून, त्याला शिवणावळीचे पैसे आगाऊ देऊन व तेथे आउसाला बसवून भटोबास परत आले. परत येतांना आउसाने त्या शिंप्याला स्वामींच्या दर्शनासाठी आणले. ती परत आली त्यावेळी मठात स्वामींसाठी कोणीतरी उपाहार आणून ठेवला होता. बाइसा इतर काही कामासाठी बाहेर गेल्या होत्या. आउसाने आपल्याच मताने त्या शिंप्याला थाळा आणायला सांगितले आणि ती त्या थाळ्यात शिंप्याला ते उपाहाराचे अन्न देऊ लागली. तितक्यात भटोबास तेथे आले. आउसाचा हा आव्यारेषुव्यापार पाहून ते रागावले; आणि म्हणाले, "हे काइ आउ करितेसि : बाइसे भीतरि नाही : यासि मीया सीवनावळि दीधली : मा तु तयासि अन्न घालित असति !" तिने भटोबासाला चूप करण्याचा प्रयत्न केला. तेव्हां भटोबासांनी स्वामींच्याकडे तक्रार केली की "बाइसे बिढारी नाही की : तयासि अवघे अन उपसौनि घातले." तितक्यात आउसा तेथे आली आणि भटोबासालाच उलटून बोलू लागली. तेव्हां स्वामींनी भटोबासांना आज्ञा केली, "घाला नाएकाते गुंफे पैलाडि :" त्याप्रमाणे भटोबासांनी तिला गुंफेबाहेर घालवून दिले. (उत्त. १२१). सारांश, स्वामींच्या मठाची व्यवस्था पूर्णपणे बाइसांच्या आधीन होती. त्यांच्या परवानगीवाचून तेथे कुणीहि काहीहि केलेले स्वामींना खपत नसे.

## कडक शिस्त

दुसऱ्या मठाची किंवा गुंफेची व्यवस्था अर्थातच इतर भक्तजनांच्या आधीन असे. पण याचा अर्थ त्या ठिकाणी त्यांनी 'स्वतंत्र' रीतीने वावरायचे असे, असा मात्र नाही. सर्व शिष्यांना चक्रधरस्वामींच्या पूर्णपणे

आशेत राहावे लागे. त्यांनी खास स्वामीसाठी जी गोष्ट करायची तीहि त्यांच्या परवानगीवाचून करता कामा नये. एक वेळ स्वामींनी नाथोबा-कडून तांदुळजा खुडून आणवला. बाइसांनी केलेली त्याची भाजी स्वामींना अतिशय आवडली. हे लक्ष्यात ठेवून नाथोबाने दुसऱ्याहि दिवशी ‘मग एरि दीसी न पुसता आणिला.’ आरोगणेच्या वेळी बाइसांनी तांदुळज्याची भाजी वाढली तेव्हां स्वामींनी विचारले, “बाइ : हा तांदुळिजा कचा ?” बाइसा म्हणाल्या, “बाबा : हा नाथोबाए आणिला :” नाथोबा तेथेच उभा होता. त्याला वाटले स्वामी आपणाला शाबासकी देतील. पण स्वामी रागावून त्याला म्हणाले, “हा तांदुळजा आणायला मी सांगितले होते काय ?” नाथोबा म्हणाला, “नाही महाराज.” “मग काय बाइसांनी आणायला सांगितला होता ?” “तसेहि नाही महाराज.” “मग हा आणला कुणी ?” नाथोबा म्हणाला, “हा मीच स्वतः आणला.” हे कळताच स्वामींनी आपल्या पानातून ती भाजी काढून घ्यायला सांगितली आणि नाथोबाला म्हटले, “एथचा व्यापारू तो एथ पूसपूसो करावा.”– आमच्यासाठी, जे काय करायचे असेल ते आम्हाला विचारूनच करीत जावे. ( उत्त. ७६ ).

नाथोबाच काय, पण भटोबास देखील स्वामींच्या परवानगीशिवाय एखादी गोष्ट करायला धजत नसत. स्वामींच्याजवळ पद्मनाभी बरेच दिवस होता. पण पुढे त्याचे नातेवाईक त्याला घेऊन गेले. या गोष्टीला बरेच दिवस झाल्यावर एके दिवशी नेवाशाच्या बाजारात भटोबासांना तो भेटला. त्यांनी त्याला थांबवले व त्याची विचारपूस केली. तेव्हां पद्मनाभी भटोबासाना म्हणाला, ‘आपण जर माझ्याबरोबर याल तर माझे राहिलेले काम संपवून मी आपणाबरोबर स्वामींच्या दर्शनाला येतो.” तेव्हां भटोबासांनी त्याला सांगितले, “ते तुम्ही जाणत असा की : मज गोसावीयाते पुसिलेया वाचौनि काहीच्चि करू नैए” असे म्हणून त्याला हात जोडून भटोबास तेथून निघाले. (उत्त. १८८). यावरून स्वामींना विचारल्यावाचून कोणतीहि गोष्ट करायला भटोबास देखील भीत असत हे दिसून येईल.

## बरोबर कुणाला ठेवायचे ?

एखाद्याला आपल्याबरोबर किंवा मठात राहू द्यायचे की नाही हे पूर्णपणे स्वामींच्या इच्छेवर अवलंबून असे. त्यांच्या परवानगीवाचून

कुणालाहि मठात राहता येत नसे, किंवा मठ सोडून जाता येत नसे. याच कारणामुळे पद्मनाभीला मठात घेऊन येण्याचे भटोबासांनी नाकारले असावे असे वरील आख्यायिकेवरून ( उत्त. १८८ ) दिसते. स्वामींच्याबरोबर राहून चांगदेवभटाला रितपुरला जायचे होते. बाइसाकडून त्याने स्वामींना तशी विनंती केली. तेव्हां ते म्हणाले, " गावा जा : पुसा : मग या " ( भा. २ पा. १४ ). चांगदेवभट लहान असल्यामुळे आपल्याबरोबर येण्यापूर्वी त्याने आपल्या घरच्या माणसांची परवानगी घेणे इष्ट आहे असे स्वामींना वाटले. मोठ्यांच्या बाबतीत अशा परवानगीची आवश्यकता दिसत नाही. पद्मनाभी स्वामींच्या जवळ होता, पण त्याने घरच्या वडील मंडळीची परवानगी घेतली नव्हती. त्याचे भाऊ जोगनायक त्याला न्यायला आले, तेव्हां स्वामी म्हणाले, " हा एथौनि बोलविला ? " म्हणजे " आमच्या जवळ राहा म्हणून आम्ही मुद्दाम याला बोलावले काय ? " जोगनायक म्हणाला, " तसे नाही महाराज ! " " बरे आम्ही नाही, तर आमच्या येथील कोणी याला येथे बोलावले काय ? " जोगनायकाने उत्तर दिले, " नाही, तसेहि झाले नाही. " त्यावर स्वामी म्हणाले, " मग न्या ना खुशाल आपल्या पद्मनाभीला ! " असे म्हणून स्वामींनी पद्मनाभीला जायला सांगितले. जोगनायकाच्या मनाविरुद्ध तो त्या ठिकाणी राहू इच्छीत होता. पण स्वामींनी त्याला राहू दिले नाही. ते त्याला म्हणाले, " आता तव जाए पा " आणि असे म्हणून त्यांनी त्याला जोगनायकाबरोबर परत पाठवले. ( भा. ३ पा. २० ). यावरून अनेक गोष्टी स्पष्ट होतात. मोठ्या किंवा प्रौढ व्यक्तींनी घरी विचारून आले पाहिजे असा स्वामींचा कटाक्ष नव्हता हे खरे; पण घरच्या मंडळीच्या इच्छेविरुद्ध ते आपल्या जवळ कुणालाहि राहू देत नसत हेहि खरे. तसेच ते स्वतः आपणहून कुणाला बोलावीत नसत, किंवा आग्रहाने मनाविरुद्ध ठेवून घेत नसत. स्वामींनी नागदेवाला आपल्याजवळ राहू देऊ नये अशी विनंती जेव्हां दादोसाने केली तेव्हां स्वामी म्हणाले, " एथ राहिल तयाते पाठविजे ना : जाइल त्याते राहविजे ना " ( उत्त. १ ) यावरून हे दिसून येईल.

पण एकदा स्वामींच्या मठात राहिले म्हणजे तेथील शिस्त शिष्यांना पाळावी लागत असे. आपल्याजवळ नागदेवाचार्यांना राहू देण्यापूर्वी " तैसे

एथ राहो नेदिजे की : तैसे एथ राहो न लभे की : तुम्हा असो आवडैल तव असाल : जावो आवडैल तेव्हळि जाल : तैसे एथ राहो नेदिजे की एथुनि पाठविजैल तेव्हळि जावे : एथौनि बोलाविजैल तेव्हळि यावे : तैसे तरि एथ राहो दीजैल" असे स्वामींनी त्याना हडसून खडसून बजावले होते हे लक्ष्यात ठेवले पाहिजे.

## आज्ञाभंगाबद्दल शिक्षा

स्वामींची आज्ञा न घेता एखादी गोष्ट केली तर ते शिक्षा करायलाहि कमी करीत नसत. एकदा असे झाले की, रेइनायकाच्या घरी श्राद्ध होते. श्राद्धाचे जेवायला म्हणून त्यांनी भटोबास व नाथोबा यांना आवतण दिले. तेव्हां भटोबास व नाथोबा म्हणाले, "आम्हाला काय सांगता तुम्ही, स्वामींनाच विनंती करा. ते पाठवतील तर आम्ही जेवायला येऊ." त्याप्रमाणे त्यांनी स्वामींना विनंती केली. तेव्हां स्वामी म्हणाले, "ते महात्मे आहेत. ते जर श्राद्धाचे जेवण जेवायला तयार असतील तर आम्ही त्यांना का पाठवणार नाही !" नायकांनी जाऊन भटोबास व नाथोबा यांना म्हटले की, "तुमच्या सांगण्याप्रमाणे मी स्वामींना विनंती केलेली आहे." असे म्हणून ते घरी गेले. मातिकाम झाल्यावर दोघेहि गंगेवर स्नानाला गेले. स्नानाहून परततात तो रेइनायक घाईघाईने आले आणि म्हणाले, "भटोबास, नाथोबा, चला चला लौकर. जेवणाची सगळी तयारी झालेली आहे." तेव्हां दोघेहि म्हणाले की, "आम्ही स्वामींना दंडवत करून येतोच." रेइनायक म्हणाले, "नका, तसेच चाला. नाहीतर उशीर होईल." असे म्हणून ते त्या दोघांनाहि अक्षरशः ओढीतच घेऊन गेले. जेवण झाल्यावर गंध लावून तोंडात तांबूल घेतलेल्या अशा त्यांच्या मूर्ति परत येतांना जेव्हां स्वामींनी पाहिल्या तेव्हां ते आउसाला म्हणाले, "आऊ, मठाची कवाडे लावा. या दोघांनाहि आत येऊ देऊ नका." आउसाला मोठा आनंद झाला. स्वामींच्या सांगण्यावरून नागदेवाने तिला अनेक वेळ बाहेर घालवले होते. पण आतापर्यंत तिला तशी संधी आली नव्हती. लगबगीने पुढे जाऊन तिने कवाडे लावली. ते दोघेहि म्हणाले, "आऊ, आम्हाला आत येऊ दे, आणि आमचा अपराध काय ते तरी स्वामींना विचारू दे." पण ती काही केल्या त्यांना आत येऊं देईना. तेव्हां बाइसांनी म्हटले, "बाबा, त्यांना आत येऊ द्या. त्यांचा अपराध त्यांना सांगा.

त्यांना विचारा व मग शिक्षा करा." स्वामींनी त्यांना आत येऊ दिले, आणि म्हटले, "तुम्ही काय ब्राह्मण आहा ? (महात्मे झाले म्हणजे त्यांचे ब्राह्मणत्व नष्ट होते.) मग लोकांच्या श्राद्धाला का जाता ?" ते म्हणाले "आम्हाला स्वामींनी पाठवले म्हणून गेलो." स्वामींनी म्हटले, "मी तुम्हाला जायला सांगितले ?" दोघेहि म्हणाले, "नाही. पण आम्ही रेइनायका-कडून विचारविले." स्वामींनी म्हटले, "तसे करणे म्हणजे आम्हाला भीड घालणे नाही का ?" दोघांनीहि आपला अपराध कबूल केला व शिक्षा करायला सांगितले. स्वामींनी त्यांना प्रत्येकी पंचवीस उड्या मठावरून घालायला सांगितले. त्यांना त्या नीट घालता येईनात म्हणून बाइसांच्या विनंतीवरून पांचशे दंडवते घालायला लावली. (उत्त. १०५).

## कामांची विभागणी

मठातील कामे निरनिराळया शिष्यात वाटून दिलेली असत. ती त्यांना आळीपाळीने करावी लागत. 'एकु एकु दी एकेकाची पाळी : मठु राखावेया झाडावेयाची : तीए दीसी देमाइसाची पाळी' (उत्त. १०६). 'एकु एकु दी अवघेयासि घरटी करावेयाची पाळी' 'तीए दीसी बीढार राखावेयाची आउसाची पाळी :' (उत्त. ९, ५०) या उल्लेखावरून मठाच्या राखणीचे काम पाळीपाळीने शिष्यांना करावे लागत असे हे दिसून येईल. एके दिवशी शिष्यमंडळी गंगेहून स्नान करून आली पण त्यांनी गंध लावला नाही. तेव्हां स्वामींनी जवळ असलेल्या नाथोबांना आज्ञा केली, "मंडळिका : तुम्ही निच या अवघेया टिळा उगाळुनि दीयावा : येथ तीर्थवारू जाणवावा...मग ते दीसवडि तैसेचि करिती" (भा. ४. पा. ४२). यावरून नाथोबाकडे दररोज सगळयांना गंध उगाळून देण्याचे व स्वामींना तिथिवार सांगण्याचे काम होते हे दिसते. नाथोबा स्वामींना दररोज तिथिवार सांगत याचा उल्लेख गद्य पूजावसरातहि आहे. आणि त्याचाच अनुवाद 'भट मंत्र म्हणती : मंडळीक तीथिवारू जाणवीति' (पूजावसर २८) या ओवीत भास्करभट बोरी-करांनी केलेला आहे. सारांश, स्वामींच्या मठातील नित्याची कामे शिष्य-मंडळीत पद्धतशीरपणे वाटून दिलेली असत. याशिवाय अनेक नैमित्तिक कामे शिष्यांच्याजवळून स्वामी करवून घेत. विहरणाला गेल्यानंतर त्यांना धावायला

लावणे, पोहायला सांगणे, एकमेकाशी त्यांचे भांडण लावणे वगैरे कामांचा उल्लेख पूर्वी एकदा केलेलाच आहे. पण याशिवाय अनेक उपयुक्त कामे स्वामी शिष्यांच्याकडून करवून घेत असत. गुंफा करण्यासाठी नागदेवादिकांना मातीकाम करावे लागे. एरवीहि कोणत्या ना कोणत्या प्रकारचे तरी मातीकाम मठासमोर नेहमी चाललेलेच असे. ( उत्त. ६, ६६, ७१ ). एक वेळ प्रवास करीत असतांना कासारवाड्याहून निघाल्यानंतर रस्त्यात एक मोठी गारी त्यांना दिसली. त्या गारीमुळे रस्त्यातून अलीकडे पलीकडे येणे जाणे करणे मोठे कठीण पडत असे. ती पाहून स्वामी म्हणाले, " रामाचे वानरसैन्य जर कामाला लागले तर ही गारी सहज बुजविली जाईल." स्वामींचे म्हणणे रामदेवाने म्हणजे दादोसाने ऐकले. आणि आपल्या शिष्यांना तेथे कामाला जुंपले. त्यामुळे हां हां म्हणता ती गारी बुजवली गेली, आणि रस्ता साफ झाला. ( भा. ३ पा. ४२ ). खडकुळीला असतांना एके दिवशी स्वामी खडकाकडे विहरणासाठी गेले. तेथे त्यांना नदीच्या पलीकडे जाण्याची इच्छा झाली. त्यासाठी एक पूल तयार करण्याची आज्ञा त्यांनी सगळ्यांना केली. भटोबास त्यावेळी तेथे नव्हते. इतरांना ते काम मोठे कठीण वाटले. तेव्हां स्वामींनी म्हटले, " एथ सांडोवा न बंधवे तरि तुम्ही एथुनि अवघे जा : " त्याप्रमाणे शिष्यमंडळी स्वामींच्या जवळून निघून एका टेकाडावर जाऊन बसली. तितक्यात पलीकडून भटोबास आपले काम करून आले. त्यांनी चौकशी करताच सगळ्यांनी स्वामींची आज्ञा त्यांना सांगितली. तेव्हां भटोबास म्हणाले, " हां गा : बांधते काइ तुम्ही : करिते काइ तुम्ही : तुम्ही होचि म्हणीतले की मा : करिते ते नेणो कोण असे : " याचा भावार्थ असा " तुम्ही नुसते हो म्हणायचे होते; तुमच्या-कडून काम करवून घेण्यास परमेश्वर समर्थ आहे. " असे म्हणून भटोबास स्वामीकडे गेले. त्यांच्याकडून त्यांनी सगळा वृत्तांत ऐकला आणि म्हटले, " मी गारी बुजवीन आणि मी साडोवा बांधीन." ते लागलीच कामाला लागले. त्यामुळे स्वामी फार प्रसन्न झाले. भटोबास हळूच म्हणाले, " मी काही मदतनीस बोलावूं ?" स्वामींनी परवानगी देताच भटोबास सर्व शिष्यांना घेऊन आले आणि सर्वांनी मिळून सांडोवा (= पूल) तयार केला. मधे एक शिळा नीट बसत नव्हती. पण स्वामींच्या आज्ञेवरून राणाइसाने ती लोटताच ती शिळा खटकन बसली. अशा प्रकारची अनेक कामे स्वामी आपल्या

शिष्याजवळून करवून घेत. आध्यात्मिक दृष्टीने असे करवण्यात भक्तांची तत्सदृश कर्मे नासण्याचाच स्वामींचा हेतु असे. किंबहुना त्याचसाठी अशी निरनिराळी कामे स्वामी त्यांच्याकडून मुद्दाम करवून घेत.

## मठाबाहेर

मठात राहणाऱ्या शिष्यांना मठाची शिस्त पाळावी लागे त्याजबरोबर स्वामींच्या व मार्गाच्या लौकिकाला शोभेल असेच वर्तन बाहेर करावे लागे. तात्त्विक दृष्टीने ज्यांच्याशी स्वामींचा विरोध होता अशांचीहि मानखंडना आपल्या शिष्यांनी केलेली त्यांना खपत नसे. तसे कुणी केले तर स्वामी त्याला शिक्षा केल्यावाचून राहत नसत. एळापुरी असतांना पद्मनाभी त्यांच्याजवळ होता. त्याच गावी दुसरीकडे परमाणुभवदेव या नावाचे एक सत्पुरुष राहात. ते मोठे ऐश्वर्य संपन्न होते. त्यांच्या एकेका विड्याला एकेका आसूची पाने लागत. एकवेळ पद्मनाभीदेव त्यांच्या बिऱ्हाडी गेला. त्यांनी पद्मनाभीचे चांगले आदरातिथ्य केले. त्याला त्यांनी बसायला आसन दिले बसल्यानंतर पद्मानाभीने त्यांना विचारले, " आपले नाव काय आहे ? " त्यांनी म्हटले, " आमचे नाव परमाणुभवदेव. " तेव्हां त्यांच्या नावावर कोटी करण्यासाठी म्हणून पद्मनाभीदेव म्हणाला, " म्हणजे, तुमचा अनुभव काय परमाणुएवढाच आहे ? " त्याच्या या म्हणण्यामुळे परमाणुभवदेव अतिशय रागावले. त्यांनी आपल्या शिष्याकडून पद्मनाभीला मठाबाहेर काढून दिले. तो परत आलासे पाहून स्वामी म्हणाले, " बाई, याला मठात येऊ देऊ नका. " बाइसांनी विचारले, " का बाबा ? " स्वामी म्हणाले, " बाइ, हा एका प्राण्याचे अंतःकरण दुखवून आलेला आहे. याला मठाबाहेर टाकून द्या. " असे म्हणून त्यांनी बाइसांना सगळी हकीगत अंतर्ज्ञानाने जाणून सांगितली. पद्मनाभीदेव फार दुःख करू लागले. स्वामी म्हणाले, " बाई, याला लौकर हाकून द्या. याचे शब्द जर आमच्या कानी पडतील तर याला फार मोठे अनिष्ट होईल." बाइसांनी विनवणी केली, " बाबा, बिचारा फार दुःख करीत आहे. येऊ द्या त्याला आत. " स्वामींनी सांगितले, " बाई, याला आमच्या मठात राहायचे असेल तर याने आताच्या आता परमाणु-भवदेवाकडे जावे, आपल्या अंगाला शेणमाती चोपडून त्यांच्या पाया पडावे, आणि त्यांची क्षमा मागावी. ते जर आम्हांला सांगतील तरच आम्ही याला

इथे ठेवू." पद्मनाभीदेव परमाणुभवदेवाकडे गेला. व त्याने त्यांची क्षमा मागितली. स्वामींच्या या वर्तणुकीमुळे परमाणुभवदेवांना अतिशय आनंद झाला. त्यांनी पद्मनाभीला धुतले. त्याला घेऊन ते स्वतः स्वामीकडे आले आणि म्हणाले, "हा आमचा होता. आता आपण याला आपल्याजवळ असू द्यावे." त्यांच्या विनंतीवरून स्वामींनी पद्मनाभीला पुन्हा आपल्या मठात ठेवून घेतले ( भा. ३ पा. ३१ )

आपल्या शिष्यांच्या गैरवर्तणुकीमुळे जर कुणाचे नुकसान झाले तर स्वामी ते भरूनहि देत. त्र्यंबकेश्वर येथे असतांना गंगाद्वाराजवळील पुजाऱ्याचे सगळे पाणी डखल्यांनी सांडले. त्याची तक्रार घेऊन तो पुजारी स्वामीकडे आला, आणि म्हणाला, "या पाण्यावरच आम्ही थोडाफार पैसा मिळवतो. तेच तुमच्या शिष्यांनी सांडले." स्वामींनी विचारले, "दिवसभरात तुला किती प्राप्ति होते ?" तो म्हणाला, "एक दाम मिळतो." ते ऐकून स्वामींनी बाइसांना सांगितले, "बाइ, एकु दामु वोपा" आणि त्याप्रमाणे बाइसांनी त्याला एक दाम दिला ( भा. २ पा. ५५ ). या आख्यायिकेवरून मठात असतांना भक्तमंडळींना कसे व्यवस्थित व काळजीपूर्वक राहावे लागे याची कल्पना येईल.

## परिवारावरील प्रेम

मठातील शिस्त आणि आपली आज्ञा पाळायला लावण्याच्या बाबतीत श्रीचक्रधरस्वामी अतिशय काटेकोरपणाने, किंबहुना किंचित् कठोरपणाने वागतांना दिसले तरी त्यांचे अंतःकरण अतिशय कोमल होते. आणि म्हणून आपल्या शिष्यसमुदायाची ते काळजीहि तशीच फार प्रेमाने घेत. स्वामींच्यासाठी उपाहार डोक्यावर घेऊन तिकवनायक हिवरळीला आले. त्यांना पाहून स्वामींनी "नाएको, श्रमलेति" असे म्हणत पुढे जाऊन 'तेयाचीए डोइची पाटी उतरवीली' – त्यांच्या डोक्यावरील पाटी खाली उतरवीली. ( भा. ३ पा. ११५ ). पैठणला त्रिपुरुषाच्या मठात असतांना बाइसाच्या लाथेने देवळाचे कवाड पडले आणि त्यामुळे आत असलेल्या काकोला जबर मार लागला. त्याला मूर्च्छा आली. भक्तजनाबरोबर स्वामीहि तेथे धावत धावत गेले आणि "काइ भटो

दुखवलेति : सावेया दुखवलेति" असे म्हणत म्हणत त्यांनी काकोसाच्या पाठीवरून आपला हात फिरवला. त्यामुळे त्याची मूर्च्छा गेली, इतकेच नाही तर 'तेयाचे दुःख होते ते निवर्तले' (भा. ४ पा. ४४). नागदेवांच्या अनुसरणानंतर स्वामींनी त्यांना रितपुरला पाठवले ते त्यांची परीक्षा पाहण्यासाठीच. रितपुरवरून येणाऱ्या भक्तमंडळीजवळ स्वामी नेहमी त्यांची चौकशी करीत. आपल्या भेटीसाठी नागदेव हाताच्या बोटावर दिवस मोजीत आहे, असे त्यांना कळले. त्यांनी नागदेवांना निरोप पाठवला की आम्ही सांगितल्यावाचून येऊ नये. पुढे त्यांनी पुन्हा चौकशी केली तेव्हां त्यांना कळले की नागदेवाचे जीवित म्हणजे 'आजिचे पाहेचे बोलणे'–आज उद्याची गोष्ट आहे. तेव्हां त्यांनी घाईने निरोप पाठवून त्यांना बोलावून घेतले. निरोप असा होता की, "आम्ही तुमच्या भेटीसाठी फार उतावीळ झालो आहो. तेव्हां अगदी तावडतोब निघावे." निरोप पाठवून त्यांच्या येण्याची स्वामी वाट पाहूं लागले. ते आलेले दिसताच 'गोसावी सामोरे बीजे केले'-स्वामी पुढे गेले. नागदेवांनी त्यांना दंडवते घातली. ते रडू लागले. तेव्हां स्वामींचाहि गळा दाटून आला. ते म्हणाले, "उगा वानरेया : एथ क्षेम दया : हे तुम्हा उतावीळ जाले :" नागदेव उठले. त्यांना स्वामींनी आलिंगन दिले. नागदेवाचार्य समोर बसून एखाद्या लहान लेकराप्रमाणे रडू लागले. तेव्हां स्वामी पुन्हा म्हणाले, "उगे असा गा वानरेया : दुख न करा : आता एथौनि तुमते केधवाही पाठविजे ना :" (उत्त. २). आणि त्याप्रमाणे स्वामींनी आपल्या प्रयाणापर्यंत नागदेवांना खरोखरच आपल्याजवळून दूर कुठेहि पाठवले नाही. डोमेग्रामला असतांना नागदेवांना ज्वर आला हे कळतांच तो निवारण करण्यासाठी स्वामींनी त्यांना मुद्दामहून नेवाशाला बाजारासाठी पाठवले. पण लागलीच त्यांच्या मागोमाग नेवाशाला जाणाऱ्या वामन मतिविलासाबरोबर त्यांच्यासाठी शिदोरी पाठवायला मात्र ते चुकले नाहीत. (उत्त. १०३ ). या व अशा इतर अनेक आख्यायिकावरून आपल्या भक्तजनाविषयी स्वामींचे अंतःकरण कसे प्रेमाने तुडुंब भरलेले असे आणि ते त्यांच्या सुखस्वास्थ्याची काळजी किती आपुलकीने घेत याची चांगली कल्पना येते.

# १

# दिनचर्या

**लौकर निजे—**

रात्री निद्रेची वेळ झाली म्हणजे बाइसा, देवळातील किंवा मठातील ओट्यावर शयनासन रचीत आणि त्यावर श्रीचक्रधरस्वामी झोपी जात. त्यानंतर बाइसा आपल्या झोपेची तयारी करीत. स्वामी ओट्यावर निजलेले असले म्हणजे बाइसा त्यांच्या पायथ्याशी खाली झोपत. स्वामींचे उपानह एका पालवात गुंडाळून त्या आपल्या उशाकडे किंवा कधी कधी आडव्या बाजूला ठेवून मग त्या झोपी जात. देवळाच्या किंवा मठाच्या दरवाज्याबाहेर नागदेवाचार्य निद्रा करीत. सामान्यतः उन्हाळयात आणि पावसाळयात ते बाहेर दरवाजाजवळ झोपत. हिवाळयात मात्र आत झोपत. पण ते आत-बाहेर कुठेहि झोपले तरी दरवाजाच्या उंबऱ्याची उशी करून झोपत. नागदेवांना नेहमी जाड्य येत असे आणि त्यामुळे त्यांच्या डोळ्यावर झोप नेहमी तरंगत असायची. स्वामी झोपले म्हणजे रात्री नागदेव जे निद्राधीन व्हायचे ते सकाळी स्वामींनी उठवले म्हणजेच उठत. तोपर्यंत अगदी गाढ झोपत.

**लौकर उठे—**

स्वामी जसे सगळयांच्या आधी झोपत त्याप्रमाणे ते सगळयांच्या आधी उठतहि. जणु, लौकर निजे लौकर उठे, तया ज्ञान संपत्ति आरोग्य भेटे, या म्हणीचे ते मूर्तिमंत उदाहरण होते. ‘पश्चात पाहारी उठीजे : तो सारस्वत काळु : देवता हृदयासि ये’ (आ. ११४) असा उपदेश

त्यांनीच आपल्या शिष्यांना केलेला आहे. चिमण्या चिवचिवायला लागतात अशी, तांबडे फुटण्यापूर्वीची पहाटची वेळ अत्यंत आल्हादकारक असते. इतकेच नाही तर ती मंगलवेळा असते. अशा या मंगल पहाटच्या वेळी स्वामी जागे होत आणि आपले पाय खाली लोंबत सोडून ओट्यावर उठून बसत. त्यावेळी बाइसा झोपलेल्याच असायच्या. त्यांना उठवण्यासाठी स्वामी हळूच खाकरत. त्यासरशी बाइसा उठून बसत आणि लगबगीने स्वामींचे चरणवंदन करीत. पालवात गुंडाळून ठेवलेल्या स्वामींच्या उपानह काढून त्या त्यांच्या पायात चढवीत. स्वामींच्या प्रत्येक चरणात उपानह घालतांना बाइसा त्या चरणाचे भक्तिभावपूर्वक अंतःकरणाने पुनःपुन्हा अभिवंदन करीत. स्वामींनी पायात उपानह घातले की बाइसा पुढे जाऊन मठाचा दरवाजा उघडीत. त्यातून बाहेर पडण्यासाठी स्वामी दरवाजाजवळ येत तोच...

## नागदेवांना उठवणे

उंबरवठ्याची उशी करून भटोबास त्या दरवाजाजवळ निजलेले आढळायचे. त्यांना पाहून स्वामी दरवाजाच्या दोन्ही बाजू दोन्ही हातांनी धरीत, आपला एक पाय उंबरवठ्यावर ठेवीत, आणि दुसरा पाय भटोबासाच्या वक्षस्थळावर ठेवत. जाड्यामुळे भटोबास झोपेत गुंगलेले असल्यामुळे त्यांना लौकर जाग येत नसे म्हणून स्वामी आपल्या पायाच्या आंगठ्याने त्यांचे वक्षस्थळ चेपीत. त्यामुळे अर्थातच भटोबासांची झोप उडून जाऊन ते एकदम जागे होत. आणि स्वामींचा चरण हृदयाशी धरून त्याला आलिंगन देत, तो आपल्या डोक्यावर ठेवीत आणि त्याचे चुंबन घेत. नंतर दुसरा चरण हृदयाशी धरून त्याला आलिंगन देत, तो आपल्या डोक्यावर ठेवीत आणि मग त्याचे चुंबन घेत. त्यामुळे भटोबासांना होणारा आनंद अवर्णनीय आहे. स्वामींचे चरण दीर्घ काळ हृदयाशी धरून ठेवल्यामुळे अनेकदा बाइसा भटोबासांना सांगून स्वामींना मोकळे करीत. आणि मग स्वामी आपल्या दिनचर्येला आरंभ करीत. स्वामी आणि भटोबास प्रातर्विधी उरकून येईपर्यंत इकडे बाइसा मठात दिवा लावीत, मठ झाडून काढून स्वामींचे शयनासन उचलून त्या ठिकाणी त्यांचे बसण्याचे आसन तयार

करीत. पाणी तापवून त्या उष्ण पाण्याचा तांब्या व स्वामींचे उपरणे जवळ घेऊन त्या स्वामींची वाट पाहत.

## प्रातर्विधी

स्वामी प्रातर्विधी उरकून आले म्हणजे भटोबास बाइसाच्या हातातील उष्णोदकाचा तांब्या आपल्या हातात घेऊन स्वामींच्या हातापायावर पाणी घालीत. हातपाय धुवून झाले म्हणजे उपरणे पांघरत पांघरत स्वामी आपल्या ओट्यावरील आसनावर येऊन बसत. बाइसा पालवाने स्वामींचे पाय पुसून स्वच्छ करीत. स्वामी आसनस्थ झाले म्हणजे भटोबास येऊन स्वामींचे चरणाभिवंदन करून जवळ बसत. तितक्यात इतर भक्तमंडळीहि प्रातर्विधी उरकून स्वामींच्या समोर येऊन बसायची. आणि मग स्वामींच्या निरूपणाला सुरवात होत असे. दररोजच त्यांना निरूपणाची प्रवृत्ति असे, असे नाही. कधी कधी प्रातर्विधी उरकून आल्यावर ते आसनावर बसून ध्यानात मग्न होत. क्वचित्, त्यावेळी उजाडायला फार अवकाश असला तर ते झोपूनहि राहत.

## सगळ्या जीवांचे चिंतन

स्वामी ध्यानस्थ होऊन कशाचे तरी चिंतन करीत हे बाइसाच्या लक्ष्यात येई. एक वेळ त्यांनी स्वामींना विचारले, "जी जी, या प्रातःकाळच्या वेळी आम्ही भक्तजन आपले चिंतन करीत असतो. पण आपण कुणाचे व कशाचे चिंतन करीत असता?" स्वामी म्हणाले, "बाइ, आम्ही सगळ्या जीवांची चिंता करतो." यावरून स्वामींचे हृदय किती विशाल होते याची कल्पना करता येईल. प्रातःकाळच्या मंगल प्रसंगी अज्ञ जीवांना सन्मार्ग दाखविण्यासाठी निरूपण करणारे आणि सगळ्या जीवांचे दुःख नाहीसे कसे होईल याची हृदयात सतत काळजी वाहणारे स्वामी खरोखर धन्य होत. श्रीचक्रधरस्वामींचा अवतार 'जीवोद्धारव्यसनी' होता असे म्हणतात, ते कसे यथार्थ आहे याची कल्पना यावरून सहज येईल. ध्यानस्थ असतांना कधी कधी ते आपल्या गुरुमाउलीच्या,—श्रीगोविंदप्रभूच्या लीळाहि आठवीत असत. निरूपण किंवा ध्यान आटोपते न आटोपते तोच....

## दंतधावन

पूर्व क्षितिजावर तांबडे फुटून अरुणोदयाची मंगल पताका लागायची. आणि मागोमाग हळूहळू प्रकाशमय सहस्ररश्मीची स्वारी आकाशात अवतीर्ण व्हायची. 'तव सूर्योदये दंतपंक्ती : सीळका चोखाळती' ( पूजा. १५ ). सूर्योदयाच्या वेळेस स्वामी दंतधावन आणि मुखमार्जन करीत. दंतधावनासाठी म्हणून आधल्या दिवशी भटोबास आंब्याच्या, बाभळीच्या किंवा कधी कधी बोरीच्या दोन शिळका आणून ठेवीत. त्यांतील एका शिळकेने ते दात घाशीत. दात घासून झाले म्हणजे ती काडी फेकून देऊन दुसरी काडी आपल्या डाव्या आंगठ्याच्या नखाने चिरीत व तिच्या दोन फाका करीत. क्रमाक्रमाने प्रत्येक काडी धनुष्याकार करून जिभेवरील मळ ते साफ करीत आणि मग बाइसांनी दिलेल्या उष्णोदकाने आपले तोंड आणि हातपाय पुन्हा स्वच्छ धूत. आपल्या हातातील पातळ अंगपुसण्याने तोंड पुसत. मग बाइसा स्वामींचे हात आणि पाय पुसून काढीत असे. स्वामी पुन्हा जाऊन आसनावर विराजमान होत.

## स्नान चार दिवसांनी

नित्यक्रमानेच पाहायचे तर मुखमार्जनानंतर आंघोळ व्हायला पाहिजे. पण श्रीचक्रधरस्वामी दररोज स्नान करीत असत असे दिसत नाही. 'बाबासि बहुत दीस मादने नाही' असा उल्लेख लीळाचरित्रात अनेक ठिकाणी आढळतो. (भा. ३. पा. ३८; भा. ४. पा. ५; उत्त. ४५३ पहा ) 'गोसावियासि चौ दीसा मादने होए : आठा दीसा क्षेउर होए' ( उत्त. ३५० ) असे एका आख्यायिकेत आलेले आहे. त्यावरून दर आठ दिवसांनी ते क्षौर करीत आणि चार दिवसांनी स्नान करीत, असे दिसते. एखाद्या ठिकाणी ते दररोजहि स्नान करीत, नाही असे नाही. उदा: पूर्वार्ध काळात ते सावळदेवाला दाएनायकाच्या आवारात होते तेव्हां 'तेथ गोसावी प्रतदीनी पूजा : आरोगण : तथा मादने होए' ( भा. ३. पा. ६९ ). पण असे क्वचित् होत असे. बहुधा ते दर चार दिवसांनी स्नान करीत आणि कधी कधी तर अनेक दिवस स्नान करीत नसत, असे दिसते. तथापि स्वामी भक्तजनांच्या घरी ज्यावेळी असत तेव्हां त्यांना

'मर्दना : मादने' नेहमी होत असे. यावरून असे म्हणता येते की स्वामी भ्रमण करीत असले म्हणजे आपणहून स्नानाच्या भानगडीत पडत नसत. त्यांना कोणी आदरातिथ्याने बोलावून नेले म्हणजे अर्थातच तेथे स्नानाचा सोहळा होई. एरवी, चार चार दिवसांनीच ते आंघोळ करीत. 'बोने : आरोगणा : मर्दना' या पक्षातील क्रमाचे स्पष्टीकरण करतांना लक्षणबंद काराने म्हटले आहे की 'मा तर आधी 'मर्दना' मग 'आरोगणा' ऐसे असावे तेथ आरोगणे पुढा मर्दना कां पा मांडली असे : तर ते ऐसे : बोने आरोगणा तर प्रतिदिनी होए : आन चौ दिसा मर्दना मादने होए म्हणौनी' (ल. बं. उद्ध. ३६). पण तोहि नियम अगदी कटाक्षाने पाळला जात असे असे नाही आणि म्हणून त्यांचे अनेक दिवस स्नानावाचून जात. असे झाले म्हणजे बाइसा, महदाइसा वगैरे भक्त मंडळी त्यांना मंगल स्नान घालीत. (भा. ३. पा. ३८; भा. ४. पा. ५).

तेव्हां, स्वामींच्या दिनचर्येत स्नानाला फारसे महत्त्वाचे स्थान नव्हते हे लक्ष्यात घेऊन आपण आत पुढे जाऊ या. दंतधावन व मुखमार्जन होऊन स्वामी आसनस्थ झाले म्हणजे त्यांच्या प्रातःकालीन पूजावसराला सुरवात होई. तो अर्थात् भक्तजनाकडून करण्यात येत असे. स्वामी एकाकी असतांना पूजावसराचे प्रसंग फारसे होत नसत हे सांगायला नको. कुणी त्यांना आग्रहाने आपल्या घरी नेले म्हणजे तेथे त्यांचा पूजापुरस्कारहि होत असे. एकाकी काळातच भांडारेकर त्यांच्याजवळ होते तेव्हां ते मधूनमधून स्वामींचा पूजावसर करीत, असे दिसते. पण स्वामी पैठणला जाऊन त्यांनी नागांबिकेला (बाइसाला) प्रेम दान दिले तेव्हांपासून बाइसा नेहमी स्वामींच्या बरोबर असत आणि त्या दररोज त्यांचा त्रिकाळ पूजावसर साजरा करीत.

## सकाळचा पूजावसर

प्रातःकाळी मुखमार्जन करून स्वामी आसनस्थ झाले म्हणजे बाइसा आपले हातपाय व तोंड धूत आणि सोवळे नेसत. भटोबास गोपीचंदन उगाळून ठेवीत. त्याचा ऊर्ध्वपौंड्र टिळा बाइसा स्वामींच्या कपाळावर लावीत. क्वचित कोणी लौकिकदृष्टया श्रेष्ठ असे पाहुणे स्वामींच्या-

कडे आलेले असले म्हणजे स्वामी स्वतःच आपल्या हाताने गोपीचंदनाचा उभा गंध कपाळावर लावीत. गंधाच्या दोन्ही उभ्या रेषा अगदी समांतर आणि सुंदर निघत. आधल्या दिवशी बाइसा फुले आणून ती ओल्या फडक्यात गुंडाळून ठेवीत. त्यांचे निरनिराळे अलंकार करून बाइसा स्वामींच्या अंगावर घालीत. आणि मग धुपाटण्यात विस्तव आणून त्यावर दशांग धूप घालीत. आरतीत पाचहि वाती पेटवून ती तबकात ठेवीत आणि मग बाइसा स्वामींना आधी धूपार्ती करीत आणि मग ओवाळून मंगळार्ती करीत. त्यावेळी त्या स्वतः आणि भटोबास 'जयतु मंगळ मंगळा परम मंगळरूपा' ही आरती म्हणत. स्वामींना आरती करतांना बाइसांचे अंतःकरण भक्तिभावनेने इतके भरून येत असे की त्यांच्या शरीरावर आठहि सात्त्विक भाव प्रगट होऊन त्यांचे हात थरथर कापू लागत आणि म्हणून त्यांच्या हातातील आरतीचे भांडेहि थरारत असे. तेव्हां स्वामींच्या आज्ञेवरून भटोबास ते आरतीचे भांडे आपल्या हातात घेत. नंतर आपल्या हातात हात घालून बाइसा स्वामींना निरांजन करीत. आरती खाली ठेवली म्हणजे भटोबास स्वामींना पाच दंडवते घालीत आणि बाइसा एकदा दंडवते घालायला लागल्या की त्याला सीमाच नसे. दंडवते घालून झाल्यावर बाइसा स्वामींना सुपारीची खांडे अर्पण करीत. विडे करून देत. हे होईपर्यंतहि त्यांच्या हाताचा थरकाप थांबत नसे. दंडवते घालून झाली म्हणजे भटोबास पुरुषसूक्तातील मंत्र म्हणत. नाथोबा जवळ असले म्हणजे ते स्वामींना तिथि-वार सांगत आणि अशा रीतीने स्वामींचा प्रातःपूजावसर समाप्त होई.

### सकाळचे विहरण

सकाळचा पूजावसर आटोपला म्हणजे स्वामी बहुधा भक्तजना-सहित फिरायला बाहेर जात. पण बाहेरची कुणी मंडळी आलेली असली किंवा कुणीतरी येणार आहे अशी त्यांना कल्पना स्फुरली तर मात्र ते मठातच आसनावर उपविष्ट होत. 'एकु दीस गोसावियासि उदेयाचा पूजावसर जालेयानंतरे गोसावी वीहरणासि बीजे केले' (भा. २ पा. २७ ५२; ५७; ६२; ६३; भा. ३ पा. २८; उत्त. ८०) या अनेक उदाहरणावरून त्यांचा नित्याचा नियम सकाळच्या पूजावसरानंतर फिरायला जाण्याचा होता असे दिसते. पण 'गोसावीयासि उदेयाचा पूजावस्वर जालेयानंतरे पटिसाळेवरि

बाइसी आसन केले : मग आसनी बैसले असति : गोपाळ पंडित ते रायाचे वक्ते...गोसावीयाचेया दरिसना आले' (भा. २ पा. ४५); 'गोसावीयासि उदेयाचा पूजावस्वर जालेयानंतरे पट्सिाळे आसन : तव इंद्राइ नाम महात्मे...दरिसना आले' (सदर. पा. ३९); '...उदेयाचा पुजाअवस्वर जाला : गोसावी...आसनी उपवीष्ट असति : तव पीसी एकि आली' (भा. ४ पा. २०) इत्यादि उल्लेखावरून येणाऱ्यांच्या निमित्ताने ते मठातच आसन करून राहत, असे दिसून येईल. सिद्धांते हरिबा-साच्या गद्य पूजावसरात आणि भास्करभट्ट बोरीकरांच्या पद्य-पूजावसरात नित्याचा क्रम म्हणून उदयाच्या पूजावसरानंतर 'विहरणाचे' च वर्णन केलेले आढळते. 'भट मंत्र म्हणती : मंडळीक तीथी वारु जाणवीती : बाइसे कापुरे वीडा बोळगवीती : श्रीचक्रधरासी' अशा रीतीने प्रातःकाळचा पूजावसर आटोपला म्हणजे मग 'आजी खेळो जाईजैल केउती : यैसे बोलीले नीज किंकराप्रती : अमृतास्रावेया वाचा जीवपती : आनंदचंद्रे' (भा. बो. पूजा २८, २९) या ओव्यावरून वरील विधानाचा पाठपुरावा होईल.

फिरायला जायचे असले म्हणजे भटोबास पुढील तयारीला लागत. स्वामींच्या उपानह आणून त्या त्यांच्या चरणात चढवायच्या. आणि मग अंगी-टोपरे साफसूफ करून ते स्वामींच्या आंगावर घालायचे. आंगीला कसे असत. ते बांधून झाले म्हणजे स्वामींच्या डोक्यावर भटोबास टोपरे ठेवीत. आणि मग अंगावर उपरणे घेऊन स्वामी विहरणासाठी बाहेर पडत. या वर्णनावरून स्वामींच्या एकंदर पोषाखाची कल्पना येईल. अंगी, टोपरे आणि उपरणे एवढाच त्यांचा अगदी साधा पोषाख असे. ऋतुमानाप्रमाणे त्यात काय थोडाफार बदल होईल तेवढाच. हा बदल देखील वस्त्रे परिधान करण्याच्या पद्धतीत. उदाः उन्हाळ्याच्या दिवसात उपरणे गळ्याभोवती घेतल्यावर दोन्ही बाजूंनी त्याचे दोन सोगे सोडीत. हिवाळ्यात तेच उपरणे डोक्यावरून घेऊन आपले कान झाकीत. पावसाळ्यात बाहेर पडायचे असले म्हणजे उपरण्याचा चांदोवा करून स्वामींच्या डोक्यावर तो धरण्यात येत असे; म्हणजेच आजच्या छत्रीसारखा त्याचा उपयोग होई. भक्तांनी अंगाला लावलेल्या कस्तुरीचंदनादि सुगंधी अनुलेपनामुळे स्वामींची आंगी

परिमळबद्दळ' असे. बारकशीप्रमाणे तिला कसे असत. त्यांना भटोबास, कधीकधी 'कसेयासि गाठी पाडीति' (ग. पूजा.); तर कधी 'आंगिएचे मोकळे कसे' (भा. २ पा. ६) असत. ही आंगी आणि तिच्या बाह्या लांब असत असे दिसते. म्हणूनच धावण्याच्या प्रसंगी 'आंगी खोवीली : आंगीचीया बाहीया वरतीया केलीया' (भा. ३ पा. ८४) म्हणजे आंगी खोवून तिच्या बाह्या वर कराव्या लागत.

असा पोशाख करून स्वामी बाहेर पडत. त्यांच्याबरोबर भटोबास व इतर भक्तमंडळी असत. बाइसाहि स्वयंपाकाची तयारी करून ठेवून स्वामीबरोबर जात. स्वयंपाकाची तयारी करायची ती काय? तर थोडीशी कणीक तिंबून ठेवून पाणीभातासाठी पाण्यामधे तांदूळ टाकायचे, चुलीत विस्तव पेटावा म्हणून शेण्या किंवा गोवऱ्या लावायच्या. हे झट्दिशी करून बाइसा आपल्याबरोबर एक पासोडी, पाण्याचे भांडे आणि चंची घेत आणि स्वामीबरोबर फिरायला जात. 'आज कुणीकडे फिरायला जावे बरे?' असा स्वामींनी प्रश्न केला म्हणजे भक्तमंडळी निरनिराळ्या जागा सुचवीत. भटोबास हे स्वामींची प्रवृत्ति ओळखून एखादे स्थान सुचवीत आणि स्वामी सामान्येकरून भटोबासांनी सुच-वलेल्या स्थानाकडेच विहार करण्यासाठी जात. अनेकदा भटोबास अगोदरच त्या स्थानाची पाहणी करून येत. तिथे पोचले म्हणजे बाइसा स्वामीसाठी आसन घालीत. त्यावर स्वामी उपविष्ट होत. आसनावर बसण्यापूर्वी बाइसा पालवाने स्वामींचे पाय पुसून स्वच्छ करीत.

## निरूपण व भक्तांचा कर्मनाश

विहरणस्थानी स्वामी स्वतः विहार करीतच असे नाही. अनेकदा त्यांना निरूपण करावेसे वाटे. तेव्हां भक्तमंडळीला बसवून ते निरूपण करीत 'गोसावीया निरूपणाची प्रवृत्ति तरि निरूपण करीती' (ग. पूजा.). 'मळे संदी माहात्मेया वैराग्य निरूपण' (भा. २. पा. २८) या आख्यायिकेतील निरूपण केव्हां झालेले आहे? तर,...'उदयाचा पूजावस्वर जालेया नंतरे मग वीहरणा बीजे करित असति : दोही मळेयाचीया संदी माहात्मे एक उघडे देखीले' –तेव्हां! 'एकू दी उदेयाचा पूजावेसर जालेया

ंतरे गोसावी वीहरणा बीजे केले : पींडापासी आसन असे : गोसावी नीरूपण करित असत '-( उत्त. ८० ); वगैरे उल्लेखावरून ही गोष्ट स्पष्ट होईल.

निरूपणाची प्रवृत्ति नसली तर मग आपल्या बरोबरच्या भक्त मंडळीला 'धाववीति : पव्हवीति : जुंझवीति : दरेदरकुटे बूजवीति : उंचे टेकें असति तीये समस्थळे करविति : पाषाण फोडवीति : ऐसे नानाविध वीहार करीति' ( ग. पूजा ); म्हणजे त्यांना धावायला लावीत, पोहायला सांगत, कधी त्यांच्यात भांडण लावून त्यांना भांडू देत, कधी त्यांच्याकडून खोलगट गड्डे बुजवून घेत, तर कधी रस्त्यातील उंचवटे साफ करून घेत; क्वचित त्यांना दगड फोडायला सांगत. अशी अनेक कामे स्वामी आपल्या भक्तजनाकडून करवून घेत. ही सर्व कामे उगीच गंमत म्हणून करून घेत असे मात्र नाही. तर भक्तांची त्या त्या प्रकारची, एरवी पुढे भोगावी लाग-गारी कर्मे या अशा क्रियांनी स्वामी नासत असत. 'यापरी एके कर्मे नासीति' असे गद्य पूजावसरात म्हटले आहे ते याच अर्थाने. एवढे होते न होते तोच सूर्य पुष्कळ वर आल्यामुळे ऊन तापायला लागले म्हणजे सर्व जण मठाकडे परतत. अनेकदा स्वामी या खेळात इतके रंगून जात की त्यांना परतण्याची आठवणहि होत नसे. तेव्हां बाइसा विनंती करायच्या की, "बाबा, आरोगणे उसीरू जाला : मठा बीजे कीजो गा : " बाइसाची विनंती ऐकून कधी ताबड-तोब तर कधी आपल्या मनाला वाटेल त्यावेळेस स्वामी परतत. सारांश, उदयाच्या पूजावसरानंतर स्वामी 'जीवा देत चतुर्विध दान : गोसावी पातले क्रीडास्थान.' ते विहरणाच्या जागी आले म्हणजे कधी 'आसनी बैसौनि नीरोपण : करीती सेवकासी' तर कधी 'जुझवीती धाववीती पोहवीती : दरे दरकुटे बुजवीती : पाखाण फोडवीती : आनंदवीती श्रीचक्रधरु' आणि मग 'यैसीया लीळा अनंतु : कींकीर जन करुनी पुनीतु : मग मुनीजनेसी येतु : आस्रमासी' ( प. पूजा. ३१-३४ ).

## आरोगणा व दुपारचा पूजावसर

स्वामी मठाकडे परत यायला निघाले म्हणजे बाइसा जरा पुढे येऊन मठ आतून बाहेरून झाडून स्वच्छ करीत. बाहेरच्या ओट्यावर पद्मासन घालून ठेवीत. स्वामी परत आले म्हणजे आंगी--टोपरे काढून ते भटोबासाच्या

हाती देत. भटोबास ते खुंटीला वाळत घालीत. त्यानंतर 'स्वामी करीती गुरुळा : धुती मुखकमळ : बाईसी अंघ्रीयौगुळ : प्रक्षाळले" (प. पूजा ३५). उष्णोदकाने स्वामी हातपाय धूत व बाइसाच्या हातातील अंगपुसणे घेऊन हातपाय पुसत. कधी कधी ते अंगपुसणे ओले करून आपले सगळे अंग त्याने पुसून काढीत. एवढे झाले म्हणजे बाइसा स्वामींना विडा अर्पण करीत व आपण आरोगणेची आणि दुपारच्या पूजावसराची तयारी करायला मठात जात. स्वामी भक्तजनाबरोबर गोष्टी करीत आसनावरच बसून राहायचे. पूजावसराची तयारी झाली म्हणजे

वीषाळ भाळस्तळा : चंदनाचा आडा रेखीला
नीकी नव्हे चंद्रकळा : तेने पाडे
सर्वांगी चंदनाची भौरी केली : एक्षकर्दमे चर्चिली
आडा रेखीला भाळी : मनोहरू

स्वामींच्या सर्वांगाला चंदनाची किंवा कधी कधी यक्षकर्दमाची उटी लावून त्यांच्या विशाल भाळप्रदेशावर बाइसा चंदनाचे गंध लावीत. नंतर प्रातःकालीन पूजावसराप्रमाणे स्वामींची पूजा सुरू होई. म्हणजे धुपाटण्यातील विस्तवावर धूप घालून आणि आरतीच्या पात्रात पाच वाती उजळून बाइसा स्वामींना प्रथम धूपार्ती आणि मग मंगळार्ती करीत

बाइसे कापुरे वीडा वोळगवीला : भक्ती श्रीचरणा नमस्कार केला
मग कृष्णागरु धूपु वोळगवीला : श्रीचक्रधरासी
रत्नाचे दीप उजळीले : भक्ती बाइसी वोवाळीले

या पूजावसरप्रसंगीहि बाइसाचे अंतःकरण भक्तिभावाने भरून आल्यामुळे त्यांच्या सर्व शरीरावर सात्त्विक भाव दाटून येऊन हात थरथर कापू लागायचे आणि म्हणून स्वामींच्या आज्ञेवरून भटोबास त्यांच्या हातातील आरतीचे भांडे आपण तोलून धरायचे. आरती संपली म्हणजे भटोबास पाच आणि बाइसा अनेक दंडवते स्वामींना घालीत. अर्थात् पूजावसरप्रसंगी उपस्थित असलेल्या भक्तजनाकडूनहि स्वामींना दंडवते घातली जायची.

## आरोगणेसाठी भिक्षान्न किंवा उपाहार

अशा रीतीने हा दुपारचा पूजावसर आटोपला म्हणजे श्रीचक्रधर-स्वामींची आरोगणा होत असे. ते आरोगणेला बसले म्हणजे आधी बाइसा

त्यांना निंब्रलोण करीत. 'अमृतसार कामवले : तैसे ताट वोगरीले' असे ताट वाढून झाले की 'मग बाइसी निंब्रलोन केले : देवरायासि' (प. पूजा. ३९). स्वामींचे जेवण अगदी साधे असे. प्रारंभी 'तूप भातु कढी : दोनि साकवतीया' म्हणजे दोन भाज्या 'ऐसी आरोगणा होए.' मग 'पोळी तरी चौतकौर : मांडा तरी दीढु : पुरी तरि एकि : कानवटी फेडुनि तुप पढीति ऐसी आरोगणा होए' आणि शेवटी 'ताक-भाताची आरोगणा होए' (ग. पूजा.). 'पोळी असली तर चतकोर, मांडा असला तर दीड आणि पुरी असली तर एक.' असे म्हणण्याचे कारण स्पष्ट दिसते. बाइसा नेहमी जो उपाहार तयार करीत त्यात कणीक तिंबून पोळीचीच योजना असे. नेहमी भटकती करीत फिरणाऱ्या त्यांच्या जवळ मांडे किंवा पुऱ्या करण्याची साधने तरी कुठून असणार ? पण स्वामी भ्रमण करीत असतांना निरनिराळ्या गावी अवस्थान करीत. तेव्हां गावातील श्रद्धाळू मंडळी त्यांना 'उपाहार' घेऊन येत; किंवा त्यांना आपल्या घरी आरोगणेसाठी नेत. अर्थात् तेव्हां स्वामीसाठी ती मंडळी चांगला सुग्रास अन्नाचा स्वयंपाक करीत. तो उपाहार स्वामींच्यासाठी आला म्हणजे त्यातून वर लिहिल्याप्रमाणे पदार्थ बाइसा स्वामींना आरोगणेसाठी देत.

'एकु दी गोसावीयासी उदेयाचा पूजावसर जालेयानंतरे गोसावी बाइसाते म्हणीतले : बाइ : आजि काही करू नको : आजि महात्मेयाचे भिक्षान्न भोजन कीजैल' ( उत्त. ८३ ). यावरून शिष्यांनी मागून आणलेले भिक्षान्न स्वामी बहुधा सेवन करीत नसत. त्यांच्यासाठी बाइसा दररोज स्वतंत्र स्वयंपाक करीत, असे दिसते. ज्या वेळी शिष्यांनी मागून आणलेले भिक्षान्न भोजन करण्याची प्रवृत्ति असे त्या वेळी आलेल्या भिक्षान्नाच्या झोळ्या भक्तजन बाइसाच्या स्वाधीन करीत. आणि 'बाइसी धड पदार्थ गोसावीया लागौनि नीवडिले : गोसावियासी ताट केले :' ( उत्त. ८३ ). यावरून त्या भिक्षान्नातील चांगले चांगले पदार्थ बाइसा स्वामीसाठी वेचून काढीत. आणि ते स्वामींना आरोगणेसाठी देत असे दिसते. 'मग बाइसी पूजा केली : आरोगण जाली : बाइसी पदार्थु निवडीला : मग गोसावियासि आरोगण दीधली' ( भा. ४ पा. २ ) यावरूनहि हे स्पष्ट होते. 'वडवाळिये अवधुताचे भिक्षान्न आरोगण' या लीळेतील उल्लेखावरूनहि

या विधानाचा पाठपुरावा होतो. स्वामींना एका अवधूताने आणलेल्या भिक्षान्नभोजनाची प्रवृत्ति झाली. ते आणल्यावर 'मग बाइसी पदार्थु निवडु आदरिला' (भा. ४ पा. ४३). 'निवडु आदरिला' या शब्दावरून ही गोष्ट स्पष्ट होते. तथापि त्या दिवशी मात्र स्वामींनी बाइसांना पदार्थ निवडू दिले नाहीत. 'बाइ: कोरके नको निवडु : कालवा' असे सांगितले व त्या काल्यातील भिक्षान्नच ते जेवले, ही गोष्ट निराळी.

स्वामींचे नित्याचे जेवण साधे असले तरी प्रसंगी आपल्या आवडीचे पदार्थ ते करवून घेत. त्यांना 'श्वेत उपहार' आवडत असावा असे दिसते. 'बाइ : श्वेत उपहारु करा' ( उत्त. १२३ ) असे बरेच उल्लेख आढळतात. या श्वेत उपहारात दही, दूध, तूप, तांदूळ, खीर, पोळ्या, पुऱ्या वगैरेंचा समावेश होत असे. 'महदाइसी तांदुळाचा भातु : तांदुळाचि खीरि : घारिया : अमृतफळे : खांडिवे : दहीवडे : कालण : दूध : दही अपार आणिले' ( उत्त. १२३ ) यावरून हे दिसून येईल. 'बाइसे म्हणति : बाबासि तांदुळाची खीरि आवडे' ( भा. ३. पा. १४ ). यावरून स्वामींना तांदळाची खीर आवडत असे असे दिसते. चण्याची घिरडीहि आवडत, असे दिसते. ( भा. ३ पा. ५७ ) क्वचित् त्यांनी 'लाडू कराल तरि हे राहिल' ( भा. ३. पा. ११९ ) अशी लाडवाविषयीचीहि आवड व्यक्त केलेली आहे. पण हे असे प्रसंग फार थोडे. एरवी त्यांचे भोजन, आधी सांगितल्याप्रमाणे अगदी साधे असे यात शंका नाही.

**पहुड : उपहुड**

अशा रीतीने आरोगणा आटोपली म्हणजे हात धुऊन, पुसून व त्यांना चंदनाचे अनुलेपन करून स्वामी, बाइसानी तयार करून दिलेला कर्पूर-विडा सेवन करीत; आणि मग भटोबासाचा हात धरून शतपावली करीत. स्वामींची शतपाउली सुरू असतांनाच इकडे बाइसा ओटा झाडून त्यावरील पद्मासन काढून त्या जागी शयनासन रचीत. शतपावली आटोपली म्हणजे स्वामी येऊन त्या शयनासनावर निद्रा करीत. भक्तजनासहित आपले भोजन आटोपले की बाइसा येऊन स्वामींचे चरण संवाहन करीत. साधारण-पणे चार घटकापर्यंत स्वामी ही दुपारची वामकुक्षी करीत. 'गोसावीयासि

घडीया च्यारि पहुडु होय' आणि मग 'उपहुड होए' म्हणजे ते झोपेतून उठत आणि 'परीश्रया बीजे करीति.'

दुपारचा हा स्वामींचा अगदी ठरलेला कार्यक्रम असे. 'पूजावसरा'तच नाही तर लीळाचरित्रातहि याचे अनेक उल्लेख आढळतात. 'दुपाहाराचा पुजावसर : आरोगण : पहुड : उपहुड' ( भा. ४. पा. २ ); 'दुपाहाराचा पूजावस्वर जाला : आरोगण जाली : गुळळा जाला : वीडा जाला : पहुड होउनि उपहुड जाला' ( उत्त. ६२; ६८ ); 'गोसावीयासि दुपाहाराचा पूजावस्वर जाला : आरोगण : गुळळा : वीडा : पहुड होउनि उपहुड' ( उत्त. १३५ ) असे कितीतरी उल्लेख आहेत. त्यावरून या दुपारच्या कार्यक्रमाची कल्पना येऊ शकेल. 'उपहुड' झाल्यानंतर बहिर्दिशेचाहि दिनक्रम ठरलेला दिसतो.

## दुपारचे निरूपण

बहुधा ओस्यावरील पद्मासनावर बसून स्वामी निरूपण करीत असत. त्यानंतर 'गोसावीयासि दुपाहाराचा पूजावस्वर जाला...पहुड होउनि उपहुड : गोसावी आसनी नीरूपण करिताती ( उत्त. १३६ ). हे निरूपण आपल्या सहवासातील भक्तजनासमोर असे. कधी कधी बाहेरून भेटीला आलेल्या व्यक्तींना उद्देशूनहि स्वामी निरूपण करीत. पण सामान्येकरून 'भटासी नीरूपण होए.' भटोबास आणि इतर मंडळी यांच्यात स्वामींच्या निरूपणाविषयी कधी कधी मतभेद होत असे. तेव्हां इतर मंडळी स्वामी-जवळ आपले मत मांडत. त्यावर 'तुम्ही भणत असा ते नव्हे : वानरेस भणत असति ते होए' असाच निर्णय बहुधा होत असे. आणि त्या सामान्य भक्तजनांना आपल्या म्हणण्याचा खराखुरा आशय कळावा म्हणून स्वामी पुन्हा 'नीरूपीति'. त्यांना ते कळले की नाही म्हणून प्रश्न करीत. कळले नसले तर 'पुढती नीरूपीति' म्हणजे पुन्हा निरूपण करीत. कारण, आपले म्हणणे त्यांना पटवून देण्याचा तर मुख्य हेतु असे. हे निरूपण आटोपले म्हणजे भक्तमंडळींची भिक्षेला जाण्याची वेळ होई. तेव्हां गाव वाटून देऊन, कुणी कुणाबरोबर जायचे हे ठरवून स्वामी त्यांना भिक्षेला पाठवीत. भिक्षा करून आल्यावर स्वामींना झोळया दृष्टपूत करून भक्तजनांचे भोजन होई.

गोसावी उपहुडले : भक्तीजना ग्राम वाटीले
मग माधुक्रीये पाठवीले : देवदेवे ॥
भक्ती करुनी नमस्कारू : भीक्षान्न दृस्टीसमोरू
वोळगौनी सत्त्वपरू : मग भोजन करीती ॥

भक्तांची भोजने आटोपतात तोच 'तव जाले अस्तमान'– सायंकाळ होऊन रात्रीच्या पूजावसराची तयारी सुरू होई. भक्तांची भोजने चालू असली म्हणजे स्वामी त्यांच्या जवळच बसत. 'दृष्टीपूता भक्तीजनाची पांती होए' असे म्हटले आहे ते याच अर्थाने. कधीकधी त्या भिक्षान्नातील 'बाइसा : पदार्थु निवडीति : गोसावीया आरोगणा होए :' पण ही आरोगणा म्हणजे यथार्थतेने आरोगणा नव्हे. भक्तांना भिक्षान्नाचा 'प्रसाद' मिळावा म्हणून त्यातील काही पदार्थ स्वामी थोडेसे खात, एवढेच.

## सायंकाळचा पूजावसार

प्रातःकाळ व मध्यान्हकाळ यावेळच्या पूजावसरापेक्षाहि सायंकाळचा पूजावसर अधिक समारंभाने साजरा होत असे. परमेश्वरावतार असलेल्या श्रीचक्रधरस्वामींच्या 'बाइसे सर्वांगी चंदन : वोळगवीती देवरायासी' –सर्वांगाला चंदन लावून कपाळी कस्तुरीचा मनोहर टिळा रेखीत. 'परमानंदा चैतन्याची खोली : तैसी सर्वांगी चंदनाची भोरी मीर्वली : मग कस्तुरीचा टीळा केला भाळी : मनोहरू :' स्वामींच्या शरीरावर फुलांचे नानाविध अलंकार घातले जात. भास्करभट्ट बोरीकर म्हणतात,

ते जैसे तारांगण गुंफीले : की शुद्ध ओघ गंगेसि आले
तैसे झुळंबुके मीर्वले : कर्णयौगुळी ॥
आनंदवेधाची साखळे : तैसे हातसरे पढीहासले
शांभव वेधाचे सरळे : तैसी शोभे कंठी माळ ॥
प्रकृतु वेधाचे बाहेवटे : तैसी अंगदे मीर्वली घनवटे
श्रीमुकुटी पूजाबंध गोमटे : ते जैसे ब्रह्मतेज ॥
कैवल्ये देयावेया दोसे : तैसा श्रीकरी फुलांचा झेला दीसे

याप्रमाणे, फुलांच्या अलंकारांनी स्वामींचे शरीर विभूषित केल्यावर 'नीरांजन करीति बाइसे : देवरायासी' (प. पूजा. ४९–५२). पूजा, धूपार्ती, मंगळार्ती सकाळच्यासारखीच व्हायची. त्यावेळी बाइसाचे शरीर

सात्त्विक भावांनी थरथरू लागले म्हणजे स्वामींच्या आज्ञेवरून भटोबास नीरांजन आपल्या हाती घेत. मंगळार्तीनंतर बाइसा व भटोबास आणि त्यांच्याबरोबर इतर भक्तमंडळीहि स्वामींना अनेक दंडवते घालीत. पूजा आटोपल्यावर स्वामी बाहेरून आलेल्या मंडळींना निरोप देत व मग त्यांचे रात्रीचे आरोगण होत असे. 'आळीवा दुधातु साकर : तुपभात साकर: ऐसी गोसावीयासि ब्याळी होए:' यावरून रात्रीच्या भोजनात भात, दूध, साखर आणि तूप यांचाच समावेश होत असे. 'रात्रीचीया पहीलीया पहारा : दुधभातु तुप साकरा : यैसी ब्याळी होये दातारा : श्रीचक्रधरासी' (प. पूजा. ५८).

## रात्री पुन्हा निरूपण

ही रात्रीची आरोगणा आटोपली म्हणजे पुन्हा निरूपण होत असे. 'परात्पर वीचारू : कृपावसे नीरोपी करुणाकरु : नागींद्राप्रती श्रीचक्रधरू : मग पहुड स्वीकरीती' (प. पूजा. ५९). हे रात्रीचे निरूपण फक्त बाइसा आणि भटोबास यांच्यासाठीच होत असे. रात्रीचा पूजावसर आटोपल्यावर बाहेरील किंवा ज्या गावी स्वामी उतरले असतील तेथील दर्शनेच्छु मंडळी परत गेलेली असत. स्वामींबरोबर असलेले इतर सेवक अपापल्या नित्यकर्मात, म्हणजेच शास्त्राभ्यासात किंवा स्मरण-चिंतनात मग्न झालेले असल्यामुळे चोहीकडे सामसूम असे. निरूपणाला सुरवात होईपर्यंत रात्रहि बरीच झालेली असायची. अशा प्रशांत वेळी श्रीचक्रधरस्वामी भटोबास व बाइसा यांना 'परावराचे' निरूपण करीत. तेही बराच वेळपर्यंत. जाड्य प्रकृतीच्या भटोबासांच्या डोळ्यावर क्वचित् निद्रा घिरट्या घालू लागायची. म्हणून स्वामी स्वतः किंवा बाइसाकडून त्यांच्या तोंडावर पाण्याचा शिपकारा मारून त्यांची 'ब्रह्मानंदी लागत असलेली टाळी' उतरवीत व त्यांचे निरूपणाकडे पुन्हापुन्हा लक्ष्य वेधीत. रात्र पुष्कळ झाल्यामुळे कधीकधी समईतील किंवा पणतीतील तेल संपत येऊन तीहि निद्राधीन होण्याच्या पंथाला लागायची. तिकडे दृष्टि जाताच स्वामी त्या पणतीत खोबरेल घालायला लावीत आणि आपल्या निरूपणाचा प्रवाह सुरू ठेवीत. अशा रीतीने चालू असलेले निरूपण संपले म्हणजे, मठातील ओट्यावर बाइसांनी घालून ठेवलेल्या शयनासनावर स्वामी 'पहुड स्वीकरीति'— निद्राधीन होत, तो सकाळी चिमण्या चिवचिवू लागेपर्यंत !

# १०

# स्वभाव-विशेष

**समरसता**

मठातील कडक शिस्त शिष्यांना पाळायला लावणारे श्रीचक्रधर-स्वामी त्यांच्याविषयी अंतःकरणात अतिशय प्रेम बाळगीत. पण भक्तांच्याच बाबतीत नाही तर एकंदरीतच त्यांचे अंत.करण दयेने ओथंबलेले असे. 'वज्रादपि कठोराणि मृदूनि कुसुमादपि'-लोकोत्तर पुरुषांची अंतःकरणे वज्रा-पेक्षाहि कठोर आणि फुलांहूनदेखील मृदु असतात असे भवभूतीने म्हटले आहे ते यथार्थ आहे. कठीण वज्रास भेदणारे विष्णुदास मेणाहूनही मऊ असतात असे तुकोबांनी नाही का सांगितले? श्रीचक्रधरस्वामी यांना अज्ञान जीवांच्या उद्धरणाचे व्यसनच होते. तेवढ्याचसाठी तर त्यांनी अवतार धारण केला होता. मग त्यांच्या ठिकाणी हृदयाची कोमलता आढळत अस-ल्यास आश्चर्य नाही. कुणाबरोबरहि समरस होणे हा चक्रधरस्वामींच्या स्वभा-वाचा एक महत्त्वाचा विशेष होता. एकाकी भ्रमण करीत असतांना वाटेत त्यांना गुराख्याची मुले भेटली म्हणजे त्यांच्यात मिळून मिसळून ते राहायचे आणि त्यांच्याचबरोबर गुरेहि वळू लागायचे. एकवेळ ते एका गावाला जात होते. तेव्हां रानामधे काही गुराख्याची मुले त्यांनी पाहिली. स्वामी आपणहून त्यांच्याकडे जाऊन म्हणाले, "गोपाळ व्हो हे तुम्हातु खेळो येईल." मुलांना मोठा आनंद वाटला. ते सगळेजण मिळून रानभेरी या नावाचा खेळ खेळू लागले. खेळामधे ज्यांच्यावर राज्य येत असे त्यांच्या पाठीवर स्वामी बसत आणि त्यामुळें त्या गुराख्यांना मोठा आनंद होई. खेळ आटोपल्यानंतर सगळ्यांनी आपल्या शिदोऱ्या सोडल्या आणि स्वामींनी

त्यांच्याबरोबर मोठ्या मजेत आरोगणा केली. (एकांक ३४). वडनेर येथे असतांना तर मुलाबरोबर त्यांनी लुटुपुटूची दुकानदारी केली. आपल्या जवळचे वस्त्र फाडून त्याचे लहान लहान तुकडे केले आणि गोपाळांना म्हटले, "गोपाळ हो, मी आता दुकानदार होईन, तुम्ही ग्राहक व्हा." ते म्हणाले, "पण घेणे देणे कशाने करायचे ?" स्वामींनी सांगितले, "त्यात काय आहे ? आसू म्हणून चिंचोक्या वापरा आणि दाम म्हणून दामोट्या वापरा." आणि मग त्यांच्यात खरेदी-विक्रीचा खेळ सुरू झाला. थोडा वेळ अशी गंमत केल्यानंतर गोपाळांच्याबरोबर त्यांचे जेवण झाले आणि ते तेथून पुढे निघून गेले. (एकांक ५८).

## लहान मुलांबरोबर—

लहान मुलाबरोबर समरस होण्याची कला तर स्वामींना विशेष अवगत होती असे दिसते. आपल्या पुढील आयुष्यातहि लहान मुलाबरोबर त्यांच्यासारखे लहान होऊन ते अनेकदा खेळले. पैठण येथे असतांना ते सारंगपंडितांच्या घरी कधी कधी जात असत. सारंगपंडितांना धानाइसा नावाची एक लहान मुलगी होती. एकदा ती कशाचा तरी हट्ट घेऊन बसली. तिच्या समजुतीसाठी स्वामी तिच्याबरोबर कवड्या खेळले. (भा. २ पा. ११). एकवेळ स्वामी सारंगपंडिताच्या घरी गेले तेव्हां त्यांची गौरवर्ण मूर्ती पाहून त्या छोट्या धानाइसाला वाटले की, यांचे आंग हळदीने उटलेले आहे, म्हणून ते इतके गोरे झाले आहेत. धानाइसाहि हट्ट धरून बसली की आपल्याहि अंगाला हळद लावा म्हणून ! तिचे लक्ष्य दुसरीकडे वेधण्यासाठी स्वामी तिला म्हणाले, "धाई, अशी माझ्याकडे ये, मी तुला एक कहाणी सांगतो." आणि मग त्यांनी तिला कहाणी सांगितली की, "साळैचे घर मेणाचे : काउळेयाचे घर सेणाचे : पाउसाळा काउळयाचे घर पुरे जाये : साळैचे वाचे :" स्वामींनी गोष्ट सांगितल्यामुळे धानाइ तावडतोब गप्प बसली. (भा. २ पा. १३). भिंगारी असतांना भाइदेव या नावाचा एक छोटा मुलगा त्यांच्याजवळ राहात असे. त्याच्यावरहि स्वामी प्रेम करायचे. रात्री स्वामींना घेतल्यावाचून तो लघ्वीला जायचा नाही. त्याच्यासाठी स्वामी तोहि त्रास सोसायचे. (भा. ३ पा. २४). एक वेळ त्याने स्वामीसाठी बोरे आणली. शबरीप्रमाणे गोड बोरे निवडून

काढण्यासाठी ती त्याने चाखून पाहिली; आणि नंतर ती स्वामींना अर्पण केली. त्याच्या अंतःकरणातील प्रेमभाव पाहून स्वामींनी भाइदेवाची ती उष्टी बोरे सेवन केली, यात आश्चर्य ते काय ? (भा. ३ पा. २४).

## मोठ्या माणसाबरोबर--

लहान मुलाप्रमाणेच मोठ्या माणसाबरोबरहि समरस होऊन स्वामी नानाप्रकारचे खेळ खेळत व विनोद करीत. पूर्वायुष्यापासून द्यूत खेळण्याचे त्यांना व्यसन होते. एकाकी असतांना ही त्यांची वृत्ति कायम होती. एके गावी ते दररोज द्यूत खेळत. पुष्कळ द्रव्य जिंकत. पण त्यातील, आपल्या भोजनाला पुरेल एवढे द्रव्य ठेवून बाकीचे सगळे देऊन टाकीत. (एकांक १३ ). द्यूताप्रमाणेच सारीपाट खेळण्याचीहि त्यांना हौस होती. एकांक काळात हंसाबेशी विवाह केल्यानंतर ते तिच्याबरोबर सारीपाट खेळत ( एकांक. १६ ). पुढे उत्तरार्ध काळात पैठण येथे असतांना एकवेळ माइते हरी त्यांना आपल्या घरी आरोगणेसाठी घेऊन गेला. या माइते हरीला सारीपाट खेळण्याचा मोठा नाद होता आणि त्यात तो प्रवीणहि होता. एकवेळ त्याने या खेळात महादेव रायाला जिंकले होते. आरोगणा आटोपल्यानंतर स्वामी त्याच्या घरच्या पडशाळेत बसले. त्यांना तेथे सारीपाट आढळला. स्वामींनी विचारले, "तुम्हांला सारीपाट खेळता येतो ?" उत्तरात माइते हरीने आपण महादेवरायाला जिंकल्याची हकीकत सांगितली. त्यानंतर ते दोघे तेथे सारीपाट खेळू लागले. त्यात स्वामींनी माइते हरीवर लागोपाठ तीन डाव लावले. (उत्त ३१६ ). तारांगुळाचाहि खेळ स्वामी खेळत असत. ( उत्त. २७५ ).

## विनोदी व खेळकर वृत्ति

आपल्या शिष्यमंडळीशी समरस होऊन स्वामी त्यांच्याबरोबरहि पुष्कळदा खेळ खेळत आणि विनोद करीत. पाण्यात पोहण्याची म्हणजे जलक्रीडा करण्याची त्यांना फार आवड असे. नांदोऱ्याला गेले असतांना जलक्रीडा करण्याची एकदा त्यांना इच्छा झाली. "मग दो पाहारा गंगे बीजे केले : पांगुरणे कडे ठेवीली : गंगे आतु रिगाले : यराते डोचळिती :

यराते डोचळिती : ऐसा खेळु केला : " अशा एकमेकांना बुड्या देत त्यांनी तेंथे जलक्रीडेचा खेळ केला. (भा. २ पा. ५९). उत्तरार्धातील १४२ या आख्यायिकेतहि त्यांच्या जलक्रीडेचे वर्णन आहे. आपल्या शिष्यमंडळीबरोबर ते एकवेळ जात्यंध-क्रीडा खेळले. स्वामींनी आपल्या दोन्ही हातांची बोटे एकमेकात गुंतवून ते हात डोक्यावर ठेवले. त्यांच्या दंडांना धरून दोन्ही बाजूंनी एकेक भक्त लटकायचा आणि मग स्वामी त्यांना गिरकी द्यायचे. यात ज्याचा भार जड होऊन तो पडेल त्याच्यावर डाव आला असे समजायचे. आणि मग त्याने आपले हात डोक्यावर ठेवून दुसऱ्या कोणत्यातरी दोघांना गिरकी द्यायची.

एकदा हिवरळी येथे असतांना महालक्ष्मीच्या देवळापलीकडे त्यांना कुणीतरी जोग्याचा वेष ठेवलेला आढळला. त्यासरशी त्यांची विनोद-वृत्ति जागृत झाली. त्यांनी आपली वस्त्रे काढून ठेवली, अंगाला विभूति-भस्म लावले, गळ्यात कंथा घातली; एका हातात खापरी आणि दुसऱ्या हातात काठी घेऊन ते उभे राहिले आणि जोग्याचे गाणे म्हणूं लागले : " कर धरी खपर : भिक्षापात्र : भस्म वीधुळीत : विळसीत गात्र : नित्य चळ : चित : मंद मंद मनसो विगळित गात्र : परमानंद : परमानंद : मन भुलि रे मन भुलि रे : " (भा. ३ पा. १०४). दुसऱ्या एका प्रसंगी स्वामी पैठण येथे असतांना भक्तजनासहित फिरायला गेले. तेव्हां एका चौकात त्यांनी आपले आंगी-टोपरे काढले. कमरेभोवती फुटा बांधला. शूद्राप्रमाणे आडवे टिळे कपाळावर लावले; आणि दोन्ही हात जोडून ते म्हणूं लागले, " सोरटी सोमनाथु : आवंढे नागनाथु : परळी वैजनाथु : सेंगा : सहस्र लींगा : कोडि लींगा : एक दंडवत : सायासि भले : मायासि भले : कायासि भले : आइबाइसी भले : माइबाइसी भले : काइबाइसी भले : " असे म्हणत म्हणत ते शिष्याकडे जाऊ लागले. आणि पुन्हा म्हणूं लागले, " पावन बापेया : पावन बापेया : पावन बापेया : " त्यांचे ते ध्यान पाहून बाइसांनी विचारले, " बाबा, हे काय ? " स्वामींनी म्हटले, " शूद्र देव पाहतात तो असाच. " या दोन्ही आख्यायिकावरून वेषांतरहि करून घटकाभर गंमत करण्याची स्वामींची प्रवृत्ति दिसून येईल. एकवेळ तर त्यांनी गोपाळ-भोजनाची नक्कल करून दाखवली. कोवळी कुसुंबी चण्यात घोळवली. उकड

आसन घालून बसले. उजव्या हाताच्या बोटामधे तिखट कुसुंबीच्या फाका धरल्या. त्या खात खात आणि गोपाळासारखे चारी दिशांना पाहात पाहात ही नक्कल त्यांनी उत्तम वठवली. ( भा. ४. पा. ४३ ).

स्वामींची विनोदबुद्धि नेहमी जागृत असे. वर उल्लेखिलेल्यासारख्या प्रसंगी ती कृतीने प्रगट होत असे, तर अनेकदा ती वाणीने प्रगट होत असे. कुणालाहि गमतीने नावे ठेवण्याची त्यांना फार सवय होती. उदा० भटोबासांना गुंफेवर धावे करण्यासाठी फाटे काढायचे होते म्हणून ते एका पिंपळावर चढले. तेथे एका डहाळीवरून दुसऱ्या डहाळीवर वानरासारखे सहज उडून जातांना त्यांना पाहून स्वामी बाइसांना म्हणाळे, " बाइ : कैसा वानरु ऐसा दीसत असे. " आणि त्या दिवसापासून स्वामी भटोबासांना वानरा म्हणूनच संबोधू लागले. (भा. ३ पा. ८७). बीड येथे असतांना एके दिवशी माइबाइसे स्वामींच्या समोर येऊन बसली. तिचे ध्यान कसे होते ? तर 'फाळ एसणे वेलंडले दात : आवयाऐसी डोई. : ' तिला पाहून स्वामींनी थट्टेने विचारले, " माइ, तुम्ही आपल्या नवऱ्याला आवडता का ?" माइबाइ म्हणाली, " तर तर, मी माझ्या नवऱ्याची जीव की प्राण आहे, ते स्वतः आपण कोरडे खातात पण मला तूप वाढतात." हे ऐकून स्वामी थट्टेने म्हणाले, " तरी तुम्ही सोभाग म्हणा "—तर मग तुम्हाला सौभाग्यवतीच म्हटले पाहिजे. " त्या दिवसापासून सगळेजण तिला सौभागा म्हणूं लागले. ( भा. ३. पा. ३). स्वामी करंजखेडला असतांना एकदा तळ्याकडे विहरणासाठी गेले. तेथे त्यांच्या भेटीला पाननायक जाऊन पोचले. हे पाननायक पूर्वी फार वातुळ व रोगी होते. त्यांना बऱ्याचशा गोष्टी सहन होत नव्हत्या. पण स्वामींच्या कृपेने ते आता बरे झाले होते. स्वामींना कमळे वाहावी म्हणून ती तोडण्या-साठी पाननायक तळ्यात शिरले. त्यावेळी स्वामींनी भटोबासाला डोळा घातला. त्यासरशी भटोबासांनी पाननायकाला ओढत ओढत पाण्यामध्ये नेले आणि ते पोहू लागले. पाण्यात असेपर्यंत त्यांना मोठा आनंद वाटत होता. स्वामी त्यांना बोलावीत पण हे काही केल्या बाहेर निघेनात. मग बऱ्याच वेळानंतर ते बाहेर आले. तेव्हां स्वामींनी म्हटले, " नायका, आम्ही बोलाविले तरीहि तुम्ही पाण्यातून बाहेर का आला नाहीत ? " पाननायक म्हणाले, " तळ्यातील पाणी जसे जसे थंड लागत

होते तसा तसा मला अधिकाधिक आनंद होत होता." यावर स्वामींनी म्हटले, "असे आहे तर मग तुम्हाला सीतळानंदच म्हटले पाहिजे. तेव्हां- पासून त्याना सीतळानंद नाव पडले. स्वामींनी शिष्यांना गमतीची नावे ठेवल्याची अशी पुष्कळ उदाहरणे आहेत.

अशी नावे ठेवण्यात जशी त्यांची विनोदवृत्ति दिसून येते तशीच ती त्यांच्या उपहासात्मक आणि थट्टेच्या भाषणात देखील दिसून येते. श्रीनगर- कडे जातांना रस्त्यात एरंडाचे वन लागले. दुरून ते आंब्याचे वन असावे असे बाइसांना वाटले. जवळ गेल्यावर ते एरंडाचे आहे असे स्पष्ट दिसले. तेव्हां स्वामी आपल्या बरोबरच्या डखल्याला उद्देशून म्हणतात कसे ? "डख- लेया, हे बाइसाचे आंबेवन पाहिले का ? पाहा पाहा कसे आंब्याचे घडच्याघड लागलेले आहेत ! 'ऐसे वीपलावो लागले' अशी स्वामी बाइसांची थट्टा करू लागले. (भा. २ पा. ४८).

एकदा साधाने स्वामींच्यासाठी लाडू तयार केले. त्यासाठी केलेला पाक अतिशय घट्ट झाला होता. त्याचे बांधलेले लाडू इंद्रभट स्वामीसाठी घेऊन आले. रात्री गोसाव्यांच्यासाठी बाइसा एक लाडू मोडायला लागली तो काय ! तो मुळी फुटेचना ! दुसऱ्या दिवशी जेव्हां साधे दर्शनाला आली तेव्हां स्वामी थट्टेने म्हणतात काय की, "आतापर्यंत आम्ही पुष्कळ सुग्रणी पाहिल्या, पण पाचसात मुसळे एकदम हाणूनहि जे फुटणार नाहीत असे लाडू तयार करणारी सुगरण मात्र पाहिली नव्हती." असे म्हणून स्वामी हसू लागले. (भा. ३ पा. ५४). भांगेला 'ब्रह्मप्रकाशिका भाजी' म्हणण्यातहि त्यांची हीच विनोदवृत्ति दिसून येते. एकदा शिमग्याच्या दिवशी स्वामींच्या दर्श- नाला कामाइसा आलेली होती. ती मळके वस्त्र नेसली होती. आखुड बाह्यांची चोळी तिने घातलेली होती. आव्याप्रमाणे तिचे डोके मोठे होते; आणि त्याच्यावर 'मळणे' घातलेले होते. विरळ तुटक्या दातातून तिच्या तोंडातील तांबूलाचा रस खाली गळत होता. ते ध्यान पाहून स्वामी थट्टेने म्हणाले, "बाई, इतक्यामध्ये सुवासिनी म्हणून मिरविणारी कोणी बाई असेल तर ती ही आहे." (उत्त. ३२). स्वामींची विनोदवृत्ति दाखविणाऱ्या अशा अनेक लीळा आहेत.

शिष्यजनाशी व आल्यागेल्याशी मिळून मिसळून वागणे व बोलणे यावरून स्वामी कसे सहृदय होते, हे चांगले दिसून येते. त्यांचा विनोद एका विशिष्ट मर्यादेच्या पलीकडे कधी जात नसे. आपल्या थट्टेत कुणाचे मन दुखवले जाणार नाही याची ते काळजी घेत. त्यांची वृत्ती विनोदी असली तरी उठल्या बसल्या शब्दच्छल करून हास्य निर्माण करणे हा त्यांचा हेतु नसे. अशा प्रवृत्तीची माणसे बहुधा आचरणाने थिल्लर असतात; आणि त्यांच्या शब्दात उपहासाचा विषारहि पुष्कळ भरलेला असतो. श्रीचक्रधर-स्वामींची स्वाभाविक प्रकृति गंभीर होती. पण ते गंभीर प्रकृतीचे असले तरी त्यांच्यात कुणाशीहि तात्काळ समरस होण्याचा धर्म आणि विनोदशीलता होती हे दाखवण्यापुरतीच वरची उदाहरणे आहेत.

## अहिंसा वृत्ति

श्रीचक्रधरस्वामी अहिंसेचे फार मोठे पुरस्कर्ते होते. अहिंसा हा थोर सत्पुरुषांचा मुख्य धर्म असतो. आपल्या वृत्तीने, वाणीने व मनाने कुणालाहि ते कधीच दुखवीत नाहीत. आणि म्हणूनच, संसाराच्या त्रिविध तापांनी पोळलेल्या अंतःकरणाचे जीव सावलीसाठी आणि विसाव्यासाठी अशा सज्जनांच्याकडे आश्रयार्थ जातात. आपल्या आश्रमातील शिष्यांनी दुसऱ्यांचे अंतःकरण दुखवता कामा नये म्हणून स्वामी किती जपत याचे एक उदाहरण आपण पाहिले आहे. पद्मनाभीने परमाणुभवदेवांचे अंतःकरण दुखवले होते. "बाइ : हा प्राणियाचे चैतन्य पोळुनि आला असे" (भा. ३. पा. ३१) हे स्वामींना बिलकुल आवडले नव्हते. आणि म्हणूनच त्यांनी त्याला मठाबाहेर घालवून दिले एक वेळ स्वामींच्या दर्शनासाठी एक स्त्री गेली असतांना स्वामी घाईघाईने मठाबाहेर आले. येतांना त्यांच्या डोक्याला दरवाजा लागला, हे पाहून बाइसा उगीचच त्या बाईवर रागावू लागली आणि तिला शिव्या देऊ लागली. "हे काइ वो जाले या रांडासि : बाबाचा मुकुट्ट दुखविला :" तेव्हां स्वामी बाइसांना म्हणाले, "बाइ : या स्त्रीला व्यर्थ शिव्या का देता ? त्यामुळे तिचे अंतःकरण किती पोळत असेल याची कल्पना करा. -'प्राणिये एथ आलेया जळता जावे तरि निवावे कोठे ?' आमच्याकडे आलेल्या जीवांनाहि जर पोळलेल्या अंतःकर-

णाने जावे लागेल तर त्यांना आणखी इतरत्र शांतता मिळणार कोठे ?' (उत्त. ७३ )

हीच गोष्ट आणखी एका प्रसंगी उत्तम प्रकारे दिसून आली. अरण्यग्रामी एका मळयातील गुंफेत स्वामी उतरले होते. ज्या गुरवाची ती गुंफा होती त्याने आसूंनी भरलेले एक नारळ तेथे पुरून ठेवले होते. त्याच्या एका मित्राला ही गोष्ट माहीत होती. त्याने ते नारळ चोरून नेले. स्वामी उतरल्यावर दुसरे दिवशी गुरवाने पाहिले तो तेथे नारळ नाही. त्याने स्वामींच्या जवळ तक्रार केली, 'तुम्ही माझे नारळ काढून घेतलेले दिसते. तर ते मला परत करा.' म्हणून तो आग्रह करू लागला. स्वामींच्या सांगण्यावरून भटोबास त्याजबरोबर बोलत होते. इतक्यात साधे तेथे आली स्वामींनी तिला विचारले, "तू नारळ खर्च केलेस काय ?" ती म्हणाली, " कुठले नारळ ? कुणाचे नारळ ?" स्वामी म्हणाले, "तो पहा पलीकडे गुरव उभा आहे. त्याचे नारळ. ते येथे होते असे तो म्हणतो आणि आता तर ते इथे नाही. " गुरवाला पाहून साधे संतापली आणि 'मरो तो गुरव' म्हणून अपशब्द बोलू लागली. तेव्हां स्वामी तिला म्हणाले, "साधे हो, हे काय ! संसारतापाने त्रस्त झाल्यामुळे, आपले कल्याण करून घेण्याच्या इच्छेने तुम्ही ईश्वराला शरण आलात ना ? मग प्राण्याला 'मरतु : मरतु' असे व्यर्थ का बोलत आहात !" नुसते दटावूनच स्वामी थांबले नाहीत. तिच्या या अपराधाबद्दल एका पायावर उभे राहण्याची त्यांनी तिला शिक्षाहि फर्मावली. ( उत्त. २२५ ). यावरून दुसऱ्यांची अंतःकरणे निष्कारण दुखवली जाऊ नयेत म्हणून स्वामी किती काळजी घेत याची पूर्ण कल्पना येईल.

### भूतमात्रावर अव्याज प्रेम

स्वामींच्या ठिकाणी अहिंसावृत्ति पूर्णपणे बाणली होती. त्यामुळे सर्व भूतमात्रावर ते सदैव प्रेम करीत. महात्म्याचे हेच मुख्य लक्षण आहे. सत्पुरुष नेहमी 'अहिंसेचे देखणे पुढे करून' सर्वत्र फिरत असतात. सर्व भूतें आपल्यासारखीच समजून ते वागतात. आपण स्वतःला ज्याप्रमाणे दुखवीत नाही त्याप्रमाणेच इतरांनाहि दुखवता कामा नये, अशा दृष्टीने तें भूतमात्रावरच काय पण तृणादिकावर देखील प्रेम करतात. 'आपणाते न

दुखवी जैसे : भूतमात्रा वागवी तैसे : तृणादि करून मानसे : न भावी वीरू' (ज्ञा. प्र. ८९ ). याचसाठी 'कृपा भरोनि डोळा : दृष्टी सुये पायतळा :'– तो आपुली दृष्टी पायाकडे लावून काळजीपूर्वक चालतो. इतका की 'तयाचे हळु पाउल पडे : जडीची आकृति न विघडे : चैतन्याचा रंग न मोडे : हालिचाली' (ज्ञा. प्र. ९४). सत्त्वस्थ अहिंसक सत्पुरुषाची ही लक्षणे स्वामींच्या ठिकाणी पूर्णपणे होती. भूतमात्राची कुणीहि हिंसा केलेली त्यांना पाहवत नसे. एकाकी असतांना एकवेळ त्यांना घोडाचूडीचे शिष्य भेटले. त्यांच्या विनंतीवरून स्वामी त्यांच्या बरोबर किष्किंध पर्वताकडे जाऊ लागले. रस्त्यात एके गावी भिक्षा मागत असतांना एका घरी या शिष्यांपैकी एकाच्या हातावर एका बाईने कढत कढत आंबील टाकली. त्यामुळे त्याचे हात भाजले. याचा सूड म्हणून त्या शिष्याने ती आंबील चाटली व आपला हात त्या बाईच्या घराच्या वळचणीला पुसला. त्यामुळे त्या घराला आणि त्या घरामुळे त्या सगळ्या गावाला आग लागली. हा वृत्तांत त्या शिष्यांनी हासत हासत जेव्हां स्वामींना सांगितला तेव्हां त्यांना अतिशय दुःख झाले. ते म्हणाले, "महात्मे हो, वोखटे केले : ऐसेनी भूतहींसा केली : परि कैसीहि काही घृणा नुपजैचि होए : आता हे तुम्हा सांघाते न ये :" (एकांक २०). असे म्हणून त्यांनी घोडाचूडीच्या त्या शिष्याबरोबर प्रवास करण्याचे साफ नाकारले. स्वामी पुणतांबे येथे असतांनाहि अशीच एक गोष्ट झाली. तेथील ठाकुराची कोणीतरी हिंसा केली. हे स्वामींच्या लक्ष्यात येताक्षणीच त्यांनी ते स्थान सोडले. (भा. २ पा. ६० ). वाडेगावी जोगेश्वरीच्या देवळात ते उतरले असतांना देवतेला बळी देण्यासाठी एक जण मेंढरू घेऊन आला, हे पाहूनहि त्यांनी ताबडतोब त्या स्थानाचा त्याग केला. ( उत्त. २६५ ). सारांश, कुणाचीहि हिंसा होत असलेली किंवा झालेली त्यांना पाहवत नसे. म्हणून त्या स्थानांचा ते ताबडतोब त्याग करीत. आपल्या शिष्यमंडळीलाहि त्यांनी असाच उपदेश केलेला आहे. हे 'हिंसा वर्ते तिये स्थानी महात्मेया असो नये' (आ. २४० ) या सूत्रावरून दिसून येईल.

श्रीचक्रधरस्वामींना हिंसेची स्थानेहि त्याज्य वाटत असत; तेव्हां आपल्या मठात ते प्रत्यक्षाप्रत्यक्ष रीतीने हिंसा होऊ देत असतील हे संभवतच

नाही. दुसऱ्याचे अंतःकरणदेखील आपल्या शिष्याकडून पोळले जाता कामा नये याविषयी ते दक्ष असत. किडामुंगी वगैरे क्षुद्र जीवजंतु व सर्प-विंचवादि प्राणी यांच्याहि बाबतीत त्यांची हीच वृत्ति दिसून येते. छिन्नपापी येथे असतांना ते भक्ताकडून गुंफा तयार करवीत होते. त्यासाठी मातीकाम सुरू झाले. आदल्या दिवशी एक खड्डा खणून त्यात मातीचा गारा तयार केला. दुसऱ्या दिवशी पाहतात तो त्यात सगळीकडे मुंग्या. शिष्यांनी स्वामींना जेव्हां हे सांगितले तेव्हां ते म्हणाले, "ते स्थान सांडा : आणिकी गारि करा : एथचि सेवा ते भूता अविरोधे करावी की गा" (उत्त. ७०). अर्थात्, आपली सेवा होतांनाहि भूतमात्रांना उपद्रव होता कामा नये, हीच कळकळ यावरून दिसून येते की नाही ? एकदा मठात एक इंगळी निघाली. आउसाने ती मारली. तिची नांगी धरून ती बाहेर फेकत असतांना स्वामींनी पाहिले आणि विचारले, "हे वींगुळी का मारिली ?" आउसा म्हणाली, "ही कदाचित एखाद्या प्राण्याला चावली असती ना ?" तेव्हां स्वामी म्हणाले, "म्हणजे इंगळी हा प्राणी नाही की काय ?" अर्थात्, इतर प्राण्यांची जी काळजी घ्यायची तीच या इंगळीचीहि घ्यायला पाहिजे ! "तुम्ही महात्मे की : सर्वा भूता अभए देयावे की" (उत्त. ३९). ज्या महात्म्यांनी सर्व प्राण्यांचे भीतीपासून संरक्षण करावे त्यांनीच इंगळीसारख्या प्राण्याला मारावे हे स्वामींना अश्लाघ्य वाटत होते. म्हणूनच मठात विंचु वगैरे निघाला तर त्याला न मारता वस्त्रात धरून ते बाहेर टाकायला सांगत असत. (उत्त. १०२). मठात एकदोनदा साप निघाले होते. त्यांनाहि त्यांनी न मारता बाहेर घालवायला लावले होते. (उत्त. ३२४, ३२६). त्यांच्या मठातील दुसरा एक प्रसंग तर याहूनहि उद्बोधक आहे. एके दिवशी एक कुत्रे मठात शिरले; आणि त्याने भटोबासाची भिक्षेची झोळी पळवली. दुसऱ्या दिवशी पुन्हा ते कुत्रे मठाकडे आले. मठाची राखण करण्याचे काम त्या दिवशी आउसाकडे होते. तिने त्या कुत्र्याला पाहताच हातात एक दगड घेतला आणि त्या कुत्र्याकडे भिरकावला. तो त्याला लागताच ते केंकाटायला लागले. त्याचा तो आर्त स्वर ऐकताक्षणीच स्वामींनी आपले डोके दोन्ही हातांनी धरले. जणु तो दगड त्यांनाच लागला होता आणि त्यामुळे त्यांचे शरीर आणि मन दुखवले गेले होते ! त्यांनी शांतपणे आउसाला विचारले,

"हे सुने का हाणितले ?" ती म्हणाली, "जी जी स्वामी जगन्नाथा, काल याने नागदेवाची झोळी पळवून नेली आणि आज हे पुन्हा आले, म्हणून मी याला मारले." स्वामी बोलले, "याला काय कोणी मायब्रहीण आहे की ती याच्यासाठी रांधून ठेवील आणि तेथे जाऊन हे जेवण करील ? नाही ना ? मग ते कुत्रे तुमचे अन्न नेण्यासाठी आले यात त्याचे काय चुकले ? अवश्य असल्यास तुम्ही आपल्या अन्नाचा नीट सांभाळ करा, पण त्यासाठी याला बिचाऱ्याला का मारता ?" दयार्द्र अंतःकरणाच्या सर्वात्मक महात्म्याचे किती थोर विचार आहेत हे ? भूतमात्रांना होणारा त्रास जणु आपणालाच होत आहे या भावनेने वागल्यास आपली व इतरांची कितीतरी दुःखे कमी होऊन जग अधिक सुखाने नांदायला लागेल !

## पशुपक्ष्याविषयी प्रेम

अशा उदारात्म्यांच्या चेहऱ्यावर अहिंसेचे जे तेज झळकत असते त्यामुळे हिंस्र प्राण्यांनी आपली हिंस्रता सोडून दिली असल्यास आश्चर्य नाही. अरण्यात राहून तपश्चर्या करणाऱ्या यतिमुनींच्या आश्रमात अहि-नकुल, गाई-वाघ एकत्रित नांदत असत, असे आपण अनेकदा वाचतो. आपले नैसर्गिक वैर सोडून ते प्राणी गुण्यागोविंदाने तेथे राहतात; इतकेच नाही तर त्या योगी पुरुषाबरोबर खेळत असतात. याचे कारण त्यांना त्या ठिकाणी निर्भय वातावरण असल्याची खात्री वाटते, त्या यतीवर त्यांचा विश्वास बसलेला असतो, हेच नाही काय ? हिंस्र प्राण्यांच्या विश्वासाला पात्र होण्याइतके अलौकिकत्व फार थोड्या महात्म्यांच्या ठिकाणी आढळते. श्रीचक्रधरस्वामी हे त्यांच्यापैकी एक होत. स्वामींच्या दिव्यतेने मोहून जाऊन सर्प देखील त्यांच्या दर्शनात रंगून जात. (भा. ४ पा. ३७; उत्त. ३२५). आपल्या शिष्यांना ते त्यांच्याबरोबर खेळायला लावीत. (उत्त. ३२७). एकाकी भ्रमणात स्वामी एका देउळीत झोपले असतांना रात्री दोन सर्प भांडत भांडत त्यांच्या वक्षस्थळावर येऊन आदळले. त्यांनी स्वामींना कोणत्याहि प्रकारची इजा केली नाही; आणि स्वामींनीहि त्यांना इजा केली नाही. त्यांनी एकेका हातात एकेक सर्प धरून तो दूर फेकून दिला. (एकांक ५९). सर्पच काय पण वाघाची पिले

देखील त्यांनी, त्यांच्या आईदेखत-वाघिणीसमोर सहज खेळवली. (एकांक ४३). एकवेळ त्यांच्या दर्शनाने वेधून एक वाघ त्यांच्या मागोमाग बराच दूरपर्यंत आला आणि स्वामींची आज्ञा होताच निघूनहि गेला. (भा. ३ पा. ६७). ही सर्व, स्वामींच्या अहिंसावृत्तीमुळे झालेली कामें होत असेच म्हटले पाहिजे. त्यांच्या ठिकाणच्या या अभिजात वृत्तीमुळेच एक ससा त्यांना शरण आला; तेव्हां त्यांनी त्याचे संरक्षणहि केले. त्याचे असे झाले की, स्वामी एकाकी विहरण करीत असतांना कोणा एका गावी झाडाखाली बसले होते. जवळच काही पारधी पैज लावून एका सशाची शिकार करीत होते. त्यांनी त्या सशामागे कुत्री सोडली. ससा म्हणजे आधीच भित्रा प्राणी, तशात त्याच्यामागे कुत्री लागलेली. मग त्याच्या भीतीला पारावर नसल्यास आश्चर्य नाही. तो बिचारा सैरावरा धावू लागला. इतक्यात झाडाखाली बसलेली स्वामींची सत्त्वस्थ मूर्ति त्याच्या नजरेस पडली. आणि नजरेस पडताच त्यांच्या दयार्द्र भावाची त्याला जणु ओळख पटली. तो एकदम स्वामीकडे आश्रयासाठी आला त्यांच्या मांडीखाली लपला. मागोमाग पारधी त्या ठिकाणी आले. त्यांनी स्वामीला विनंती केली की, "महाराज, हा ससा आपण मोकळा सोडवा," स्वामी म्हणाले, "हा मला शरण आलेला आहे ना?" पारधी पुन्हा म्हणाले, "पण महाराज, हा आमच्या होडेचा ससा आहे. याला मारण्यासाठी आमच्यामधे पैज लागली आहे. याच्यासाठी आमच्यात भांडण लागेल ना?" स्वामींनी पुन्हा सांगितले, "ते खरे, पण हा मला शरण आलेला आहे. आणि शरण आलेल्याला मरण देणे कसे शक्य आहे? शिवाय, तुम्ही असे पहा की हा बिचारा गरीब प्राणी आहे. रानावनात राहून खातोपितो. कुणाला तो उपद्रव करीत नाही. मग तुम्ही याला मारणे योग्य आहे काय?" स्वामींच्या उपदेशाने पारध्यांची अंतःकरणे शांत झाली. ते म्हणाले, "नाही महाराज, आजपासून आम्ही असे करणार नाही." असे बोलून ते निघाले. ते निघून गेल्यावर आपली मांडी उचलून स्वामींनी सशाला म्हटले, "महात्मे हो : आता जाए" आणि मग तो कृतज्ञ होऊन गेला. (एकांक २३). स्वामींच्या अहिंसावृत्तीचे किती सुंदर उदाहरण आहे हे!

हे झाले इतरांची हिंसा करण्याच्या बाबतीत. पण आपणाला कुणी त्रास दिला, तर मग आपण त्याच्याशी कसे वागावे ? याही बाबतीत सात्त्विक पुरुषांच्या ठिकाणी असलेला आदर्श गुण स्वामींच्या ठिकाणी आढळतो. आपणाला कुणी मारायला आला तर त्याला आपण उलट मारायचे नाही. जशास तसे किंवा ठोशास ठोसा ही महात्म्यांची वृत्तीच नव्हे. श्रीचक्रधर-स्वामींनी आऊला उपदेश करतांना "एथौनि तुम्ही ऐसेया होआवे की हा जनु तुमते डोइए डोइए मारील : परि तुम्ही डोइचि वोडवावी" ( उत्त. २२५ ). लोकांनी आपल्या डोक्यावर प्रहार केला तर आपण उलट प्रहार न करता त्याच्या समोर आपले डोके नम्र केले पाहिजे ! 'आपल्या एका गालावर कुणी मारले तर आपण दुसरा गाल त्याच्या समोर करावा' हा ख्रिस्ताचा उपदेश आणि श्रीचक्रधरस्वामींचा उपदेश यात केवढे विलक्षण साम्य आहे हे ! अलौकिक पुरुषांची भूमिका सर्वत्र सारखीच असते याचा प्रत्यक्ष पुरावाच आहे हा !

याचे एक मोठे सुंदर उदाहरण स्वामींच्या चरित्रात आहे. त्यांच्या आयुष्याच्या अखेरच्या काळात हेमाडपंताने पाठवलेले काही सैनिक जेव्हां त्यांच्या मठात घुसले तेव्हां स्वामींनी त्यांचा यत्किंचितहि प्रतीकार केला नाही. ते शस्त्रधर आलेले पाहून ' मुनिए आले गा ' असेच उद्गार त्यांच्या मुखातून बाहेर पडले. आपल्यावर शस्त्र घेऊन चालून आलेल्या मारेकऱ्यांना ' मुनी ' म्हणजे यति-महात्मे म्हणून संबोधणाऱ्या श्रीचक्रधरस्वामींची दृष्टि कशी समभावाने ओथंबलेली होती हे दिसून येईल. त्यांनी त्यांचा प्रतीकार न करता उलट स्वागत केले खरे ! पण त्यांचे शिष्य भटोबास यांना मात्र राहवेना. त्यांनी एका सैनिकाला फाडकन् मारून खाली पाडले व त्याची ढालतलवार घेऊन तो लढू लागला. तेव्हां स्वामी मोठ्याने ओरडून सांगू लागले, " वान-रेया : हा गा : तुज करवि एथौनि करविले " — " मी तुला असे करायला सांगितले काय ? नाही ना ? मग ठेव ते शस्त्र खाली—ठेविसि ना तरि एथिची आण :" असे म्हणून त्यांनी त्याला शस्त्र खाली ठेवायला सांगितले. ( तथापि नागदेवांनी पुन्हा ते उचलले, ही गोष्ट निराळी ). स्वामींचा वर उल्लेखिलेला उपदेश त्यांच्यावर आलेल्या या प्रसंगात व त्यावेळच्या त्यांच्या वर्तनात पूर्णपणे प्रतिबिंबित झालेला नाही काय ?

सारांश, श्रीचक्रधरस्वामी पूर्णपणे अहिंसक वृत्तीचे होते. अहिंसेचे ते आदर्श पुरुष होते, असे म्हणायला हरकत नाही. त्यामुळेच त्यांना महात्मा ही पदवी यथार्थपणे शोभून दिसते. मारायला आलेल्याला यति-मुनि म्हणून संबोधून समभावाने पाहणारा पुरुष आदर्श नाही असे कोण म्हणेल ? स्वामींच्या महात्मेपणाच्या अशा अनेक आख्यायिका सांगता येतील. त्यातील निवडक अशी एकच आख्यायिका या ठिकाणी देतो. जवळगावला असतांना त्यांनी भटोबासाला एक देऊळ पाहाण्यास पाठवले. ते देऊळ केव्हां पडेल याचा नेम नव्हता. स्वामींनी विचारले, "का गा : देऊळ कैसे ?" नागदेवांनी म्हटले, "महदाश्रमाचिए पूजेसारिखे" कारण, स्वामींची पूजा करण्याच्या निमित्ताने त्यांना खाली गर्तेत पाडण्याचा कट महदाश्रमाने रचलेला होता. अप्रत्यक्ष रीतीने, नागदेवाने महदाश्रमाचा उपहासच केला. स्वामींच्या अंतःकरणाला हे आवडले नाही. ते तात्काळ म्हणाले, "तुम्ही महात्मे आहात : तुम्हा मारिता पूजिता समानचि होआवा की गा :- मारणाऱ्याला आणि पूजा करणाऱ्याला तुम्ही सारख्याच दृष्टीने पाहिले पाहिजे. ज्याला मुक्ति मिळवायची आहे त्याने मुंगी मारता कामा नये, इतकेच काय पण मनात तिचे वैरहि चिंतू नये. भावार्थ असा की, महदाश्रमाविषयी अशी भावना मनात ठेवणे हे तुमच्या महात्मेपणाला शोभत नाही" (उत्त. ४५०). प्रत्यक्ष आपणाला ठार मारण्याचा कट करणाऱ्याविषयीहि स्वामींच्या मनात अत्यंत सद्भाव असे हेच या वरून स्पष्ट होत नाही काय ?

## विरक्त वृत्ति

या अहिंसावृत्तीप्रमाणेच श्रीचक्रधरस्वामींच्या ठिकाणी विरक्तिहि पूर्णपणे बाणली होती, निरिच्छता, निःस्पृहता, ब्रह्मचर्यप्रवृत्ति इत्यादि स्वभाव म्हणजे विरक्तीचीच निरनिराळी स्वरूपे होत. आणि ती सर्व स्वामींच्या ठिकाणी आढळतात. स्वामी निरंतर स्थानांतर करून गावोगावी फिरत असत. त्यामुळे त्यांच्याजवळ 'संग्रह' असा कशाचाच नव्हता. जीवनाला आवश्यक तेवढी वस्त्रप्रावर्णे व अन्नधान्य ही मिळाली म्हणजे पुरे. पण त्यासाठीहि त्यांनी कधी चिंता केली आहे असे नाही. जीवांना ज्ञान देऊन त्यांचा उद्धार करण्याची प्रवृत्ति स्वीकारल्यापासून लौकिक दृष्ट्या आवश्यक तेवढी वस्त्रे ते वापरत. पण त्यापूर्वी म्हणजे एकांक भ्रमणात तर त्यांना त्यांचीहि पर्वा नव्हती.

बरीच वर्षेपर्यंत त्यांनी आपला एकाकीचा काळ नग्नावस्थेत काढला. जी गोष्ट वस्त्राविषयी तीच अन्नाविषयी. बाइसांनी तयार केलेला पाणीभात, त्या भातावरील पाण्याची कढी, तूप, दूध वगैरे हे त्यांचे नित्याचे जेवण होते. भक्तजनांनी उपाहार दिला तर तो ते स्वीकारीत, पण त्याविषयी त्यांनी कधी लोलुपता दाखवलेली आहे असे नाही.

## निःस्पृहता

तथापि कुणाचीहि वैराग्यवृत्ति पारखून पाहायची असली तर ती कनक आणि कांता या दोन कसोट्यावर घासून पहावी म्हणून म्हणतात. कारण या दोन वस्तूंनी मोहवश झाला नाही असा पुरुष विरळाच सापडतो. आणि म्हणूनच त्याच्या ठिकाणी अलौकिकत्व किंवा असामान्यत्व आहे असे आपण म्हणतो. यापैकी कनकाच्या बाबतीत पाहिले तर श्रीचक्रधरस्वामी पूर्णपणे कसोटीला उतरतात. आपल्या राजतुल्य वैभवावर लाथ मारून घराबाहेर पडलेल्या पुरुषाला पैशाचा मोह राहील असे कधी झाले आहे काय ? आपल्याजवळील सर्व अलंकार व वस्त्रे रस्त्यात फेकून देणारे श्रीचक्रधरस्वामी समलोष्ठाश्मकांचन वृत्तीचे होते यात काहीच शंका नाही. एकाकी विहरण करतांना एकदा ते लोणार येथे तारातीर्थावर आसन घालून बसले होते. तेथे त्यावेळी देवगिरी येथील कन्हरदेव यादव राजेहि आले होते. त्यांनी स्वामींचे दर्शन घेतले, तेव्हां नित्याच्या पद्धतीप्रमाणे आसूंनी ( सुवर्ण मुद्रांनी ) भरलेली पिशवी त्यांनी स्वामींना अर्पण केली. पण स्वामींनी तिकडे ढुंकूनहि पाहिले नाही. तेव्हां कन्हरदेवाजवळ असलेल्या एका माणसाने म्हटले," देव हो, घ्या, हे द्रव्य घ्या. सिंघणाचा मुलगा कन्हरदेव हा तुमच्यावर प्रसन्न झाला आहे." हे ऐकून कन्हरदेवच म्हणाला, " चला दूर व्हा. स्वामींना उद्देशून तुम्ही असे काय बोलतां हे.? कान्हा कदाचित तुम्हाला मोठा वाटत असेल, पण स्वामींना त्याचे काय." कन्हरदेव निघून गेल्यावर स्वामींनी त्या पैशांचा विनियोग तेथील 'कुमारेश्वर' देवळाची पाळी बांधण्याकडे केला. ( एकांक ४१ ) स्वामींची ही निर्लोभी वृत्ति त्यांच्या विरक्तीचेच लक्षण नाही काय ?

दुसऱ्या एका प्रसंगी, गदोनायकाने स्वामींची रत्नखचित पदार्थांनी पूजा केली व म्हटले, " महाराज, माझ्याजवळ अमूप द्रव्य आहे, त्यामुळे

मला ईश्वर प्राप्त होईल ?" स्वामींनी स्पष्ट उत्तर दिले, "द्रव्यामुळे जर ईश्वर प्राप्त झाला असता तर मग या राजेरजवाड्यांना तो केव्हांच मिळाला असता. त्यांच्याजवळ पैसा पुष्कळ असतो. पण आपणाला परमेश्वर मिळावा अशी बुद्धीच नसते. सारांश-'द्रव्य संपति ईश्वर न पविजे"...(उत्त. २५०). पण ही संपत्ति साधकाने ईश्वरार्पण–किंवा गुरूला अर्पण करावी असे श्रीचक्रधरस्वामींनी सांगितले नाही, हे मात्र लक्ष्यात ठेवायला पाहिजे. स्वामींना अनुसरलेल्या खेइगोईने स्वामींना 'काही' – अर्थात् द्रव्य वगैरे लागेल काय म्हणून विचारले. पण "एथ काही न लगे" असे सागून स्वामींनी त्याच्याकडे पाठ फिरवली. (ली. च. उत्त. ४३). यावरून काय दिसून येते ? स्वामी टोकेगव्हाण येथे असतांना संगमेश्वराच्या देवळात बसले होते. त्या दिवशी 'सोमवारी'= सोमवती अमावस्या होती. यात्रेनिमित्त आलेले लोक स्वामींना पाहून त्यांचीच पूजा करीत व त्यांच्याच समोर दक्षिणा ठेवीत. प्रत्यक्ष देवासमोर काहीच ठेवीत नसत. हे पाहून तेथील पुजाऱ्याला फार वाईट वाटले. थोड्या वेळाने स्वामी आसनावरून उठले. बाइसा ती पूजा सावरू लागल्या. तेव्हां स्वामी त्यांना म्हणाले, "बाई, ते तेथेच राहू द्या. ते सगळे काही येथील पुजाऱ्याचे आहे." (उत्त. २५६). द्रव्याच्या बाबतीत स्वामींच्या अनासक्ततेची अशी पुष्कळ उदाहरणे आहेत. पण आपल्या आयुष्यभर कोठेहि घर किंवा मठ न बांधता ते राहिले हा काय कमी महत्त्वाचा पुरावा आहे ?

जी गोष्ट कनकाच्या बाबतीत तीच गोष्ट 'कांते'च्याहि बाबतीत खरी आहे असे दिसून येते. श्रीचक्रधरस्वामी जसे राज्य–संपत्तीवर लाथ मारून आले होते, तसेच ते आपल्या स्वरूपसुंदर पत्नीकडे पाठ फिरवून किंबहुना, तिला विटूनच घराबाहेर पडले होते, याचे या ठिकाणी मुद्दाम स्मरण करून देणे अवश्य वाटते. तथापि पुरुष एका स्त्रीला विटला म्हणजे तो कायमचा विरक्त झाला असे थोडेच आहे ? इतर स्त्रियांच्या मोहपाशात तो पुन्हा अडकून पडू शकतो ! त्यातून स्वामींनी आपल्या आयुष्यात एकूण तीनदा विवाह केल्याची समजूत काही लोकात प्रचलित असलेली दिसते. म्हणून या गोष्टीचा विचार निर्विकारपणाने व सावधतेने व्हायला पाहिजे यात शंका नाही.

स्वामींनी एकूण तीन विवाह केले होते ही समजूत बरोबर नसल्याचे मागे पाहिलेच आहे. त्यांनी दोनच विवाह केले होते. पहिला, पूर्वाश्रमीच्या हरिपाळदेवाने कमळांबेबरोबर केलेला आणि दुसरा वरंगळचा. स्वामी भरवस सोडून निघाले तेव्हांपासूनच आपल्या दृष्टीने त्यांचा खराखुरा आयुष्यक्रम सुरू होत असल्यामुळे कमळांबेबरोबरचा विवाह लक्ष्यात घेण्याचे कारण दिसत नाही. पण प्रश्न असा की, विरक्त वृत्तीने बाहेर पडल्यानंतर, इतकेच नव्हे तर अनेक वर्षेपर्यंत तीव्र तपश्चर्या केल्यानंतरहि स्वामींनी हंसांबे-बरोबर विवाह का करावा ? स्वामींच्या या विवाहाची हकीकत नीट पाहिली म्हणजे त्याच्या मुळाशी स्वामींची स्त्रीसंभोगलोलुपता होती असे मुळीच दिसत नाही. हंसाबेच्या वडिलांनी त्यांना विनंती केली आणि त्यांनी ती स्वीकारली, असा हा प्रकार आहे. तात्त्विक दृष्टीने, हंसांबेच्या विषय प्रेमाची चाल पूर्ण करण्यासाठी स्वामींनी तिच्याबरोबर लग्न लावले असे या गोष्टीचे समर्थन करण्यात येते. लौकिक दृष्टीने विचार करणारांना हे समर्थन मान्य होईलच असे नाही. तसे ते मान्य न झाले तरी स्वामींचा हा विवाह-संबंध 'अनैतिकते'त मोडू शकत नाही, ही गोष्ट मात्र कबूल केलीच पाहिजे. स्त्रियांच्या बाबतीत ते शिथिल आचरणाचे होते असे त्यावरून म्हणता येत नाही. कारण जाणुनबुजून तो विवाह होता ! आणि तोहि मुद्दामहून स्वेच्छेने केलेला नव्हे. हंसांबेबरोबर थोडे दिवस घालवून पुन्हा ते 'अवधूत' बनून बाहेर पडले यात त्यांच्या मूळ स्वभावाचे खरेखुरे बीज आहे असे वाटते.

विवाहाचा हा एक प्रसंग सोडून दिला तर स्वामी अखंड ब्रह्मचर्य प्रवृत्तीचे होते असे म्हणता येते. त्यांनी कधीहि कोणत्याहि स्त्रीची अपेक्षा केली नाही. इतकेच नाही तर ज्या ज्या वेळी स्त्रियांनी किंवा इतरांनी त्यांना मोहपाशात अडकवण्याचा प्रयत्न केला त्या त्या वेळी त्यांनी ते पाश निग्रहाने तटातट तोडून टाकले. त्यावेळी स्वामींचे झालेले वर्तन पाहिले म्हणजे त्यांच्या ब्रह्मचर्य वृत्तीची अधिकाधिक जाणीव होते. ते एकाकी विहरण करीत असतांना कळावीबीरवीने त्यांना 'प्रवृत्त' करण्याचा प्रयत्न केला. (एकांक ३७); पुत्रप्राप्तीच्या अपेक्षेने एका ठाकुराने स्वामींकडे प्रथम आपली वडील स्त्री व नंतर दुसरी तरुण बायको पाठविली. पहिलीला त्यांनी परत पाठवले आणि दुसरीला तर आतहि येऊ दिले नाही. त्या सर्वांचा

अनुभव एकच. ' गोसावियासि प्रवृत्ति नाही ' ( एकांक ४४ ). पैठणला असतांना एका नृत्यांगनेने त्यांचा पदर धरून " जी जी माझेया बिढारासि बीजे करावे जी " म्हणून त्यांना आपल्या घरी नेण्याचा आग्रह धरला. पण स्वामींनी त्याहि प्रसंगातून आपली सुटका कुशलतेने करून घेतली. ( भा. २ पा. १३ ). अशी ही उदाहरणे पाहिली म्हणजे स्वामी निष्ठावंत ब्रह्मचारी होते याची खात्री पटते. हे सगळे खरे असले तरी स्वामींच्या आयुष्यात झालेल्या ' शेवटचे प्रकरणा 'च्या मुळाशी ते स्त्रीलंपट असावेत असा काहींचा झालेला गैरसमज होता, हे विसरता कामा नये. त्याविषयी प्रसंगोपात्त विस्तृत विचार आपण पुढे करूच.

११

# शिक्षण व ग्रंथरचना

महानुभावांच्या दृष्टीने श्रीचक्रधरस्वामी ईश्वरावतार असल्यामुळे त्यांचे शिक्षण व विद्वत्ता यांच्याविषयी कोणतीहि चर्चा करणे कदाचित अप्रस्तुत ठरेल. कारण ईश्वरावतार हा सर्वगुणसंपन्न असायचाच ! त्यातून चक्रधरस्वामी म्हणजे उभयदृश्या अवतार. त्यामुळे पर आणि अवर असे दोन्ही प्रकारचे ज्ञान त्यांच्या ठिकाणी होतेच. याच दृष्टीने महानुभाव महंत त्यांना 'सर्वज्ञ' म्हणून संबोधीत असतात. या 'सर्वज्ञ'तेत सर्व काही अंतर्भूत झालेले आहे ! ही दृष्टि सांप्रदायिक म्हणून बरोबर असली तरी पंथीयेतरांच्या दृष्टीने चक्रधरस्वामींच्या लौकिक जीवनात त्यांच्या यासर्वज्ञतेची कोणकोणती अंगे प्रत्यक्षाप्रत्यक्ष रीतीने आविष्कृत झालेली होती हे पाहणे उद्बोधक होईल.

## भाषाप्रभुत्व

श्रीचक्रधरस्वामी गुजराथी, मराठी आणि संस्कृत या तीन भाषा अस्खलित बोलत. ते मूळचे गुजराथी असल्यामुळे गुजराथी ही तर त्यांची मातृभाषाच होती. त्यामुळे त्या भाषेत ते उत्तम बोलत यात आश्चर्य नाही. महाराष्ट्रात आल्यानंतर या गुजराथीचा संस्कार त्यांच्या ठिकाणी शिल्लक होताच. सिन्नर येथे असतांना पाल्हा डांगियापासून आपले व्यक्तित्व लपविण्यासाठी त्यांनी आपल्या या मातृभाषेचाच आश्रय घेतला होता. येथे चांगदेवराउळ आहेत काय असे त्याने विचारताच 'इहां कोइ नथी...मातारी एकी छे : ते गावमां भिक्षा मांगन गैइ छे : इउं इहां अछों " – (भा. २. पा. ४९) असे उत्तर त्यांनी दिले. ते प्रथम महाराष्ट्रात आले त्यावेळी

मराठी त्यांना येत नसावी. शक्तिस्वीकाराच्या वेळी श्रीप्रभूबरोबर त्यांचे फारसे संभाषण न होण्याचे हे एक कारण असावे असे वाटते. पुढे अनेक-वर्षेपर्यंत ते सालबर्डीच्या डोंगरात राहिले. तेथेच त्यांनी मराठी भाषा आत्मसात केली असावी. त्यानंतर ते मराठीतच बोलू लागले. आणि या भाषेवर त्यांनी इतके प्रभुत्व संपादन केले की तीच त्यांची स्वाभाविक भाषा बनली. गणपती आपयोने म्हाइभटाला स्वामींची माहिती देतांना 'ते मऱ्हाठी अनावर बोलत असेति' (उत्त. १११) असे त्यांच्या मराठीतील अस्खलित वक्तृत्वाबद्दल प्रशंसोद्गार काढले होते. त्यांच्याबरोबर मराठीत वादविवाद करताना हे आपणाला आटोपत नाहीसे पाहून म्हाइभटाने त्यांच्याशी संस्कृत भाषेतून चर्चा सुरू केली. स्वामींना संस्कृतातहि उत्तम बोलता येत होते. आणि तेहि अगदी सहज. 'गोसावी जे प्रयोग बोलति ते तयां ज्ञातही नाही' इतके त्यांचे त्या भाषेवरील प्रभुत्व ! 'ऐसी घडिया च्यारि संस्कृते उघाणी जाली : मग संस्कृते नीरोत्तर केले" (उत्त. १११). यावरून चक्रधरस्वामींच्या संस्कृत भाषेवरील प्रभुत्वाची सहज कल्पना येईल.

संस्कृत भाषेतील प्राविण्यामुळे त्यांच्या मराठी भाषेलाहि एक प्रकारचा डौलदारपणा आणि अभिजातपणा आलेला आहे. आपल्या बोलण्यातून प्रसंगानुसार संस्कृत वचनांचा आणि सुभाषितांचा ते सहज उपयोग करीत. सारंगपंडित रिक्त हस्ताने भेटायला आलेला पाहताच स्वामी म्हणाले, "तुम्ही रीतहस्ते भेटलेति...रिक्तहस्तेन न पश्येत् राजानं देवतां गुरुं" (भा. २ पा. ४४); स्वामींच्या ठिकाणी आधी पूजा करून मग जेवीन म्हणून म्हणणाऱ्या दाइंबाला ते एकदम बोलले, "तैसे एथ कांही नाही : स्वस्थे चित्ते बुद्धयः संभवन्ति" (उत्त. ११); आपल्या जोगाच्या अभिमानाने इतरांना तुच्छ लेखणाऱ्या जोग्याला उद्देशून त्यांनी उपदेश केला, "ऐसे न म्हणिजे हो.. हे बहुरत्ना वसुंधरा" (उत्त. २१८); रामदेवाने राणाइसाला रात्री अवेळी पाणी आणण्याला पाठविले हे कळताच स्वामी म्हणाले, "माहात्मे हो : एकली स्त्री एऱ्हडेया वेळा तैसीया स्थाना न पाठविजे की : स्वयं दास्यं तपस्विनाम्" (उत्त. २०५) याशिवाय 'यदनंतरं यद्दृश्यते तत्तस्य कारणम्' (वि. ६१); 'बलवत्तरो दुर्बलं बाधते' (वि. १७५); 'इहामुत्रफलोपभोगविरागो वैराग्यम्' (आ.

३४); 'चातुर्वर्ण्य चरेद्भैक्ष्यम्'—(आ. ८१) वगैरे. अशी अनेक संस्कृत वचने चक्रधरस्वामींच्या तोंडी आढळतात. ती त्यांच्या संभाषणातूनच निवडलेली आहेत. यावरून त्यांच्या बोलण्याला प्रौढी कशी प्राप्त झालेली होती याची कल्पना येईल.

## वेदोपनिषदांचे अध्ययन

या संस्कृत वाक्यांच्या, वचनांच्या आणि सुभाषितांच्या मागोव्यावरून त्यांच्या एकंदर अध्ययनाचाहि शोध घेता येतो. मूळचे ते प्रधानपुत्र असल्यामुळे लहानपणी तत्कालीन सर्व शास्त्रांचे त्यांनी अध्ययन केले असणे सहज संभवनीय दिसते. त्यांच्या पुढील आयुष्याला लौकिक दृष्टीने जे वळण लागले ते आध्यात्मिक स्वरूपाचे होते हे स्पष्ट आहे. त्यावरून बहुधा लहानपणीच त्यांच्याकडून संस्कृतातील आध्यात्मिक ग्रंथांचा अभ्यास झाला असावा असे अनुमान करणे चुकीचे होणार नाही. असे ग्रंथ म्हणेच श्रुति-स्मृति-पुराणादिकांचे होत. यांचा त्यांनी चांगला अभ्यास केला होता असे त्यांनी प्रतिपादन केलेल्या तत्त्वज्ञानावरूनहि दिसून येते. त्यांनी आपले स्वतःचे असे विशिष्ट तत्त्वज्ञान प्रतिपादन केले असले तरी त्याची पाळेमुळे आपल्या जुन्या वेदशास्त्रपुराणादिकात आढळून येतात यात शंका नाही. किंबहुना असेहि म्हणायला हरकत नाही की, या जुन्या तात्त्विक मतप्रणालींचे आलोडन केल्यानंतर त्यांची ग्राह्याग्राह्यता पारखून पाहून व त्यावर स्वतःच्या विचारांचे संस्कार करून त्यांनी आपल्या तत्त्वज्ञानाची उभारणी केलेली आहे. अर्थात, यासाठी वेदोपनिषदादिकांचा त्यांनी चांगला अभ्यास केलेला असला पाहिजे. आणि तसे असल्याचे त्यांच्या एकंदर संभाषणादिकावरूनहि उत्तम प्रकारे दिसून येते.

'कव्हणी एकु वेदविभागु : चैतन्याचेया अस्तित्वाते जाणे तथा बोले' (वि. १३). या सूत्रपाठातील वचनावरून वेदाचा एक विभाग म्हणजे उपनिषदे-यांना केवळ चैतन्यमायेचे अस्तित्व तेवढे ठाऊक असल्याचे मत श्रीचक्रधरस्वामींचे बनले होते असे दिसते. त्यांनी केलेल्या उपनिषदांच्या अभ्यासाचे हे गमक मानायला हरकत नाही. निरनिराळ्या उपनिषदातील विचाराशी स्वामींच्या विचारांचे साम्य पंडित बाळकृष्ण शास्त्री यांनी

'महानुभाव पंथ' या आपल्या पुस्तकात दाखवले आहे. (प्रकरण ५) ते जिज्ञासूंनी पहावे. म्हणजे स्वामींच्या औपनिषदिक अभ्यासाची त्यांना कल्पना येईल. 'माया-स्वरूपी एकदेशी तम असे' (संस. १) हा विचार ऋग्वेदातील 'तम आसीत्तमसा गूढमग्रे' या श्रुतीवरून उचलेला आहे. 'यापरी मागौती जैसी असिली तैसी सृष्टि रची' (संस. २६) याला ऋग्वेदातील 'यथापूर्वमकल्पयत्'चा आधार आहे. अशी काही प्रत्यक्ष प्रमाणे देता येतात. या वेदोपनिषदाप्रमाणेच ब्रह्मसूत्रे, त्यावरील भाष्ये हीहि त्यांनी अभ्यासली असल्याचे पंडित बाळकृष्ण शास्त्री यांच्या पूर्वोक्त ग्रंथातील प्रकरणावरून सहज दिसून येईल. शंकराचार्य आणि रामानुजाचार्य हे दोनच वैदिक आचार्य चक्रधरांच्या पूर्वी होऊन गेले होते. आणि त्या दोघांच्याहि मताशी त्यांचा चांगला परिचय होता. शंकराचार्यांचा विवर्तवाद आणि रामानुजाचार्यांचा परिणामवाद आपणाला मान्य नसल्याचे 'एकाते प्रपंचु परिणामु बोलिजे : एकाते विवर्तु बोलिजे : एथ तैसे नव्हे...' (वि. ६०) या सूत्रात त्यांनी म्हटले आहे. यावरून या दोन्ही आचार्यांच्या मतप्रणालींची माहिती त्यांनी करून घेतली होती हे स्पष्ट होते.

## भगवद्गीता

वेदोपनिषदांची सारभूत असलेली भगवद्गीता हा तर स्वमींच्या तत्त्वज्ञानाचा प्रमाणभूत ग्रंथ मानला जातो. त्यातील किती तरी वचने जशीची तशी त्यांच्या सूत्रपाठात आढळतात. 'आर्तो दुःखत्रसचित्तो जिज्ञासुरुत्तमो मयि : अर्थार्थी नित्यपदाकांक्षी श्रद्धया परमास्तिक :' (आ. मा. १५३; गीता ७-१६); 'काम क्रोध लोभ इथे तीनि नरकद्वारें (आ. १७२) म्हणजेच 'त्रिविधं' नरकस्येदं द्वारं नाशनमात्मन:। कामःक्रोधस्तथा लोभ:'— (गी. १६-२१); 'परमेश्वरशास्त्री ··· अकरणी प्रत्यवायो नाही' (आ. मा. ११९) म्हणजे 'नेहाभिक्रमनाशोस्ति प्रत्यवायो न विद्यते' (गी. २-४०) इत्यादि वचनावरून हे दिसून येईल. चक्रधरस्वामींनी जुन्या शास्त्रीय ग्रंथातून फक्त भगवद्गीतेचेच काय ते प्रामाण्य मान्य केले आहे. (बाई : गीता श्रीकृष्णोक्ति : एर अवघी व्यासोक्ति : वि. मा. १०९). भगवद्गीतेतील श्लोकावर ते व्याख्यान करीत, असे 'एथ गोसावी दोनी श्लोक गीतेचे वाखाणिले : चतुर्विधा भजन्ते मां ॥ तेषां ज्ञानी नित्ययुक्त ॥ हे दोनि श्लोक

म्हाइभटाप्रति वाखाणिले ' ( उत्त. ४८० ) यावरून दिसून येते. कास्त हरिदेव पंडित हे 'पुराण गीता आइकति : मग तेथींचे संदेह पडति : ते येउनि गोसावीया पुसति ' ( भा. २. पा. ९ ). यावरून गीतेतील संदेह स्वामी फेडीत असे स्पष्ट दिसते. गीतेप्रमाणेच पुराणातीलहि संदेह ते फेडीत असे याच उल्लेखात आहे. ही पुराणे कोणती हे स्पष्ट निर्देशिलेले नाही. तथापि त्यावरून, वेदोपनिषदाप्रमाणे ( रामायण, भारत, भागवत आदि ) पुराणांचाहि त्यांनी अभ्यास केलेला असावा असे म्हणावयास हरकत नाही. चक्रधरस्वामींच्या तत्त्वज्ञानात 'पुराणे क्षीराब्धिपर्यंत देखति '— ( वि. मा. १०८ ) असा पौराणिक ज्ञानाचा निष्कर्ष सांगितला आहे. त्यावरूनहि त्यांच्या पुराण-ग्रंथांच्या अभ्यासाविषयी कल्पना येऊ शकेल.

## तंत्र ग्रंथाशी परिचय

इतर काही पंथीयांच्या वैचारिक भूमिकेचीहि त्यांना चांगली माहिती होती असे दिसते. 'आगम अष्टभैरवपर्यंत देखति ' ( वि. मा. १०८) हा 'आगम ' शास्त्रासंबंधीचा त्यांचा अभिप्राय आहे. तंत्रग्रंथांचाहि स्वामींनी अभ्यास केलेला असला पाहिजे असे दिसते. शांभव, शाक्त, आणव इत्यादि विद्या व त्यांचे परिणाम अभिनवगुप्ताचार्यांच्या 'तंत्रालोक ' ग्रंथात जसे वर्णिले आहेत तसेच ते चक्रधरांच्या वचनातहि आलेले आहेत. देवतांच्या मळांची कल्पना तर त्यांनी तंत्रालोकापासूनच उचललेली असावी की काय असे वाटते. 'देवादीनां च सर्वेषां भाविनां त्रिविधं मलम् ' 'इह खलु द्विधा बन्ध आत्मनि अनात्माभिमान : अनात्मनि आत्माभिमानश्च – इति तदेव चाणवं मलमुच्यते'— वगैरे तंत्रालोकातील अनेक वचने याची साक्ष देतील. पंडित बाळकृष्णशास्त्री यांच्या महानुभावपंथ या ग्रंथात ( पा. १७२ ते १७४ ) ही साम्ये दाखवलेली आहेत ती पहावी. तंत्रालोकाप्रमाणेच वायवीय संहिता व तंत्रागम यांतील वचनाशी आणि कल्पनाशी असलेले चक्रधरस्वामींच्या वचनांचे व कल्पनांचे साम्यहि तेथे दिग्दर्शित केले आहे. त्यावरून ह्या ग्रंथांचा अभ्यास स्वामींनी केला असला पाहिजे हे स्पष्ट दिसते. दृष्टांतपाठात आलेले कुकडी, मासळी, कासवी आणि भिंगुरटी यांचे दृष्टांत हे जवळजवळ जसेचे तसे तंत्रागमातून उचलेले आहेत. यावरूनहि याचा पाठपुरावा होऊ शकतो.

श्रीचक्रधरस्वामींनी पुरस्कारलेला व प्रतिपादलेला संन्यस्तांचा आचारधर्म व स्मृतिग्रंथातील आचारधर्म सारखाच असल्याचे दिसून येते. काही ठिकाणी मनुस्मृतीतील वचने व चक्रधरांची वचने यात विलक्षण साम्य आढळते. नारदपरिव्राजकोपनिषद, योगतत्त्वोपनिषद इत्यादि ग्रंथातील आचारवचनाशीहि साम्य आढळते. ते पाहिले म्हणजे या ग्रंथाचे अवलोकन स्वामींकडून झालेले असावे असे वाटते. हे ठरविण्याला पंडित बाळकृष्ण शास्त्री यांच्या उपरोक्त ग्रंथातील प्रकरण बरेच साह्यभूत होईल. सारांश वेद, उपनिषदे, गीता, पुराणे, आगमग्रंथ ( तंत्रागम, तंत्रालोक वगैरे ) इत्यादिकांचा अभ्यास स्वामींच्या कडून झालेला असावा असे अनुमान काढण्यास काहीहि हरकत नाही. चक्रधरस्वामींच्या अध्ययनासंबंधी व बहुश्रुततेसंबंधी यावरून चांगली कल्पना येईल. पैठण येथे असतांना स्वामींना पाहून काही ब्राह्मण आपापसात जेव्हां विचारू लागले की ‘ हे काइ जाणेति ’ तेव्हां त्यांना स्वामींनी स्वतः उत्तर दिले, “ हे सकळ सीद्धांताचा–शास्त्रांचा–मतितार्थ जाणे ” ( उत्त. ३९२ ) हे त्यांचे उद्‌गार यथार्थ आहेत यात शंका नाही.

## लौकिक विद्यांचे ज्ञान

या शास्त्रपुराणादि आध्यात्मिक ग्रंथाप्रमाणेच इतर अनेक विद्यांचे ज्ञान चक्रधरस्वामींना होते असे ‘ लीळाचरित्रा ’ वरून दिसते. एक वेळ दाइंबाने त्यांना विचारले, “ जी जी : गोसावी सकळ वीद्या जाणेति : सकळ वोखदी जाणेति ? ” तेव्हां स्वामींनी “ होय ” असे म्हटले. ( उत्त. ४५५ ). हे केवळ अर्थवादात्मक होते असे नाही. निरनिराळ्या प्रसंगी या अनेक विद्यांचे निरूपण त्यांच्याकडून झालेले असल्याचे उल्लेख पुष्कळ आहेत. एकाकी असतांना हेडाऊंच्या समोर त्यांनी घोड्यांच्या निरनिराळ्या जातींचे निरूपण केले होते ( एकांक. १६ ). तसेच अचलपूर येथील अंबीनाथाच्या देवळातील ‘ सुतारा ’ जवळ ‘ चुने जाति निरूपीली ’ म्हणजे चुन्यांच्या प्रकारांचे वर्णन केले; इतकेच नाही तर चुना तयार कसा करावा, खडे कसे भाजावे, त्यात कोणती द्रव्ये टाकावी आणि त्यांचे मर्दन कसे करावे, किती दिवस तो कुजू द्यावा याचे वर्णन केले आहे. कुजल्यावर चुना वाटून झाला म्हणजे तो कुऱ्यांना ‘ दहिभाताचा उंडा ’ वाटला पाहिजे असा निष्कर्ष त्यात त्यांनी

सांगितला. ( एकांक. ५६ ). यावरून अश्वपरीक्षा आणि चुना तयार करण्याची विद्या स्वामींना चांगली ठाऊक होती असे दिसते. महादेवराव यादवाचा पाइक साळीवाहन हा भेटीला आला असतांना स्वामींनी त्याजजवळ हटयोगातील प्रक्रिया आणि त्यांची कार्ये यावर असे निरूपण केले की ' हटु तो आम्हीचि जाणो ' असे म्हणणारा साळीवाहन आश्चर्यचकित होऊन गेला आणि म्हणाला की " आपण सांगता ते आम्ही -' जी जी : परिसो नेणो जी : मा बोलौनि काई " म्हणजे हे आम्ही ऐकलेहि नाही, मग बोलावे काय ? ( भा. २ पा. ३१ ). हटयोगाप्रमाणेच चौरंगी विद्येचेहि त्यांना ज्ञान असावे असे त्यांनी केलेल्या ' चौरंगी विद्यानिरूपणा--' वरून वाटते. ( भा. २ पा. ५७ ). विश्वनाथ नावाच्या एका नाथपंथी महात्म्याने ' आपणाला तांब्याचे सोने करता येते काय ? ' म्हणून विचारले तेव्हां स्वामींनी विनयाने " नाही " असे म्हटले. पण त्यानंतर आपण ते सहज करू म्हणून ते आपल्या शिष्याजवळ बोलले. तथापि " असे आम्ही केले तर मग आम्ही तुमचे कोणी नाही " असे त्यांनी म्हणताच नाथोबा बोलला, " आम्हा चाड नाही जी : " यामुळेच त्यांनी तो चमत्कार करून दाखवला नाही. तथापि या आख्यायिकेवरून नाथपंथी महात्म्याप्रमाणे चक्रधरस्वामींनाहि तांब्याचे सोने करण्याचे ज्ञान होते असे दिसते. त्यांना प्रल्हादविद्याहि येत होती. ज्या विद्येच्या योगाने शरीरावर शस्त्राघात झाले तरी ते लागत नाहीत, उलट त्यामुळे आनंदच वाटतो अशी ही विद्या आमदेवभटाला स्वामींनी दिली होती. तेव्हां त्यांना ती येत असली पाहिजे असे अनुमान करण्याला काहीच हरकत नाही. ( भा. २ पा. २८ ). चक्रधरस्वामींना ज्योतिषशास्त्राचीहि माहिती होती. आकाशात शुभ्र नक्षत्रांच्या दर्शनाच्या निमित्ताने उपाध्याच्या बरोबर भाषण करीत असतांना या शास्त्रासंबंधीची एक आख्यायिका त्यांनी सांगितली आहे. ( भा. ४ पा. ३२ ).

स्वामींना ' वज्री ' म्हणजे 'वारितुरंग' घडण्याची कलाहि माहीत होती. आपल्या आयुष्याच्या शेवटी शेवटी बेलापुरी असतांना त्यांनी एके दिवशी एक वज्री तयार केली. ती कशी ? तर ' डावा श्रीकरी काळी इट : उजवा श्रीकरी चीपतळ : उजविए श्रीचरणीचेनि अंगुठेन दडनि उजविया श्रीकरिचिया

चिपतळाकरूनि वज्री घडिली :' ती तयार केल्यानंतर खालच्या दगडावर वारंवार घासून तिला ते 'सरिसी' (व्यवस्थित) करीत होते, त्यावेळी महदाइसेने स्वामींना पाहिले. तिने स्वामींना विचारले, "जी जी : हे काइ कीजत असिजे ?" स्वामींनी सांगितले, "बाइ : हे वजरी घडिजत असिजे :" "वजरी म्हणीजे काइ ?" "बाइ : हे वज्री म्हणीजे वारितुरंग :" "जी जी : वारितुरंग म्हणीजे काइ ?" "वारितुरंगम एक घोडे : दीपी असेति : ते उदकावरि चालेति : तैसी हे वजरी : बाइ : उदकावरि तरंगाए म्हणौनि वारितुरंग म्हणीतले :" (उत्त. ५०१). यावरून साधी वीट पाण्यावर तरंगत राहील अशी घडविण्याचे कौशल्य स्वामींच्या ठिकाणी होते असे दिसून येईल.

चुन्याप्रमाणेच पाषाणांचेहि अनेक भेद त्यांना परिचित होते. पैठणला असतांना वैजनाथाच्या देवळासाठी दगड घडण्याचे काम चालू होते. तेथे सहज उभे राहून त्यांनी दगड घडणारांना पाषाणाच्या जाती विचारल्या. त्यांनी आपल्या माहितीप्रमाणे त्या सांगितल्या. पण नंतर स्वामींनी 'पाषाणाचीया जाती निरूपिलिया' त्या ऐकून ते लोक म्हणाले की 'त्याची आम्ही सोयही नेणो' (उत्त. २९९). यावरून स्वामींनी सांगितलेले प्रकार त्यांना अश्रुतपूर्व असले पाहिजेत असे दिसते. पाषाणाप्रमाणेच वृक्ष-फळादिकांचीहि त्यांना उत्तम माहिती होती. गदोनायकाने वेरूळ येथे स्वामींच्या दर्शनाला जाणाऱ्या सारंगपंडिताबरोबर भेट म्हणून दोन फळे पाठवली व त्यांचे नाव विचारण्याला सांगितले. अनेकांनी अनेक नावे सांगितली. पण ती 'रितुपे' असल्याचे स्वामींनी बरोबर ओळखले. (भा. २. पा. ४५) तसेच आनव या गावी असतांना इतर झाडावरून आंबे उतरलेले असतांना एकच झाड आंब्यांनी लहडलेले दिसले. तेव्हां 'असे का' म्हणून भक्तजनांनी स्वामींना विचारले. त्यावेळी विनोदाने 'हे संसारमोचक आंबे आहेत' म्हणून त्यांनी सांगितले. कारण ते आंबे खाल्ल्याने ज्वर येत असे. (भा. ३. पा. ७३). यावरून वृक्षफळादिकांची माहिती स्वामींना कशी होती याची चांगली कल्पना येते.

याबरोबरच नाव हाकणे, आउत वाहणे, शस्त्र फेकणे इत्यादि कलाहि त्यांना ठाऊक होत्या. साडेगाव येथे असतांना स्वामींना गोदावरीच्या पलीकडे

जायचे होते. ते नदीकाठावर भक्तजनासह आले. तेथे डोणी होती. पण हाकणारे नव्हते. जे होते त्यांना वल्हवता येत नव्हते. त्यावेळी स्वामींनी नाव वल्हवीत नेली; आणि तीहि अगदी सरळ ! ते पाहून तेथील लोक म्हणाले, " हे काइ जी : ऐसि दोनि कव्हणी आवलुं नेणे जी : कैसी उजुचि नेली " ( भा. ४ पा. १३ ). स्वामी बीड येथे असतांना एके दिवशी फिरायला गेले. शेतात कुणबी आउत वाहतांना दिसला. तेव्हां बरोबरच्या दायंबाला त्यांनी विचारले, " तुला आठत वाहता येतो काय ? " त्याने ' हो ' म्हटले. स्वामी म्हणाले, " करून दाखव पाहूं " — दायंबाने करून दाखवले. तेव्हां त्यात राहिलेला दोष स्वामींनी दाखविला. यावरून आऊत वाहण्याची माहिती त्यांना होती असे दिसते. त्याचप्रमाणे सरावाचेहि ज्ञान त्यांना होते. ( भा. ३ पा. १० व ११ ). लाठीच्या साह्याने घाव मारणे व तो परतवणे म्हणजेच लाठीकाठी खेळण्याचीहि माहिती त्यांना चांगली होती. त्यांनी त्याची चुणुक तेवढी एका राजगुरूला दाखवली. ( भा. २. पा. ६३ ). आपण त्यातील आपले कौशल्य दाखविले असते तर त्या राजगुरूने ते सहज माहीत करून घेतले असते आणि मग ' घाया घाया प्राणियाते ठेवीत ' — प्रत्येक घावा सरशी त्याने एकेका प्राण्याचा प्राण घेतला असता, असे त्यांना वाटत होते. यावरून यातील त्यांच्या कौशल्याची कल्पना करता येईल. या कौशल्याबद्दल आश्चर्य वाटण्याचेहि कारण नाही. कारण चक्रधरस्वामी हे प्रधानपुत्र असल्या- मुळे अशा खेळांचे शिक्षण त्यांना लहानपणीच मिळाले असले पाहिजे यात शंका नाही.

## वक्तृत्व आणि रसिकत्व

श्रीचक्रधरस्वामी चांगले वक्ते व रसिक होते. अध्यात्मशास्त्रे व इतर लौकिक शास्त्रे याप्रमाणेच काही ललित कलांचेहि मार्मिक ज्ञान त्यांना होते. त्यांचे नित्याचे बोलणे अतिशय मधुर असे. त्यामुळे ऐकणारे मुग्ध होऊन त्यांच्याकडे वेधले जात. प्रसंगविशेषी निरनिराळे रस वक्तृत्वाच्या द्वारा ते सहज निर्माण करीत. स्वामी वेरूळ येथे असतांना गोपाळ पंडित त्यांच्या दर्शनाला आले. त्यांच्या बरोबर सारंगपंडित होते. सारंगपंडितांनी गोपाळ- पंडितांचा परिचय करून देतांना सांगितले की, " हे माझे मैत्र : हे शास्त्रवक्ते :

हे बरवे बोलो जाणति : " यावरून वक्तृत्वासंबंधी गोष्टी निघाल्या. त्यावेळी चक्रधरस्वामी स्वतः 'सावजाचा यावा बोलिले.' तो ऐकून, त्या ठिकाणी आलेल्या सर्वांना 'लेणे फोडुनि पळावे' असे वाटू लागले. इतका 'ऐसा भयानकु अवतरवीला'– म्हणजे भयानक रस निर्माण केला. आणि लागलीच नंतर 'धुरेचा लाटु बोलता : राजकेयांचिया कडी दबेयावरि हात पडीले : भक्तजन सन्मुख जाले : ऐसा वीररस अवतरवीला' (भा. २ पा. ४५). यावरून स्वामींचे रसनिर्माणकौशल्य दिसून येते.

स्वामींच्या वादकुशलबुद्धिसंबंधी श्री. ह. ना. नेने यांनी काढलेले उद्गार अत्यंत समर्पक आहेत. ते लिहितात : 'जिज्ञासू, आर्त अगर ज्ञानी मंडळी त्यांच्या दर्शनास येई व सहजपणे''चर्चा चालत, अगर एखादा विषय निघून प्रसंगप्राप्त असे''निरूपण होई. अशा वेळी निरूपण करीत असता आपला आशय श्रोत्यांच्या मर्यादित बुद्धीस अवगत व्हावा म्हणून चक्रधर अनेक दाखले, उदाहरणे व दृष्टांत सजवून तो आशय सहजगम्य करीत असत. निरूपणाच्या भरात प्रतिपादनार्थ ज्या मंडनपद्धती लेखकास उपयोजाव्या लागतात त्यात, आणि जेव्हां आपले म्हणणे श्रोत्यांच्या अंतःकरणावर वक्ता बिंबवीत असतो तेव्हां त्याची वृत्ती 'चांद्रमयी' करण्याकरिता तो वक्ता संभाषणपद्धतीतील युक्त्या, पकडी, प्रश्नप्रतिप्रश्न इत्यादिकांचा स्वीकार करितो त्या दोहीत जमीनअस्मानचा फरक असतो. पद्य जसे वेधक व मंजुळ तसे गद्य हे भेदक व निर्णायक असावे लागते. वादविवाद अगर संवादात्मक रचनेत जे वैशिष्ट्य असते ते वेगळ्याच प्रकारचे असते. शंकाप्रश्नांचा मारा सुरू असता आपली बाजू सावरून घेऊन व एखादा समर्पक दृष्टांत रंगवून प्रतिपक्षावर मात करणे हे जसे एखादा प्रसंगावधानी वक्ता करू जाणतो त्याप्रमाणे कोणत्या वर्गाच्या व ग्रहणशक्तीच्या श्रोत्यांना कोणत्या उदाहरणांचा दाखला समर्पक वाटेल हे ओळखून त्यांचीच योजना करून समाधान करणे ही योजकता थोडक्यांच्या अंगी असते. हीच वादकुशलबुद्धि सर्वज्ञांच्या ठिकाणी होती.' (दृष्टांतपाठ प्रस्ता. ४)

वक्तृत्वाप्रमाणेच गायनाची रसिकताहि त्यांच्या ठिकाणी होती. पैठण येथे असतांना एके दिवशी चक्रधरस्वामी भोजनोत्तर वामकुक्षी करीत होते. त्यावेळी जवळच उमाइसा हळूहळू गात होती. ते गाणे ऐकून

स्वामींनाहि गाण्याची लहर आली. उमाइसाला त्यांनी आधी गाणे म्हणायला लावले आणि मग धनाश्री रागात त्यांनी स्वतः एक चौपदी गाइली. 'गीतु विखो गा' म्हणून म्हणणाऱ्या चक्रधरस्वामींना गायन अजीबात वर्ज्य वाटत होते असे नाही. आसक्तीच्या दृष्टीने ते त्याज्य आहे. एरवी निर्वेदपर गीते म्हणायला त्यांची हरकत नव्हती. हे लक्ष्यात घेऊनच पुढे नागदेवाचार्यांनी दामोदर पंडितांना गाणे म्हणण्याला परवानगी दिली. वरील आख्या-यिकेवरून गीत गाणे आणि ऐकणे या दोन्ही बाबतीतील त्यांचे रसिकत्व दिसून येते. गायनाप्रमाणेच नृत्याच्याहि बाबतीत ते रसिक होते. पैठण येथे असतांना एक वेळ ते चांगदेवाच्या देवळात बसले होते. तेव्हां काही नृत्यांगना देवासमोर नृत्य करण्यासाठी आल्या. त्यांचे ते नृत्य पाहण्यासाठी स्वामी देवळात गेले. नृत्यांगनांनी नृत्य सुरू केले. स्वामींनी 'पेलणे आइको आदरिले :' नृत्याबरोबरच 'मादळीत : काहाळिया : वसकरू : चाकीकरू : आळतीकरू' वगैरे साथीदारांनीहि आपले कौशल्य दाखविले. 'जे जेयाचे अंग ये ते तो दाखवी : तया अंगा गोसावी तोखति :' नृत्याच्या शेवटी स्वामींनी संतुष्ट होऊन सर्वांना तांबूल दिले. आपली सर्व चंची रिकामी केली. त्यामुळे आनंदित होऊन ते सर्व म्हणाले, "जी जी : इतुले दीस कला पोरटीया जालिया होतिया : आजी सकळांचे माहेर भेटले :" (भा. २ पा. १३). यावरून स्वामींची रसिकता स्पष्टपणे कळून येईल. आउसा नावाच्या योगिनीला त्यांनी आग्रहाने विवस्त्र होऊन नृत्य करायला लावले होते. (उत्त. ४३५).

या सर्व गोष्टी लक्ष्यात घेतल्या म्हणजे श्रीचक्रधरस्वामींचे शिक्षण व संस्कार यांची फार चांगली कल्पना येते. अध्यात्मशास्त्रावरील प्रमुख वैदिक ग्रंथांचे जसे त्यांनी अध्ययन केले होते, तसेच त्याव्यतिरिक्त अन्यपंथी-यांच्या आचारधर्माचेहि ज्ञान करून घेतले होते. अनेक लौकिक विद्या त्यांना अवगत होत्या. नित्योपयोगी अशा कोणत्याहि कामाची माहिती त्यांना नव्हती असे नाही. याबरोबरच शस्त्रविद्येतहि ते पारंगत होते. शिवाय त्यांच्या अंगी उत्तम प्रकारचे वक्तृत्व, वादकौशल्य व रसिकताहि आढळून येत होती. सारांश, लौकिक दृष्टीने विचार केला तरी श्रीचक्रधरस्वामी म्हणजे तत्कालीन समाजातील एक शास्त्रविद्यासंपन्न, बहुश्रुत व वक्तृत्वकलाकुशल

रसिक सत्पुरुष होते असे म्हणायला हरकत नाही. त्यांच्या या अभिजात गुणसंपदेतूनच त्यांची वाङ्मयीन मूर्ति आकाराला आलेली आहे. तिचे निरीक्षण करण्यापूर्वी त्यांच्या 'ग्रंथकर्तृत्वा' संबंधी निरनिराळ्या विद्वानांनी जी मते व्यक्त केलेली आहेत त्यांचे समालोचन करणे अवश्य आहे.

## 'चक्रधरांचा एकहि ग्रंथ नाही'

महानुभाव पंथाचे संस्थापक श्रीचक्रधरस्वामी यांचा आज जो लौकिक सर्वत्र पसरला आहे तो एका विशिष्ट संप्रदायाचे प्रवर्तक आणि तत्त्वज्ञानाचे प्रतिपादक म्हणून. ग्रंथकार, लेखक किंवा साहित्यिक या नात्याने त्यांची फारशी प्रसिद्धी नाही. इतकेच नाही तर त्यांच्याविषयी लिहिणाऱ्या बहुतेक लेखकांनी चक्रधरांनी ग्रंथरचना केली नाही असाच आपला अभिप्राय व्यक्त केला आहे. कै. वि. ल. भावे यांच्या 'महानुभाव-महाराष्ट्र-ग्रंथावली, कवि-काव्य-सूची' मधे चक्रधरांच्या नांवावर एकहि ग्रंथ नाही. त्याच्याच 'महाराष्ट्र सारस्वता'त (भा. १ पा. ८३) 'श्रीचक्रधरांनी प्रत्यक्ष रचलेला असा एकहि ग्रंथ नाही' असे नमूद केलेले आहे. डॉ. य. खु देशपांडे याच्या 'महानुभावीय मराठी वाङ्मय' या पुस्तकांतहि चक्रधराच्या नावावर एकहि ग्रंथ नाही. तथापि 'श्रीमच्चक्रधरांची चौपदी' म्हणून 'श्रीमच्चक्रधर यांनी .....गायिलेली' एक 'चौपदी' (पा. ११, १२) त्यांनी उद्धृत केलेली आढळते. 'प्रत्यक्ष चक्रधरस्वामींची कांही ग्रंथरचना उपलब्ध नाही. नाही म्हणावयाला त्यांची एक चौपदी (गाणे) प्रकाशात आली आहे.' असे कै. बा. अ. भिडे यांनीहि म्हटले आहे. (मराठी भाषेचा व वाङ्मयाचा इतिहास. पा. १२१). कै. पांगारकरांनी 'गोविंदप्रभु, चक्रधर किंवा नागदेवाचार्य हे पंथाचे संस्थापक असून त्यांपैकी एकानेहि ग्रंथ लिहिलेला नाही.' असेच म्हटले आहे. (मराठी वाङ्मयाचा इतिहास. खंड १ पा. ४१५). कै. नी. ब. भवाळकर आणि श्री. ह. ना. नेने यांनीहि 'चक्रधरांनी स्वतः असा कोणताच ग्रंथ लिहिला नाही' (श्रीचक्रधरसिद्धांतसूत्रे. प्रस्तावना) असे म्हटलेले आहे. महानुभावीय प्राचीन लेखकांनीहि ग्रंथकार किंवा लेखक म्हणून चक्रधरस्वामींचा उल्लेख केलेला आढळत नाही. सामान्यतः 'वृद्धान्वया' मधे महानुभाव ग्रंथकारांची व त्यांच्या कर्तृत्वाची नोंद आढळते; पण

तेथेहि श्रीचक्रधरस्वामी अभावानेच चमकतात. तेव्हां श्रीचक्रधरस्वामी हे 'प्रत्यक्ष' किंवा 'स्वतंत्र' अथवा 'स्वतः' ग्रंथकार नव्हते असा या सर्व संशोधकांच्या म्हणण्याचा आशय आहे, असे म्हणण्यास हरकत नाही.

## हे विधान एकांगी आहे

त्यांचे म्हणणे अगदीच चुकीचे आहे असे नाही; तथापि ते एकांगी वाटते. माझ्या मते श्रीचक्रधरांना ग्रंथकार म्हणून म्हणायला काहीहि हरकत नाही; इतकेच नव्हे तर त्या पदवीवर त्यांचा पूर्णपणे हक्क आहे. चक्रधर हे ग्रंथकार होते; इतकेच नाही तर मराठीतील आद्यग्रंथकार होते, असे मला म्हणायचे आहे. वरील संशोधकांना चक्रधरांच्या या वाङ्मयीन कर्तृत्वाची मुळीच कल्पना नाही असे मात्र नाही. त्यांना त्याची कल्पना आहे. श्री. भवाळकर-नेने यांनी तर आपल्या पुस्तकाला 'श्रीचक्रधरसिद्धांतसूत्रे' असे नाव दिले आहे. दृष्टांतपाठालाहि त्यांनी 'श्रीसर्वज्ञ चक्रधर निरूपित' 'दृष्टांतपाठ' असे म्हटलेले आहे. या दोन्ही पुस्तकातील मजकुराचे कर्तृत्व चक्रधरांचे आहे हे त्यांना मान्य असल्याचे या नावावरून आणि त्यांच्या प्रस्तावनेतील विवेचनावरून स्पष्टपणे दिसते; आणि तरीहि 'चक्रधरांनी स्वतः असा कोणताच ग्रंथ लिहिला नाही' असे त्यांनी म्हटले आहे ते का, याचा विचार केला पाहिजे. 'ग्रंथ' हाच शब्द बहुतेकांनी योजलेला असल्यामुळे त्याच्याच अनुरोधाने हा विचार करणे सोयीचे व उपयुक्त होईल.

## ग्रंथ म्हणजे काय ?

चक्रधराने स्वतः ग्रंथरचना केली नाही हे परमार्थाने खरे आहे काय ? 'ग्रंथ' म्हणजे तरी काय ? केवळ व्युत्पत्तिदृष्ट्या पाहिले तर 'ग्रथ्यते इति ग्रंथः' जो बांधलेला आहे, एकत्रित केलेला आहे, व्यवस्थितपणे रचलेला आहे तो ग्रंथ; आणि असे करणारा जो तो 'ग्रंथकार.' या दृष्टीने तर आपले स्वतःचे किंवा इतरांचे विचार एका विशिष्ट क्रमाने किंवा व्यवस्थेने ज्यात एकत्रित मांडलेले किंवा लिहून ठेवलेले आहेत तो ग्रंथ आणि ते मांडणाराला किंवा लिहून ठेवणाराला ग्रंथकार म्हणावे लागेल. व्यवहारात ग्रंथलेखनाच्या बाबतीत काय काय घडून येते ! काही लेखक एखाद्या विषयावरील आपले

विचार स्वतःच लिहून ठेवतात. उदाः दासोपंतांनी भगवद्गीतेवर ‘ गीतार्णव ’ नावाची टीका रचली आणि ती त्यांनी स्वतः लिहून ठेवली; किंवा लो. टिळकांनी ‘ गीतारहस्य ’ नावाचा ग्रंथ रचला व स्वतःच लिहिला. यात स्वतःचे सुसंबद्ध विचार खुद्द लेखकाने स्वतःच लिहून काढलेले आहेत. तेव्हां त्यांच्या लेखनाला ‘ ग्रंथ ’ आणि त्यांना ‘ ग्रंथकार ’ ही संज्ञा यथार्थतेने लागू पडते. दुसरा प्रकार असा की, एखादी व्यक्ति विषयाची रचना मनात करून त्याचे ‘ निरूपण ’ करते आणि ते निरूपण दुसरा कोणी तरी लागलाच ‘ अक्षरशः लिहून काढतो. व्यासाने भारत सांगावे व गणपतीने ते अक्षरशः लिहून घ्यावे हा प्रकार असाच होय. ज्ञानेश्वर महाराजांनी भगवद्गीतेवर व्याख्या स्वतः केली आणि ती सच्चिदानंदबाबाने लिहून काढली. येथे शब्दशः लेखन करणारा दुसराच कुणीतरी आहे, तो अक्षरशः ‘ लेखक ’ असला तरी लौकिकात भारताचा लेखक गणेश आणि ज्ञानेश्वरीचा लेखक सच्चिदानंदबाबा असे आपण म्हणत नाही. या ग्रंथांचे लेखक अनुक्रमे व्यास व ज्ञानेश्वर महाराजच होत. आता आपण अशी कल्पना करू की, एखाद्या विचारवंताने केलेले तोंडी निरूपण, त्याच वेळी अक्षरशः लिहून न घेता काही दिवसानंतर पण त्या विचारवंताच्या हयातीतच स्मरणाने लिहून काढले गेले तर ? अशा रीतीने तयार झालेल्या त्या ग्रंथाचे कर्तृत्व कुणाला द्यायचे ? मुख्य विचार व विवेचन त्या विचारवंताचे; पण ते त्यावेळी नव्हे तर कालांतराने आणि अक्षरशः नाही तर स्मरणातून लिहून काढणारा निराळा. पुस्तकाचे कर्तृत्व कुणाकडे द्याल ? या प्रश्नाचे उत्तर देणे सोपे व्हावे म्हणून असे एक उदाहरण आपणासमोर ठेवतो. विनोबांनी १९३२ मध्ये धुळे जेलमध्ये गीतेवर जी प्रवचने केली ती तेथेच साने गुरुजींनी लिपिबद्ध केली............पुढे कॉंग्रेस साप्ताहिकात ‘ संक्षेपाने ’ ती प्रसिद्ध झाली. बारा वर्षानंतर ती पुस्तक-रूपाने प्रकाशित करण्यात आली. गीताप्रवचनांचे कर्ते म्हणून आज विनोबा प्रसिद्ध आहेत, साने गुरुजी नव्हत. प्रसिद्ध झालेल्या ग्रंथावर नावहि विनोबांचेच आहे. विनोबांनी ही प्रवचने पाहून तपासून दिलेली नाहीत हे लक्ष्यात ठेवावे. यावरून दिसून येईल की, मूळ विचारवंताला किंवा प्रवचन-कारालाच ग्रंथ-कर्तृत्वाचे खरे श्रेय दिले पाहिजे. साने गुरुजींनी ती अक्षरशः लिपिबद्ध केली असे गृहीत धरले तर ही विचारसरणी अधिक प्रमाणभूत होईल.

असाच प्रकार बॅ. सावरकर यांच्या 'कमला' या खंडकाव्याचा अ हे. हे काव्य त्यांनी अंदमानच्या तुरुंगात लिहिले. मनात श्लोकांची रचना करावी व ती विटकराच्या तुकड्यांनी अगर टोकदार दगडाने भिंतीवर लिहावी असा आरंभीचा क्रम होता. पुढे त्यांनीच ते काव्य स्वतः पाठ करून टाकले. ज्या खोलीतील भिंतीवर त्यांनी ते काव्य लिहून ठेवले होते ती त्यांना पुढे बदलावी लागली. तिच्यात प्रयाग येथील स्वराज्य पत्राचे संपादक रा. रामहरि यांना ठेवण्यात आले. या सद्गृहस्थांची भाषा हिंदी. परंतु विनायकरावांनी त्यांना तुरुंगात मराठी भाषा शिकविली. तेवढ्यावर श्री. रामहरि यांनी भिंतीवर लिहिलेले 'कमला' काव्य पाठ करून टाकले. अंदमानातून श्री. रामहरि हे लौकर सुटले. ते कलकत्त्यास येताच विनायकरावांचे धाकटे बंधु डॉ. सावरकर यास भेटले. 'कमला' काव्यातील शेकडो ओळी त्यांनी डॉ. सावरकर यास पाठ म्हणून दाखवल्या. त्यावरून त्या समग्र 'कमला' काव्याची एक हस्तलिखित प्रत डॉ. सावरकर यांनी सिद्ध केली. पुढे १९२१ मध्ये विनायकरावांनी घाईघाईने लिहून दिलेल्या प्रस्तावनेसहित त्यांनी ती 'विजनवासी' या टोपणनावाने प्रसिद्ध केली. ( कमला, ३ री आवृत्ती. काव्याचा परिचय ). यावरून दिसून येईल की केवळ 'रामहरि' यांच्या स्मरणातून बाहेर आलेल्या अर्थात, त्यांनी 'निवेदन' केलेल्या आणि डॉ. सावरकरांनी लिहून काढलेल्या स्वरूपात कमला काव्य प्रसिद्ध झाले. याचे बरेचसे श्रेय श्री. रामहरि यांना असेल; तरी मूळ काव्याचे रचयिते बॅ. सावरकर यांच्याच नावाने ते आरंभापासून ओळखले जाते. राजकीय कारणासाठी 'विजनवासी' हे टोपणनाव वापरलेले असले तरी रचना कुणाची याबद्दल महाराष्ट्रीय वाचक-वर्गात त्यावेळीहि यत्किंचित सुद्धा संदेह नव्हता. ते एक उघडे गुपित होते.

## हे 'ग्रंथां' चे नमुने पहा

वरील ग्रंथ मूळ कर्त्यांनी निवेदन करून इतरांनी लिहून घेतलेले असले तरी त्यांचे विषय एकसूत्रात्मक आहेत, त्यात योजनाबद्धता आहे. क्वचित् असे घडते की, एखादा विचारवंत विविध विषयावरील आपली स्फुट प्रकरणे ( स्वतः किंवा लेखकाकडून ) लिहून काढतो. अशी अनेक प्रकरणे झाली म्हणजे मग त्यांची शक्य तितकी पद्धतशीर मांडणी तो करतो. उदाः

'ग्रंथराज' म्हणून गौरविलेला दासबोध पहा. या 'ग्रंथराजा'ला स्वतंत्र असा एकच विषय नाही. अनेक विषयावरील प्रकरणांचे ते संकलन आहे; आणि ते खुद्द रामदासांनी म्हणजे ग्रंथकर्त्याने केलेले आहे. त्यातहि कांही भाग त्यांनी 'स्वतः' लिहिला असेल किंवा इतराकडून लिहून घेतला असेल. दासबोधाची अधिकृत संहिता कल्याणस्वामींच्या हातची आहे; त्यावरून ज्ञानेश्वराच्या सच्चिदानंदबाबाप्रमाणे रामदासांनी कल्याणस्वामींचा उपयोग करून घेतला असावा असे दिसते. ते कसेहि असले तरी एकसूत्रात्मक विषय नसूनहि स्फुट प्रकरणांच्या संकलनालासुद्धा खुद्द रामदासांनी आणि इतरांनीहि 'ग्रंथ'-नव्हे 'ग्रंथराज' म्हटलेले आहे! तुकाराम महाराजांच्या गाथ्याचीहि अवस्था हीच दिसते. प्रसंगोपात्त त्यांनी म्हटलेले अभंग क्वचित् त्यांनी व संताजी जगनाडे यांनी लिहून ठेवलेले आहेत. त्यांच्या गाथ्याला विषयाच्या दृष्टीने एकसूत्रता नाही; तरी आपण त्याला ग्रंथ म्हणतो व तुकारामांना ग्रंथकारांच्या मालिकेत मानाचे स्थान देतोच ना? हा ग्रंथाचा चौथा प्रकार झाला. ग्रंथाचा पाचवा प्रकार याहूनहि निराळा आहे. वरील उदाहरणात मूळ ग्रंथकार आणि त्याचा अक्षर-लेखक हे दोन्ही समकालीन आहेत; परस्परांच्या सान्निध्यात ते असतात.

## भगवद्गीता कोणी लिहिली?

पण भगवद्गीतेच्या बाबतीत काय आढळते? स्थूलार्थाने लौकिकात भगवद्गीता हा ग्रंथ श्रीकृष्णाच्या नावावर मोडतो. 'भगवत्' या शब्दावरूनहि हे दिसून येईल. गीता कुणाची?—तर श्रीकृष्णाची, असे आपण म्हणतो. पण वास्तवात तिची निर्मिती कशी झाली? गीता श्रीकृष्णाने स्वतः लिहिली नाही; किंवा आपल्या लेखकाकडून लिहविली नाही; तर त्याने अर्जुनाला ती सांगितली. 'पार्थाय प्रतिबोधिता भगवता नारायणेन स्वयं' असे तिचे स्वरूप आहे. पण ती लिहिली कुणी?—'व्यासेन ग्रथिता पुराणमुनिना मध्ये महाभारतम्'—म्हणजे, आपल्या महाभारत ग्रंथामध्ये पुराणमुनि व्यासांनी ती ग्रथन केली आणि सर्व महाभारत हे व्यासांनी स्वतः सांगून गणेशाकडून लिहवून घेतल्याचे आपण पाहिलेच. म्हणजे एकंदर प्रकार असा की, रणांगणावर कृष्णाने अर्जुनास सांगितलेली गीता व्यासांनी

गणेशाकडून लिहून घेतली. कृष्णाकडून अर्जुनाला गीता सांगितली ज असतांनाच व्यास ती अक्षरशः टिपून घेत होते असे नाही. गीता म्हण कृष्णार्जुनांचा संवाद संजयाने ऐकला आणि धृतराष्ट्राला सांगितला ! अगदी अक्षरशः सांगितला असेल; पण तो संजयाने आठवून सांगितले आहे. आणि त्यालाच पद्यबद्ध स्वरूप देऊन व्यासांनी तो गणेशद्वारा लिहू काढला आहे. तरीहि त्याचे कर्तृत्व श्रीकृष्णाकडेच दिले जाते. श्रीकृष्णा तो स्वतः लिहिला नाही; लिहवून घेतला नाही. लिहिला गेला तोहि मागाहू आणि पद्यस्वरूपात. तरीसुद्धा मूळ विचार श्रीकृष्णाचे असल्यामुळे गीते कर्तृत्व श्रीकृष्णाकडेच देतात. गीताग्रंथाचा कर्ता 'व्यास' किंवा 'संजय असे लौकिकात म्हणत नाहीत.

## सॉक्रेटिसची ॲपॉलॉजी

पाश्चात्य वाङ्मयातील अशा एका ग्रंथाचे उदाहरण आपणासमे ठेवणे अवश्य आहे. ग्रीक वाङ्मयात 'ॲपॉलॉजी' नावाचा एक ग्रं प्लेटोच्या नावावर आढळतो. वस्तुतः ही 'ॲपॉलॉजी' म्हणजे सॉक्रेटीस आपल्यावरील आरोपांचे निराकरण करण्यासाठी अथेन्समधील सेनेटसमे केलेले भाषण होय. या भाषणाच्या वेळी प्लेटो तेथे हजर होता. सॉक्रेटीसच मृत्यूनंतर प्लेटोने ते भाषण लिहून काढले. या भाषणाच्या पुस्तकाला 'ॲपॉलॉजी' असे नाव आहे. या ग्रंथाचा वास्तव कर्ता कोण ? काहीं म्हणणे असे आहे की, प्लेटोने सॉक्रेटीसचे भाषण अक्षरशः लिहून घेत नव्हते, त्याने ते स्मरणाने लिहून काढले; तेव्हां त्यातील शब्द न् शब सॉक्रेटिसाचा असेलच असे नाही. भाषा, विषयाची मांडणी वगैरे प्लेटोची असावी. म्हणून ॲपॉलॉजीचे कर्तृत्व प्लेटोचेच. तथापि इतर काहींचे म्हण असे की – "Apology may reasonably be taken as reproduction by Plato of what Socrates actually said (ग्रोटे); "his version in substance has preserved th actual speech" (टेलर). हे दुसरे मत गृहीत धरले तर ॲपॉलॉजी कर्तृत्व प्लेटोकडे न देता सॉक्रेटीसकडे देणे न्याय्य होईल असे मला वाटते ग्रीक वाङ्मयाच्या इतिहासात 'गिलबर्ट मरे' ने साक्रेटीसला स्थान दि आहे, त्याचे कारण याशिवाय दुसरे कोणते असणार ?

असे प्रश्न पूर्वी आपल्याकडेहि उपस्थित झालेले होते; नाही असे नाही. ‘यस्य वाक्यं स ऋषिः’ असा या बाबतीत वेदांचा निर्णय आहे. वैदिक मंत्रातील वाक्ये मुळात ज्याने उच्चारली असतील तोच ऋषि त्या मंत्राचा कवि अथवा द्रष्टा समजला जातो. परंपरेने त्याचे पठण किंवा संरक्षण करणाराकडे अथवा लिपिकाराकडे ते श्रेय जाऊ शकत नाही. जैन वाङ्मयातील ‘षट्खंडागम’ नामक ग्रंथावरील ‘धवला’ नावाच्या टीकेत या विषयाची थोडीफार प्रत्यक्ष चर्चा आलेली आहे. महावीरांच्या मुखीची वचने श्रवणपरंपरेने धरसेनाचार्यापर्यंत येऊन त्यांनी त्यातील काही भाग भूतबलि व पुष्पदंत यांना शिकविला व या दोघांनी तो सूत्रपाठात रचला. महावीरांच्या वचनांचा हा थोडासा भाग भूतबलि व पुष्पदंत यांच्या द्वारे आलेला असल्यामुळे ‘त दो एयं खंड-सिद्धंतं पडुच्च भूदबलि-पुप्फयंता-दूरियावि कत्तारे उच्चंति’—या खंड सिद्धांताच्या अपेक्षेने भूतबलि आणि पुष्पदंत आचार्य यांना देखील या ‘श्रुत’-ऐकलेल्या ज्ञानाचे कर्ते म्हणून म्हणण्यात येते असे धवला-टीकाकाराने आधी म्हटले; आणि लागलीच ‘तदो मूल-तंत-कत्ता वड्ढमाण भडारओ’ म्हणजे मूळ ग्रंथाचा कर्ता वर्धमान भट्टारक (= महावीर) होय असे स्पष्ट सांगितले आहे. इतकेच नाही तर ‘ग्रंथकर्तृत्वाच्या प्रश्नाचा विचार करण्याचे कारण काय ?’ असा प्रश्न स्वतःच उपस्थित करून त्याने त्याला उत्तर दिले आहे-“शास्त्रस्य प्रामाण्यप्रदर्शनार्थम् ‘वक्तृप्रामाण्याद् वचनप्रामाण्यम्’ इति न्यायात्” (= शास्त्राचे प्रामाण्य दाखविण्यासाठी. कारण वक्त्याच्या प्रामाण्यावरच वचनांचे प्रामाण्य अवलंबून असते) असे उत्तर दिले आहे. (षट्खंडागम. भा. १. पा. ६०-७२; संपादक : डॉ. हिरालाल जैन). यात एखाद्या वचनाला अधिकृतता येते ती वक्त्याच्या प्रामाण्यामुळे, अर्थात्, मूळ वक्ता जो असेल तोच महत्त्वाचा; आणि म्हणून तोच ‘मूळग्रंथकर्ता’ होय हे स्पष्टपणे सूचित केलेले आहे.

## ग्रंथकार कोणाला म्हणावे ?

तेव्हां एखाद्या विषयावरील सुसंगत विवेचन असो किंवा विविध विषयांचे एकत्रित संकलन असो,— ते स्वतः लेखकाने लिहून काढलेले असो

किंवा इतराकडून लिहून घेतलेले असो; अथवा, आपले हे विचार कुणी लिहून काढावे अशी कल्पना देखील नसतांना एखाद्याने उच्चारलेली वाक्ये त्याच्या अपरोक्ष इतरांनी केवळ संस्मरणाने लिहून काढलेली असोत–त्यांना आपण ग्रंथ ही संज्ञा देतो आणि ते विचार व्यक्त करणारी वाक्ये ज्यांनी उच्चारली असतील त्यांनाच आपण ग्रंथकार म्हणतो; संकलनकाराला किंवा अक्षर— लेखकाला ग्रंथकार ही संज्ञा यथार्थतेने आपण लावीत नाही.

## संकलनकार हा ग्रंथकार नव्हे

क्वचित् काही ग्रंथ केवळ संकलनकाराच्या नावावरहि मोडले जातात, नाही असे नाही. पण ते केव्हां ? तर त्या मूळ गद्य-पद्य कृतींचे वास्तव कर्ते हे अनेक किंवा अज्ञात असतात तेव्हां. 'नवनीत' 'भक्तिमार्गप्रदीप' वगैरे ग्रंथात अनेक कवींचे कर्तृत्व अंतर्भूत झालेले आहे हे ठाऊक असूनहि 'गोडबोल्यांचे नवनीत' 'पांगारकरांचा भक्तिमार्गप्रदीप' असे आपण म्हणतो. साने गुरुजींनी व पां. श्रा. गोरे यांनी अनेक स्त्रियांकडून लोकगीते-ओव्या गोळा करून छापल्या. ह्या ओव्या नक्की कुणाच्या हे कुणालाच सांगता येत नाही. म्हणून संग्रहकाराच्याच नावाने स्थूल मानाने त्या पुस्तकांचा उल्लेख होतो. साने गुरुजींचे स्त्रीजीवन, किंवा गोऱ्यांची वऱ्हाडी लोकगीते असे आपण म्हणतो. पण या सर्व ठिकाणी गोडबोले, पांगारकर, साने गुरुजी, गोरे वगैरे लेखक हे 'संग्रहकार' आहेत याची जाणीव आपल्याला असते. या संग्रहाची योजना, निवड, मांडणी वगैरे करण्यास संग्रहकारांचे स्वतंत्र बुद्धि-कौशल्य व्यक्त होते हे खरे; पण म्हणून त्या पुस्तकाचे, म्हणजे त्यांतील मजकुराचे कर्तृत्व आपण त्यांना देत नाही. पण समजा एखाद्या कवीचे ग्रंथकर्तृत्व अनेक पोथ्यातून विखुरलेले असल्यामुळे त्या सर्व पोथ्यातून त्या कवीची सर्व रचना वेचून काढून एखाद्या संपादकाने प्रसिद्ध केली तर त्या ग्रथाचे कर्तृत्व आपण कोणाकडे देऊ ? जुन्या संतकवीविषयी असे अनेकदा होते. उदाः देवनाथांची कविता ही अशीच निरनिराळ्या संग्रहात हस्तलिखित व मुद्रित स्वरूपात होती. काही कविता तर केवळ शिष्यांच्या तोंडी होती. ती सर्व संकलित करून कै. अच्युत सीताराम साठे यांनी छापली. त्यांनी ग्रंथाला 'देवनाथाची कविता' हेच नाव दिले आणि तेच योग्य आहे. याहून

निराळा प्रकार असा की, एखाद्या सत्पुरुषाच्या हयातीत किंवा मृत्युनंतर त्याची वचने शिष्यवर्गाने गोळा केली तर त्या वचनांचे कर्तृत्व त्या सत्पुरुषाकडेच निर्विवादपणे दिले जाते. आख्यायिका आठवणी वगैरे गोळा केल्या तर त्यांच्या अनेककर्तृत्वामुळे तो ग्रंथ संपादकाच्या नावावर मोडणे स्वाभाविक आहे. उदा. बापट यांनी प्रसिद्ध केलेल्या लो. टिळकांच्या आठवणी. पण या आठवणीतून एखाद्या विशिष्ट विषयावरचे लो. टिळकांचे विचार त्यांच्या तोंडून बाहेर पडलेल्या शब्दाप्रमाणे — एखाद्याने प्रसिद्ध केले तर त्या ग्रंथाचे कर्तृत्व कुणाकडे देणे इष्ट ठरेल ? अर्थात् , लो. टिळकांकडे ! — बापटांनी गोळा केलेल्या आठवणीतून — त्या विवक्षित विषयावरील लोकमान्यांचे व्यक्त झालेले विचार अक्षरशः निवडून संकलित करणाराकडे नाही.

ग्रंथकर्तृत्वाच्या बाबतीत विचार करायला लावणारे आणखी एकदोन प्रकार संभवतात. अनेकदा काही लेखक स्वतः ग्रंथरचना करतात पण ती इतरांच्यासाठी. असे म्हणतात की 'रत्नावली' हे नाटक बाणाने लिहिले, पण ते श्रीहर्षाच्या नावावर. याच हर्षाच्या दरबारातील दुसरा एक कवि धावक यानेहि 'नागानंद' नावाचे नाटक आपल्या या आश्रयदात्याचे नाव घालून स्वतः लिहिले. सध्या ही नाटके श्रीहर्षाच्या नावावर मोडतात. अंतर्गत पुरावा तसाच आहे. पण वरील आख्यायिका खऱ्या असतील तर ही दोन्ही नाटके श्रीहर्षाच्या नावाने न ओळखली जाता बाण व धावक यांच्या नावांनी ओळखली गेली पाहिजेत. महानुभाव वाङ्मयात अशा प्रकारचे एक सुंदर उदाहरण आहे. 'वच्छहरण' या नावाचे काव्य दामोदर पंडिताचे म्हणून समजले जाते. मूळ काव्यात 'म्हणे मुनि कशिराजु' असे अनेक उल्लेख आहेत (ओ. ६, ६२, ११३, ३७५; ५०२). अगदी शेवटच्या ओवीत पंडित दामोदराचे नाव आहे. वृद्धाचारातील आख्यायिकेवरून (४) सुद्धा असे कळते की काव्य पंडित दामोदराने लिहिले. पण केवळ सौजन्यामुळे त्याने ते केसोबासाच्या नावाने लिहिले. अर्थात् एका कवीने ते आपल्या मित्राच्या नावावर लिहिले आहे. तेव्हां या काव्याचा खरा कर्ता कोण ? केसोबास की दामोदर पंडित ? दामोदर पंडित हा कर्ता म्हणावा तर मूळ काव्यात सर्वत्र केसोबासांचे नाव आहे. पण बाह्य पुराव्यावरून (व काव्याच्या शेवटच्या ओवीवरून) ते दामोदर पंडितांचे म्हणावे लागते. मूळ कर्ता दामोदर पंडित असून त्याने ते

केसोबासांच्या नावाने लिहिले, हे इतर प्रमाणावरूनहि सिद्ध होऊ शकते. तेव्हां काव्याचा मूळ कर्ता दामोदर पंडितच होय; आणि तसाच तो महानुभाव वाङ्मयात घातला जातो. असाच काहीसा प्रकार 'धवळया' च्या उत्तरार्धा-विषयी झालेला आहे. महदाइसेच्या नावावर असलेल्या धवळ्यांचे दोन भाग आहेत. एक पूर्वार्ध आणि दुसरा उत्तरार्ध. यापैकी पूर्वार्ध भाग महदाइसेने रचला असे म्हणता येते. पण उत्तरार्ध भाग मात्र लक्ष्मीधरभटाच्या मदतीने म्हाइभटाने लिहिला; आणि तो महदाइसेने गाइला. मूळ रचयिता प्रामुख्याने म्हाइभट असल्यामुळे त्याच्याच नावाने (फार तर म्हाइभट व लक्ष्मीधरभट या दोघांच्याहि नावाने) तो भाग ओळखला गेला पाहिजे. पण या बाबतीत श्री. वा. ना. देशपांडे यांनी असा युक्तिवाद केला आहे की 'पण या दोघांनी या आख्यायिकेप्रमाणे ज्याअर्थी महदाइसेसाठीच उत्तरार्ध केला, त्याअर्थी तो तिच्याच नावाने ओळखला जाणे वाजवी आहे.' (आद्य मराठी कवयित्री. प्रस्ता. पा. ११). हा युक्तिवाद मान्य करता येणे शक्य नाही. एखादा ग्रंथ ज्याच्यासाठी लिहिला त्याच्या नावाने ओळखला जाण्यापेक्षा मुळात ज्याने तो लिहिला त्याच्याच नावाने तो ओळखला गेला पाहिजे, हीच गोष्ट न्याय्य आहे.

## चक्रधरांची ग्रंथरचना

प्रस्तुत विषयाचे हे अत्यंत स्थूल दिग्दर्शन केले आहे. त्यावरून एखाद्या लेखनाचे 'ग्रंथकर्तृत्व' कुणाकडे जाते याची कल्पना येईल. तद्-नुरोधाने आपणास श्रीचक्रधरस्वामींच्या ग्रंथकर्तृत्वाचा आता विचार करावयाचा आहे. आरंभी उल्लेखिल्याप्रमाणे चक्रधरांनी 'प्रत्यक्ष' अथवा 'स्वतः' एकहि ग्रंथ लिहिलेला नाही, हे म्हणणे एका दृष्टीने खरे आहे. कारण लौकिक दृष्टीने आपणाला एखादा 'ग्रंथ' लिहायचा आहे असे त्यांच्या मनाने कधीहि घेतले नाही. ग्रंथरचनेची कल्पनाहि त्यांच्या मनाला शिवलेली आढळत नाही. तेव्हां योजनापूर्वक एखाद्या विषयावर त्यांनी 'स्वतः' 'प्रत्यक्ष' लेखन केलेले नाही हे खरेच आहे. ज्ञानदेवांच्या समोर गीतेवर व्याख्यानरूपाने ग्रंथरचना करण्याची इच्छा आणि योजना होती. आणि तदनुसार [ म्हणऊनि मी प्रवर्तो लाहे । ग्रंथी इये' (अ. १-७९)]. ग्रंथरचनेला प्रवृत्त होऊन त्यांनी ती पूर्णहि केली. अशी ग्रंथरचना चक्रधरांनी

खरोखरच केली नाही. जगातील अन्य विचारप्रवर्तक भगवान बुद्ध, महावीर, सॉक्रेटीस वगैरेंनी तरी अशी 'ग्रंथ' रचना कुठे केलेली आहे. पण तरीहि त्यांच्या नावावर लेखनकर्तृत्व आढळतेच की नाही ? चक्रधरांच्या ग्रंथ-कर्तृत्वाचीहि स्थिति तशीच आहे. जे ग्रंथ त्यांच्या नावावर प्रसिद्ध असायला पाहिजेत असे मला वाटते त्यांच्या निर्मितीचा इतिहास प्रथम या ठिकाणी सांगितला पाहिजे. म्हणजे पुढील विवेचन लक्ष्यात येऊ शकेल.

## लीळाचरित्राची रचना

गोविंदप्रभुपासून शक्ति–स्वीकार केल्यानंतर चक्रधरांनी अनेक वर्षे तपश्चर्येत घालविली आणि तदनंतर त्यांनी महाराष्ट्रात अखंड भ्रमण सुरू केले. या भ्रमणात ते आपल्या विशिष्ट तत्त्वज्ञानाचा व आचारधर्माचा उपदेश जनतेला करीत असत. त्यांच्या आयुष्यातील एकांक काळाच्या शेवटी शेवटी त्यांना अनुयायी मिळू लागले. तेथून तो त्यांच्या प्रयाणकाळापर्यंत साधारणपणे आठ वर्षांचा अवधि आहे. या काळातच त्यांनी आपला उपदेश आपल्याकडे आलेल्या जिज्ञासूंना प्रसंगोपात्त सांगितला. त्यांच्या प्रयाणानंतर नागदेवादि त्यांचे शिष्य रितपुर येथे गोविंदप्रभूजवळ सेवेसाठी आले. तेथे असतांना नागदेवाचार्य निरंतर कशाचे तरी स्मरण करीत असलेले पाहून एकदा म्हाइभटाने विचारले की, "तुम्ही निरंतर कशाचे मनन करीत असता ?" नागदेवाचार्य म्हणाले, "सर्वज्ञे मज हीवरळीयहूनि ऋद्धिपूरा पाठविले तै माते सर्वज्ञे भणितले : वानरेया येथौनि निरोपीले वीचार शास्त्र : अर्थ ज्ञान : त्याचे श्रवण मनन नीदीध्यासन करावा : तेही एक स्मरणचि की गा : ।।१।। एथीची चरीत्रे आठवीजेति : आईकीजेति : उच्चारीजेति : तेही एक स्मरणचि की गा : ।।१।। " आणि म्हणून नागदेव त्यांच्या सर्व लीळा आठवीत असत. त्यांच्या समोर घडलेल्या लीळा तर त्यांना माहीतच होत्या. त्यांच्या अनुसरणापूर्वी बाइसांच्या समोर घडलेल्या लीळा त्यांनी बाइसांना विचारल्या होत्या. अळज-पुराहून निघाल्यापासून तो बाइसांची भेट होईपर्यंतच्या लीळा खुद्द श्रीचक्र-धरस्वामींनी 'प्रसंगे भक्ताप्रती सांघीतलीया' होत्या, त्याहि नागदेवाचार्यांनी ऐकल्या होत्या. चक्रधरांनी प्रसंगोपात्त आपल्या भक्तांना द्वारवतीकार चक्र-पाणी, श्रीदत्तात्रेयप्रभु, आणि श्रीप्रभु म्हणजे गोविंदप्रभु यांच्या लीळा

सांगितल्या होत्या. त्याहि नागदेवांनी माहीत करून घेतल्या होत्या. या लीळांचे मनन नागदेवाचार्य करीत असत. या लीळाप्रमाणेच 'सर्वज्ञे जे नीरोपीले परावर नीरूपण' त्याचेहि नागदेवाचार्य निरंतर मनन करीत. हे ऐकून म्हाइभटांनी सूचना केली.की, संप्रदायातील लोकांच्या उपयोगासाठी या सर्व लीळा " तुम्ही सांगा आन लिहीन. " नागदेवांना ही सूचना पसंत पडली. तदनंतर त्यांनी लेखनकार्य सुरू केले. 'भट महीभट वाजेश्वरी वीजन करति : एक प्रहर लेखन करति' 'उरलेनि काळे श्रीप्रभुचे सेवादास्य करति : ऐसे अवघे भटोबासी लीळाकथन केले : ते महीभटी सा मासा लिहिले:' आपण स्वतः व बाइसा अनुसरण्यापूर्वीच्या लीळा स्वामींनी ज्यांना सांगितल्या होत्या त्यांच्याकडे जाऊन त्या लीळा त्यांना पुन्हा विचारण्याची आज्ञा नागदेवांनी म्हाइभटांना केली. त्याप्रमाणे म्हाइभट त्या त्या भक्ताच्या गावी गेले व लीळांचे त्यांनी संशोधन केले. 'ऐसे भटां अवीद्यमान आन बाइसा अवीद्यमान जीया लीळा तिया महीभटी जेथ जेथ सर्वज्ञे बीजे केले होते तेथ तेथ जावौनी पूसौनी लिहिलीया :' म्हाइभटांनी त्या नागदेवाचार्यांना दाखविल्या. नागदेवाचार्यांनी 'हे सर्वज्ञाचे श्रीमुख शब्द होति : हे नव्हेति :' असे सांगितल्यावर 'जे श्रीमुखीचे नव्हे ते मोडीले.' लिहिलेल्या लीळांचे पूर्वार्ध आणि उत्तरार्ध असे दोन विभाग केले. अशा रीतीने लीळाचरित्र हा ग्रंथ तयार झाला. या लीळा--चरित्र ग्रंथांचे कर्तृत्व कोणाकडे द्यावयाचे हा एक स्वतंत्र प्रश्न आपल्यासमोर उभा राहतो. पण त्याचे विवेचन येथे करण्याची आवश्यकता नाही.

## सूत्रपाठ : दृष्टांतपाठ

कालांतराने गोविंदप्रभूच्या मृत्यूनंतर नागदेवाचार्य निंबा या गावी येऊन राहिले. तेथे त्यांना अनेक शिष्य मिळाले. त्यामध्येच केसोबास नावाचे एक संस्कृत पंडित होते. या केसोबासांनी लीळाचरित्र ग्रंथातून चक्रधरांच्या मुखीची विचारआचारपर सूत्रे वेगळी निवडून काढली; आणि नागदेवा-चार्यांच्या विचाराने अकरा प्रकरणात त्यांचा व्यवस्थित अनुक्रम लावून 'सूत्रपाठ' तयार केला. चक्रधरांनी प्रसंगोपात्त आपल्या तत्त्वज्ञानाच्या स्पष्टीकरणासाठी निरनिराळे दृष्टांत सांगितलेले होते, ते 'दृष्टांत' हि केसो-

व्यासांनी वेगळे काढले. सूत्रपाठाचे हे बारावे प्रकरण समजण्यात येते. प्रत्येक दृष्टांताचे मुख्य सूत्र, त्यावरील दृष्टांत व त्या दृष्टांतातील अर्थ व्यक्त करून दाखविणारे स्वतःचे दार्ष्टांतिक मिळून केसोबासांच्या नावावर असलेला आजचा दृष्टांतपाठ हा ग्रंथ तयार झालेला आहे. आता प्रश्न असा की सूत्रपाठ आणि दृष्टांत या ग्रंथांचे कर्तृत्व कोणाकडे द्यावयाचे ? चक्रधराकडे की केसोबासाकडे ? बहुतेकांनी ते केसोबासाकडे दिले आहे. माझ्या मते ते चक्रधराकडे दिले पाहिजे.

## हे ग्रंथ कोणाचे ?

सूत्रपाठातील सूत्रे व दृष्टांत 'चक्रधरांनी सांगितलेले' आहेत; ते 'श्रीमुखीचे शब्द' आहेत, याबद्दल कुणाचेच दुमत नाही. तेव्हां त्यांचे कर्तृत्व चक्रधराकडेच जावयास पाहिजे हे निर्विवाद आहे. पण असे असूनहि 'केशवराजबासांचा' 'लक्षणान्वय-सूत्रपाठ' 'आपण प्रसिद्ध करीत आहोत' असे नेनेभवाळकरांनी म्हटले आहे. पुस्तकाचे नाव 'श्रीचक्रधर सिद्धांत सूत्रे (ज्ञानेश्वरपूर्वकालीन मराठी गद्य ग्रंथ)' आणि त्यातील प्रत्येक वाक्य 'चक्रधराचे' असे असूनहि ग्रंथकार म्हणून मान मात्र 'केशव-राजबासां' ना, हा मला वदतोव्याघात वाटतो. पूर्वीच्या संशोधकांनीहि असेच म्हटलेले आहे. कै. भावे यांनी 'श्रीचक्रधरांनी प्रत्यक्ष रचलेला असा एकहि ग्रंथ नाही. पण त्यांची आचार्य-सूत्रे आहेत. ज्यात ही ग्रथित केली आहेत त्या ग्रंथाला सिद्धांतसूत्रपाठ असे म्हणतात' (म. सा. भा. १. पा. ८२) असे एके ठिकाणी म्हटल्यावर पुढे केसोबास (केशवराजसूरी) यांची माहिती देतांना 'यांच्या सर्व ग्रंथात' 'सिद्धांतसूत्र-पाठ' 'हा अतिशय प्रसिद्ध आहे' (म. सा. भा. १. पा. १०५) असे म्हटले आहे. म्हणजे सूत्रपाठाचे कर्तृत्व त्यांनी चक्रधराकडे न देता केसोबास यांच्याकडेच दिले आहे. श्री. य. खु देशपांडे यांनीहि 'केशवव्यास ऊर्फ केशवराज सूरी यांचाहि "सिद्धांत सूत्रपाठ" **विशेष प्रसिद्ध आहे**' (म. म. वा. पा. २६) असेच म्हटले आहे. पांगारकर यांनी सिद्धान्तसूत्रपाठाचे कर्तृत्व केशवराजसूरीकडे तर दिले आहेच पण शिवाय वर-" त्यात केशवसूरीचे स्वतःचे असे काही नाही' तरी मोठ्या मनुष्याच्या 'उक्तींचा संग्रह' करणे हे कामहि कमी चातुर्याचे आहे असे

नाही-" ( म. वा. इ. खं. १. पा. ४५५ ) असे समर्थन केले आहे. 'दृष्टान्त' च्या बाबतींतहि प्रकार हाच आढळतो. श्री. भावे व डॉ. य. खु. देशपांडे ह्या दोघांना तर हे दृष्टान्त केसोबासानेच दिलेले आहेत असे वाटते. "ह्या सूत्रांवर त्यांचे स्पष्टीकरणार्थ ११४ दृष्टान्त केशवराजसूरीने सांगितले आहेत. ज्यात हे दृष्टान्त दिले आहेत त्या ग्रंथाला दृष्टान्तिक असे म्हणतात." असे भावे यांचे म्हणणे आहे ( म. सा भा. १. पा. १०५ ). श्री. य. खु. देशपांडेहि, "यांनी ( केसोबासांनी ) प्रथम सूत्रे लिहून त्यानंतर त्यावर ११४ दृष्टान्त सांगितले आहेत, त्यास दृष्टान्तिक म्हणतात." ( म. म. वा. पा. २६ ) अशीच माहिती देतात. ही माहिती चुकीची आहे; कारण दृष्टान्त केसोबासांनी सांगितलेले नसून चक्रधरांनी निरूपण केले आहेत. पण, ते "चक्रधर-निरूपित" आहेत याची जाणीव असूनहि केसोबासांनी ते निवडून काढलेले असल्यामुळे नेनेभवाळकरहि ह्या ग्रंथाचे कर्तृत्व केसोबासालाच देतात असे दिसते. याचमुळे केसोबासांना ते 'प्राचीन मराठी गद्यरचनेचे प्रथमाचार्य' म्हणतात. तेव्हां मुख्य प्रश्न असा की, सूत्रपाठ व दृष्टान्त हे ग्रंथ कोणाचे म्हणायचे ? चक्रधरांचे की केसोबासाचे ?

## कर्तृत्व चक्रधराकडे दिले पाहिजे

त्यांचे कर्तृत्व चक्रधराकडे दिले पाहिजे असे माझे मत मी आधीच सांगितले आहे. सूत्रपाठाच्या निर्मितीत केसोबासांचा हात ती सूत्रे निवडून अन्वयी लावण्यापुरताच होता. तसे पाहिले तर सूत्रपाठातील ११ पैकी ९ प्रकरणे चक्रधरांनी निरनिराळ्या वेळी स्वतःच पूर्णपणे निरूपण केलेली होती. म्हणजे असे की, ह्या प्रत्येक प्रकरणातील सूत्रे एकत्रित करून त्यांचे केसोबासांनी 'एकेक' प्रकरण तयार केले असे नाही. निरूपण करतांना चक्रधरांनी एकेका वेळी एकेक प्रकरण स्वतःच संपूर्ण सांगितले होते. त्यामुळे ती अन्वयी लावण्याचेहि श्रम केसोबासांना पडले नाहीत. फक्त या प्रकरणांचा क्रम काय तो त्यांनी ठरविला; आणि तोहि नागदेवाचार्यांच्या विचाराने. दृष्टांत तर सर्वस्वी चक्रधरांचे आहेत. ते निवडून केसोबासांनी वेगळे लिहिले एवढेच. या निवडून वेगळे लिहिण्याबद्दल व त्यांचा अनुक्रम लावण्याबद्दल केसोबासांचे आपण ऋणी आहोत हे मान्य; पण त्यामुळे त्या ग्रंथाचे कर्तृत्व त्यांच्याकडे

कसे जाईल ? मूळ सूत्रे ज्यांनी उच्चारली आणि दृष्टान्त ज्यांनी निरूपण केले त्यांच्याकडेच त्यांचे कर्तृत्व गेले पाहिजे हे उघड नाही काय ? संजयाने सांगितलेल्या आणि व्यासाने ग्रथित केलेल्या पण भगवान् श्रीकृष्णांनी निरूपिलेल्या भगवद्गीतेचे कर्तृत्व ज्याप्रमाणे श्रीकृष्णाचे त्याप्रमाणे नागदेवाचार्यांनी सांगितलेल्या व म्हाइभटाने लेखक म्हणून लिहून काढलेल्या लीळाचरित्रातून केसोबासाने निवडलेल्या पण प्रत्यक्ष चक्रधराने निरूपिलेल्या सूत्रांचे व दृष्टान्तांचे कर्तृत्वहि चक्रधराचेच होय. वाङ्मयेतिहासाच्या ग्रंथात ते तसे त्यांच्याच नावावर नमूद व्हायला पाहिजे. सूत्रपाठ आणि दृष्टांत यांच्या प्रमाणेच 'श्रीकृष्ण-चरित्र' व 'श्रीदत्तात्रेय-चरित्र' हे ग्रंथहि चक्रधरांचेच होत. लीळाचरित्राच्या निर्मितीचा इतिहास नीट लक्ष्यात आणला तर असे दिसून येईल की चक्रधरांनी प्रसंगोपात्त श्रीकृष्ण, श्रीदत्तात्रेय, श्रीचक्रपाणी व श्रीप्रभु यांच्या ज्या ज्या लीळा भक्तांना सांगितल्या होत्या त्यांचेहि नागदेवाचार्य स्मरण व मनन करीत असत. चक्रधरस्वामींच्या लीळाबरोबरच या अवतारांच्या लीळाहि नागदेवांनी सांगितल्या व म्हाइभटाने लिहून घेतल्या. चक्रधरांनी सांगितलेल्या लीळांपैकी चक्रपाणी व गोविंदप्रभु यांच्याविषयीच्या लीळा 'लीळाचरित्रातच' विखुरलेल्या आहेत. पण श्रीकृष्ण व श्रीदत्तात्रेय यांच्या अनुक्रमे ४६ व ४७ लीळा मात्र स्वतंत्रपणे लिहिलेल्या असून त्यांनाच श्रीकृष्णचरित्र व श्रीदत्तात्रेयचरित्र अशी नावे आहेत. चक्रधरांनी ज्या शब्दात या लीळा भक्तांना सांगितल्या त्याच शब्दात नागदेवांनी त्या म्हाइभटाला सांगितल्या व त्याने त्या लिहून घेतल्या. असे असल्यामुळे या दोन्ही चरित्रग्रंथांचे कर्तृत्व चक्रधरांनाच दिले पाहिजे. याप्रमाणेच लीळाचरित्रातील एकांक भागाचेहि कर्तृत्व चक्रधराचे ठरते. चक्रधरांच्या आयुष्यातील एकांक भाग म्हणजे गुजराथेतील भरवसचा वृत्तांत व तेथून अळजपूरच्या मार्गाने रिद्धपूरला आल्यापासून तो प्रतिष्ठान येथे बाइसाची भेट होईपर्यंतचा काल. या कालात आपल्या आयुष्यासंबंधीच्या लीळा खुद्द चक्रधरांनीच भक्तांना सांगितल्या होत्या. त्याच नागदेवांनी म्हाइभटाला सांगितल्या व त्याने त्या लिहिल्या. अर्थात् याहि लीळांचे कर्तृत्व चक्रधरांचेच ठरते. या सर्व ग्रंथांचा मूळ मजकूर चक्रधरांनी निवेदन केलेला आहे आणि म्हणून त्यांचे कर्तृत्व चक्रधराकडे दिले पाहिजे.

आरंभी ग्रंथलेखनाचे जे निरनिराळे प्रकार निवेदन केले त्यावरून सूत्रपाठ, दृष्टांत, श्रीकृष्णचरित्र, श्रीदत्तात्रेयचरित्र व लीळाचरित्र–एकांक भाग या ग्रंथांचे कर्तृत्व चक्रधरांना का दिले पाहिजे हे लक्ष्यात येईल. त्यांच्या तत्त्वज्ञानाच्या दृष्टीने सूत्रपाठ व दृष्टांत हेच दोन ग्रंथ विशेष महत्त्वाचे आहेत. त्यात अंतर्भूत झालेल्या त्यांच्या तत्त्वज्ञानाची आधी ओळख करून घेऊ.

## १२

# चक्रधरस्वामींचे तत्त्वज्ञान

### चार मुख्य पदार्थ

श्रीचक्रधरस्वामींच्या तत्त्वज्ञानाचे रहस्य समजण्यासाठी त्यांनी गृहीत धरलेले मुख्य पदार्थ आधी लक्ष्यात घेतले पाहिजेत. उदाः-श्रीशंकराचार्यांनी सर्व सृष्टीत एकच 'पदार्थ' असल्याचे मानले आहे. तो पदार्थ म्हणजे 'ब्रह्म' होय. हे एकदा नीट कळले म्हणजे त्यांच्या केवलाद्वैताचा सिद्धांत आत्मसात करणे सोपे जाते चक्रधरस्वामींनी असे मुख्य पदार्थ चार मानलेले आहेत. जीव, देवता, प्रपंच आणि परमेश्वर हे ते चार पदार्थ होत. हे चारहि पदार्थ स्वतंत्र असून अनादि व अनंत आहेत. मुळापासूनच ते एकमेकापासून वेगळे असून शेवटपर्यंत ते तसेच राहणार. अर्थात, सर्वात किंवा त्यातील कोणत्याहि दोहोत ऐक्य होणे कधीच शक्य नाही. या दृष्टीने चक्रधरस्वामी हे पूर्ण द्वैती होते असे दिसून येईल.

मूळ पदार्थ म्हणून उल्लेखिलेल्या वरील चारापैकी प्रत्येक पदार्थ जातित्वाने एक असला तरी वस्तुतः त्यात अनेकांचा अंतर्भाव होतो. उदा. 'ईश्वर' एकच असला तरी ब्रह्माचाहि अंतर्भाव त्यातच होतो. ब्रह्म आणि ईश्वर या दोहोंनाहि स्थूल मानाने ईश्वर हे एकच नाव आहे 'प्रपंच' हा एक पदार्थ असला तरी त्यात पंचभूते आणि तीन गुण यांचा समावेश होतो. या आठांना मिळून प्रपंच असे संबोधतात. 'जीव' तर मुळापासूनच अनंत आहेत. पण वर्ग म्हणून तो एकच पदार्थ मानला जातो. 'देवता' नामक पदार्थात ८१ कोटी १। लक्ष १० देवता मोडतात. या सर्वांचा मिळून देवता हा एक पदार्थ होय. हे सर्व पदार्थ मुळात अव्यक्त आहेत. पण त्यांची ही अव्यक्त

स्वरूपे भावात्मक होत; अभावात्मक नव्हेत. ती सर्व भावरूप असल्यामुळेच त्यांचे अस्तित्व कल्पिता येते.

## देवताथोवे : संख्या : स्वरूप-मर्यादा.

प्रत्येक ब्रह्मांडात एकूण ८१ कोटी ११ लक्ष १० देवता आहेत. त्यांचे एकंदर ९ समूह ऊर्फ थोवे असून, थोवेपरत्वे देवतांची संख्या व त्यांची स्वरूपमर्यादा पुढीलप्रमाणे आहे. (१) **कर्मभूमीच्या** देवता : संख्या १३ कोटी. प्रत्येक देवतेची स्वरूपमर्यादा ५०० योजने; (२) **अष्टौदेवयोनी:** संख्या १३ कोटी, स्वरूपमर्यादा ५००० योजने; (३) **अंतराळ** : संख्या १३ कोटी, स्व. म. ५० हजार योजने; (४) **स्वर्ग** : ३३ कोटी देवता, स्व. म. ५ लक्ष योजने; (५) **सत्य-कैलास-वैकुंठ** : संख्या ९ कोटी, स्व. म. ५० लक्ष योजने; (६) **क्षीराब्धी** : संख्या ११ लक्ष, स्व. म. ५ कोटी योजने; (७) **अष्टभैरव** : संख्या ८, स्व. म. ५० कोटी योजने, (८) **विश्व** : संख्या १, स्व. म. ५०० कोटी योजने; (९) **माया** : संख्या १, स्वरूपमर्यादा अगणित.

या सर्व थोव्यात उंचनीच क्रम आहे. सर्वात खालचा थोवा कर्मभूमीच्या देवतांचा असून सर्वात उंच थोवा मायेचा आहे. हाच उंचनीचपणा प्रत्येक थोव्यातील देवतात आहे. तथापि, सत्य-कैलास-वैकुंठीच्या थोव्यातील ब्रह्मा, हर आणि हरी या देवता समान आहेत. त्यांच्यात उंचनीचपणा नाही. तसेच अष्टभैरव हेही सर्व बाबतीत समान आहेत. त्यांच्यात श्रेष्ठकनिष्ठपणा नाही.

## देवता-स्वरूपीची समृद्धी

अनादिकालापासून ही सर्व देवतास्वरूपे भावरूप पण अव्यक्त असून ज्ञान, सुख, सामर्थ्य, ऐश्वर्य व प्रकाश या पंचप्रकारांनी युक्त आहेत. खालील देवतेच्या स्वरूपापेक्षा वरील देवतेचे स्वरूप ८ पटींनी धोष्ठर म्हणजे जाड आहे. तसेच, खालील देवतास्वरूपात असलेल्या ज्ञानसुख-सामर्थ्यादि पंचप्रकारापेक्षा वरील देवतास्वरूपातील पंचप्रकार १० पटींनी अधिक आहेत. ही सर्व देवतास्वरूपे व्याप्यव्याप्यकभावाने आपल्या सामर्थ्याधारे स्थित आहेत. अर्थात्, खालील देवतास्वरूपाला वरील देवतास्वरूप

व्यापून असते. या दृष्टीने पहाता माया ही सर्वांना व्यापून असल्याचे दिसून येईल. खालील देवतास्वरूप वरील देवतास्वरूपाला पाहू शकत नाही. पण वरील देवतास्वरूप मात्र आपल्या खालील सर्व देवतास्वरूपे पाहू शकते. तथापि या सर्व देवताना ईश्वराचे अस्तित्वज्ञान असते. इतकेच नाही तर त्याची प्रवृत्ती त्याने जाणविल्यास ती जाणण्यासाठी त्या उत्सुकतेने सदैव वाट पाहात असतात.

## ब्रह्मांडस्था : पिंडस्था : त्यांचे कार्य

देवतांची ही स्वरूपे नित्यबद्ध आहेत; म्हणजे त्यात त्यांच्या ठराविक मर्यादेपेक्षा अधिक काहीहि होणे शक्य नाही. अधीनत्व, अज्ञान व अविद्या या बंधनांनी ती स्वरूपे कायमची बांधलेली आहेत. त्यातून ती मोकळी होणे अशक्य आहे. हेच त्यांचे वास्तविक नित्यबध्दत्व होय. अर्थात्, देवता मुक्तीला पात्र नाहीत हे ओघानेच आले. तथापि, त्यांच्या ठिकाणी ‘ होण्याचा ’ व ‘ उरण्या’ चा भाव मात्र आहे. ‘ होण्या’ च्या भावामुळे त्यांच्या अव्यक्त स्वरूपातून त्या ब्रह्मांडस्थांच्या रूपाने व ब्रह्मांडस्थापासून विग्रह, पिंडस्था वगैरेंच्या रूपाने त्या विभागू शकतात. तरीहि मूळ स्वरूपात उरण्याच्या भावाने त्या उरलेल्याच असतात. सृष्टिरचनेच्या वेळी सृष्टीचा व्यापार चालविण्यासाठी सर्व देवता आपल्या अव्यक्त स्वरूपातील होण्याच्या भावातून ब्रह्मांडस्थांच्या रूपाने विभागतात. सर्व ब्रह्मांडव्यवस्था त्याच चालवतात. या ब्रह्मांडस्थापासून विभागून जे देवतावतार होतात, त्यांना विग्रह असे म्हणतात. ब्रह्मांडस्थापासूनच पिंडस्थाहि विभागतात. त्यांचे अधिष्ठान शरीरधारी जीवाच्या देहात असते. सर्व देवतांच्या पिंडस्थांनी युक्त असलेला देह हाच धर्मकर्माचरणाला ‘ युक्त ’ असू शकतो. असा ‘ युक्त ’ मनुष्यदेहच मोक्षाधिकारी होतो.

देवतांचे मुख्य कार्य, सृष्टीतील जीवांना त्यांच्या कर्मांची सुखदुःखात्मक फळे देणे, हे होय. अर्थात्, ईश्वरविषयक कर्माची फळे मात्र त्या देऊ शकत नाहीत. ती ईश्वरापासूनच जीवाला मिळतात. ईश्वरविषयक कर्माव्यतिरिक्त इतर सर्व कर्माबद्दल देवता जे सुख भोगवितात ते निर्भेळ नसते; तर सुखदुःखात्मक असते. त्यातहि देवता आधी दुःख भोगवतात आणि मग सुख भोगवतात. या दृष्टीने जीवमात्राकडून जी कर्मे होतात त्यांचे सामान्यतः

दोन प्रमुख विभाग आहेत. एक ईश्वरविषयक कर्मांचा; यालाच 'दैवरहाटी' म्हणून संबोधतात. दुसरा, ईश्वराव्यतिरिक्त इतर सर्व कर्मांचा. अशा सर्व कर्मांची फळे देवताकडूनच दिली जातात, म्हणून ती देवताविषयक कर्मे होत. याला 'कर्मरहाटी' असे नाव आहे. जीव या सृष्टीत आल्यानंतर एकतर कर्मरहाटीचा अनुयायी असतो किंवा दैवरहाटीचा असतो. या दोन्ही रहाटीतील जीवाचे कर्तृत्व पाहण्यापूर्वी आधी त्याचे मूळ स्वरूप लक्ष्यात घेऊ या.

## जीवस्वरूप

अनादि आणि नित्य असलेले जीव अनेक आहेत. मायास्वरूपाचा 'तम' या नावाचा एक विभाग आहे. त्यात अनादिकाळापासून ते पडलेले होते. जीवस्वरूप भावरूप पण अव्यक्त आहे. विशेष हे की अनादिकाला-पासून ते अविद्येने युक्त आहे. या अविद्येच्या आश्रयानेच त्याच्या ठिकाणी अज्ञान, अन्यथाज्ञान, जीवत्व व आदिमळ राहतात. या सर्वांना मिळून 'पाचपिशी' असे म्हणतात. या पाचपिशीप्रमाणेच जीवस्वरूपी विकार, विकल्प व स्वभाव हे तीन दोष असून त्यांनाहि मूळ आधार अविद्याच होय. याशिवाय अधमति, अधगति आणि अधरति म्हणून संबोधले जाणारे मतित्रयहि जीवस्वरूपी आहे. या मतित्रयामुळे जीवाचा एकसारखा अधःपात होत असतो. तथापि, हे अधोगामी मतित्रय जर ऊर्ध्व केले तर जीवाचा उद्धारहि होऊ शकतो.

जीवस्वरूप मूलतः स्फटिकशुभ्र आहे. पण अविद्येच्या युक्तत्वामुळे ते किंचित् काळसर झाले आहे. जीवस्वरूप अविद्यायुक्त असले तरी ते 'केवळ' होय. ते अविद्येपासून वेगळे झाले म्हणजे 'कैवल्य' होते. जीवाच्या ठिकाणी वर उल्लेखिलेले जसे काही दोष आहेत तसे काही गुणहि आहेत. एखादी बरीवाईट गोष्ट संपादन करण्याचे 'अर्जकत्व' त्याच्या ठिकाणी आहे. तसेच संतासंत कर्म अर्जन करण्यासाठी लागणारे 'सर्वाधिकारित्व'हि आहे. त्यामुळे कोणतीहि चांगली किंवा वाईट गोष्ट करण्याची पात्रता त्याच्या ठिकाणी निर्माण होते. त्याला जिथे ठेवाल तिथे तो राहतो. ही 'सकळाशी मिळिजे शक्ति' त्याच्या ठिकाणी आहे. पण तो एकदेशी असल्यामुळे एका वेळी एकाच ठिकाणी राहू शकतो. देवतांच्या ठिकाणी जसा होण्याचा व उरण्याचा

भाव आहे, तसा जीवाच्या ठिकाणी नाही. तो एकदेशी आहे म्हणून त्याला एकाच वेळी सुखाचा व दुःखाचा अनुभव घेता येत नाही; किंवा एकाच वेळी दोन वेगवेगळ्या प्रापंचिक शरीरात तो राहू शकत नाही.

एवंगुणविशिष्ट जीव पूर्णपणे निष्क्रिय आणि म्हणून परतंत्र असतो. सृष्टिरचनेपूर्वी मायास्वरूपातील तमोभागात तो जडभरताप्रमाणे पडून होता. त्याला क्रियाशील बनविण्यासाठी सृष्टिरचनेच्या वेळी परमेश्वरप्रवृत्तीमुळे मायेने आपल्या स्वरूपाचा एक अंश ( चैतन्यांश ) त्याला सोबत म्हणून दिला. जीवाला मुक्ति मिळेपर्यंत हा त्याच्याबरोबर लागलेला असतो. म्हणून त्याला 'संलग्न' असे म्हणतात. जीवाने उल्लेखिलेल्या सर्व कर्मांचे त्याला चेष्टकत्व करणे हे त्याचे मुख्य कार्य होय. जीव अनेक संतासंत कर्मे करण्याचे उल्लेख करितो. पण त्याला त्याचे स्मरण रहात नाही. संलग्न त्याला उल्लेखांचे स्मरण करून देतो. इतकेच नाही तर त्याच्याकडून ही कर्मे करवून घेतो. अर्थात्, या बाबतीत जीव संलग्नाच्या अधीन म्हणजे परतंत्र असतो. परंतु संलग्नाचे हे चेष्टकत्व व पारतंत्र्य जीवाकडून होणाऱ्या कर्मरहाटीच्या क्रियांच्याच बाबतीत तेवढे असते. दैवरहाटीतील क्रिया करतांना जीव पूर्णपणे स्वतंत्र असतो.

कर्मरहाटीतील प्रत्येक क्रिया जीव जरी संलग्नाच्या चेष्टकत्वाने करीत असला तरी त्या क्रियेचे वास्तविक कर्तृत्व मात्र फक्त जीवाचेच असते. कारण क्रियेचा प्रथमोल्लेख होतो तो जीवाकडून; आणि पुढे प्रत्यक्ष कार्य होते तेहि जीवाकडूनच. कर्तृत्व जीवाचे असल्यामुळे त्याचे पापपुण्य तेहि फक्त जीवालाच. त्याबद्दल सुखदुःखाचा खरा भोग जीवालाच भोगावा लागतो. संलग्नालाहि जीवाबरोबर सुखदुःख होते; पण ते केवळ मानलेपणाचे. अग्नीने व्याप्त असलेल्या लोखंडावर घणाचे घाव घातले गेले तर ताडनाचे घाव लोखंडावर बसतात, अग्नीवर नाहीत. तद्वत् संलग्न जीवाला व्यापून असला तरी सुखदुःखभोग कर्तृत्वाधिकारी व लेपाधिकारी जीवाला होतो, संलग्नाला नाही.

देवतांच्या स्वरूपी जसे सुख म्हणजे आनंद असतो, तसा आनंद जीवस्वरूपी नसतो. तो 'निरानंद' आहे. तथापि, आपल्या ठिकाणच्या सर्वाधिकारित्वामुळे तो इतरांच्या आनंदाला पात्र होऊ शकतो. नित्यबद्ध

देवतांच्या ठिकाणी तो धर्म नाही. त्या इतरांचा आनंद उपभोगू शकत नाहीत. जीव उपभोगू शकतो. कारण देवताप्रमाणे जीव नित्यबद्ध नाही, तो 'बद्ध–मुक्त' आहे. म्हणजे जीवस्वरूप अनादिकालापासून अविद्येने 'बद्ध' असले तरी ते त्यापासून 'मुक्त' होऊ शकते व ईश्वराचा आनंद उपभोगू शकते. हा जीवस्वरूपाचा सर्वांत महत्त्वाचा विषय होय. तथापि, अविद्यायुक्त स्थितीत ईश्वराचा आनंद त्याला मिळणार कसा ? त्यासाठी त्याची अविद्या नाहीशी झाली पाहिजे. जीवस्वरूपीची ही अनादि–अविद्या एक परमेश्वरच नासू शकतो. अर्थात्, त्यासाठी जीवाने परमेश्वराला प्रसन्न करून घेतले पाहिजे, हे ओघाने आलेच.

## ईश्वर–स्वरूप

जीवदेवताप्रपंचाप्रमाणे ईश्वर हीहि एक अनादिनित्य वस्तु असल्याचे आपण प्रारंभी पाहिले आहेच. देवताचक्राची स्वामिनी जी माया तिचे अव्यक्त स्वरूप मानवी दृष्टीने अगणित खरे, पण वस्तुतः ते मर्यादित आहे. कारण त्याच्या पलीकडे ब्रह्मस्वरूप आणि या ब्रह्मस्वरूपापलीकडे ईश्वरस्वरूप आहे. सर्व देवता, मायास्वरूपातील तमोभागात असलेले अनेक जीव, आणि भैरवस्वरूपाधारे असलेला प्रपंच, याला 'अवर' विभाग म्हणतात; तर मायेच्या पलीकडे असलेला 'पर' विभाग होय. ईश्वर आणि ब्रह्म यांचा त्यात अंतर्भाव होतो. स्थूल मानाने ईश्वर आणि ब्रह्म मिळून एकच ईश्वरविभाग होय. पोट आणि पाठ हे जसे एकाच माणसाचे दोन भाग असतात, त्याचप्रमाणे ईश्वर आणि ब्रह्म हे एकाच ईश्वराचे भाग होत. ईश्वरस्वरूप हे पोटाप्रमाणे तर ब्रह्मस्वरूप हे पाठीप्रमाणे आहे.

## ईश्वर व ब्रह्मस्वरूप यांचे भिन्नत्व

तथापि, सूक्ष्म दृष्टीने विचार केला असता ईश्वरस्वरूप व ब्रह्मस्वरूप ही भिन्न होत. ब्रह्मस्वरूपाच्या पलीकडे त्या ब्रह्मस्वरूपाला व्यापून ईश्वरस्वरूप आहे. अर्थात् ब्रह्मस्वरूप हे मर्यादित आहे, तसे ईश्वरस्वरूप नाही. ते यथार्थतः अनंत म्हणजे अमर्याद आहे. ईश्वरस्वरूप अनादि, नित्य, अव्यक्त, स्वयंप्रकाश, सर्वव्यापक, सर्वात्मक, सर्वातीत, केवळ, ज्ञानमय, आनंदमय,

नित्यमुक्त, शुद्ध, अच्युत, अविक्रिय असून ते सर्वसाक्षी, सर्वकर्ते व निर-भिमानी आहे. सर्वकर्तृत्वादि काही गुण सोडले तर हे सर्व काही ब्रह्मस्वरू-पाच्या ठिकाणी आहेच. पण ईश्वरस्वरूपाचा विशेष हा की त्याच्या ठिकाणी विरुद्धधर्मित्व आहे. म्हणूनच ते अविक्रिय असूनहि सर्वकर्ते आहे, निर्गुण असूनहि मायासंबंधाने सगुण होते. ब्रह्मस्वरूपाचे तसे नाही. ते यथार्थतः अविक्रिय-निर्गुण आणि सर्वधर्मशून्य आहे. ईश्वरस्वरूपात असणाऱ्या गुणधर्मांचे दोन प्रकार कल्पिता येतील; एक स्वरूपांग गुणधर्म तर दुसरा शक्तिरूप गुणधर्म. स्वरूपांग गुणधर्म हे मूळ स्वरूपीच काय ते असतात. ते इतरांना देता येत नाहीत. पण शक्तिस्वरूप गुणधर्म इतरांना देताहि येतात व घेताहि येतात. ईश्वर आणि ब्रह्मस्वरूप यात महत्वाचा फरक असा की, ईश्वरस्वरूपी जसे स्वरूपांग आणि शक्तिरूप दोन्ही प्रकारचे गुणधर्म आहेत; तसे ब्रह्मस्वरूपी नाहीत. ब्रह्मस्वरूपी फक्त स्वरूपांग गुणधर्म आहेत; शक्तिरूप गुणधर्म नाहीत. याच अर्थाने ब्रह्मस्वरूप गुणधर्मरहित म्हटलेले आहे. शक्तिस्वरूप गुणधर्मांखेरीज ईश्वरस्वरूपी 'अन्यत्राचेनि प्रमाणे' गुणधर्म असतात. स्थूल मानाने, इतरत्र जे जे आहे ते ते सर्व ईश्वराच्या ठिकाणी आहेच. पण प्रसंगी त्याचा त्याला स्वीकार करावा लागतो, एवढेच. या दृष्टीने देवतांच्या ठिकाणी असलेले गुणधर्म ईश्वरस्वरूपी असतातच. त्यांना 'अन्य-त्राचेनि प्रमाणे' असलेले गुणधर्म म्हणून नाव देतात.

## सृष्टिरचना कशासाठी ?

एवंगुणविशिष्ट ईश्वरस्वरूपीचा आनंद ओसंडून वाहत असतो. तो कुणाला तरी द्यावा अशी ईश्वराची इच्छा असते. पण तो द्यावा कुणाला ? त्याचा स्वीकार करण्यास 'जीव'च फक्त पात्र आहेत. देवता नित्यबद्ध अस-ल्यामुळे त्यांना ईश्वराचा आनंद प्रभवू शकत नाही. प्रपंच तर बोलून चालून जड. त्याच्याकडून आनंदाचा स्वीकारहि होऊ शकत नाही. अनादि-कालापासून निरानंद स्थितीत पडून असलेल्या अनादिअविद्यायुक्त पण बद्ध-मुक्त जीवांना मात्र हा आनंद घेता येणे शक्य आहे. पण त्याला तो पात्र होण्यापूर्वी त्याची अविद्या नाहीशी झाली पाहिजे. ती फक्त परमेश्वरच नासू शकतो. म्हणून जेणेकरून परमेश्वर आपल्या अविद्येचा नाश करील अशी

त्याची कृपा जोडण्यासाठी जीवाने त्याला प्रसन्न करून घेतले पाहिजे. हे कर्म त्याला तमोभागातील अव्यक्त व निष्क्रिय स्थितीत करता येणे शक्य नाही. त्यासाठी जीवाला साकार देहधारी बनविणे अवश्य असते. हा देहहि सर्वावयवांनी व सर्व लक्षणांनी युक्त असला पाहिजे. अर्थात्, त्यासाठी सर्व देवतांची अधिष्ठाने त्याच्या शरीरात असणे अवश्य आहे. सर्व देवतांची स्वरूपे फक्त कर्मभूमीतच असल्यामुळे जीवाला युक्त देह कर्मभूमीतच मिळू शकतो आणि असा युक्त देह मनुष्याचाच असतो. म्हणून ईश्वराने प्रथम सृष्टी निर्माण करून जीवांना कर्मभूमीत युक्त मनुष्यदेह दिला. हेतु हा की, तेथे त्याने ईश्वरविषयक कर्मे करून त्याची कृपा जोडावी, त्याजकडून आपल्या अविद्येचा नाश करून घ्यावा आणि ईश्वराचा आनंद प्राप्त करून घेऊन मुक्त व्हावे. मनुष्यदेहधारी जीवांना ईश्वराचा प्रत्यय आणून देण्यासाठी व त्याचा उद्धार करण्यासाठी ईश्वरालाहि कर्मभूमीत मनुष्यवेषाने अवतरणे अवश्य आहे. म्हणून ईश्वर अनंत रूपांनी कर्मभूमीत अवतार घेतो. परमेश्वराचा हा अवतारहि युक्त-मनुष्य-देहधारी असला पाहिजे. तरच तो उद्धरणकार्य करू शकेल.

परमेश्वरावताराचा मनुष्यदेह ‘युक्त’ पाहिजे म्हणजे तो शरीराने अव्यंग व सर्व लक्षणासहित पाहिजे. ‘युक्त’ मनुष्यदेह हा जसा सर्व देवतांच्या अधिष्ठानांनी युक्त असतो तसाच परमेश्वराने धारण केलेला मनुष्यदेहहि असतो, असे मात्र नव्हे. देवता ह्या परमेश्वराच्या शक्ति आहेत. या सर्व शक्तींनी म्हणजे देवतांनी तो युक्त असला पाहिजे, हे खरे. पण ह्या शक्तिरूप देवता त्याच्या अवताराच्या शरीरात असत नाहीत, तर त्या बाहेर ओळगण्यांच्या रूपाने असतात. प्रत्येक देवतेच्या स्वरूपातील उरीच्या भावातून सृष्टिरचनेच्या वेळी प्रत्येक परमेश्वरावताराच्या सेवेसाठी एकेक ओळगणी विभागते. अर्थात्, प्रत्येक परमेश्वरावताराजवळ सर्व देवतांची एकेक ओळगणी असते. अशा सर्व ओळगण्यांनी ‘युक्त’ असलेला परमेश्वरावतारच जीवाचा उद्धार करू शकतो. कार्यपरत्वे, परमेश्वराच्या सेवेसाठीच का होईना पण एखादी ओगळणी जेव्हां अवतारशरीरापासून दूर गेलेली असते, तेव्हां त्या अवताराकडून उद्धरणकार्य होऊ शकत नाही. या दृष्टीने जीवोद्धरणकार्य करणारा उभयदृश्या परमेश्वरावतार हा युक्तमनुष्यदेहधारी असून देवतांच्या

सर्व ओगळण्यांनीहि युक्त असला पाहिजे, हे दिसून येईल. सृष्टि उत्पन्न करून, जीव जी अनेक कर्मे आचरतील त्यांची फळे देण्यासाठी देवताहि ब्रह्मांडस्थारूपाने विभागतात आणि प्रत्येक देहधारी जीवाचा शारीरिक व्यापार चालविण्यासाठी पिंडस्थांच्या रूपाने विभागून त्या शरीरात राहतात.

## सृष्टिरचना-कार्य.

हे सृष्टिरचनेचे कार्य अर्थात, ‘ प्रपंचा ’च्या सहाय्याने होते. प्रपंच म्हणजे पंचमहाभूते आणि तीन गुण मिळून झालेली अष्टधा प्रकृती होय. ही भूते आणि गुण भैरवस्वरूपाधारे अव्यक्त स्थितीत होती. ईश्वराला सृष्टिरचनेची इच्छा त्र्यंशस्वरूपात-म्हणजे जेथे ईश्वर, ब्रह्म व माया यांची स्वरूपे एकत्रित झालेली असतात, त्या ठिकाणी होते. अर्थात, या त्र्यंशात मायास्वरूप असते. त्याला व्यापून ब्रह्मस्वरूप आणि या दोहोंनाहि व्यापून ईश्वरस्वरूप असते. त्र्यंशात रचनेची प्रवृत्ती होताच ईश्वर मायेला ती जाणवतो. त्यासरशी माया सृष्टिरचनेचे कार्य करू लागते. तशा तिच्या स्वामित्वाखाली असलेल्या देवताहि रचना-कार्याला लागतात. मुख्य म्हणजे देवतांची अव्यक्त स्वरूपे ब्रह्मांडव्यापारासाठी ब्रह्मांडस्था व त्यापासून पिंडस्थांच्या रूपाने विभागतात. या रचनाकार्यात मायेचे कार्य सर्वात महत्त्वाचे होय. ती प्रथम संलग्नांच्या रूपाने विभागते. एकेक संलग्न तमोभागातील निष्क्रिय अव्यक्त जीवस्वरूपाला जाऊन लागतो व त्याला क्रियाशील करतो नंतर सर्व जीवांना माया आपल्या तमोभागातून काढून ब्रह्मांडात लोटते.

## मळरचना

पण मनुष्यदेह स्वीकारून जीव ब्रह्मांडात येण्यापूर्वी एक अत्यंत महत्वाचे कार्य जीवाकडून होते ते म्हणजे मळरचनेचे. सृष्टीत आल्यानंतर जीवाकडून होणाऱ्या कर्मरहाटीच्या सर्व कर्मांची व त्यांच्या फळांची व्यवस्था यथान्याय लावण्यासाठी जीवस्वरूपाचे दर्शन सर्व देवतांना होणे आवश्यक असते. पण देवतास्वरूपापेक्षा जीवस्वरूप इतके सपूर व सूक्ष्म असते की, त्यांना ते दिसू शकत नाही. त्यांना ते दिसावे म्हणून जीवाला सर्व देवतांचे मळ लावून घ्यावे लागतात. जीवस्वरूपावर झालेली शुभाशुभ

कर्मांची नोंद क्रमाने ( ज्या देवेतेने कर्म असेल तिच्या ) मळावर प्रतिबिंबित होते. हेच देवतेला जीवस्वरूपाचे होणारे दर्शन होय. मायेने दिलेल्या सामर्थ्याने जीव प्रापंचिक अष्टभूतापासून क्रमाक्रमाने सर्व देवतांचे मळ तयार करतो व ते स्वतःला लावून घेतो या मळरचनेच्या वेळीच अष्टभूतापासून परमाणु तयार होतात व त्यांच्या सांघाताने जड सृष्टि, पार्थिव शरीरे वगैरे बनवितात. दिव्य प्रपंचाच्या मूर्तीत देवता ब्रह्मांडस्थारूपाने अवतरतात तर पार्थिव शरीरात व्यापून जीव मनुष्यदेहधारी बनतो. पुढे ईश्वरकृपा जोडता यावी म्हणून कर्मभूमीत देहधारी होण्यासाठी जीव देवतामळ तयार करतो खरे, पण हे मळ बंधनासारखेच असतात. आपली ही मळादि कर्मे नाहीशी केल्यावाचून त्याला ईश्वरकृपा जोडता येणे शक्य नसते, हे लक्ष्यात ठेवले पाहिजे.

## परमेश्वरावतार : त्याचे प्रकार

जीवाबरोबर, त्याला चहुपदार्थांचे यथार्थ ज्ञान करून देऊन उद्धाराचा मार्ग दाखविण्यासाठी ईश्वरहि मनुष्यदेह धारण करून अवतरतो. तो फक्त तीन रीतींनी अवतरतो. (१) गर्भ : इतर जीवाप्रमाणे मातापित्यांच्या शुक्रशोणिताचा स्वीकार करून मातेच्या उदरात जन्म घेणे. (२) पतित : मृत शरीरात प्रवेश करून; अथवा (३) दवडणे : एखाद्या मातेच्या उदरात आलेल्या जीवाला तेथून घालवून लावून आपण त्याचे शरीर स्वीकारणे. त्याने कोणत्याहि रीतीने अवतार घेतला तरी त्याच्या अवताराचे संपूर्ण शरीर हे मायेने व्याप्त असते. म्हणून त्या शरीराला 'मायापुर' म्हणतात. अशा मायापुरधारी परमेश्वराचे प्रमुख तीन प्रकार आहेत. (१) अवरदृश्यावतार. (२) पर—दृश्यावतार आणि (३) उभयदृश्यावतार. अवरदृश्यावताराने फक्त अवर-शक्तीच स्वीकारली असते. परदृश्याने फक्त परशक्ती स्वीकारली असते. उभय-दृश्यावताराच्या ठिकाणी मात्र अवर, व पर या दोन्ही शक्तींचा स्वीकार असतो. असा युक्त मनुष्यदेही उभयदृश्यावतारच जीवोद्धरणाचे खरे कार्य करू शकतो.

## आरंभीच्या तीन सृष्टि

मूळ सृष्टीची रचना करून जीवांना कर्मभूमीत युक्त मनुष्यदेह दिल्या-नंतर परमेश्वरावतारांचे मुख्य कार्य त्यांना ज्ञानदान करण्याचे होते. त्याप्रमाणे

अनेक परमेश्वरावतारांनी जीवांना चहु पदार्थांचे ज्ञान, त्यांच्या ठिकाणी असलेल्या सर्वाधिकारित्वाच्या आधारे करून दिले. देवता, प्रपंच, परमेश्वर व जीव यांच्या स्वरूपांची जीवांना ओळख करून देऊन त्यांच्या मुक्तीचा मार्ग त्यांनी त्यांना उपदेशिला. पण परमेश्वरावताराने ईश्वरप्रतीति आणून दिलेली असूनहि त्यांना ती राखून ठेवता आली नाही. काही काळानंतर ते देवतांना किंवा सामान्य जीवांनाच परमेश्वर समजू लागले. ते कर्मोल्लेख करण्यास स्वतंत्र असल्यामुळे निरनिराळ्या कर्मांचा उल्लेख करू लागले. अशा स्थितीत सर्व जीवांना ज्ञान देऊन झाल्यानंतर परमेश्वराने सृष्टीचा संहार केला व लागलीच दुसऱ्यांदा सृष्टिरचना केली. हेतु हा की, जीवाच्या ठिकाणी पूर्वसृष्टीत झालेले संस्कार अधिक दृढ होऊन त्यांना वाचिक स्वरूप यावे. या दुसऱ्या सृष्टीत परमेश्वरावतारांनी पुन्हा सर्व जीवांना ज्ञान देऊन ईश्वरप्रतीति आणून दिली. पण पूर्वसंस्कारामुळे कित्येकांना ती झाली तर अनेकांना झाली नाही. त्यांनी आपल्या पूर्वसृष्टीत केलेल्या जीवदेवताविषयक कर्मांचे उल्लेख वाचिक केले. तेच त्यांचे संस्कार अधिक दृढ झाले. या दुसऱ्या सृष्टीत सर्व जीवांना ज्ञान देऊन झाल्यावर परमेश्वराने पुन्हा सृष्टिसंहार केला व लागलीच तिसरी सृष्टि रचली. यातहि ज्ञानदानाचे कार्य पूर्वीप्रमाणेच झाले. पूर्वसृष्टीत जीवांनी, जीवदेवता व ईश्वरविषयक कर्मांचे जे उल्लेख केले होते, ते या सृष्टीत कायिक झाले, म्हणजे त्यांची ती कर्मे पूर्ण झाली. प्रत्येक कर्म प्रथम मानसिक, मग वाचिक आणि तदनंतर कायिक होऊन पूर्ण होते. तदनुसार परमेश्वरज्ञानानंतर जीवांनी पहिल्या सृष्टीत अनेक संतासंत कर्मांचे नुसते उल्लेख केले; दुसऱ्या सृष्टीत ते उल्लेख वाचिक होऊन तिसऱ्या सृष्टीत कायिक झाले. यानंतर सृष्टिसंहार केला व लागलीच चौथी सृष्टि रचली. या चौथ्या सृष्टीत मात्र जीवाला त्यांच्या संतासंत कर्मलेपानुसार परमेश्वराने स्वर्ग, नरक, मोक्ष, आणि कर्मभूमि या चतुर्विध कर्मफळात घातले. स्वर्ग व मोक्षफळे म्हणजे देवताफळे; व नरकफळे म्हणजे मनुष्ययोनीखालील सर्व योनी; आणि कर्मभूमि म्हणजे मनुष्यदेह. या कर्मफळात घातल्यावर प्रावाहिक सृष्टि सुरू झाली. जीवांची कर्ममालिका व तदनुसार देवताकडून फळदातृत्व यांना सुरवात झाली. ज्यांच्या ठिकाणी ईश्वरविषयक ज्ञानाचा संस्कार टिकून राहिला होता व तदनुसार ज्यांनी कर्मे केली होती ते दैवराहटीचे बनून ईश्वरोपासनेला

लागले. तदितर मनुष्यप्राणी कर्मरहाटीच्या देवताफळदायक क्रिया आचरण करायला लागून देवतामार्गाचे उपासक बनले.

## देवतांचे बहिर्याग ऊर्फ युगधर्म

देवताफलप्राप्तीचे मुख्य मार्ग दोन आहेत. एकाला 'बहिर्याग' म्हणतात तर दुसऱ्याला 'अंतर्याग' म्हणून संबोधतात. बहिर्याग म्हणजे 'युगधर्म' होय; अंतर्याग म्हणजे 'विद्यामार्ग' होय. परमेश्वराने युगपरत्वे आचरायला सांगितलेला धर्म 'युगधर्मात' अंतर्भूत होतो; तर परमेश्वरावतार, देवतेची ब्रह्मांडस्था, ज्ञानविग्रह, विद्यावंत इत्यादिपासून एखाद्या देवतेची विद्या कर्मलेपानुसार प्राप्त होणे व त्याद्वारा देवताफळ मिळणे हा 'विद्यामार्ग' होय. बहिर्याग ऊर्फ युगधर्म प्रामुख्याने आचरणपर आहे. कारण त्यात काही आचार प्रत्यक्ष आचरावे लागतात. उदा:— आत्मोपास्ती हा कृतयुगीचा, भक्ति हा त्रेतायुगीचा, यज्ञयाग हा द्वापरयुगीचा, व तीर्थक्षेत्रव्रतदान हा कलियुगीचा धर्म आहे. त्या त्या युगात तोच विशिष्ट युगधर्म आचरला पाहिजे, तरच त्याची ठराविक फळे मिळू शकतात. भिन्न युगीचा धर्म आचरल्याने फार तर त्या भिन्न युगात मनुष्यदेह मिळून तेथे युगधर्म सहज रीतीने आचरला जातो. कृतयुगाची अधिष्ठात्री देवता माया होय. अर्थात आत्मोपास्ती हा मायेचा बहिर्याग आहे. त्याच्या आचरणाने मायेचे फळ मिळते. त्रेतायुगावर सत्यकैलासवैकुंठातील ब्रह्मा, विष्णु व महादेव यांचे अधिष्ठान असून 'भक्ति' या युगधर्माचरणाने त्यांची फळे मिळतात. याच युगात 'आगम' आचरले तर उत्तम, मध्यम व कनिष्ठ आचरणभेदाने विश्व, अष्टभैरव व शेषशय्या यांची फळे प्राप्त होतात. स्वर्गातील इंद्रचंद्रादि सर्व देवता द्वापरयुगाधिष्ठात्री असून त्यांची फळे यज्ञ-यागांच्या क्रियांनी प्राप्त होतात. कलियुगाधिष्ठात्री देवता म्हणजे अंतराळ, अष्टौदेवयोनी व कर्मभूमि या स्थानातील असून तीर्थक्षेत्रव्रतदानांच्या आचरणाने यांची फळे मिळतात. हे सर्व युगधर्म आचरणपर आहेत. फक्त मायेचा आत्मोपास्तीरूप धर्म मात्र आचरणपर नाही. देवतांच्या विद्याप्रमाणे तो संचारी असून त्याचे प्रत्यक्ष असे कोणतेच आचरण करावे लागत नाही. युगधर्माचे आचरण इतर कुणी त्या धर्माचा उपदेश केला की होऊ शकते.

त्यासाठी पूर्वजन्मी किंवा पूर्वसृष्टीत कांही विशिष्ट क्रिया घडलेल्या असतात असे नाही.

## देवतांचा विद्यामार्ग ऊर्फ अंतर्याग

विद्यामार्गाचे मात्र तसे नाही. पूर्वसृष्टीत ब्रह्मांडस्था, ज्ञानविग्रह, किंवा विद्यावंत यांच्या ठिकाणी भोजन घातले गेले असेल तर त्या देवतेच्या विद्येचा लेप जीवस्वरूपी लागतो. तो लेप भोगाई होताच तो पाहून एखादा ज्ञानविग्रह किंवा विद्यावंत त्या विद्याधिकारी पुरुषाला ती विद्या दृष्टिद्वारा संचरतो. विद्यासंचार झाल्यानंतर विद्यावंताला देवताफळ मिळविण्यासाठी विशेष काही करावे लागत नाही. जे होते ते सर्व त्याच्या अंगी संचरलेल्या विद्येमुळेच होते. विद्येचे मुख्य कार्य असे : जीवाच्या ठिकाणी एखाद्या देवतेची विद्या संचरली गेली की त्या विद्यावंताच्या शरीरात असलेली त्या देवतेची पिंडस्था त्याला प्रकाशित होते, म्हणजे दिसू लागते. त्या देवतेच्या ब्रह्मांडस्थेची जी आकृती असेल तशीच आकृती त्याला पिंडस्थेच्या ठिकाणी भासमान होते. या पिंडस्थेला तो विद्यावंत आपला ईश्वर मानतो, व तिचीच मानसिक उपासना करतो. त्याला त्या पिंडस्थेचा वेध लागतो. त्या पिंडस्थेच्या वेधाने शेवटी त्याला देवतेच्या ब्रह्मांडस्थेची म्हणजे तिच्या फळाची प्राप्ती होते. मृत्युसमयी विद्या पूर्ण झाल्यावर देवताफळाचा जीवस्वरूपी नुसता लेप लागतो. पुढे परवडी प्रमाणे तो जेव्हां भोगाई होतो तेव्हां त्याला त्या देवतेचे फळ उपभोगायला सापडते. बहिर्यागाने व विद्येने दोहोंनीहि देवताफळच मिळते; पण त्यात फरक असा की, बहिर्यागाने मिळालेल्या फळापेक्षा विद्येने मिळालेले फळ दहापट श्रेष्ठ असते. अर्थात्, ते दहापट अधिक काळ भोगायला सापडते.

## देवतांची फळे.

देवतेचे फळ मिळते म्हणजे काय होते, याची थोडक्यात कल्पना अशी : देवताफळाचा लेप जेव्हां भोगाई होतो तेव्हां त्या देवतेच्या ब्रह्मांडस्थ मूर्तीत जीवस्वरूप व्यापते. तेथे देवता त्याला सुख भोगवतात. उदा : शभर यज्ञ करून जीवाने इंद्रदेवतेचे फळ मिळविलेले आहे. हे फळ भोगण्याची पाळी जेव्हां येईल तेव्हा इंद्रदेवतेच्या ब्रह्मांडस्थ मूर्तीत तो जीव व्यापून राहील.

त्यामुळे आपणच इंद्र आहोत असे त्याला वाटते. ती ब्रह्मांडस्थ मूर्ति जे निर-निराळे व्यापार करते ते जणु आपणच करीत आहोत असे त्या जीवाला वाटते. हाच त्याच्या इंद्रफळाचा उपभोग. प्रत्येक देवतेची एकेकच ब्रह्मांडस्था असल्यामुळे ती एकाच वेळी एकाच जीवाला आपल्या ठिकाणी व्याप्त करून फलभोग देऊ शकते, हे लक्ष्यात ठेवावे. यामुळे देवताफळ भोगण्यामधे किती अडचणी येतात ते पहाण्यासारखे आहे. पहिली गोष्ट अशी की, मनुष्यदेहात-जीव ज्या क्रमाने कर्मे करितो त्याच क्रमाने त्याला त्याची फळे मिळतात. अनंत जन्मातील अनंत कर्मांचे लेप त्याच्या स्वरूपी असतात. जीवाने देवताफळ मिळवून ठेवलेले असले तरी त्याचा त्याला ताबडतोब भोग मिळत नाही मागील सर्व कर्मांचे भोग भोगून पार पडले म्हणजे या देवताफळाचा भोग ' उपस्थित ' होतो. पण समजा, त्यावेळी त्या देवतेच्या फळात दुसरा एखादा जीव फळ भोगीत असला तर ? तर या नवीन जीवाला त्या फळाचा उपभोग त्यावेळी मिळणे शक्य नसते. म्हणून तो तेथून ' टिचतो ' व पुढील कर्माचा भोग भोगू लागतो. पुढे त्या देवतेचे फळ जेव्हां रिकामे होते तेव्हां हा जीव दुसरेच फळ भोगत असतो. ते जर उच्च देवतेचे फळ असेल तर तेथून त्याला काढताहि येत नाही. म्हणून त्याचे फळ दुसऱ्यांदा टिचते; पण भोगत असलेले फळ खालील देवतेचे असेल तर वरील देवता त्या जीवाला खालील देवतेच्या फळातून काढून आपल्या फळात नेते. असे केल्याने त्याचा तो खालील देवतेच्या फळाचा उपभोग अपुराच राहतो. सारांश काय, देवतांची फळे पूर्णपणे भोगण्याची वेळ येणे सुलभ नसते. पण याहून महत्त्वाची गोष्ट अशी की, ज्या देवतेचे फळ त्याला मिळते, ती देवता आपल्या ठिकाणचा सगळा आनंद त्याला भोगवीत नाही, तर पान्हा चोरणाऱ्या गाईप्रमाणे ती वंचकत्वाने फलोपभोग देते. इतकेहि करून पुन्हा पुण्य संपले म्हणजे त्या देवताफळातील जीव खाली ढकलला जातो. अर्थात्, देवतांची फळे ही क्षणिक होत. ती शाश्वत नाहीत. त्यांच्या ठिकाणचा आनंद हाहि पूर्णानंद नाही. म्हणून या क्षणिक आनंद देणाऱ्या अशाश्वत देवताफळांच्या मागे लागण्यापेक्षा अक्षय्य आनंद देणारे ईश्वरपद प्राप्त करून घेणे हेच श्रेयस्कर होय. याच कारणामुळे चक्रधरस्वामींनी देवतांची उपासना त्याज्य मानिली आहे.

## ईश्वरप्राप्तीचे उपाय : ज्ञान व प्रेम ऊर्फ भक्ति.

आनंदमय ईश्वराचा आनंद हा देवतांच्या ठिकाणी असलेल्या आनंदापेक्षा अनंतपटींनी श्रेष्ठ होय. तो मिळविणे हेच जीवाचे खरेखुरे साध्य होय. ईश्वराने सृष्टिरचना करून जीवाला साकार बनविले, तेहि आपल्या आनंदाचा त्याला उपभोग देण्याच्या सदिच्छेनेच. पण अज्ञानी जीव अन्यथाज्ञानाने देवतांनाच ईश्वर मानून त्यांच्या भजनी लागतो. त्याने खऱ्या ईश्वराचा आनंद प्राप्त करून घेण्याच्या मार्गाला लागावे म्हणून परमेश्वर स्वतः मनुष्यरूपाने अवतरून त्याला यथार्थ ज्ञानाचा व सन्मार्गाचा उपदेश करीत असतो. ईश्वराचा आनंद प्राप्त होऊन उपभोगता यावा म्हणून जीवस्वरूपीची अनादि अविद्या नष्ट झाली पाहिजे. त्यासाठी जीवांनी ईश्वरोपासना करून ईश्वराची कृपा जोडली पाहिजे. ती जोडण्याचे म्हणजे ईश्वरप्राप्तीचे मुख्य दोन मार्ग आहेत. एक ज्ञानमार्ग; दुसरा भक्तिमार्ग. परमेश्वराचा ज्ञानमार्ग हा देवतांच्या बहिर्यागाप्रमाणे आचरणरूप आहे, तर त्याचा भक्तिमार्ग हा देवतांच्या विद्यामार्गाप्रमाणे साध्यसाधनी सुखरूप आहे. ज्ञानमार्गाने जीव ब्रह्मस्वरूपात पावन होतो, तर भक्तिमार्गाने तो ईश्वरस्वरूपात पावन होतो. अर्थात्, ज्ञानमार्गापेक्षा भक्तिमार्ग श्रेष्ठ होय. जीवदेवतांच्या ठिकाणी निर्हेतुक भोजन घातल्याने परमेश्वराच्या ज्ञानाचा अधिकार जोडला जातो, तर प्रत्यक्ष परमेश्वरावतारांच्या ठिकाणी भोजन घातल्याने त्याच्या प्रेमाचा म्हणजे भक्तीचा अधिकार प्राप्त होतो.

## ज्ञानमार्गाचे स्वरूप.

ज्ञानाचा अधिकार ज्याने जोडला असेल त्याला परमेश्वरावतार आपल्या मुखाने अथवा, एखाद्या अधिकरणाला निमित्त करून त्याच्या मुखाने ज्ञान देतो. हे ज्ञान देतांना त्याची अक्षरे परा-वाणीत घोळलेली असतात. अधिकरणाच्या मुखाने जेव्हां ज्ञान देतात, तेव्हाहि त्या अधिकरणाची अक्षरे परा-वाणीत घोळलेली असतात. परमेश्वरच त्यात परा-वाणीचा निक्षेप करीत असतो. या ज्ञानदानाच्या वेळी परमेश्वरावतार जीवाच्या ठिकाणी बोधशक्तीचा संचार करून जीवाला प्रतीति आणून देतात व शाब्दिक ज्ञान निरूपण करतात म्हणजे जीवदेवताप्रपंचपरमेश्वराचे वास्तविक स्वरूप त्याला सांगतात. प्रपंच

जड आहे; देवता नित्यबद्ध आहेत; जीव बद्धमुक्त आहे; आणि या सर्वांहून वेगळा असलेला परमेश्वर तोच काय तो नित्यमुक्त आहे. अनादि-अविद्येने बद्ध झालेल्या पण सर्वाधिकारित्वामुळे उध्दरणाला पात्र असलेल्या जीवाने जड प्रपंचाच्या व च्युतिमंत फळे देणाऱ्या जीवदेवतांच्या नादी न लागता चैतन्यपर परमेश्वराच्या ज्ञानाचे व प्रेमाचे उपाय जोडून ब्रह्मानुभूती मिळवावी. यासाठी परमेश्वराचे दास्य घडले पाहिजे. ते घडावे म्हणून जीवेश्वरामधील भेदाची प्रतीति अधिकारियाला प्रथम आली पाहिजे. हा ईश्वर आणि त्याहून वेगळा मी जीव त्याचा सेवक आहे, हे ज्ञानधिकारी जीवाला पटवून देणे हे बोधाचे कार्य होय. ही प्रतीति आली म्हणजे तो शाब्दज्ञानी बनलाच.

पण शाब्दज्ञानी झाला म्हणजे तो ज्ञानी मोक्षाच्या मार्गाला लागला असे म्हणता येत नाही. याकरिता त्याला सर्वसंगपरित्याग करून परमेश्वराला अनुसरले पाहिजे, संन्यास घेतला पाहिजे. जीवदेवताप्रपंचाच्या नादी न लागता नित्यमुक्त परमेश्वराच्या दास्यानेच आपली अनादि-अविद्या नष्ट होऊन आपल्याला परमेश्वराचे अच्युतपद आणि तेथील शाश्वत व निरतिशय आनंद लाभू शकेल, हे कळले असूनहि जो धनपुत्रदारा यांचा त्याग करणार नाही तो मोक्षमार्गाला लागला असे कसे म्हणता येईल ? संपत्तीचा मोह म्हणजे जड प्रपंचाची सेवा होय, आणि स्त्रीपुत्रांची ममता म्हणजे जीवांची भक्ति होय. याने मुक्ति मिळणार नाही. त्यासाठी त्या बोधवंताने सर्वसंगपरित्याग करून परमेश्वराला अनुसरणे व त्याच्या आज्ञेप्रमाणे विधिनिषेधांचे परिपालन करून ईश्वरस्मरण करणे हाच खरा मार्ग होय. हे अनुसरणदेखील वयाच्या ५६ व्या वर्षापूर्वीच झाले पाहिजे. नाही तर तो बोधवंत ननुसरत-प्रमादी बनतो. सर्व प्रापंचिक कर्मे करून थकल्यावर म्हातारपणी संन्यास घेणे म्हणजे ईश्वराची फसवणूक करणे होय. विषयसेवनाला जो काळ अनुकूल तोच काळ ईश्वरोपासनेला अनुकूल होय. म्हणून विशिष्ट वयोमर्यादा ओलांडण्यापूर्वी संसार सोडून संन्यास घेणे व अनुसरणे अवश्य होय. बोधवंताने असे केले म्हणजे तो खराखुरा मोक्षमार्गीचा अनुयायी बनला. त्यालाच शाब्दज्ञानी यथार्थतः म्हणायचे.

### आचारधर्माचा मुद्रितार्थ

या अनुसरणानंतर त्या साधकाने परमेश्वराच्या सान्निध्यात राहून

त्याचे सेवादास्य केले पाहिजे. असा परमेश्वरावतार विद्यमान नसला तर असन्निधानीचा कडक आचारधर्म पाळला पाहिजे. या आचारधर्माला महानुभाव ' असति परी ' ( म्हणजे, असण्याची, राहण्याची रीत ) म्हणतात. या आचारधर्माचे ऊर्फ असतीपरीचे सार एवढेच की, अनुसरलेल्या ज्ञानियाने विकार व विकल्प सोडून देऊन, आपल्या आहारावर नियंत्रण घालून एका परमेश्वराखेरीज इतर कोणावरहि अवलंबून न राहता परमेश्वराचे निरंतर स्मरण करीत आपला जन्म क्षेपला पाहिजे. विकारशून्यतेसाठी, ज्या ज्या जडचेतन पदार्थांच्या संबंधाने आपल्या मनात चलबिचल निर्माण होणे शक्य आहे त्या त्या सर्व पदार्थांचा त्याग केला पाहिजे. विकल्प म्हणजे विपरीत कल्पना होय. एखादा पदार्थ चांगला किंवा वाईट म्हणणे अथवा एखाद्याला श्रेष्ठ व दुसऱ्याला कनिष्ठ लेखणे म्हणजे विकल्प होय. तसेच, पदार्थाच्या वास्तव स्वरूपाशी विपरीत अशी कल्पना करणे हाहि विकल्पच होय. उदाः- जीवदेवतांना ईश्वर समजणे हे दोन्ही प्रकारचे विकल्प ज्ञानियाने आपल्या मनात निर्माण होऊ देता कामा नयेत. विशेषतः ईश्वराखेरीज इतर जीव-देवतावर त्याने ईश्वरत्व-बुद्धि येऊ देणे हे महापाप होय. तसे त्याने केले म्हणजे तो विकल्पप्रमादी होऊन कायमचा भ्रष्ट झाला म्हणून समजावे. इतरावर ईश्वरबुद्धि येण्याचे टाळावे म्हणून इतरांचा आश्रय त्याने पूर्णपणे तोडावा. फक्त ईश्वरावर अवलंबून रहावे. त्याचे निरंतर स्मरण करावे. ते करता यावे म्हणून नेहमी विजनात वास करावा, म्हणजे जनसंपर्कापासून त्रास होणार नाही. केवळ शरीरयात्रा चालविण्यासाठी परिमित भोजन करावे. तेहि सर्व वर्णात भिक्षा मागून मिळवावे. तेवढ्यापुरते त्याने गावात जावे. एरवी रानातच रहावे. एकाच गावात नेहमी भिक्षा मागितली तर विकार आणि आलंबनाचे दोष उद्भवण्याचा संभव असतो. म्हणून साधकाने नित्य भ्रमण-अटण करीत असावे. अशा कडक आचरणाने वागून सदैव ईश्वरस्मरण केले म्हणजे तो ज्ञानी अपरोक्ष-ज्ञानाला पात्र होतो. ही पात्रता त्याला एकाच जन्मात लाभते असे नाही.

## ज्ञानाचे चार प्रकार

ज्ञानाचे एकूण चार प्रकार आहेत. शाब्द ज्ञान, अपरोक्ष ज्ञान, सामान्य ज्ञान व विशेष ज्ञान. शाब्द ज्ञानानंतर अनुसरण करून त्याने आचारधर्म

पाळला पाहिजे. म्हणजे त्याला परमेश्वर अपरोक्ष ज्ञान देतात. या ज्ञानामुळे साधकाला जीव, देवता प्रपंच, व परमेश्वर या चारहि पदार्थांची स्वरूपे प्रत्यक्ष दिसू लागतात. पूर्वी त्याला त्यांचे फक्त शाब्दिक ज्ञान होते. आता ती तो डोळ्यांनी पाहू शकतो. आपले स्वतःचे स्वरूप त्याला दिसू लागते. त्यावर असलेले कर्मलेप व मळ तो पहातो. यातून सुटून शुद्ध होण्याची आणि लौकर ईश्वराकडे जाण्याची तळमळ त्याला लागते. या अपरोक्ष ज्ञानात साधक आपलीं अनुपभुक्त कर्मे बहुरूपतेने व बहुकामनेने क्षाळतो. त्यानंतर परमेश्वर त्याला सामान्य ज्ञान देतात. या ज्ञानात चहु पदार्थांचे स्वरूप त्याला अधिक स्पष्ट दिसू लागते. या सामान्य ज्ञानात त्याची सर्व पूर्व कर्मे पूर्णपणे नासतात. सृष्टिरचनेच्या वेळी जे देवतामळ त्याने लावून घेतले होते तेहि तो परमेश्वरप्रवृत्तीने नासतो. अशा रीतीने तो मळकर्मापासून सुटला म्हणजे परमेश्वर त्याला विशेष ज्ञान देतात. यात त्याचे राहिलेले अयोग्यतेचे दोष नासावयाचे असतात. म्हणून परमेश्वर त्याचा अव्हेर करतात. त्यामुळे त्याची ईश्वरप्राप्तीची तळमळ अधिकाधिक वाढते. त्या तळमळीच्या आगीत ते दोष जळाले म्हणजे परमेश्वर त्याच्या जीवस्वरूपीचे अज्ञान नष्ट करून आपल्या कृपारूप शस्त्राने त्याची अविद्या छेदतात. पूर्वी अविद्येने युक्त असलेले जीवस्वरूप नुसते 'केवळ' होते; आता अविद्येपासून मोकळे होताच ते 'कैवल्य' रूप बनते. १०० ब्रह्मांडाएवढे असलेले जीवस्वरूप अविद्येमुळे किंचित संकोचलेले होते. मळादिकांच्या बंधनांनी तर ते ५०० योजन मर्यादेइतके संकोचले होते. अविद्यानाशानंतर ते आपले पूर्ण रूप धारण करते. अविद्यायुक्त असेपर्यंत जीवस्वरूप मायेच्या आधाराने असते. पण अविद्यानाशानंतर ते मायास्वरूपाधारे न राहता ब्रह्मस्वरूपाधारे राहते. हीच जीवाची मायापारंगतता होय. अशा रीतीने अविद्येचा नाश होऊन जीव मायापारंगत झाल्यावर तो ब्रह्मस्वरूपाधार राहतो; म्हणजेच त्याला ब्रह्मस्वरूपाची प्राप्ती होते. पण अजून तेथील आनंद तो उपभोगू शकत नाही कारण त्याच्याजवळ अजून साध्याचा अज्ञानबंध शिल्लक असतो. ईश्वर ते अज्ञान नासतो. त्याला अनुभवज्ञान देतो, म्हणजे ब्रह्मानंद भोगण्याचे रसनारूप द्वार जीवस्वरूपी करतो. असे झाले म्हणजे त्याला ब्रह्मानंद भोगता येतो. हेच त्याचे ब्रह्मस्वरूपात मिसळणे होय. हाच त्याचा मोक्ष होय. मोक्षपद अच्युत

असल्यामुळे तो जीव शाश्वत काळापर्यंत ब्रह्मानंद भोगत असतो. अर्थात्, यावेळी जीवस्वरूप व ब्रह्मस्वरूप व्यक्तित्वाने स्वतंत्र व निराळी असतात, हे सांगावयास नको. म्हणजे द्वैत कायम राहून जीव ब्रह्माचा आनंद भोगीत असतो. किंबहुना या द्वैतामुळेच तो हा आनंद उत्तम रीतीने उपभोगू शकतो. ब्रह्माच्या अव्यक्तस्वरूपात ज्ञानमार्गाने प्राप्तीस पोहोचलेले अनेक जीव एकाच वेळी आनंद उपभोगू शकतात.

**भक्तिमार्ग**

मोक्षाच्या ज्ञानमार्गाची स्थिती वरीलप्रमाणे होय. मोक्षाचा दुसरा मार्ग प्रेमाचा ऊर्फ भक्तीचा होय. ज्याने प्रेमाधिकार जोडला असेल त्याला परमेश्वर प्रेम देतात. विद्या देतांना जीवांच्या ठिकाणी देवता ज्याप्रमाणे आपल्या विद्येचा संचार करतात त्याचप्रमाणे प्रेमाधिकारी जीवाच्या ठिकाणी परमेश्वर आपल्या ‘ प्रेम ’ नामक शक्तीचा संचार करतात. हा संचार होताक्षणीच साधक सर्वसंगपरित्याग करून परमेश्वराला यथार्थतः अनुसरतो. या प्रेमी भक्ताचा विशेष हा की त्याचा व परमेश्वरावताराचा कधी वियोग होत नाही. वियोगात भक्त जिवंतच राहत नाही. एखाद्या कामानिमित्त क्षणकाल दूर जाण्यानेहि तो तळमळतो. दुसरे असे की, विद्यासंचारानंतर देवतेच्या विद्यावंताला जसा विशिष्ट आचार करावा लागतोच असे नाही, तसेच प्रेमसंचारानंतर भक्ताला ज्ञानियाप्रमाणे ‘ असती परी ’ आचरावी लागत नाही. परमेश्वराचे निरंतर सन्निधान लाभल्यामुळे त्याला सदा ईश्वरदास्य घडते. त्यामुळे त्याचा सगळा आचार चरित होतो किंबहुना त्याला ईश्वरस्वरूपात पोहोचवीपर्यंत त्याची सर्व काळजी परमेश्वरच वाहतात.

पण याचा अर्थ, ज्ञानियाप्रमाणे भक्ताच्या पूर्वसंचित मळकर्मांचा त्याला नाश करावा लागत नाही, असा नाही. चारी ज्ञानात ज्ञानियाच्या ज्या ज्या क्रिया होतात, त्या त्या भक्ताच्या बाबतीत होतात. फरक इतकाच की, ज्ञानियाप्रमाणे त्याला त्या प्रत्यक्ष कराव्या लागत नाहीत, तर त्याच्या ठिकाणी असलेल्या प्रेमशक्तीच्या द्वारा त्या आपोआप सिद्ध होतात. उदाः—ज्ञानियाचे शाब्दज्ञान एका जन्मात पूर्ण झाले नाही तर परमेश्वर त्याला पुनःसंबंधाचा देतात; म्हणजे पुनर्जन्मात त्याला श्रीमंत मातापितरांच्या पोटी जन्माला घालून

तेथे १२ वर्षानंतर त्याला भेट देतात. ज्ञानियाप्रमाणे काही भक्तांनाहि पुनः-संबंधाचा देह मिळतो. याचा अर्थ त्याचे शाब्दज्ञान पूर्वदेहात पूर्ण झालेले नसते. हा पुनःसंबंधाचा देह देतांना खास परमेश्वर जुळ्या भावाच्या रूपाने त्या भक्ताबरोबर जन्म घेतात. हेतु हा की, मातेच्या गर्भात देखील भक्ताला परमेश्वराचा वियोग होता कामा नये. अशा रीतीने प्रेमशक्तीच्या द्वारे परमेश्वर भक्ताची चारहि ज्ञाने परिपूर्ण करून घेतात. म्हणजे त्याच्या मळ-कर्मांचा नाश करून, शेवटी अविद्याछेदन करून त्याला मायापारंगत करतात व ईश्वरस्वरूपात लीन करतात. तेथे त्याला प्रेम देणारी श्रीमूर्ति, तिने दिलेले प्रेम व त्यामुळे जोडलेली योग्यता ही तिन्ही साधने निवृत्त होतात. त्यानंतर साध्यानंद जेणेकरून उपभोगता येईल असे अनुभव-ज्ञान ऊर्फ रति म्हणजे रमण-करते-द्वार ईश्वर त्याला देतात. रसना-इंद्रियामुळे जसे आपण पदार्थसेवन करू शकतो, त्याप्रमाणे रतिमुळे भक्त ईश्वरानुभूति अनुभवू शकतो. ही रति दिल्यावर मग परमेश्वर भक्ताला आपली अनुभूति देतो. म्हणजे ईश्वर जो सुखानंद भोगतो तोच भक्ताला अवंचकत्वाने देतो. हा आनंद म्हणजे एखादा निराळा पदार्थ असून परमेश्वर त्याचा उपभोग घेतो असे नाही. त्याचे स्वरूपच आनंदमय आहे. त्यात ईश्वर स्वतः रममाण झालेला असतो. साध्यप्राप्तीनंतर तो भक्तालाहि तेच स्वरूप देतो, त्यात त्याला पावन करतो. ईश्वरपद अच्युत असल्यामुळे त्यात पावन झालेल्या भक्ताला तेथे शाश्वत काळपर्यंत आनंद उपभोगायला मिळतो. मुंगी ज्याप्रमाणे आपली वेगळीक कायम ठेवून साखरेची गोडी सेवन करते, त्याप्रमाणे भक्तहि आपला निराळेपणा राखून ईश्वरस्वरूपाचा आनंद उपभोगीत असतो. भक्त ईश्वराच्या अव्यक्त स्वरूपात पावन होत असल्यामुळे प्राप्तीला पोचलेले अनेक जीव एकाच वेळी त्याच स्वरूपात पावन होऊन आनंद उपभोगत राहू शकतात. अशा रीतीने ज्याच्या त्याच्या अधिकारानुसार व क्रियाकर्मानुसार परमेश्वर जीवांचा उद्धार करीत असतात; म्हणजे ज्ञानियाला त्याच्या अधिकाराप्रमाणे ब्रह्मस्वरूप तर भक्ताला त्याच्या अधिकाराप्रमाणे ईश्वरस्वरूप प्राप्त करून देऊन त्याचा उद्धार करतात. जीवाचे मतित्रय जर ऊर्ध्व झाले तर परमेश्वराच्या ज्ञानप्रेमाने यथाधिकार त्याचा उद्धार होऊन तो अच्युत-पद प्राप्त करून घेतो व तेथे अवंचकत्वाने निरंतर आनंद उपभोगीत असतो. हाच आत्यंतिक मोक्ष होय.

## चक्रधरांचे तत्त्वज्ञान हेच गीतेचे तत्त्वज्ञान.

श्रीचक्रधरस्वामींच्या तत्त्वज्ञानाचे सार स्थूल मानाने हे असे आहे. सूक्ष्म दृष्टीने त्याचा विचार केल्यास त्याची वैशिष्ट्ये लक्ष्यात येऊ शकतील. आपल्या पूर्वी प्रचारात असलेल्या अनेक शास्त्रांचा 'मथितार्थ' स्वामींना ठाऊक होता हे आपण पाहिलेच आहे. तेव्हां त्या त्या शास्त्रातील काही सिद्धांतांचा समावेश त्यांच्या तत्त्वज्ञानात झालेला आढळल्यास आश्चर्य नाही. पण असे असले तरीहि त्यांच्या तत्त्वज्ञानाचे काही बाबतीत अनन्यसाधारणत्व शिल्लक उरतेच. 'सकळही शास्त्रे या शास्त्रासि मिळेति : परि हे कव्हणाही न मिळे' (विचार १५१) म्हणजे आपल्या शास्त्रात इतर शास्त्रातील सिद्धांत अंतर्भूत झालेले आहेत, पण आपले सिद्धांत मात्र इतर शास्त्रात नाहीत, असे त्यांनीच स्वतः म्हटले आहे. याचा अर्थ असा की, त्या त्या शास्त्राचे आपापल्या पतिपाद्य विषयापुरते प्रामाण्य त्यांना मान्य आहे, इतर बाबतीत नाही. उदाः मायेची प्राप्ती करून देणारे शास्त्र या दृष्टीने वेद त्यांना मान्य आहेत; अष्ट-भैरवांची प्राप्ति करून देणारे शास्त्र म्हणून आगम त्यांना प्रमाण आहेत; क्षीराब्धिपर्यंतच्या देवतांच्या उपासनेचा मार्ग दाखविणारी या नात्याने पुराणांना त्यांनी संमति दिलेली आहे; पण ईश्वरज्ञानाच्या व मोक्षप्राप्तीच्या दृष्टीने यापैकी कोणत्याहि शास्त्राचा उपयोग नाही हे त्यांचे स्पष्ट मत आहे. तथापि आपण जे तत्त्वज्ञान सांगतो ते अगदी अभिनव आहे असाहि त्यांचा अभि-निवेश नाही, उलट 'हे शास्त्र हंसावतारे ब्रह्मयाप्रति निरूपिले' (विचार १५०) इतके ते जुने आहे, परंपरेने तेच भगवान श्रीकृष्णाने अर्जुनाला गीतेच्या द्वारा सांगितले, अर्थात् आपले तत्त्वज्ञान म्हणजेच गीतेचे तत्त्वज्ञान, असे त्यांचे म्हणणे आहे. यावरून ब्रह्मविद्याशास्त्राच्या दृष्टीने चक्रधरस्वामींना सर्वस्वी प्रमाण ग्रंथ म्हणजे भगवद्गीता होय. 'बाइ : गीता श्रीकृष्णोक्ति : एर अवघी व्यासोक्ति' (विचार मालिका १०९) या सूत्रातून त्यांनी हेच स्पष्ट केले आहे.

## भारतीय तत्त्वज्ञानाची पार्श्वभूमि

वेदोपनिषदादि ग्रंथ हे जगाच्या वाङ्मयातील प्राचीनतम ग्रंथ आहेत. भारतीय तत्त्वज्ञानाची पार्श्वभूमि या ग्रंथांनीच तयार करून ठेवलेली आहे.

तदनंतर उदयाला आलेल्या ऋषिमुनींनी, धर्मसुधारकांनी आणि तत्त्वज्ञांनी वेदोपनिषदातील तत्त्वज्ञानाच्या पार्श्वभूमीवरच जगताच्या उत्पत्तिस्थितिलया-संबंधीची चित्रे आपापल्या कल्पनानुसार रेखाटलेली आहेत. कित्येकांनी त्यातील मूलभूत तत्त्वांची परिभाषा स्वीकारूनहि, सृष्टिचक्राचे कोडे सोडवितांना त्यांचे प्रामाण्य अमान्य केलेले आहे, तर इतरांनी त्यांचे प्रामाण्य मान्य करून पण आपल्या प्रतिभेला झालेल्या साक्षात्कारानुरूप त्यातील वचनांचा अर्थ लावून, आपापले स्वतंत्र तत्त्वज्ञान प्रतिपादिले आहे. जैन व बौद्ध दर्शने या दृष्टीने अवैदिक आहेत; तर वेदांत दर्शनातच शंकराचार्यांचा केवलाद्वैतवाद, रामानुजाचार्यांचा विशिष्टाद्वैतवाद, मध्वाचार्यांचा द्वैतवाद आणि वल्लभाचार्यांचा शुध्दाद्वैतवाद अशी निरनिराळी मते आहेत. याशिवाय सांख्य, न्याय, योग इत्यादि दर्शने आहेत ती वेगळीच. या अनेक शास्त्रातील महत्त्वाचे सिध्दांत अभ्यासून चक्रधरस्वामींनी आपले तत्त्वज्ञान सिध्द केलेले आहे. वैदिक तत्त्वज्ञान हे केवळ चैतन्यमायेच्या प्राप्तीचे साधन होय. ईश्वराचे स्वरूप वेदांना ठाऊक देखील नाही. श्रीकृष्णाने उपदेशिलेले गीता-शास्त्र किंवा त्यांचे तत्त्वज्ञान म्हणजेच ब्रह्मविद्याशास्त्र हेच काय ते मोक्षदायक आहे हा चक्रधरस्वामींचा प्रमुख सिध्दांत आहे. या अर्थाने ते अवैदिक आहेत. पण अवैदिक बौध्दाप्रमाणे ते अनात्मवादी आणि जैनाप्रमाणे निरीश्वरवादी नाहीत. सांख्य आणि वैशेषिक हीहि दर्शने निरीश्वरवादीच होत. चक्रधरस्वामी सेश्वरवादी असल्यामुळे अर्थातच ते वरील सर्वाहून वेगळे आहेत. एकदा स्वामी काही निरूपण करीत असतांना जवळ बसलेले पाठक म्हणाले की, "हो हो जी : नैयायिकी ऐसेचि बोलिले असे" तेव्हां स्वामी म्हणाले, "पाठा : काइ पाठा : हा आधीचि अज्ञानु : वरि लागले अन्यथाज्ञानु : जैसा कोडावरि दादु" यावरून न्यायशास्त्रातील काही गोष्टी चक्रधरस्वामींच्या तत्त्वज्ञानाशी जुळत असल्या तरी एकंदरीत न्यायशास्त्राचे तत्त्वज्ञान हे अन्यथाज्ञानाचे होय असेच स्वामींनी स्पष्टपणे सूचित केले नाही काय? आणि ते बरोबर आहे. सांख्याप्रमाणे नैयायिका निरीश्वरवादी नसले तरी वैदिक असल्यामुळे स्वामींना त्यांचे तत्त्वज्ञान मान्य कसे होणार? स्वामी स्वतः सेश्वरवादी होते, तसे वैदिक आचार्यहि सेश्वरवादीच होते. तथापि वैदिक आचार्याप्रमाणे चक्रधरस्वामी सेश्वरवादी असले. तरीहि जगात सर्वत्र एक ब्रह्मच काय ते भरलेले आहे,

जग मिथ्या आहे, जग म्हणजे ब्रह्मावर झालेला अध्यास होय हा शंकराचार्यांचा 'ब्रह्मसत्यंजगन्मिथ्या' वाद आणि विवर्तवाद त्यांना मान्य नाही. चिदचिद्विशिष्ट अशा परमेश्वरातील चिदंशापासून जीव व अचित् अंशापासून सृष्टि 'परिणाम' पावली-निर्माण झाली हा रामानुजाचार्यांचा परिणामवादहि त्यांना मान्य नाही. मध्वाचार्यांप्रमाणेच जीव, जगत आणि परमेश्वर हे एकमेकाहून पूर्णपणे भिन्न असे अनादि व अनंत पदार्थ आहेत असे चक्रधरस्वामींचे मत आहे. पण मध्वाचार्य पूर्णपणे वैदिक आहेत तर चक्रधरस्वामी अवैदिक आहेत. मध्वाचार्यांना विष्णुसर्वोत्तमत्व मान्य आहे तसे ते चक्रधरांना नाही. त्यांच्या मते विष्णु ही सामान्य देवता होय, ईश्वर नाही; अर्थात ती मोक्ष देऊ शकत नाही. तेव्हां परमेश्वरप्राप्तीच्या दृष्टीने तिची उपासना त्याज्य होय. हे लक्ष्यात घेतले म्हणजे चक्रधरस्वामी मध्वाचार्यांप्रमाणे द्वैती असले तरी त्यांच्याहून वेगळे आहेत, हे दिसून येईल.

## पूर्ण द्वैत आणि भक्ती यांचे मधुर मीलन

मध्वाचार्यांचे पूर्ण द्वैत जसे चक्रधरांच्या तत्त्वज्ञानात आढळते तशीच त्यांची व रामानुजाचार्यांच्या तत्त्वज्ञानातील भक्तिहि आढळते. 'ज्ञानादेव तु कैवल्यं' म्हणणाऱ्या शंकराचार्यांनी 'ज्ञाना' लाच महत्त्व दिलेले आहे; तर मध्व आणि रामानुज यांनी भक्तीला प्राधान्य दिलेले आहे. चक्रधरांच्या तत्त्वज्ञानात या दोहोंचा समन्वय झालेला दिसून येईल. त्यांनी ज्ञानापेक्षा भक्ति श्रेष्ठ असे म्हटले असले तरी भक्तीत ज्ञान हे स्वभावतःच अंतर्भूत असते व त्या ज्ञानाच्या साह्यानेच भक्त ईश्वरस्वरूपात विलीन होतो असे प्रतिपादन करून ज्ञान व भक्ति यांना सारखेच महत्त्व दिलेले आहे. शंकराचार्यांचा 'माया' वाद रामानुज व मध्व या दोहोंप्रमाणेच चक्रधरांनाहि मान्य नाही. पण 'माया' ही स्वतंत्र व सर्वश्रेष्ठ अशी देवता-स्वामिनी मानून तिला त्यांनी आपल्या तत्त्वज्ञानात समाविष्ट करून घेतलेच आहे. फरक इतकाच की, शंकराचार्य मायेला असत्य मानतात तर चक्रधरस्वामी तिला सत्य, इतकेच नाही तर भावरूप मानतात. शंकराचार्यांनी असत्य मानलेल्या अविद्येलाहि चक्रधरांनी जीवस्वरूपात अनादि कालापासून भावरूपाने विद्यमान असल्याचे, अर्थात् सत्य मानले आहे.

## संन्यास

शंकराचार्यांच्या ‘ संन्यासा ’ लाहि चक्रधरस्वामींनी आपल्या तत्त्वज्ञानात स्थान दिल्यासारखे वाटेल. पण वस्तुतः या दोघांनी स्वीकारलेल्या ‘ संन्यासा ’च्या कल्पनेत बराच फरक आहे. शूद्र आणि स्त्रिया यांना संन्यास देणे किंवा त्यांनी संन्यास घेणे हे वैदिक शंकराचार्यांना मान्य नाही. पण चक्रधरांना, पुरुषाप्रमाणेच स्त्रियांनी आणि त्रैवर्णिकाप्रमाणेच शूद्रांनीहि संन्यास घेणे मान्य आहे. त्यामुळे संन्यास–स्वीकारासंबंधीचे त्यांचे मत शंकराचार्यांच्या मतापेक्षा बौद्ध व जैन यांच्या मताशी अधिक जुळते आहे. वैदिक मार्गात पूर्वी कधी काळी स्त्रियांना संन्यास देण्याची पद्धति कदाचित अस्तित्वात असेलहि, पण शंकराचार्य आणि तदनंतरच्या काळात ती नव्हती. इतकेच नाही तर स्त्रियांना संन्यास देणे हे निषिद्ध मानले जात होते. तेव्हां चक्रधरस्वामींना ही बौद्ध आणि जैन यांच्यापासून ती सुचली असावी असे दिसते. केवळ परिस्थितीचाच विचार केला तर ती जैनाकडून सुचली असणे अधिक संभवनीय वाटते. कारण चक्रधरस्वामी हे मूळचे गुजराथेतील. शककाळाच्या बाराव्या शतकात गुजराथेत जैनांचेच प्राबल्य अधिक होते. तेव्हां त्यांच्याचकडून स्त्रियांनाहि संन्यास देण्याची कल्पना चक्रधरांना सुचली असावी. तथापि, ती गीतोपदिष्ट धर्मातीलच आहे हे लक्ष्यात ठेवले पाहिजे.

## बौद्ध आणि जैन दर्शनांचा परिणाम.

लीळाचरित्रात बौद्धांचे व जैनांचे उल्लेख अनेक ठिकाणी येतात. तेव्हां या दोन्ही अवैदिक पंथाशी व त्यांच्या तत्त्वज्ञानाशी चक्रधरस्वामींचा परिचय असला पाहिजे. बुद्धाने मानलेली संसाराची दुःखमूलता चक्रधरांच्या विचारसरणीतहि आढळते. ‘ दुःखरूपता : पापमूलता : अनित्यता इये तीन्ही नव्हेति तरि संसारावाचौनि आणिक काही गोमटे असे ’ (विचार १९१) असे त्यांनी म्हटलेलेच आहे. आणि याचसाठी संसार आणि त्यातील ‘ कर्म : धर्म : विधि : विलो : ’ परित्यजौनि–म्हणजे यांचा त्याग करून ‘ परमेश्वरा शरण रिगावे ’ ( आचार ५६ ) असे त्यांनी सांगितले आहे. तेव्हा प्रपंचाचा त्याग व संन्यास ही दोन्ही चक्रधराच्या तत्त्वज्ञानातील आवश्यक अंगे आहेत आणि ती वरील दोन दर्शनाशी विशेष जुळती आहेत. सृष्ट्युत्पत्तीच्या बाबतीत

चक्रधरस्वामींना परिणामवाद मुळीच मान्य नाही. तेंव्हां अर्थात सांख्यांचा विकृत परिणामवाद आणि रामानुज, निंबार्काचार्य इत्यादींचा अविकृत परिणामवाद हेहि दोन्ही त्यांना संमत नसल्यामुळे पांचभौतिक आणि त्रिगुणात्मक प्रपंच परमाणूंच्या सांघातापासून जड सृष्टि निर्माण झालेली आहे हे चक्रधरस्वामींचे मत बौद्धांच्या सांघातवादाशी अधिक जुळते. त्यांनी आपल्या सूत्रात 'साघात' शब्दाचा उपयोग केलेला नसला तरी त्यांच्या अनुयायांनी सृष्ट्युत्पत्तीचे प्रवचन करतांना तो अनेकदा वापरला आहे. 'पाचे भूते गुण त्रिविधा : हे भिन्न प्रकृति अष्टधा : या आठांचा सांघात बांधा : प्रपंचाचा ' ' या आठांचा सांघात मिळे : तै सृष्टिन्त्रिय टाकसाळे : भूतनाणे पडे एकवेळे : स्थूल सूक्ष्म मुद्रेचे ' ( ज्ञानप्रबोध. ५७६; ५७० ) विश्वनाथबासाच्या या ओव्यावरून ही गोष्ट स्पष्ट होईल.

सृष्ट्युत्पत्तीच्या कार्याला प्रारंभ होताक्षणीच चैतन्यमायेचा एकेक अंश संलग्नरूपाने जीवाला लागतो व त्यानंतर जीव क्रमाक्रमाने सर्व देवतांचे मळ घेतो, असे चक्रधरस्वामींनी प्रतिपादन केले आहे. यापैकी मळरचनेची कल्पना त्यांनी अभिनवगुप्ताचार्याच्या तंत्रालोकातून उचललेली आहे, हे आपण पूर्वी पाहिले. ( पा. १९१ ). संलग्नाची कल्पना त्यांनी अगदी जशीची तशी एखाद्या ठिकाणाहून उचलल्याचे दिसत नाही. तथापि तिचे बीज मुंडकोपनिषदातील ' द्वा सुपर्णा सयुजा सखाया समानं वृक्षं परिषस्वजाते । तयोरयन्यः पिप्पलं स्वाद्वत्यनश्नन्यो अभिचाकशिती ' या श्लोकात आढळतात. हीच कल्पना ' द्वौ सुपर्णौ शरीरेऽस्मिन् जीवेशाख्यौ सहस्थितौ । तयोर्जीवः फलं भुंक्ते कर्मणो न महेश्वरः ' या रुद्रहृदयोपनिषदातील श्लोकात आलेली आहे.

## अहिंसा

संन्यासाप्रमाणेच 'अहिंसा' हीहि चक्रधरस्वामींच्या तत्त्वज्ञानाचे अविभाज्य अंग होय. बौद्ध आणि जैन हे दोघेहि अहिंसामार्गाचे उपासक होत. पण त्यातहि बौद्धापेक्षा जैनांची अहिंसा ही अधिक कडक आहे. केवळ आपल्याच भोजनासाठी न मारलेल्या अशा पशूचे मांस खाण्याला बौद्धांना काही हरकत वाटत नसे. खुद्द भगवान बुद्ध हेच डुकराचे मांस खाऊन

झालेल्या रोगामुळे मृत्यु पावले अशी आख्यायिका आहे. जैनांना मांसाहार हा सर्वथैव निषिद्ध वाटतो. चक्रधरांनीहि 'चातुर्वर्ण्यं चरेद्भैक्ष्यं मद्यमांस-विवर्जितम्' या वचनाच्या द्वारा मांसाहार व मद्यपान निषिद्ध ठरवले आहे. मांसाहाराच्या निषेधाच्या मुळाशी अहिंसातत्त्वच प्रमुख होय, हे स्पष्ट दिसते. चक्रधरस्वामींनी हिंसा ही सर्व युगात अधर्म म्हणून ठरविली आहे. जैन संन्यासी हे आपल्याकडून पाण्यातील जीवजंतुचीहि हिंसा होऊ नये म्हणून नेहमी पाणी वस्त्रगाळ करून पितात, जीवजंतु तोंडात जाऊ नयेत म्हणून तोंडाला एक फडके बांधतात आणि स्नानाचा विधिनिषेध मानीत नाहीत. चक्रधरस्वामींचे अनुयायी तोंडाला फडके बाधत नाहीत हे खरे. पण ते स्नानाचा विधनिषेध बाळगीत नाहीत आणि पाणी वस्त्रगाळ करून पितात. चक्रधरस्वामींनाहि स्नानाचा विधिनिषेध नव्हता हे आपण पूर्वी पाहिले आहे. हा सर्व जैनांच्या अहिंसाधर्माचा परिणाम असावा असे वाटते. त्यांच्या या अहिंसाव्रताची मर्यादा कोठपर्यंत व्यापक बनलेली होती हे पाहण्यासारखे आहे. चक्रधरस्वामींनी आपल्या अनुयायांना 'एथौनि तुम्ही ऐसेया होआवे की हा जनु तुमते डोइये डोइये मारील परि तुम्ही डोइचि ओडवावी की' 'तुम्हा मारीता पूजीता समानचि होआवा की गा' (आचार. ६३; ६४) असा नियम घालून दिलेला आहे. त्यावरून चक्रधरस्वामी म्हणजे 'एका गालात मारली असता दुसरा गाल पुढे कर' म्हणून उपदेश करणाऱ्या येशू ख्रिस्ताची प्रतिमा होय असे म्हणावयास हरकत नाही.

## मध्वाचार्य आणि चक्रधर.

यावरून चक्रधरस्वामींच्या तत्त्वज्ञानात इतर दर्शनातील सिद्धांतांचा अंतर्भाव कसा झाला आहे हे दिसून येईल. भारतीय तत्त्वज्ञानात जी प्रमुख तत्त्वे आढळतात तीच चक्रधरांच्या तत्त्वज्ञानातहि आढळतात. त्यांच्या परस्परसंबंधाविषयी निरनिराळ्या तत्त्वज्ञामध्ये मतमतांतरे आढळतात. चक्रधरस्वामींचेहि स्वतःचे असे काही विशेष मत आहे आणि ते द्वैताचे आहे. या द्वैताची भूमिका इतर प्राचीन तत्त्वज्ञांनी तयार करून ठेवलेलीच होती. तरीहि त्याची व्यवस्थित मांडणी करणारचे श्रेय वेदांती मध्वाचार्याला आहे. चक्र-

धरस्वामी मध्वाचार्यांचे समकालीन होते. चक्रधरांच्या प्रयाणानंतर दोन वर्षांनी म्हणजे शके ११९८ मधे मध्वाचार्यांचे निधन झाले. चक्रधरस्वामींचे एकंदर चरित्र अनुक्रमाने लक्ष्यात घेतले तर आंध्रदेशात वरंगळपर्यंत त्यांचा संचार होता असे दिसते. तिकडेच मध्वाचार्यांची मते त्यांच्या कानावर पडली असण्याचा संभव आहे. मध्वाचार्यांनी दोनदा बदरिकेश्वराची यात्रा केली. पहिल्या वेळी परत येतांना ते गोदावरी–तीरावर उतरले होते. तेथे 'पुणतांबे' येथील शोभनभट्ट नावाचे विद्वान ब्राह्मण त्यांना शिष्य म्हणून लाभले असे त्यांचे चरित्रकार सांगतात[1]. पुणतांबे आणि त्याच्या आसपासच्या विभागात गोदावरी–तीरावर चक्रधरस्वामींचेहि परिभ्रमण नेहमी चालू असे. तेव्हां या दोन्ही तत्त्वज्ञांची माहिती त्यांना परस्परांना असणे अगदीच अस्वाभाविक नाही. असे असले तरीहि आपले द्वैताचे तत्त्वज्ञान चक्रधरांनी मध्वापासून उचलले असे मानण्याची गरज नाही. कारण पूर्वीच्या अनेक दर्शनात ते विद्यमान होतेच. त्यातूनच त्यांनी ते उत्क्रांत केले असावे असे वाटते.

याचे एक कारण असे की चक्रधरांच्या तत्त्वज्ञानात समकालीन मध्वाचे पूर्ण द्वैत जसे आढळते तसे आपल्यानंतर जवळजवळ तीनशे वर्षांनी होऊन गेलेल्या वल्लभाचार्यांच्या तत्त्वज्ञानातीलहि काही गोष्टी आढळतात. उदाः त्यांनी ब्रह्माच्या ठिकाणी विरुद्धधर्मित्व कल्पिले आहे. ( विरुद्ध सर्व धर्माश्रयत्वं तु ब्रह्मणो भूषणाय : ) याचेच प्रतिपादन चक्रधरांनी 'ईश्वर सकलधर्मरहितु होए आणि युक्तही होए' (वि. पा. १४ ); 'विरुद्धा धर्मी समावेश ईश्वरीचि आति' ( वि. मा. १० ) इत्यादि वचनात केले आहे. चक्रधरांनी याचा आविष्कार आपल्या पूर्वीच्या दर्शनातून स्वतःच केला आहे. तीच गोष्ट त्यांच्या पूर्ण द्वैताच्या तत्त्वाच्या आविष्कारासंबंधीहि आहे. माध्व आणि चक्रधर यांचे संबंध जोपर्यंत निश्चित होत नाहीत तोपर्यंत तरी एकाच वेळी हे दोघेहि तत्त्वज्ञ दक्षिण भारतात आपले पूर्ण द्वैताचे तत्त्वज्ञान स्वतंत्र रीतीने प्रतिपादन करीत होते असे धरून चालणे हेच अधिक वास्तव आणि सयुक्तिक होय.

---

१. श्रीमन्मध्वाचार्य व त्यांचे तत्त्वज्ञान. (ले. रा. बा. अवधानी) पा. ५१ व ८३

## सामाजिक बाजू : देवतांची उपासना त्याज्य

चक्रधरस्वामींच्या तत्त्वज्ञानातील सामाजिक बाजूचाहि विचार करणे आवश्यक आहे. त्यांच्या तत्त्वज्ञानाकडे लक्ष दिले तर जीव, देवता, प्रपंच आणि परमेश्वर या अनादि आणि अनंत अशा स्वतंत्र वस्तु मानणारे ते द्वैती होते; देवतांची उपासना करण्यापेक्षा सर्वश्रेष्ठ परमेश्वराची मोक्षप्रद भक्ति करण्यातच जीवमात्राचे कल्याण आहे असा संदेश सर्वत्र सांगणारे ते भक्तिमार्गाचे पुरस्कर्ते होते, हे त्यावरून दिसून येईल. त्यांचा हा संदेश तत्कालीन परिस्थितीला सर्वथैव अनुरूप असाच होता. श्रीचक्रधरस्वामी महाराष्ट्रात जेव्हां आले तेव्हां श्रीशंकराचार्यांच्या अद्वैत मताचा पगडा सर्व जनतेवर बसलेला होता. महाराष्ट्राचे त्या वेळचे यादव राजे याच मताचे पुरस्कर्ते होते. त्यामुळे अद्वैत तत्त्वज्ञानाचा सर्वत्र प्रचार आणि प्रसार होत असला तर त्यात आश्चर्य नाही. या अद्वैतकल्पनेमुळे भारतात क्षुद्र देवतांना भलतेच महत्त्व प्राप्त झालेले होते. आकाशातून पडलेले पाणी ज्याप्रमाणे शेवटी सागराला जाऊन मिळते त्याप्रमाणे कोणत्याहि देवतेला केलेला नमस्कार हा शेवटी श्रीकृष्णालाच जाऊन पोचतो—अशा विचारसरणीमुळे जनतेत अनन्यश्रद्धेचा अभाव फार मोठ्या प्रमाणात दिसून येत होता. कारण प्रत्येकच देवता ईश्वराच्या योग्यतेची ठरल्यामुळे त्या सर्वांचीच उपासना श्रेयस्कर ठरली. म्हणून

माझे अधिष्ठान घरीं । आणि वौसे आनाचे करी
पितरकार्य अवसरीं । पितरांचा होए ॥
एकादशिचां दिसीं । जेतुला पाडु आमसिं
तेतुलाचि नागासि । पंचमीसि ॥
चौथि मोटकी पाहे । आणि गणेशाचाचि होए
चाउदसीं म्हणे माए । तूझाचि वो दुर्गे ॥
नवमीते मांडी । आणि बैसे नवचंडी
आदित्यवारिं वाढी । भैरवां भरीं ॥
पाठिं सोमवारु पावे । आणि बेलेसिं लिंगा धावे
ऐसा एकल्लचि आघवे । जोगावी जो ॥

असे ज्ञानेश्वरांनी वर्णन केलेले 'अज्ञानाचे मूर्त अवतार' (ज्ञाने. १३-८१५-८१९) समाजात सर्वत्र आढळत होते. 'जाखाई जोखाई उदंड दैवते' 'नानापरीची दैवते । बहुत असती असंख्याति' (नाम. १६०८, १६०९) असे त्यावेळचे वर्णन नामदेवानेहि केलेले आहे. 'समारंभ करिती आणिक देवांचा । म्हणती येणे विष्णु तृप्त होय साचा । धिक् धिक् आचार जळो त्यांचा । वायावीण वाचा विटाळली' (नाम. १६१२) या शब्दात, अद्वैताच्या कल्पनेमुळे माजलेल्या या बजबजपुरीचा नामदेवाने धिक्कार केला आहे. ज्ञानेश्वर-नामदेवांच्या पूर्वी अनेक वर्षापासून महाराष्ट्रात ही परिस्थिति होती. आणि त्यामुळे नाना देवतापंथ भरभराटले होते. त्यावेळी महाराष्ट्रात बुद्धधर्मानुयायी फारसे नव्हते; पण जैनांची संख्या बरीच होती. त्यांच्या देवळातून चक्रधरस्वामी अनेकदा वस्ती केरीत. महाराष्ट्राच्या सीमा प्रदेशात दक्षिणेकडे लिंगायत पंथ होता. महाराष्ट्रात नाथपंथी जोगी-जोगिणी होत्या; आगमिक होते; सिद्ध होते; वैदिक कर्मकांडी होते; संन्यासी होते; पयोव्रती होते; मासोपवासिनी होत्या. असे अनेक पंथीय होते. स्थानपोथीत तत्कालीन महाराष्ट्रातील सुमारे १५३ देवतांचा उल्लेख आलेला आहे. त्यात प्रमुख अशा वैष्णव व शैव देवताव्यतिरिक्त काळीका, कोळाए, चिचाए, सुराए, डोंबाइ, जखीण यासारख्या क्षुद्र देवतांचाहि अंतर्भाव होतो. याशिवाय, लीळाचरित्रात ज्यांची नावे आलेली नाहीत अशा कितीतरी क्षुद्र देवता त्यावेळी पाषाणमूर्तींच्या रूपाने अस्तित्वात होत्या. या असंख्य देवता, त्यांची तीर्थक्षेत्रे, तेथील पुजारी-गुरव, त्या त्या देवतांचे भगत, देवताप्रीत्यर्थ होणारी व्रतवैकल्ये, बलिदाने इत्यादिकामुळे महाराष्ट्राचे धार्मिक जीवन नुसते गजबजून गेले होते. तत्कालीन महापंडित हेमाद्रि याने लिहिलेल्या चतुर्वर्ग-चिंतामणि " ह्या ग्रंथात दर दिवसाला व तिथीला दहादहा पाचपाच व्रते सांगितली आहेत व त्या त्या व्रताला कोणत्या देवाची कोणते पक्वान्न करून

(१) एकांक ४३; भा. ३-४१, ४३, ४७, ५५. (२) एकांक. ११. (३) भा. २-३८, ३९, ४६; भा. ३-१०४; भा. ४-४९ ते ५१; उत्त. ८१, ४१७. (४) भा. २-२७; (५) भा. २-२७. (६) उत्त. १०१. (७) भा. २-५६, ५७; भा. ३-१८; उत्त. ४१४ (८) भा. २-३; उत्त. २९७. (९) पू. २४; भा. ३-३, ५२, १०२.

व किती ब्राह्मण घालून प्रीति संपादन करावी ह्याचा स्मृति, श्रुति व पुराणे ह्यातून उतारे देऊन गंभीरपणे निर्णय केला आहे. हेमाद्रीच्या व्रतखंडावरून पाहता वर्षाच्या ३६५ दिवसांची एकंदर २००० व्रते व्हावी असा अंदाज होतो. लोकांची व्रते करण्याकडे, ब्राह्मणभोजने घालण्याकडे, पक्वान्ने खाण्याकडे व तद्वारा मोक्ष मिळतो अशा मताकडे अतोनात प्रवृत्ति असल्याविना हेमाद्रीने ही व्रते केवळ पांडित्य दाखविण्याकरिता किंवा करमणूक करण्या-करिता सांगितली असतील, हे संभवत नाही." (राजवाडे. ऐति. प्रस्तावना. पा. ३९८). यावरून तत्कालीन महाराष्ट्रातील देवतांचे व तत्प्रीत्यर्थ चालू असलेल्या तीर्थक्षेत्रव्रतदानादिकांचे स्तोम केवढे माजले होते याची कल्पना येईल. या सर्व बजबजपुरीला त्यावेळी प्रचलित असलेला वैदिकधर्म आणि त्याचा अद्वैतसिद्धांत जबाबदार होता. या बजबजपुरीतून सर्वसामान्य जनतेला सोडवणे आवश्यक होते. कारण वरिष्ठ वर्ण तर या परिस्थितीमुळे लौकिकदृष्ट्या पुष्ट होत होता. सामान्य जनतेने व्रतदानादि करून ब्राह्मणांना भोजन घालणे अवश्य असल्याने तो वर्ग ऐहिक सुखसमृद्धीत लोळत होता. चालू असलेल्या अधर्ममार्गाने जनतेला जाऊ देण्यात त्यांचा स्वार्थसंबंध गुंतलेला असल्यामुळे ते तोच उचलून धरीत होते. पण हा देवतोपासनेचा मार्ग अधर्ममार्ग होय हे जनतेच्या नजरेला आणून तिला खऱ्या परमेश्वराच्या भक्तीकडे वळविणे चक्रधरस्वामींना आपले कर्तव्य वाटले. आणि म्हणूनच जीवदेवताप्रपंच-परमेश्वराचे पूर्ण द्वैत प्रतिपादून देवता ह्या ईश्वराहून भिन्न होत, इतकेच नाही तर हीन होत या गोष्टीवर त्यांनी जोर दिला. मायेपासून तो यक्षिणी-पर्यंतच्या सर्व देवता ह्या ईश्वर नाहीत हे त्यांनी ठासून प्रतिपादन केले. देवता आपल्या उपासकांना क्षणकाल क्षुद्र आनंद देऊ शकतात हे खरे, पण जन्ममरणाच्या फेऱ्यातून पूर्णपणे सोडविणारा मोक्ष देण्याचे सामर्थ्य त्यांच्या ठिकाणी नाही, ते फक्त परमेश्वराच्याच ठिकाणी आहे, असा यथार्थ त्यांनी जनतेसमोर ठेवला. त्यांचा हा उपदेश भगवान श्रीकृष्णाच्या गीतोपदिष्ट तत्त्वानुसारच होता. भगवद्गीतेतील

कामैस्तैस्तैर्हृतज्ञानाः प्रपद्यन्तेऽन्यदेवताः
तं तं नियममास्थाय प्रकृत्या नियताः स्वया ॥ (७-२०)

अंतवत्तु फलं तेषां तद्भवत्यल्पमेधसाम्
देवान् देवयजो यांति मद्भक्ता यांति मामपि ॥ (७-२३)

आब्रह्मभुवनाल्लोकाः पुनरावर्तिनोऽर्जुन
मामुपेत्य तु कौंतेय पुनर्जन्म न विद्यते ॥ (८-१६)

यांति देवव्रता देवान् पितृन्यान्ति पितृव्रताः
भूतानि यान्ति भूतेज्या यान्ति मद्याजिनोऽपि माम् ॥ (९-२५)

इत्यादि श्लोकात देवता या ईश्वराहून भिन्न असून त्यांची उपासना क्षणिक फल देणारी, पण ईश्वरोपासना मात्र मोक्षदात्री आहे असे स्वच्छ सांगितलेले नाही का? चक्रधरस्वामींनी हाच मोक्षधर्म निरूपण केलेला आहे. त्यासाठी, वरील वचनातील भावार्थाच्या अनुरोधाने द्वैताची भूमिका घेणे अत्यंत आवश्यक होते, म्हणून त्यांनी तीच स्वीकारली. देवतांचे अंतर्याग व बहिर्याग त्यांनी विस्ताराने वर्णन केले. हेतु असा की त्यांच्या उपासनेपासून होणाऱ्या सुखाची क्षुद्रता जनतेच्या लक्ष्यात यावी. भिन्न भिन्न क्षुद्र देवतांच्या व्रतवैकल्यात व्यर्थ काळक्षेप करणाऱ्या, छिन्नभिन्न समाजाला केवळ एकाच परमेश्वराच्या छत्रछायेखाली आणून एकवटण्यासाठी त्यांचे हे तत्त्वज्ञान होते, ही गोष्ट लक्ष्यात येईल.

देवता ह्या मुळातच हीन असल्यामुळे त्यांची उपासना चक्रधर-स्वामींनी निषिद्ध ठरविली, अर्थात् देवताप्रीत्यर्थ होणारे तीर्थक्षेत्रव्रतदान हे मार्गहि त्यांनी निषिद्ध ठरवले, हे ओघाने आलेच. हजारो देवतांच्या सेवेत व्यर्थ काळक्षेप करीत असलेल्या जनतेला त्यातून मुक्त करण्यासाठी स्वामींना देवतातीर्थादिकांचाहि निषेध करणे अवश्यच होते. 'पुरुषोत्तमक्षेत्रा न वचावे' (आ. मा. ११४); 'तुम्ही जात्रे क्षेत्रा न वचावे' (आ. मा. १९) अशा स्पष्ट आज्ञा त्यांनी आपल्या अनुयायांना दिलेल्या आहेत. अनुसरणापूर्वी महदाइसा वाराणसीला जायला निघाली तेव्हां 'तीर्थक्षेत्रे अमोचके : ईश्वरसन्निधान मोचक (उत्त. १२५) असे सांगून स्वामींनी तिला परावृत्त करण्याचा पुष्कळ प्रयत्न केला, यातील रहस्य हेच होय.

## वैदिक उपासना त्याज्य

देवतांच्या उपासनेचे हीनत्व जनतेच्या मनावर ठसवायचे होते म्हणून चक्रधरस्वामींना अनुषंगानेच वेदांचे न्यूनत्व जनतेच्या लक्ष्यात आणून द्यावे लागले व त्यांचे मोक्षमार्गाच्या बाबतीतील अप्रामाण्य स्पष्ट करावे लागले. कारण त्यांच्या मते वेदोपनिषदादि ग्रंथ हे केवळ देवताभक्तीचा मार्ग प्रतिपादन करणारे आहेत. त्यांना खऱ्या ईश्वराचे मुळीच ज्ञान नाही. जास्तीत जास्त म्हणजे देवताचक्राची स्वामिनी असलेल्या मायेच्या अस्तित्वाचेच ज्ञान वेदांना आहे असे त्यांचे मत होते. ' कव्हणी एकु वेदविभागु चैतन्याचेया अस्तित्वाते जाणे : तथा बोले ' ( वि. १४ ) असे त्यांनी स्पष्ट म्हटलेले आहे. खऱ्या परमेश्वराची उपासना करावयाची असेल तर वेदोपनिषदादिकांचा, अर्थात् त्यात प्रतिपादन केलेल्या मार्गाचा म्हणजे देवतामार्गाचा त्याग करणे अवश्य आहे. देवतांच्या उपासनेचे मार्ग दाखविणारे ग्रंथ म्हणून वेदोपनिषदे चक्रधरस्वामींना मान्य असली तरी खरे ईश्वरस्वरूप व त्याच्या प्राप्तीचे उपाय या दृष्टींनी ते त्यांना अप्रमाण होते. या अर्थाने चक्रधरस्वामी अवैदिक होते यात शंका नाही.

## स्त्रीशूद्रांना मोक्षप्राप्तीचा सारखाच अधिकार

मोक्षप्राप्तीसाठी वैदिक मार्गाचा त्याग करण्याचा चक्रधरांचा उपदेश हा इतर दृष्टींनीहि उपयुक्त होता. जनतेचे वेदानुयायित्व जोपर्यंत कायम आहे तोपर्यंत वेदप्रणीत विधिनिषेधांचे पालन करणे हे तिचे कर्तव्यकर्म ठरते. आणि हे विधिनिषेध पाळायचे म्हणजे समाजातील सर्व वर्णातील स्त्रियांना व शूद्रांना मोक्षाधिकार नाकारणे होय. कारण त्यांना मुळातच वेदाचा अधिकार नाही. ' स्त्रीशूद्रद्विजबंधूनां त्रयी न श्रुतिगोचरा ' हे वचन प्रसिद्ध आहे. भगवद्‌गीतेचे महत्त्व वर्णन करितांना ज्ञानेश्वरांनीहि वेदांच्या या वैगुण्याचा स्पष्ट निर्देश केलेला आढळतो. ' वेदु संपन्न होये ठायी । परि कृपणे आन नाही । जे कानी लागला तिही । वर्णाचाचि ॥ एरा भवव्यथा ठेलिया । स्त्रीशूद्रादिका प्राणिया । अनवसरु मांडूनिया । राहिलाहे ॥ मज पातां ते उणे । फेडावेया गीतापणे । वेदु वेठला भलतेणे । सेव्य होआवेया " ( ज्ञान. १८-१४४७-१४४९ ) असे त्यांचे उद्‌गार आहेत. या वैगुण्यामुळे वेदमार्ग हा

सर्वसामान्य जनतेच्या पारमार्थिक आणि ऐहिक कल्याणाच्या दृष्टीने निरुपयोगीच नव्हे तर विघातक होता. स्त्रीशूद्रांचा वर्ग मोक्षापासून वंचित होता. त्यामुळेच क्षुद्र देवतांच्या तीर्थक्षेत्रव्रतदानात तो अडकून पडला होता. यामुळे समाजातील एका विशिष्ट वर्णाकडून त्याचे शोषण चाललेले होते. दुसरे असे की, तात्त्विक दृष्टीने अद्वैताचा पुकारा करणारा वैदिक मार्ग हा व्यवहारात विषमतामूलक चातुर्वर्ण्याचा आधारस्तंभ बनलेला होता. त्यामुळे वर्णविषमता त्यावेळी सर्वत्र दिसून येत होती. ब्राह्मणक्षत्रियादि चार वर्णात जशी विषमता होती तशीच ती सर्व स्त्रीपुरुषवर्गातहि होती. ईश्वरोपासनेच्या दृष्टीने हे अनिष्ट होते. चक्रधरस्वामींना ह्या गोष्टी मान्य नव्हत्या. वैदिक मार्गात त्रैवर्णिकातील पुरुषांनाच काय तो उपासनेचा अधिकार होता. म्हणून चक्रधरांनी जनतेला त्या मार्गाचा त्याग करायला सांगून असे उद्घोषित केले की परमेश्वरप्राप्तीचा अधिकार सर्व वर्णातील सर्व स्त्रीपुरुषांना सारखाच आहे. त्यामुळे त्यांनी स्थापन केलेल्या पंथात ब्राह्मणक्षत्रियादिकाप्रमाणेच शूद्रातिशूद्र सर्व स्त्रीपुरुषांना ज्ञानप्राप्ती करून घेऊन परमेश्वरानुसरण करण्याचा आणि शेवटी त्याच्या कृपेला पात्र होण्याचा सारखाच अधिकार आहे. 'स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेपि यान्ति परां गतिम्' ( गी. ९–३२ ) हा गीतोपदिष्ट धर्म महाराष्ट्रात आणि मराठी भाषेत श्रीचक्रधरस्वामींनी प्रथम पुरस्कारिला होता, हे त्यांचे महत्त्वाचे कार्य होय !

स्त्रियांनाहि धर्माधिकार आहे हे आपले मत स्वामींनी अगदी स्पष्टपणे प्रगट केलेले आहे. एकवेळ स्वामी निरूपण करीत होते आणि अनेक स्त्रिया त्यांच्या भोवती बसून निरूपण ऐकत होत्या. स्वामी स्त्रियांना निरूपण करीत आहेत हे पाहून सारंगपंडिताला मनात वैषम्य वाटले. ते ओळखून स्वामी सर्वासमक्ष त्याला म्हणाले : "धर्माचिया चाडा सातसिया परवडी एथ बाइयाचि का नसावीया : तुम्ही काइ करावे असा : टोंग : हां गा : तुमचा काइ जीउ आणि यांचिया काइ जीउलीया : तुमते आन देवो राखता आणि याते आन देवो राखता ? : ऐसे काइ एथ असे ?" ( उत्त. ८४ ). यावरून पुरुषदेहातील जीवात्मा व स्त्रीदेहातील जीवात्मा सारखाच असल्यामुळे स्त्रीला देखील धर्माधिकार आहे हे त्यांनी स्पष्ट सांगितले आहे. स्त्रीदेहापेक्षा पुरुषदेह अधिक श्रेष्ठ असे त्यांचे मत होते यात शंका नाही. कारण स्त्री–

देहात असतांना एखाद्या जीवाला शाब्दज्ञान झाले तर पुनःसंबंधानंतर त्याला पुढील जन्मी पुरुषदेह प्राप्त होतो व त्याचा उद्धार होतो. तथापि, त्या स्त्रीदेहातील जीवाचे शाब्दज्ञान याच जन्मी चरितार्थ होऊन त्याला याच देहात अपरोक्ष ज्ञान झाले तर त्या स्त्रीदेहात असतांनाच त्याचा उद्धार होतो. ही गोष्ट लक्ष्यात घेतली म्हणजे (कोणत्याहि वर्णातील) पुरुषदेहातील काय किंवा स्त्रीदेहातील काय सर्व जीवात्म्यांना धर्माचरण करून आपला उद्धार करून घेण्याचा सारखाच अधिकार त्यांनी मान्य केला आहे हे दिसून येईल.

## चातुर्वर्ण्याला अमान्यता

पण हे करण्यासाठी त्यांनी वर्णव्यवस्थेवर प्रत्यक्ष शस्त्र उपसले होते असे मात्र नाही. वर्णव्यवस्था ही विषमतामूलक आहे आणि म्हणून ती मोडून टाकली पाहिजे असा आक्रोश त्यांनी केला नाही. कारण, कार्यसफल-तेच्या दृष्टीने तसे करणे उपयुक्त नव्हते. त्यांनी परमेश्वरप्राप्तीसाठी आपल्या अनुयायांना असे काही विधिनिषेध घालून दिले की त्यामुळे चातुर्वर्ण्यव्यव-स्थेचा अडथळा मोक्षमार्गातून आपोआप दूर व्हावा. यासाठीच 'चातुर्वर्ण्यं चरेद्भैक्ष्यम' (आ. ८१) चा उपदेश त्यांनी जनतेला केला; आणि सर्वांना 'विकल्पशून्य' व्हायला सांगितले. चारहि वर्णात भिक्षा मागायला सांगितल्यामुळे परिणामतः वर्णावर्णातील रोटीव्यवहाराचे निर्बंध आपोआप गळून पडतात. आणि 'विकल्पशून्य' झाल्यामुळे हा श्रेष्ठ आणि तो कनिष्ठ ह्या कल्पना नाहीशा होतात. विकल्पाचे त्यांनी दोन प्रकार सांगितले आहेत. एक देवताजनित विकल्प आणि दुसरा विचिकित्सारूप विकल्प. जीवदेवतावर ईश्वरबुद्धि कल्पिणे हा देवताजनित विकल्प होय, तर हा पवित्र व तो अपवित्र, हा श्रेष्ठ व तो कनिष्ठ मानणे हा विचिकित्सारूप विकल्प होय. असे विकल्प केल्याने साधक प्रमादी बनतो व मोक्षाला दुरावतो. अशा कल्पना-पासून चक्रधरस्वामी स्वतः मुक्त होते आणि आपल्या अनुयायांनाहि ते मुक्त राहायला सांगत होते. चारहि वर्णांच्या घरून मागून आणलेल्या भिक्षेचा काला करून ते स्वतः आणि त्यांचे अनुयायीहि सेवन करीत. एका मातंगाने भक्तिभावपूर्वक अर्पण केलेला लाडू त्यांनी स्वतः खाल्ला होता व तोच प्रसाद म्हणून आपल्या शिष्यांना खाण्याला दिला होता. (उत्त. ५६)

एकांकी असतांना ते तेल्याच्या घरी जेवले (एकांक. ११), चांभाराच्या हातचा विडा त्यांनी खाल्ला, गोंडवाड्यांतील गोंडांच्या घरी तर अनेकदा आरोगणा करण्याचे प्रसंग त्याजवर आले. (ए. २२). परीभ्रमण करीत असतांना भेटलेल्या गवळ्यांच्या मुलाबरोबर त्यांच्या शिदोऱ्यांतील अन्न त्यांनी सेवन केले. (एकांक. १३) अशी कितीतरी प्रत्यक्ष उदाहरणे आहेत. पण वस्तुतः ते स्वतः आणि त्यांचे अनुयायी चातुवर्णी भिक्षा करून आलेले अन्न सेवन करीत, यात सर्व काही आले. दोन तीन वेळा त्यांच्या भक्तांनी ब्राह्मणांच्या घरी भिक्षा मागितली असे उल्लेख आहेत पण ते अपवादात्मक समजले पाहिजेत. एकवेळ भटोबासांनी एका गावात ब्राह्मणांची घरे नव्हती म्हणून कुणब्याकडून कोरान्न भिक्षा मागितली. (उत्त. २१०); दुसऱ्या एका वेळी लोणी येथे भिक्षा मागत असतांना, आपल्या गावात ब्राह्मणांची घरे थोडी असल्यामुळे तेथील राण्याने (गुरवाने) भटोबासाला 'आगळी' भिक्षा वाढली (उत्त. २३६); स्वामींची साधे नावाची शिष्या होती. तिला त्यांनी एकदा 'साधे हो : गावातु जा : ब्राह्मणाचां घरी रांधा' (उत्त. २२६) असे सांगितले. हीच साधे एकदा स्वामींच्या दर्शनाला येत असतांना रस्त्यात 'एका ब्राह्मणाचेया घरा पाणि पीयायेया गेली' (उत्त. २२९) असे तिनेच म्हटले आहे. असे तीनचार अपवादात्मक निर्देश सोडून दिले तर एरवी वर्णविषमता न पाळता सर्वांचा अन्नोदकव्यवहार होत असे. आपण चातुवर्णी भिक्षा करतो हे तर त्यांचे शिष्य अभिमानाने सांगत. 'पाहावो : उपासनियाची सुन : दीक्षिताची कन्या : नाथपंथी उपदेशु : चातुर्वर्णी भिक्षा करी : पाणिभातु जेवी'...(उत्त. १३६) असे आपले वर्णन आउसाने अभिमानपूर्वक केले आहे. त्याकाळी ब्राह्मण लोक गुरवाच्या हातचे पाणी पीत नसत. पण महदाइसा प्याली. तिला त्यापासून स्वामींनी परावृत्त केले नाही. यावरून महदाइसा व दादोस रामदेव यांच्यात झालेला वादविवाद मोठा उद्बोधक आहे (उत्त. २६९). सारांश, अन्नोदकव्यवहाराच्या बाबतीत त्यावेळची प्रतिष्ठित चातुर्वर्ण्यव्यवस्था चक्रधरस्वामींना मान्य नव्हती, यात शंका नाही.

परमेश्वरप्राप्तीचे साधन आचरतांना देखील चातुर्वर्ण्यातील विषमता त्यांना मान्य नव्हती. समाजातील सर्वश्रेष्ठ म्हणून मानल्या गेलेल्या ब्राह्मणा-

विषयीचे त्यांचे उल्लेख पाहिले म्हणजे ही गोष्ट स्पष्ट होईल. आपले ( अर्थात् ईश्वराचे ) अनुयायित्व स्वीकारण्यापूर्वी साधकाने 'कर्म : धर्म : विधी : विखो : परित्यजौनि परमेश्वरा शरण रिगावे' ( आचार. ५६ ) ही त्यांची आज्ञाच होती. यातील 'धर्म' शब्दात "**देशधर्म** : पायी पायी तने वाटे जाता भाकरी खाणे : एके देशी आंघोळी वांचौनि विडा तोहि न घेणे । दुसरा **ग्रामधर्म** : म्हणजे ग्रामदेवता पूजलेया वांचौनि थुंकी तेही न गिळणे । तिसरा **जातीधर्म** : जैसे कसारी गन्हाचे व्रत धरणे । चौथा **कुळधर्म** : म्हणजे कुळदेवता न पूजिता एकाधा प्रस्तावा पाहणे । पाचवा **चौवर्णधर्म** तोच जैसा ब्राह्मणाचा शिखासूत्र : टिळा : तसेच येरा तिही वर्णांचे जाणावे..." इत्यादि द्वादशधर्म त्यांना अभिप्रेत होते. हे सर्व मोडून दिले पाहिजेत असे त्यांचे स्पष्ट सांगणे आहे. ( आचारबंद. ५६ ), एकवेळ स्वामींनी आउसाला विचारले की "आनो नीका की मार्कंड नीका ?" तिने म्हटले, "जी जी स्वामी जगन्नाथा : अनो नीका नव्हे : तो चातुर्वर्णी भिक्षा करी : मार्कंड नीका :" हे उत्तर ऐकतांना स्वामी बोलले, "ढोरे राखा हो नाएका : एथचेया दर्शनाचेया चाडा ब्राह्मण्याचे सर्वस्व शीखा-सूत्राते धाडिले तो अनो वोखटा ? मां मार्कंडु चांग ?" ( उत्त. १९६ ) यावरून चातुर्वर्णी भिक्षा आणि ब्राह्मण्याचा त्याग स्वामींना कसा आवश्यक वाटत होता हे दिसून येईल. 'ग्रासला साता जीउ देशाचेया सेवटा जाउनि **सर्वाधमत्व ब्राह्मणत्व** स्वीकरील' ( उत्त. ४०२ ) या वचनावरून परमेश्वरप्राप्तीच्या मार्गाच्या दृष्टीने ब्राह्मणत्व कसे सर्वाधम आहे हे त्यांनी सांगितले. आणि ते स्वीकारण्याचा प्रसंग येऊ नये म्हणून आपल्या अनु-यायांना काही बाबतीत त्यांनी सवलतीहि ठेवल्या आहेत. चक्रधरस्वामींना मोक्षमार्गाच्या दृष्टीने विषमतामूलक चातुर्वर्ण्य कसे मान्य नव्हते याची या उदाहरणावरून कल्पना येईल.

## शुचि-अशुचित्व अमान्य

श्रेष्ठकनिष्ठत्व, शुचिअशुचित्व इत्यादि कल्पनाच स्वामींना त्याज्य वाटत होत्या. विटाळजनित विकल्प त्यांनी प्रमादकारक ठरविला याचे कारण हेच होय. असा विकल्प करणे म्हणजे '**उत्तम** म्हणजे ब्राह्मण : आन

**अधम** म्हणजे मातंग ऐसे म्हणे : परि तोहि मनुष्यदेही आन निष्पत्तिकारकचि असे : परि वृथा कल्पना करी ' ( वि. बंद. १८१ ) यावरून धर्मसाधन आचरण्याच्या दृष्टीने स्वामींना ब्राह्मण आणि मांग सारख्याच योग्यतेचे वाटत हे स्पष्ट होईल. " पवित्र म्हणजे गाय : अपवित्र म्हणजे सुणे : एवं दोन्ही पशुदेहचि : आन अमंगलभक्षक : परि कैसी अन्यथा कल्पना करी " ह्या पवित्रापवित्रतेच्या कल्पनाहि त्यांना मान्य नव्हत्या. म्हणूनच आपल्या इतर अनेक भक्तापेक्षा आपल्या विरहाने प्राण सोडणारा डांगरेश कुत्रा त्यांना अधिक श्रेष्ठ वाटला. ( उत्त. ३०५ ). या पवित्रापवित्रतेच्या कल्पनाप्रमाणेच स्पृश्यास्पृश्यत्वाच्या व विटाळाच्या कल्पनाहि त्यांना मान्य नव्हत्या. ' **विटाळ** : म्हणजे मातंगाच्या तथा ऋतुमती स्त्रीयेचा मानी : आन निरयदेही स्थावर शिंदीचा वृक्ष सदा पाणी वाहे तयाचा न मानी : आन आपुला देही लाळसेंबूड वाहे : अथवा मळमूत्र वाहती : अमंगळ द्वारे असती तयांचा विटाळ न मानी ' ( वि. बंद. १८१ ). अशा विटाळाच्या कल्पनेचा त्यांनी त्याग करायला सांगितले आहे. यावरून स्वामी स्पृश्यास्पृश्यता मानण्याच्या विरुद्ध होते. विटाळशीचाहि विटाळ मानण्याचे काही कारण नाही असे त्यांचे मत होते हे स्पष्ट दिसते. मासिकधर्मामुळे विटाळ पाळण्याची काही आवश्यकता नाही असा उपदेश त्यांनी उमाइसाला केला होता. ( उत्त. ३४७ ) हे आपण पूर्वी पाहिलेच आहे. ( मागे पा. ७८ पहा. ). एकदा स्वामी वडाच्या झाडाखाली उभे असतांना समोरून आउसा शौचाहून आली. हातपाय धुतलेले नसल्यामुळे स्वामींना नमस्कार न करता ती पुढे गेली. तेव्हां स्वामींनी तिला हटकले, " हे काइ नाएका : एथचा नमस्कारू के ? " आउसा म्हणाली, " हे काइ जी जगन्नाथा : बापुडा अशुचि असे : " स्वामींनी उत्तर दिले, " मनिचे अभिलाष निवर्तले तरि शुचि अशुचि ये दोन्ही नाही की नाएका : " ( उत्त. ४३८ ). यावरून शौचाशौचाचाहि विधिनिषेध स्वामी बाळगीत नव्हते हे दिसून येईल.

---:०:---

# १३

# विरोधाचे वादळ

## वाढता लौकिक

जीवोद्धरणव्यसनाचा स्वीकार केल्यापासून तो आपल्या प्रयाणकालापर्यंत याच तत्त्वज्ञानाचा व तदनुषंगिक आचारधर्माचा प्रचार करीत करीत चक्रधरस्वामी महाराष्ट्रात अखंड परिभ्रमण करीत होते. आपण ईश्वरावतार आहोत अशी त्यांची दृढ श्रद्धा होती. त्यामुळे, अन्यथाज्ञानाने वाट चुकलेल्या जनतेला खऱ्या ज्ञानाचा उपदेश करून मार्गाला लावणे हे त्यांना आपले पवित्र कर्तव्यकर्म वाटत होते. म्हणून कोठेहि एकाच ठिकाणी मठ किंवा आश्रम बांधून न राहता ते स्वतः भ्रमण करीत होते. जनतेने आपल्याकडे यावे अशी अपेक्षा न करता ते स्वतः जनतेकडे जात होते. तिच्यात मिसळत होते. तिची आध्यात्मिक व सामाजिक सुखदुःखे माहीत करून घेत होते. ती नाहीशी करण्यासाठी गीतोपदिष्ट ब्रह्मविद्येचा आपल्या रसाळ वाणीने जनतेच्या भाषेतून म्हणजे मराठीतून उपदेश करीत होते. त्यामुळे सर्वसामान्य जनता त्यांच्याकडे आकर्षिली जाई. चक्रधरस्वामी स्वतः अतिशय सुंदर होते. तशात त्यांच्या ठिकाणी उत्कृष्ट वक्तृत्व होते. त्यांच्या रसाळ वाणीचा प्रवाह एकदा सुरू झाला म्हणजे श्रोते त्यात न्हाऊन निघत असल्यास आश्चर्य नाही. यामुळे त्यांचे दर्शन घेण्यासाठी आणि निरूपण ऐकण्यासाठी लोकांची गर्दी होई.

पण महात्म्यांचा उत्कर्ष हा सर्वांना सहन होतोच असे नाही. जनतेची दिशाभूल करून श्रेष्ठतेच्या सिंहासनावर बसलेल्या शिष्टांना सज्जनांच्या

उत्कर्षामुळे आपली प्रतिष्ठा कमी होत आहे असे वाटते. म्हणून ते त्यांचा द्वेष करू लागतात; इतकेच नाही तर कोणत्या ना कोणत्या तरी रीतीने त्यांचा काटा आपल्या मार्गातून दूर करू पाहतात. चक्रधरस्वामींनी जीवोद्धरणकार्याला सुरवात केली न केली तोच त्यांना या गोष्टीचा अनुभव येऊ लागला. त्यांनी संन्यास स्वीकार केला तो पैठणला. त्यानंतर तेथेच त्यांना नागांबिका ऊर्फ बाइसा ही शिष्या अनुसरली. बाइसा पूर्वी पयोव्रतमार्गाची अनुयायी होती. आपला मार्ग सोडून ती स्वामींची शिष्या झाल्यामुळे अर्थातच प्रयोव्रत मार्गातील इतर लोक स्वामींच्या आणि तिच्या विरूद्ध भलभलते बडबडायला लागले. पूर्वीचे तिचे शिष्य हंसराज व पांडे हे सुद्धा बडबडत. पण रात्री स्वप्नात पाड्याला जेव्हां यमदूतांनी बडगा दाखविला तेव्हां त्याची बडबड थांबली, व तो स्वामींचा शिष्य बनला. ( भा. २. पा. ३ )

स्वामींचा लौकिक तेव्हांपासून हळूहळू वाढू लागला. देइभट, सारंगपाणीभट यांच्यासारखे पुराणिक त्यांच्या दर्शनाला व उपदेश ऐकण्याला येऊ लागले; इतकेच नाही तर स्वामींना आपल्या घरी नेऊन त्यांचा पूजापुरस्कार करू लागले. (भा. २. पा. ६, ७). जानोपाध्यासारख्या वैदिक पंडिताने अक्षताफुले वाहून व 'सहस्रशीर्षः पुरुषः ' हा वैदिक मंत्र उच्चारून त्यांची पूजा केली. (भा. २. पा. ८ ). कास्त हरिदेव पंडितासारखे विद्वान पुराणे, गीता वगैरे ग्रंथातील आपल्या शंका निवारण करून घेण्यासाठी स्वामीजवळ येऊ लागले. (भा. २. पा. ९). सामान्य लोक तर आपले नातेवाईक आपणाला वाळीत टाकतील किंवा जनता आपणाला नष्टभ्रष्ट म्हणेल या आक्षेपाची पर्वा न करता स्वामींचे उष्टे तांबूल घेऊ लागले. ( भा. २. पा.९). रिद्धपूरहून श्रीप्रभूंचे दर्शन घेऊन स्वामी परत येत आहेत हे कळतांच डोडविहीर येथील राघवदेवाने रस्त्यावर सडासंमार्जन करून गुढ्या उभारल्या आणि भजनी मंडळीबरोबर गाणी म्हणत म्हणत व नाचत नाचत ते स्वामींना सामोरे आले आणि आपल्या घरी घेऊन गेले. ( भा. २. पा. २३ ).

### ब्रह्मवानूकडून विषप्रयोग

स्वामींचा लौकिक जसजसा वाढू लागला तसतसे त्यांच्याकडे मोठमोठे लोकहि आकृष्ट होऊ लागले. रिद्धपूरहून परत आल्यावर स्वामींचा

मुक्काम वेरूळ येथे होता. जवळच यादवांची राजधानी देवगिरी होती. तेथे राजकाजानिमित्त येणारी अनेक मंडळी स्वामींचे दर्शन घेण्यासाठी वेरूळला येऊ लागली. भेटीला आलेल्या लोकांबरोबर स्वामी चर्चा करीत व त्यांना आपल्या तत्त्वज्ञानाचा उपदेश करीत. (भा. २ पा. २४, २५). एके दिवशी महादेवरायाचा राऊत साळीवाहन स्वामींच्या दर्शनाला आला. स्वामींचे हटयोगाचे ज्ञान पाहून तो दिपून गेला. पुढे, यादवांच्या दरबारातील सेवक पाल्हा डांगिया आला. यादवांचे भांडारी गदोनायक हेहि दर्शनाला येऊ लागले. सारांश, 'राजीके तेतुके गोसावीयाचेया दरीसना एति : साळीवाहान : पाल्हा डांगीया हे मुख्य करूनि अवघे राजीके : आणिकहि लोकू ये' (भा. २ पा. ३१, ३५). महादेवराव यादवांच्या दरबारात ब्रह्मसानू आणि महदाश्रम या नावाचे दोन राजपुरोहित होते. दरबारातील राजपुरुष चक्रधराच्या दर्शनाला जातात ही गोष्ट त्यांना आवडेना. कारण त्यामुळे त्यांची प्रतिष्ठा कमी होत होती. एवढे मोठे राजपुरोहित पण त्यांना आता कुणी विचारीनासे झाले. त्यामुळे चक्रधरस्वामीविषयी त्यांच्या मनात वैषम्य निर्माण झाले. 'मूर्तिप्रकाश' कार केशिराज म्हणतो : 'तैसा भक्तजनासहित परेशु : राज्यभक्तिविलासु : ते देखौनि उपजे आवेशु : दुष्टदुर्जनासी ॥ तो जगदात्मा जगदेश्वरू : जीवा चिंतु नेणे वोखटे वीरू : पर पापिये भोगीती ज्वरू : परश्रीसंतापाचा ॥' दुसऱ्याचा उत्कर्ष ज्यांना सहन होत नव्हता अशा या दुर्जनांनी मनात काय आणले ? 'ऐसा श्रृंगारिला परमपुरुषु : देखौनि पापिये करिती रागद्वेषु :' पण नुसता रागद्वेष बाळगल्याने त्यांच्या मनाचे समाधान कसे होणार ? 'वाढवुनी मानमान्यतेचा अभिलाषु : वोखट्या प्रवर्तले' (३१५-३१८)...आपल्या प्रतिष्ठेच्या आहारी जाऊन त्यांनी चक्रधराला जगातून नाहीसे करण्याचे ठरविले. त्यांना भीती वाटली की आज सभाजनावर चक्रधराची छाप पडली आहे, उद्या प्रत्यक्ष राजालाहि तो आकृष्ट करून घेणार नाही कशावरून ? आणि तसे झाले तर मग आपले राजपौरोहित्य टिकणार कसे ? आपणाला विचारणार कोण ? छे छे ! या चक्रधराचा काटा आपल्या मार्गातून काढून टाकला पाहिजे ! त्यांनी चक्रधरस्वामींना विषप्रयोग करण्याचे ठरविले. अत्यंत तीव्र विषांनी माखलेली सुपारीची खांडे त्यांनी आपल्या शिष्यांच्या

हाती पाठविली. ते शिष्य स्वामीकडे आले. त्यावेळी त्यांचा प्रातःकालीन पूजावसर चालू होता. ब्रह्मसानू आणि महदाश्रम यांच्या त्या शिष्यांनीहि स्वामींची पूजा केली व नंतर त्यांच्या हातात सुपारीची ती खांडे दिली. स्वामींनी त्याकडे पाहिले आणि मग ती खांडे त्यांनी तोंडात टाकली. ‘ विषे घोळुनि दातारा : फोडी ओळगविलीया चक्रधरा : ’ पण त्या विषापासून स्वामींना यत्किंचितहि अपाय झाला नाही. कारण ‘ दोष विसरौनि कैवल्य-नाथे : निर्विष केले दृष्टिपाते ’ ( मूर्तिप्र. ३२६ ); आपल्या दृष्टिपाताने त्यांनी त्या विषमिश्रित फोडी निर्विष करून टाकल्या होत्या ! आपणाला विषप्रयोग करणाराविषयी त्यांनी कोणतीहि अनुदार भावना मनामधे आणली नाही, हे लक्ष्यात ठेवण्यासारखे आहे.

## विषप्रयोगाचा दुसरा प्रयत्न

आपला हा प्रयत्न फसल्याचे जेव्हां राजपुरोहितांना कळले तेव्हां त्यांना फार आश्चर्य वाटले. महदाश्रम तर स्वस्थ बसला. पण ब्रह्मसानूच्या मनातील मत्सराची मळमळ नाहीशी होईना. त्याने पुन्हा एकदा प्रयत्न करण्याचे ठरविले. त्याने आपल्या एका शिष्याला पुन्हा स्वामीकडे पाठविले. ‘ आंधारी आसन घालावे : आपुलेनि हाते फोडी श्रीमुखी घालाविया ’ अशी स्पष्ट सूचना त्यांना केली. त्याप्रमाणे त्या शिष्याने स्वामीकडे जाऊन, अंधारात त्यांचे आसन रचून ‘ आपुलेनि हाते श्रीमुखकमळी : फोडी ओळगविलीया चांडाळी ’ ( मूर्ति प्र. ३२८ ). सुपारीची ती खांडे चावून गिळतांच स्वामींच्या सर्व काही लक्ष्यात आले. त्यांनी तोंडातील तांबूल थुंकून टाकला, पण विष तर त्यांच्या पोटात गेलेच होते. त्यामुळे त्यांच्या कपाळावर स्वेदबिंदु आले, अंगाला दरदरून घाम सुटला आणि डोळे एकदम लाल झाले. ते एकदम उद्गारले, “ बाइ : एथ वीषप्रळयो जाला : ’ बाइसा घाबरून गेली. तिची गजबज काय विचारता ! पण स्वामींनी तिला शांत केले. त्यांनी पोटात गेलेले सर्व विष ओकून टाकले. तथापि विषाचा परिणाम थोड्याफार प्रमाणात का होईना, झाल्यावाचून थोडाच राहणार ! स्वामींच्या सगळ्या अंगावर ‘ अणिया अणिया ’ अशा पुटकुळ्या आल्या. ते तीन दिवस नुसत्या दुधावर राहिले. तेव्हां कुठे त्या तीन दिवसानंतर त्यांची विषबाधा पूर्णपणे नाहीशी

झाली. तेंव्हां स्वामी म्हणाले " बाइ : भिया ना : हे राळे मवणे की बाइ : त्यांची पूजा ते होआवीचि असे " ( भा. २. पा. ३५, ३६ ).

## चक्रधर आणि महादेव यादव

ब्रह्मसानू आणि महदाश्रम यांचे, स्वामींना विषप्रयोग करून ठार मारण्याचे हे दोन्ही प्रयत्न अशा रीतीने निष्फळ झाले. त्यांच्या या प्रयत्नामुळे स्वामींच्या मानमान्यतेलो यत्किंचित देखील ओहोटी लागली नाही; उलट ती वाढतच गेली. राजसभेतील गदोनायक, गोपाळ पंडित यांच्या सारखे वरिष्ठ अधिकारीसुद्धा स्वामीकडे आकर्षिले गेले. इतकेच नाही तर काही दिवसांनी महादेवराव यादवालादेखील त्यांच्या दर्शनाचा वेध लागला. त्याचे असे झाले की, देवगिरीहून अनेक सभाजन स्वामींच्या दर्शनाला जात असत. त्यामुळे, एके दिवशी राजा जेंव्हां सभामंडपात आला तेंव्हां त्याला महत्त्वाचे असे अनेक सभासद अनुपस्थित आढळले. राजाने पाल्हा डांगियाला विचारले, " तुम्ही अवघे के जाता ? " पाल्हा डांगिया म्हणाला, " ना : येळापुरी जे पुरुखु असति तेयाचिया दर्शनासि जात असो : " राजाने विचारले, " त्यांचे नाव काय ? " पाल्हा म्हणाला, " श्रीचांगदेव राउळ : " त्याने स्वामींचे नाव घेताक्षणीच राजाच्या ठिकाणी वेध संचरला. तो स्वामींच्या दर्शनासाठी तळमळू लागला. स्वामींचे महादेवराजाविषयी फार चांगले मत होते. शिष्याबरोबर राज्यधर्माच्या गोष्टी करीत असतांना

---

१ काहींच्या मते स्वामी याच वेळा म्हणाले की, " बाइ : हे काइ ऐसेचि जाईल : एथौनि एकाते निमित्य करील आणि या राष्ट्रा बोलु लावींजैल : मग जाइजैल की बाइ :" (भा. २. पा. ३६ ).

२ ब्रह्मसानूने चक्रधरस्वामींना विषप्रयोग केला तो आपल्यापेक्षा त्यांची मानमान्यता वाढू नये म्हणून, ही गोष्ट विचारबंदातील पुढील भाष्यावरून देखील दिसून येईल. ' तथाच कार्मिके तथा दैविके आणिका पात्रासी मान्यता केलेया आपणेयापासि तयाची मान्यता न व्हावी. म्हणौनि दुष्ट संस्कारे ब्रह्मसानाची परी न करावी : आन तेणेहि तयाची अमान्यता होय ऐसे न करावे " " तथाच येळापुरी ब्रह्मसान एवं इतर जाणतेया ब्राह्मणासि तथा अन्यदर्शियासि मान्यता असता तैसा स्थळी तयापासि अपुली मान्यता अधिक होय ऐसे करणे : तेणे येळापुरी ब्रह्मसानासि बोखटे घडले तैसी परी होय : हा आचार " ( वि. बं. २२८ )

एकवेळ त्यांनी "माहादेवोराजा राज्यधर्म जाणे : कान्हरदेवो अस्तिक : रामदेवो निपरवस :" असे आपले मत व्यक्त केले होते. "माहादेवो पात्र : एथीचेया दर्शना एइल : राज्य संपादील : आपण सेवक होउनि वर्तेलः" अशी स्वामींना खात्री वाटत होती. पण महादेवरायाने अशा रीतीने राज्य-त्याग करून विरक्त व्हावे हे स्वामींना मान्य नव्हते. म्हणून त्यांनी त्याला दर्शन दिले नाही. याच निमित्ताने स्वामी वेरूळ सोडून निघून गेले. त्यांचा शोध करीत करीत महादेवराय सिन्नर येथे आला. पण तेथेहि त्यांनी त्याला दर्शन देण्याचे टाळले. एवढा मोठा सम्राट आपल्या दर्शनासाठी येत आहे हे कळताच इतर कोणत्याहि सामान्य पुरुषाला कृतार्थ वाटले असते. तो आपला शिष्य होऊन राहील हे ठाऊक असूनहि त्याच्याकडे पाठ फिरवणारे चक्रधरस्वामी धन्य होत !

अशा निःस्पृहतेमुळे उत्तरोत्तर स्वामींचा प्रभाव एकसारखा वाढू लागला. पण केवळ लहानमोठ्या पुरुषांना आपले शिष्य करून आपली कीर्ती वाढवावी हा स्वामींचा हेतु नव्हता. त्यांना अज्ञान जीवांना खरे ज्ञान सांगून त्यांचा उद्धार करायचा होता: वैदिक मार्गाला लागून क्षुद्र देवीदेवतांच्या उपासनेत व्यर्थ काळक्षेप करणाऱ्यांना त्यांच्या अन्यथाज्ञानापासून मुक्त करायचे होते; ब्राह्मणाप्रमाणेच इतर सर्व वर्णियांना मोक्षाचा अधिकार आहे हे पटवून द्यायचे होते; पुरुषाप्रमाणेच स्त्रियांनीहि ईश्वरोपासना करून मुक्त व्हायला हरकत नाही, कारण पुरुषाच्या व स्त्रीच्या जीवात्म्यांना धर्माधिकार सारखाच आहे या तत्त्वाचा प्रसार करायचा होता; वर्णविषमता आणि शुचिअशुचित्वाच्या कल्पनेमुळे अस्तित्वात असलेल्या विषमतेची कटुता कमी करायची होती; यासाठी गावोगावी आणि वाडोवाडी जाऊन आपल्या तत्त्वज्ञानाचे म्हणजेच ब्रह्मविद्येचे निरूपण करणे हे आपले अवतारकार्य त्यांना पार पाडायचे होते. त्यामुळे राजैश्वर्याचा लोभ त्यांना मोह कसा घालू शकणार ? त्यांनी अखंड भ्रमण सुरू ठेवले ते याचसाठी !

## सनातनी वेदांत्यांचा विरोध

त्यामुळे त्यांच्या मतांचा प्रसारहि झपाट्याने होऊ लागला. त्यावेळी महाराष्ट्रात शंकराचार्यांच्या अद्वैत वेदांताच्या तत्त्वज्ञानाचा पगडा विशेष

होता. अर्थात, चातुर्वर्ण्य, वर्णविषमता, नानादेवतोपासना इत्यादि समाजहित-विघातक रूढींच्या पाशात सगळा महाराष्ट्र अडकून पडलेला होता. चक्रधरस्वामींच्या उपदेशाने हे पाश हळूहळू तुटू लागले. त्यांचे सगळेच तत्त्वज्ञान त्यावेळच्या अन्याय्य रूढींना धक्का देणारे होते. मग ते समाजातील प्रतिष्ठित वर्गाला रुचणार कसे? त्यामुळे आपला वेदांत मार्ग उच्छेदिला जातो, असे त्यांना वाटत होते. आणि एका दृष्टीने हे बरोबरहि होते. चक्रधरस्वामी आपल्या परिभ्रमणात इतर पंथीयाप्रमाणेच वेदांत्याशीहि चर्चा करीत. त्यांच्या आक्षेपांचा परिहार करून त्यांची आपल्या मार्गावर श्रद्धा निर्माण करीत. अयोग्य आचरण करणाऱ्या संन्याशावर ते सडकून टीकाहि करीत. "आम्हाला आधी दंडवत करा; आम्हीच तुम्हाला ब्रह्मविद्या सांगतो." असे म्हणणाऱ्या, सिन्नर येथील भीलमठातील संन्याशांचे वर्तन ऐकून "ब्रटिका : काई म्हणे भगवा... ब्रह्मवीद्या सुपी सूनि विकीजत असीजे" (भा. २ पा. ५७) असे उद्गार त्यांनी काढले होते. प्रकाशदेव (भा. ३ पा. ८५), वसिष्ठदेव (उत्त. २५७, २५८) यांच्यासारखे सत्पुरुष स्वामींचा आदरसत्कार करीत, तर नृसिंहारण्यासारखे पुरुष मत्सराने नुसते जळत. (उत्त. ७२). बीड येथील सारस्वतभटहि स्वामींचे विरोधक बनल होते. कारण स्वामींच्या उपदेशामुळे त्यांचा पद्मनाभी नावाचा शिष्य त्यांना सोडून स्वामीजवळ येऊन राहिला होता. (भा २ पा. ६२). वेदांतानुयायी अनेक लोक आपला वैदिक मार्ग सोडून चक्रधराकडे येऊ लागले होते. गणपती आपयो, पिंपळे वामनभट, गुणाकरदेव, प्रज्ञासागर या सर्वांची वेदांतावरील श्रद्धा उडाली होती व ते चक्रधरांच्या भजनी लागलेले होते. म्हाइभटाचे उदाहरण तर विशेष डोळयात भरण्यासारखे होते. हा षट्शास्त्रसंपन्न गर्वोद्धत वेदांती मोठ्या ईर्ष्येने स्वामीबरोबर चर्चा करण्यासाठी आला होता. पण स्वामींनी त्याला पूर्णपणे निरुत्तर केले. (उत्त. १११). याचा परिणाम असा झाला की लौकरच म्हाइभट श्रीप्रभूजवळ अनुसरला. ब्रह्मसानूच्या पैठण येथील अनेक अनुयायावर स्वामींचा प्रभाव पडला होता. त्याचे शिष्य स्वामींच्या परिवारात येऊन दाखल झाले होते. त्यामुळे मनातून चक्रधराविषयी तो नुसता जळत होता. पैठण येथे असतांना चक्रधरस्वामी अनेकदा शास्त्रमठात जात असत.

महदाश्रमाचे शिष्य तेथे वेदांताचा अभ्यास करीत असायचे. स्वामी त्यांना विचारीत, "वेदांती काई प्रतिपाद्य ?" संन्यासी उत्तर देत, "जी जी : आत्मा :" अशा रीतीने चर्चेला सुरवात झाली की स्वामी त्यांच्या समोर वेदांताचे खंडन करून आपल्या मताची प्रतिष्ठा करीत. त्यामुळे चक्रधरावर श्रद्धा बसून महदाश्रमाचे संन्याशी शिष्य चोरून स्वामींच्या दर्शनाला जात. 'तांबुळाचा प्रसाद घेति : चरणोदक घेती :' हे महदाश्रमाच्या लक्ष्यात येताच त्याने म्हटले की, "आता हे आमचा मार्गु उंच्छेदिती" (उत्त. ३८०).

## महदाश्रमाकडून यंत्रासन-पूजा

यामुळे चक्रधरांचा नाश करण्याचे विचार पुन्हा त्याच्या मनात घोळू लागले. वस्तुतः चक्रधरांचा जनमनावरील प्रभाव कमी करण्यासाठी त्यांच्या तत्त्वज्ञानावर व आचारधर्मावर हल्ला चढवून त्याचे खंडन करणे हा सरळ मार्ग होता. महदाश्रमासारख्या वेदांत्याला तसे करणे जड जात होते. कारण त्यात त्याचा टिकाव लागला नसता. म्हणून तो पुन्हा आडमार्गाने जाण्याचा विचार करू लागला. वेरूळच्या मुक्कामात विषप्रयोग करून चक्रधराला नाहीसे करण्याचा त्याचा प्रयोग फसला होता. म्हणून त्याने आता दुसरी युक्ति केली. कामाख्येच्या देवळात त्याने 'रंगपूजा केली : एंत्रासन रचीले......अवघिया देवता आव्हानुनि उर्ध्वमूखा केलिया :' अशी तयारी करून मग त्याने आपल्या शिष्याकडून चक्रधरस्वामींना पूजेसाठी बोलाविले. यंत्रासन रचून तेथे देवतांना ऊर्ध्वमुख करून ठेवण्याचा हेतु असा की जो

---

१ 'संन्यासिनस्तत्प्रभृतीश्वरं तं समाययुः संनामितुं च रात्रौ । तांबूळमैशं जगृहुस्तदा ते ज्ञातं चरित्रं महदाश्रमेण ॥ उन्मूळयिष्यंति हि मार्गमेनममीति मत्वास विचार्य चित्ते । चकार यंत्रं महदाश्रमोऽसौ सर्वज्ञनाथाय स मूढवर्य :' (रत्नमालास्तोत्र पा. १६२). आपले शिष्य चक्रधरस्वामीकडे वेधले गेले त्यामुळे वैषम्य वाढूनच महदाश्रमाने त्यांचा नाश करण्याचा प्रयत्न केला. विचारबंदकार म्हणतो : "मग आपुले शिष्य उत्तमाधिकरणाचे ठाइ गुणे क्षोभति तरी माहादाश्रमाची परी हो नेदावी : उत्तमाधिकरणे तयाचिये गुरू आज्ञेविरहित संग जवळीक नेदावी" "तथाच **यंत्रासनपूर्वक** एवं अन्यदर्शनीयाचा शिष्य प्रतारीला तरी यंत्रासनपूर्वक माहादाश्रमे वोखटे केले तेणे न्याये"...... (वि. कं. २२८)

त्या आसनावर बसेल त्याचा बळी देवतांनी घ्यावा. चक्रधरस्वामी, बोलावण्या-प्रमाणे आले. पण येताक्षणीच महदाश्रमाचे कपट त्यांच्या लक्ष्यात आले. महदाश्रमाने उठून, स्वामींचे स्वागत करून आसनावर बसण्याची त्यांना विनंती करताच स्वामींनी प्रथम आपल्या डाव्या पायाच्या आंगठ्याने ते आसन हलविले आणि त्या ठिकाणी अंगठा जोराने दाबून ' अवघिया देवता अन्हानुनी उर्धमुखा केलिश होतिया तिया ढाळौनि अधोमुखा केलीया : ' त्यामुळे अर्थातच महदाश्रमाची युक्ति फसली. त्यानंतर ' मग गोसावी आसनी उपविष्ट : वीडा वोळगविला : गोसावी रंगासी रूप केले : जेथचे जे चुकि ते दाखविले : नीके ते मानिले : मग गोसावियासी पूजा केली : वीडा वोळगवीला : मग गोसावी बीजे केले : ' ( उत्त. २९४ ). या यंत्रासनाच्या वेळी स्वामीबरोबर नागदेवाचार्य होतेच. त्यांनी विचारल्या-वरून स्वामींनी यंत्रासनप्रयोगातील महदाश्रमाचे सर्व कपट उकलून सांगितले. अशा रीतीने चक्रधरस्वामींचा नाश करण्याचा महदाश्रमाचा हा तिसराहि प्रयत्न फसला.

## हेमाडपंडिताच्या मनातील वैषम्य

आपले हे प्रयत्न निष्फळ झाले म्हणून महदाश्रम स्वस्थ बसला असे मात्र नाही. आतापर्यंतचे त्याचे दोन्हीतिन्ही प्रयत्न हे वैयक्तिक होते. आता त्याने हेमाडपंडिताचे आणि त्याच्या द्वारा यादवराजाचे साह्य मिळविण्याचे ठरविले. हेमाड पंडित हा यावेळी रामदेवराव यादवाचा मुख्य प्रधान होता. महादेवराय यादवाच्या कारकीर्दीत तो ' श्रीकरणाधिप ' म्हणजे साधा दप्तरी अथवा फडणीस होता. रामदेवरायाच्या राज्यात फडणिसाचा तो मुख्य प्रधान कसा झाला हे एक कोडे आहे. महादेवानंतर राज्यावर बसलेला त्याचा मुलगा आमणदेव, याचे डोळे काढून रामदेव गादीवर बसला. या राज्यक्रांतीत रामदेवाला हेमाद्रीचे साह्य झाले असावे व त्याचे फळ म्हणून

१ रत्नमालास्तोत्रकारानेहि हा प्रसंग वर्णिला आहे. " कदापि देव महदाश्रमेण पूजांच यंत्रासनपूर्वकांच । अकारि शिष्यैः परमेश्वरंच समाह्वयामास च मस्करी तं ॥ समागतस्तत्र विदां वरिष्ठः संपूजयामास तदा परेशं । यंत्रासने संप्रविशन्परात्मा पादेन संचाळितमासनं तत् ॥ " वगैरे ( नेने संपादित रत्नमालास्तोत्र. पा. १२७ ).

त्याला मुख्य प्रधानपद देण्यात आले असावे असे वाटते. यावरून या दोघांच्याहि क्रूरपणाची थोडीफार कल्पना येऊ शकेल. हेमाड पंडिताच्या ठिकाणी आणखीहि एक गुण होता. तो सनातन वैदिक धर्माचा कट्टर अभिमानी होता. आपल्या चतुर्वर्गचिंतामणीत नाना देवतांची व्रते, तत्प्रीत्यर्थ ब्राह्मण-भोजने आणि दानदक्षिणा इत्यादींचे साक्षेपपूर्वक संकलन त्याने केलेले आहे. त्याला चक्रधराने चालविलेले वेदांचे आणि त्यातहि अद्वैतवेदांताचे खंडन, देवतोपासनेचे व तत्प्रीत्यर्थ होणाऱ्या तीर्थक्षेत्रव्रतदानाचे खंडन, 'चातुर्वर्ण्ये-चरेद्भैक्ष्यम्' या शास्त्राचा प्रचार, श्रेष्ठकनिष्ठत्वाच्या भावनेवर आधारलेल्या विषमतेला व शुचिअशुचित्वाच्या कल्पनेला विरोध इत्यादि गोष्टी आवडणे शक्य नव्हते. या सर्व वातावरणाचा उपयोग करून घेण्याचे महदाश्रमाने ठरविले असल्यास आश्चर्य नाही. तशात, चक्रधराविरुद्ध हेमाडपंत क्रुद्ध होण्याला आणखी एक कारण सापडले.

ते असे की, खुद्द हेमाडपंडिताची बायको चक्रधराकडे वेधली गेली. त्यामुळे तो मनात मत्सराने जळफळू लागला. हेमाड पंडिताच्या या पत्नीचे नाव 'देमती'. ती परित्यक्ता होती. हेमाड पंडित तिच्याकडे लक्ष देत नसल्यामुळे ती अत्यंत दुःखात काळ कंठीत असे. एक वेळ स्वामींचा मुक्काम पैठण येथील ढोरेश्वराच्या देवळात असतांना ती त्यांच्या दर्शनाला आली. स्वामींनी तिला प्रसाद म्हणून आपल्या मुखातील ताबूल दिला. तो तिने घेतला. स्वामींच्या चरणीचे चंदन घेऊन ते तिने आपल्या कपाळी लावले. याचा परिणाम असा झाला की हेमाडपंताचे अंतःकरण तिच्याकडे ओढले

---

१. ही संपूर्ण आख्यायिका अशी : "वनिताचंदने स्त्रीये प्रीति ॥ देमती ते हेमाडिपंडिताची राणी : ढोरेश्वरासि आली : श्रीमुखिचे तांबोळ घेतले : श्रीचरणीचे चंदन घेतले : तेणे ते वर्जिली होती : ते चंदन तीया कपाळी लाविले : तीचेया ठाया तो गेला : तीन दी : तो नीगो न म्हणे : हे ऐसे काइ : आधी मी इकडे वास न पाहे : आता मज हे काइ पा : ऐसे पूसिले : मग तीया सांगितले : मज तेया गोसावीयाचेनि दर्शने जाले : तेथौनि चंदन आणिले : म्हणौनि ऐसे जाले : सर्वज्ञे म्हणीतले : स्त्री म्हणौनि आह्याचपणे सांगितले : ते एक खंति : आगा : जो आमचे न मिळ : ॥" (उत्त. ४२४). मला पहावयास मिळालेल्या लीळाचरित्र-उत्तरार्धाच्या बहुतेक पोथ्यात ही आख्यायिका आलेली आहे.

गेले. तो तिच्या अंतःपुरात गेला. तीन दिवस त्याने तिथे कालक्रमणा केली, तरी त्याला तिच्यापासून दूर जावेसे वाटे ना. त्याने देमतीला म्हटले, "आतापर्यंत मी तुझ्याकडे मुळीच लक्ष देत नव्हतो, पण आता मात्र मला तुझा एकसारखा वेध लागला! हे झाले तरी कसे?" साध्याभोळ्या देमतीने भाबडेपणाने सांगून टाकले की, "मला चक्रधरस्वामींचे दर्शन घडले. त्यांच्या चरणीचे चंदन मी आणले म्हणून हे असे झाले." हे ऐकताच हेमाडपंत क्रुद्ध झाला. आपली बायको चक्रधराकडे वेधली गेलेली पाहून त्याच्या मनात संशय उत्पन्न झाला. चक्रधराविषयी त्याला खंती वाटू लागली[१] (उत्त. ४२४).

## सारंगपंडिताच्या मनातील वैषम्य

स्वामींच्याविषयी अशीच खंती सारंगपंडिताच्याहि मनात निर्माण झाली होती. वस्तुतः स्वामी प्रथम पैठणला आले त्यावेळी सारंगपंडिताने आपणहून त्यांना आपल्या घरी बोलावून नेले आणि त्यांचा पूजापुरस्कार केला. त्यानंतरहि अनेक वेळा त्याने स्वामींना उपाहारासाठी घरी बोलाविले. तो व त्याची पत्नी उमाइसा दोघेहि स्वामींच्या दर्शनाला वारंवार जात. स्वामीहि त्यांच्या घरी येत व या दांपत्याची चौकशी करीत. इतकेच नाही तर त्यांची लहान मुलगी धानाइ, हिच्याबरोबर खेळत. सारंगपंडिताची स्वामीवरील श्रद्धा वरवरची होती; पण उमाइसा मात्र त्यांची मनापासून भक्ति करीत असे. एखादे वेळी शक्य असूनहि स्वामींचे दर्शन न झाले किंवा त्यांच्याकडे उपाहार पाठवायला उशीर लागला म्हणजे तिला हळहळ वाटत असे. यामुळे एक वेळ पतीची नजर चुकवून ती स्वामीकडे उपाहार घेऊन गेली. (उत्त. ३०२, ३०३). हे लक्ष्यात आल्यावर सारंगपंडिताच्या मनात, आपल्या पत्नीचे आणि स्वामीचे काहीतरी रहस्य असले पाहिजे अशी अनुदार भावना निर्माण झाली असेल तर त्यात

१ 'एकदा शार्ङपत्नी सा देवताव्रतमाचरन् । रोटद्वयं प्रगृह्यासावाजगाम जगद्गुरूं ॥...... तदंगीकृत्य सर्वात्मा ततोनुज्ञामदापयत् । पथा येनागतासि त्वं पुनस्तेन न गम्यतां ॥ पंडितो याति तेनेति नियुक्ता प्रययौ गृहं । शार्ङविप्रस्तदा काळे समेत्येशं ननाम सः ॥' (रत्नमालास्तोत्र. पा. १३१).

आश्चर्य नाही. त्यालाहि खंती वाटू लागली. " बाई ः पांड्यासि आजिकाली ऐसे वर्तते असे " असे स्वामींनी एकदा बाइसाजवळ म्हटले, ते याच अर्थाने. ( उत्त. ४८८ ).

सारांश, स्वामींचा काहीहि अपराध नसतांना त्यांच्या विषयी हेमाडिपंडित, सारंगपंडित इत्यादिकांच्या मनात आपापल्या स्त्रियासंबंधाने अनुचित अशा अनुदार भावना निर्माण झाल्या. स्वामींच्या चारित्र्याविषयी त्याच्या मनात संशय उत्पन्न झाला. जिकडे तिकडे हीच कुजबुज सुरू झाली. दुर्दैवाने या संशयाला पोषक असे वातावरण स्वामीभोवती निर्माण होऊ लागले.

## ' चांगदेव राउळाच्या ठायी स्त्रियासीचि वेधु '

चक्रधरस्वामींच्याकडे स्त्रिया विशेष आकृष्ट होत असत यात शंकाच नाही. ते स्वतः अतिशय सुंदर होते. त्यामुळे पुरुष देखील त्यांच्या सौंदर्याने मोहीत होत असत, मग स्त्रिया होत असतील यात आश्चर्य काय ! एकांक काळातील भक्ताचे स्वामीवरील अनन्यप्रेम पाहून " स्त्रिया पुरुषाचा ऐसा वेधु नाही : पुरुषा पुरुषाचा काइ वेधु " असे एका ब्राह्मणाने उद्‌गार काढले होते, ते उगीच नाही ! ( एकांक १४ ). पाटवधा येथे केदाराच्या मंदिरात स्वामी आपले अंग अर्धवट उघडे टाकून बसले असतांना तेथे राहीनायक आला. स्वामींचे सौंदर्य पाहून तो इतका विस्मित होऊन गेला की, " आंग उघडे घालि गा जी : डोळेयां हों देइजो पारणे " ( भा. ३ पा. १२ ) अशी स्वामींना विनंती केल्यावाचून त्याला राहवले नाही. स्वामी जोगेश्वरी येथे असतांनाहि असाच एक प्रसंग घडला. एका राउताने तेथे त्यांना पाहिले, आणि त्यांच्या सौंदर्याने आकृष्ट होऊन तो त्यांच्याकडे एकसारखा पाहातच राहिला. तेथून पैठणला जाताच त्या राउताबरोबर साधे होती. स्वामींच्या सौंदर्यावर लुब्ध झालेला तो राऊत वारंवार रस्त्यात उभा राहून साधेजवळ • प्रशंसोद्‌गार काढायचा की, " देखिले गा : कैसे गोसावी बरवे : बहुत राजकुमर देखिले परि ऐसे सूंदर्ये कव्हणा ठायी नाही : वहिया घालिजेति राउळी : आबूलिया घालीजेति माहेरी : मग असिजे गोसावियाचा ठाइ : " ( उत्त. ६० ). स्वामींच्या सौंदर्याचा वेध लागल्यामुळे जेथे पुरुषांना

सर्वसंगपरित्याग करून त्यांच्या जवळ राहावेसे वाटे तेथे स्त्रियांना वाटत असल्यास आश्चर्य नाही. एकांक काळात कळावीत्रीरवणी ही तर त्यांच्या सौंदर्यावर इतकी आसक्त झाली होती की त्यांच्यावर मन ठेवून तिने आपल्या दासीकडून " पूस गे : देवासि काइ देवी असे ? " असे विचारले. तिच्या त्या आसक्तीची गोष्ट आठवूनच स्वामी नाथोबाजवळ दुःखाने म्हणाले की, " प्राणियाते यातेही देखौनि विकारू भोगू आवडे ! " ( एकांक. १७; उत्त. ९० ). कानसा येथील मळ्यात स्वामी बसले असतांना त्यांच्यावर लुब्ध झालेल्या जोगिणीला " अया : कैसे सौंदर पुरुषु : साक्षात गोरक्षनाथु : " असे उद्‌गार प्रत्यक्ष आपल्या नवऱ्याजवळ काढल्यावाचून राहवले नाही. जोगिणीची जर ही स्थिति तर संसारी स्त्रियांची काय अवस्था होत असेल याची कल्पनाच करावी. स्वामींचा मुक्काम पैठण येथे फार असे. त्यामुळे पैठण येथील अनेक स्त्रियांना त्यांचा वेध लागला होता. तेथे असतांना घोगरगावची एक बाई तर केवळ विषयवासनेने त्यांच्याकडे आली होती. पण स्वामींनी तिच्या अंतःकरणातील विषयानंद घालवून तेथे परमानंद प्रगट केला. ( उत्त. ८९ ); पैठणच्या दोन 'सामान्यस्त्रिया' हि अशाच हेतूने त्यांच्याकडे आल्या होत्या. एकदा तर स्वामी ब्रह्मचारीदेवाच्या गुंफेत जात असतांना तेथील अंगणात सडा घालीत असलेल्या बाईने " गोसावियाते देखीले : आणि गोसावीयासि क्षेमालिंगन दीधले : " हे दृश्य पाहून जवळच्या देवळातील ब्राह्मणांनी कुत्सितपणे उद्‌गार काढले : " बाहुल्ये श्रीचांगदेव राउळाचा ठाइ स्त्रीयासीचि वेधु " ( उत्त. २७९ ). अशा गोष्टींचा गावात प्रसार फार लौकर होतो. त्यामुळे पैठणच्या महाजनांचे चक्रधराच्या शीलसंबंधी मत निष्कारणच कलुषित होऊ लागले.

---

१ पैठणच्या महाजनांनी चक्रधरस्वामींचे वोखटे केले ते का, याची कल्पना विचारबंदातील पुढील उताऱ्यावरूनहि येईल : " **हेमाडपंडित : महदाश्रम : ब्रह्मसान : पैठणचे माहाजन : पूतना**... पैठणीचे माहाजन ते आळंच निमित्ते : तथा ज्ञानांकुश " " तथा अधिकरणाचा ठाइ बहुत धर्मरूप बाया असति तयाची झाडपूसपूर्वक सेवा करीता आळंचभावो येवो नेदावा : आन पैठणीचे माहाजन त्याचे वोखटेया प्रवर्तावे " " **मुधादित्यी** महाजन एवं गावो प्रतिकूळ होय ऐसिया क्रिया केलीया पैठणी मुधादित्यी महाजना वोखटे घडले तैसी परी होय " ( वि. बंद. २२० ).

धर्मश्रवणासाठी स्वामींच्या भोवती गोळा होणाऱ्या स्त्रियामुळेहि स्वामींच्या विरुद्ध संशयग्रस्त झालेल्या लोकमतात अधिक भर पडली. वस्तुतः एखाद्या सत्पुरुषाच्या भोवती स्त्रियांचा घोळका जमावा यात आश्चर्य काही नाही. अनेक पुरुष जसे धर्मश्रवणासाठी त्यांच्याकडे येतात तशाच ह्या स्त्रियाहि येतात. त्यांना पाहून "कैसीया गुलगुलीया सातसे परवडी वेटाळुनि बैसलिया असत" (उत्त. ८४) असे सारंगपंडिताप्रमाणे इतर कुणाच्याहि मनात येणे हा त्याचा दोष होय. दर्शनाला आलेल्या स्त्रियांनी स्वामींच्या चरणावर डोके ठेवणे, त्याना क्षेमालिंगनें देणे, स्वामींनी त्यांना आपल्या मुखातील तांबूल देणे, उच्छिष्ट अन्नाचा प्रसाद देणे इत्यादि गोष्टी नित्याच्या असल्यामुळे त्याबद्दल वस्तुतः कुणालाहि काही विकल्प वाटू नये; पण कावीळ झालेल्या माणसाला चंद्राप्रमाणे पांढरेशुभ्र दूध देखील पिवळे दिसू लागले तर त्याला कोण काय करणार ?

## चक्रधरांची दक्षता

आपल्या परिभ्रमणात स्वामींच्या बरोबर बाइसा, महदाइसा इत्यादि म्हाताऱ्या बहुधा असत. पण हा घोळका वाढू न देण्याची ते स्वतःच काळजी घेत. कारण लोकांना हे पसंत पडत नाही. साधेने स्वामींच्या बरोबर जाण्याचा एकदा आग्रह धरला त्यावेळी "तुम्ही सात बाइया : हे एकले बोडिके : तरि लोकविरुद्ध की :" (उत्त २१३) असे त्यांनी म्हटले तें याच अर्थाने. आपल्यावर कोणत्याहि प्रकारचा अपवाद येऊ नये म्हणून चक्रधरस्वामी स्वतः अत्यंत काळजी घेत असले तरी आता विरोधाची वावटळ उठू लागली होती यात शंका नाही. काळदासभटाची तरुण विधवा मुलगी स्वामींच्या दर्शनाला येऊन बाइसाला कामात मदत करू लागली. बाइसा तिला म्हणाली, "बटिकी : बाबा निके : बाबापासि असावे : बाबाची सेवा करावी : बाबापासौनि काही

---

१. भक्तांनी (स्त्रीपुरुष कोणीहि असो) स्वामींच्या वक्षस्थळाला आपल्या मस्तकाचा स्पर्श करणे आणि स्वामींनी आपला उजवा हात कृपापूर्वक भक्ताच्या पाठीवर ठेवणे किंवा फिरविणे हे क्षेमालिंगन होय. पितापुत्री, बंधुभगिनी यांच्यामधे अशा क्षेमालिंगनाची पद्धत अजूनहि आहे. अलीकडे पुत्रीच्या डोक्यावर नुसता हात फिरवण्याची पद्धत अधिक रूढ होत आहे.

गोमटे होईल :" बाइसा बिचारी तिच्या धार्मिक कल्याणाच्या दृष्टीने बोलली. त्या मुलीने ते काळदासभटाजवळ सांगताच ते उद्गारले, "का राहावीति ना : देखीलिसि तरूणि धारी तरि राहाविति ना : या माहात्मेयाचे ते ऐसेचि की :" हेच काळदासभट पुढे "आमचे गोसावी साक्षात श्रीकृष्णचक्रवर्ति : आराधीता मूक्ति : का वीरोधीता मूक्ति" अशी मुक्तकंठाने स्वामींची स्तुतिस्तोत्रे गाऊ लागले, ही गोष्ट निराळी. (भा. ४. पा. १८). पण यावरून स्वामींच्या चारित्र्याविषयी निष्कारण आरोप कसे निर्माण होऊ लागले याची कल्पना येते. "बाइ : एथौनि जरि अव्यवस्था होआवी तरि व्यवस्था ते कोठौनि होआवी :" (विचार. २२२) अशी दृष्टि निरंतर समोर ठेवणाऱ्याकडून असे आचरण होत असेल असे वाटत नाही; आणि त्यांच्या चरित्रात तसा पुरावाहि मिळत नाही. लोकांच्या जिभेला हाड नसते थोडेसे कुठे काही दिसले की यांच्या मनात संशयाचे पिशाच्च उभे राहून ते वाटेल तसे बडबडू लागतात. उमाइसावरून माहादेव पाठक स्वामीविरुद्ध काहीतरी बोलू लागले, तेव्हां स्वामींनी तिला म्हटले, "बाइ : बोलिजे ऐसे एथ काही असे?" तिने उत्तर दिले, "ना जी : काइ नेणो : काइ नेणो : बोलतु असतिः तरि मी काइ करू?" स्वामी म्हणाले, "आपणेया निवारे तरि निवारिजे : नाही तरि स्थानत्यागु कीजे :" (भा. ४. पा. ६, ७). अनेक स्त्रीप्रलोभने समोर आली असतांनादेखील ती परत लावण्याइतके निष्ठावंत व्रत व कठोर मन त्यांच्या जवळ होते हे आपण पूर्वी पाहिलेच आहे. स्वामींचा सर्व व्यवहार उघड असे. लोकापासून लपवून ठेवण्यासारखे असे त्यांच्या जवळ काहीहि नव्हते. नागदेवाविरुद्ध स्वामींचे कान फुंकण्याचा प्रयत्न करण्यासाठी रामदेवदादोसाने त्यांना एकांत मागितला, त्यावेळी ते हेच म्हणाले, "एथ कोण गा लोकांतु असे : अळंचु पाळंचु न किजे : वोठांतरे नीगैल ते देशांतरा जाईल :" नागदेवाविरुद्ध तक्रार करतांना "जी हा नीका नव्हे : हा अनेगा धांडाळाचा असे : गोसावियाचे आइकैल आणि पैन्हा जाउनि भडभडील :" असे जेव्हां दादोसाने म्हटले तेव्हां स्वामींनी एकदम विचारले, "तैसे एथ काइ गा असे? मा : पैन्हा जाउनि भडभडील तैसे एथ काही असे?"

---

१ मागे पा. १८५, १८६ पहा.

म्हणजे, 'दुसरीकडे जाऊन सांगण्यासारखे असे काही आमच्या ठिकाणी आहे काय?' दादोसाने उत्तर दिले. "ना: जी:" (उत्त. १). यावरूनहि स्वामींच्या चारित्र्याची चांगली कल्पना येईल. आसक्त स्त्रियांना ते मुळी आपल्याजवळ राहूच देत नसत. 'जाखुबाइ' नावाची अशी एक स्त्री स्वामींच्याबरोबर राहण्याची इच्छा करीत होती. तेव्हां त्यांनी स्पष्ट सांगितले की "ऐसेयासि एथ राहो नेदिजे:" जाखुबाईने विचारले, "मग ह्या इतर स्त्रिया कशा आहेत?" स्वामींनी सांगितले, "ये काइ माणुसे? ये मरणासि धरणे बैसली असत:" मठातील सर्व कामे करण्याचे तिने कबूल केले, पण स्वामींनी तिला मुळीच राहू दिले नाही. (उत्त. ६४).

## आउसाचे नग्ननृत्य: लोकांचा विरोध

तथापि, एकवेळ स्वामींनी 'साधे'ला जलक्रीडेसाठी बोलावले हे सामान्य लोकांच्या दृष्टीला योग्य वाटले नसावे. "जळकेळि ते कैसी जी" असे तिने विचारल्यावर "हे उदकामध्ये रीगैल: तुम्ही उदकामध्ये रीगा: हे तुमते सींपिल: तुम्ही यातें सींपा:" असे त्यांनी सांगितले. ऐन वेळी साधेच्या आईने तिला बोलावून घेतल्यामुळे ही जळकेली झाली नाही ही गोष्ट निराळी. (उत्त. १४२). आउसा नावाची जोगीण स्वामींच्याबरोबर असायची. ती अत्यंत विरक्त होती. तिची स्त्री-पुरुषबुद्धि नष्ट झाली होती. (मागे पा. ९२ पहा). तथापि चौबारे गावाहून वृद्धासंगमाकडे जात असतांना स्वामी या आउसेच्या पाठीवर बसून गेले, त्यावेळी 'मार्गी गोसावी लोकांचा ठाइ त्रीविधता स्वीकरिली' (उत्त. ४३३). याचा अर्थ असा की, आउसाच्या पाठीवर बसून जात असलेल्या स्वामींना पाहून काही लोकांच्या मनात त्यांच्याविषयी प्रतिकूळ भाव उत्पन्न झाला. वृद्धासंगमावर तर छिद्रान्वेषी लोकांची ही प्रतिकूळता वाढवणाऱ्या गोष्टी घडून आल्या. नागदेवाला आणि आउसेला स्वामींनी जवळच जळत असलेला प्रेताग्नि विझवायला सांगितला. तसे करीत असतांना आउसा एकसारखी भीत होती. विरक्त जोगीण असूनहि तिच्या ठिकाणी भीतीची भावना अद्याप कायम आहे हे पाहून तिची भीति घालवण्यासाठी स्वामींनी नागदेवाकडून तिचे वस्त्र हरण करून घेऊन तिला तसेच स्मशानात बसवले.

तिची भीती नष्ट झाली तेव्हां तिला वस्त्र नेसायला दिले. ( उत्त. ४३३ ). दुसऱ्या दिवशी तेथे आलेल्या नग्न मुनींना त्यांनी आउसेकडून विवस्त्र होऊन क्षेमालिंगन द्यायला लावले. (उत्त. ४३४). आउसेच्या विरक्त वृत्तीची परीक्षा म्हणून या दोन्ही गोष्टींचा अन्वयार्थ विचारवंतांना लावता येणे शक्य आहे. पण आधीच प्रतिकूळ झालेल्या विरोधकांना त्या इष्ट कशा वाटणार ? तशात, त्याच रात्री स्वामींनी तिला सर्वांच्यासमोर नग्न होऊन नृत्य करायला लावले. तिने अट घातली : " जी जी : तरी गोसावी रात्रि करावी :" त्याप्रमाणे ' गोसावी नेत्रावरि श्रीकर धरिले : आवघेया भक्ताकरवि देवविले : रात्रि करा गा म्हणीतले : ' आपल्या बोटांनी आपले डोळे स्वामींनी आणि त्यांच्या भक्तजनांनी झाकून घेतल्यावर आउसा ' विवस्त्र जाली : नाचो लागली : ' नंतर स्वामींनी आउसेला नृत्य थांबवायला सांगितले. ( उत्त. ४३५ ). आउसेच्या या नग्ननृत्याचा आध्यात्मिक अर्थ लावणे फारसे कठीण नाही. शिवाय, त्यामुळे चक्रधरस्वामींच्या नैष्ठिक ब्रह्मचर्यव्रतावर आक्षेप येऊ शकत नाही हेहि खरे. किंबहुना, या दोनतीन प्रसंगांच्या द्वारा आउसेच्या विरक्तीची परीक्षा पाहिल्यावरच स्वामींनी " पोरी आउवेसि मी स्त्री ऐसी बूधिही नाही : पूरुषु ऐसीचि बूधि : स्त्रीत्व हे उछेदौनि गेले " असे प्रशंसोद्‍गार काढले. पण अशा प्रसंगामुळे लोकांचा त्यांच्या विषयीचा संशय वाढला असावा असे दिसते. आउसाच्या पाठीवर बसून स्वामी वृद्धासंगमाला गेले तेव्हांपासूनच लोकामधे त्यांच्याविषयी विपरीतभाव निर्माण झाला, असे ' लीळाचरित्र ' कारांनी सांगितले आहे त्याचे हेच कारण स्वाभाविक होय. सारांश, स्वामींच्या तत्त्वज्ञानामुळे त्यावेळच्या धर्मधुरीणात

---

१ ' नग्नां तदा सोऽपि बळेन नीत्वा प्रतप्त भूम्यामुपवेशयत्तं '; ' कदापि तां चक्रधरः प्रवृत्या नृत्यं विधातुं विनियुज्य नग्नां । विलज्जमाना ब्रुवती कुरु त्वं रात्रि परेशेति तदादिदेवः ॥ नेत्रे कराभ्यां विरळांगुळीभिः विधाय नग्नकृतनृत्यमीशः । निरीक्ष्यमाणो रुचिरं रराम प्रोन्मीलयंस्तरिपदधात्मुहुस्स : '; ' सुवेषतो वेषयुतोऽपि मौनी कदापि नग्नो विचचार तत्र । अदापयत् क्षेम मनोमलांस्तान्विनाशयंश्चक्रधरो धरण्यां ' अशा रीतीने या तिन्ही प्रसंगाचे वर्णन करून त्यांच्या मुळाशी आउसेचे मनोमळ नाहीसे करण्याचा स्वामींचा हेतु रत्नमालास्तोत्रकाराने सांगितलेला आहे. ( रत्नमाला स्तोत्र. पा. १७२, १७३ ).

आधीच विक्षोभ उत्पन्न झालेला होता. त्यात आता त्यांच्या चारित्र्याविषयी संशय निर्माण झाला. लोक आपापसात त्यांच्या विरुद्ध कुजबुजू लागले. तशात, आपल्या पत्नीची स्वामीवर जडलेली भक्ति पाहून सारंगपंडित आणि हेमाडिपंत यांच्या मनात वैमनस्य उत्पन्न झाले. आणि त्यामुळे चक्रधर-स्वामींचे पारिपत्य करण्याचे कारस्थान आकाराला आले. त्याचा पहिला आघात स्वामी वृद्धासंगम येथे असतांनाच त्यांना सहन करावा लागला.

## गुंफेचा नागोवा

एके दिवशी सकाळी मठाच्या आवारात 'उदयाचा पूजावस्वर' झाल्यावर स्वामी आसनावर बसले होते. भोवती अनेक भक्तजन गोळा झाले होते. इतक्यात त्यांना दुरून काही सैनिक येत असल्याचे दिसले. स्वामींनी भक्तजनांना सांगितले "मुनिए आले गा :" ते असे बोलतात न बोलतात तोच बाहेर गलबला चालू झाला. पाइक येऊन पोचले. त्यांनी गुंफेची लुटालूट चालविली. हे पाहून नागदेवाचार्य त्या सैनिकाशी झोंबाझोंबी करू लागले. एका सैनिकाजवळून त्याची ढालतलवार हिसकावून घेऊन ते त्या सर्व पाइकाबरोबर अत्यंत आवेशाने लढू लागले. हे पाहून स्वामी स्वतः बाहेर आले आणि मोठ्याने ओरडून म्हणाले, "वानरेया, वानरेया, हां गा : तुज करवि एथौनि करविले ?...ठेविसि ना तरि एथिचि आण :"-आपली शपथ घालून त्यांनी नागदेवाला शस्त्रत्याग करायला लावला. आलेल्या पाइकांनी सर्व मठ लुटून नेला. त्यांची धाड येताक्षणीच आउसा स्वामींची 'जाडि : पोफळफोडना : चवरि' घेऊन भिंतीवरून उडी टाकून पळून गेली. इतर

१ हेमाडपंडिताने चक्रधरस्वामींचे वोखटे केले याला कारण आपल्या पत्नीची चक्रधरावर जडलेली भक्ति होय हे विचारबंदातील पुढील उताऱ्यावरूनदेखील दिसून येईल. "ना : अधिकरण ईश्वरअधिष्ठित म्हणौनि मुखीचे तांबूल तथा उच्छिष्ट ते प्रसादबुद्धी घे तरा तयाचे समागमीया स्त्रीकल्पनेतव हेमाडासारखे अनिष्टा न प्रवर्तावे :" "**हमाडि पंडित : भीळ : महदाश्रमः ब्रह्मासन : पैठणचे माहा-जन : पूतना** ऐसे संस्काराचे जाणावे :...ते कैसे ? ना : हेमाडपंडित तो चेतन पदार्थ स्त्रीअभिमानार्थे..." (विचारबंद २२० ).

भक्तहि पळाले हे सांगावयास नकोच. नागदेवाने शस्त्रत्याग करताच सर्व पाइकांनी स्वामींना विनंती केली की, "हेमाड पंडिती बोलाउ पाठविले असे :" स्वामींनी ती विनंती मान्य केली. ते त्या पाइकाबरोबर पैठणला गेले. (उत्त. ४४६ ).

## बाइसाची आत्महत्या

काही पाइक चक्रधरस्वामींना घेऊन गेल्यानंतर इतरांनी स्वामींच्या गुंफेतील होते नव्हते ते सर्व सामान लुटले व ते परतायला लागले. हा सर्व प्रकार झाला त्यावेळी बाइसा तेथे नव्हती. त्यादिवशी स्वामींचा पूजावसर झाल्यावर लागलीच ती नाथोबाला घेऊन नदीच्या पलीकडील गावात हाटाला गेली होती. ती हाट घेऊन परत आली. नदी ओलांडण्यासाठी ती नावेत बसली. तेव्हां इतर पाइक दुसऱ्या नावेत बसून या काठावर येत होते. बाइसांनी त्यांना विचारले, "तुम्ही के गेले होतेति :" त्यांनी सांगितले : "श्रीचांगदेव-राउळ गोसावियांचा ठाइ ऐसेनि ऐसे करावेया"... म्हणजे "स्वामींचा नाश करण्यासाठी"..."हा नव्हे नागोवा नेतु असो :" अर्थात्, त्यांनी आपल्या म्हणण्याला पुरावा म्हणून स्वामींच्या गुंफेतून लुटून आणलेले सामान बाइसाला दाखविले. तिने पाहिले तो खरेच ! स्वामींची जाडी त्यात होती. ज्या पालमांड्यात वाती उजळून बाइसा स्वामींचा त्रिकाळ पूजावसर करीत ते पालमांडे त्यात होते. ह्या वस्तु पाहून बाइसांची खात्री झाली की स्वामींचा अवतार समाप्त झाला. बाइसा स्वामींची अनन्य 'भक्त' होती; आणि खरा भक्त परमेश्वरसान्निध्यावाचून जगूच शकत नाही. बाइसाची स्थितिहि तशीच झाली. स्वामींनी प्रयाण केले हे कळताच तिला विरह असह्य झाला; नावेतून तिने नदीत उडी घेतली आणि देहत्याग केला. "श्रीचांगदेवराउळाचिया बाइया घातले घातले" म्हणजे 'उडी घेतली, उडी घेतली' अशी हाकाटी एकदम झाली. तिला वाचवण्यासाठी लागलीच नावाड्यानेहि उडी घातली. पण काही उपयोग झाला नाही. बाइसाची शिष्या हासुबाई हीदेखील काठाकाठाने शोधीत शोधीत बव्हेगावापर्यंत गेली. परंतु बाइसाचे शरीर तिला दिसले नाही. (उत्त. ४४७ ).

पाइकांनी स्वामींना पैठणला नेल्यावर काय झाले ? तेथे मुधादित्याच्या देवळात हेमाडिपंडित, सारंगपंडित आदिकरून पैठणच्या सर्व महाजनांची सभा भरली व त्यात " ना याचा ठाइ स्त्रियाचि वेधति : हे स्त्रीयांचा ठाइ ऐसेनि ऐसे करिती " असा आरोप ठेवण्यात आला. माइते हरी, प्रज्ञासागर इत्यादिकांनी त्यांना पुष्कळ विरोध केला. पण त्याचा काही उपयोग झाला नाही. स्वामींनी, " हे भीक्षु माहात्मे...यणे तुमचे काइ गा केले : ऐसे विचारा : " असे म्हटले. सारंगपंडिताची साक्ष घेण्याला सांगितले. त्यावेळी सारंगपडितांनी विरुद्ध साक्ष दिली. त्यामुळे शिक्षा करण्यासाठी स्वामींना 'काउसेनेचेया देवळा आतु ' नेले. आणि तेथे त्यांचा ' अवयवछेद ' करण्यात आला.

---

१ स्वामीच्या अवयवछेदाचा वृत्तांत व शेवटच्या प्रकरणाचा वृत्तांत दुःखद असल्यामुळे बहुतेक पोथ्यातून तो गाळण्यात येतो. नेने प्रतीत हा अवयवछेदाचा वृत्तांत नाही, तो याच कारणामुळे. मला पहावयास मिळालेल्या **ध. द. न.** अशा तीन प्रतीत मी येथे दिल्याप्रमाणे हा वृत्तांत सविस्तर वर्णन केलेला आहे. इतर पोथ्यात अवयवछेदाची प्रत्यक्ष लीळा गाळली असली तरी त्यापुढील लीळांतून स्वामींचा अवयवछेद झालेला होता हे स्पष्टपणे नमूद केलेले आहे. (**उत्त.** ४४७, ४४८ पहा.) अवयवछेदाची लीळा देणाऱ्या पोथ्यातहि कोणत्या अवयवाचा छेद केला हे स्पष्ट सांगितलेले नाही. तथापि मी पाहिलेल्या **ध. द.** पोथ्यात ' पूजा स्वीकरीली : नाकाची : एकी वासना : कानासहित ' असे वाक्य आहे. त्यावरून नाक कापण्यात आले असावे असे दिसते.

## १४

# शेवटचे प्रकरण

### महात्मा चक्रधर

पैठणच्या पंडितांनी चक्रधरस्वामींचा अवयवछेद करून त्यांची विटंबना केली खरी; पण ती होत असतांना त्यांना स्वामींनी यत्किंचितहि विरोध केला नाही, मग प्रतिकार करणे कुठले ? आपला अपराध नसतांना आपली ही विटंबना होत आहे याची जाणीव असून देखील ते शांत राहिले. प्रतिपक्षियाकडून होणाऱ्या हिंसेचा त्यांनी समचित्ताने स्वीकार केला. कारण ते महात्मा होते, अहिंसेची मूर्ति होते, प्रेमाची प्रतिमा होते. मुंगीशी देखील वैर न चिंतिण्याइतपत उदार अंतःकरण त्यांच्याजवळ होते. वृद्धासंगमी असतांना हेमाडपंताकडून आलेले शस्त्रधर पाइक पाहून ' मुनिए आले गा ' असे म्हणणाऱ्या स्वामींचे अंतःकरण केवढे थोर असले पाहिजे याची कल्पना करावी. म्हणूनच त्या पाइकाबरोबर झुंज घेणाऱ्या नागदेवाचार्यांना त्यांनी आपली शपथ घालून शस्त्रत्याग करायला लावला. आपल्यावर शस्त्र काढून आलेल्या माणसाचाहि शस्त्राने प्रतिकार करू न देणाऱ्या चक्रधर-स्वामींची अहिंसकवृत्ति अत्यंत परमावधीला पोचलेली होती हेच यावरून दिसून येत नाही काय ? हेमाडपंत प्रधानाकडून आलेले निमंत्रण त्यांनी अविरोध मान्य केले याचेहि कारण तेच होय. आणि त्याचमुळे आपल्या शरीरावयवावर शस्त्राघात होत असतांना सुद्धा त्यांनी मुळीच विरोध किंवा प्रतिकार केला नाही. " एथौनि तुम्ही ऐसेया होआवे की हा जनु तुमते डोइये डोइये मारील परि तुम्ही डोइचि ओडवावी की " ( आ. ६३ ) असा

त्यांचा आपल्या शिष्यांना उपदेश होता. ‘ बोले तैसा चाले ’– या वचनाच्या कसोटीवर त्याची परीक्षा होण्याची ही वेळ होती. चक्रधरस्वामी या कसोटीस पूर्णपणे उतरले. आपली विटंबना होत असतांनाहि हूं का चूं न करता त्यांनी या सर्व प्रसंगाला अहिंसात्मक धैर्याने तोंड दिले, यावरून ‘ महात्मा ’ ही पदवी त्यांना यथार्थपणे शोभून दिसते यात शंका नाही ! ( मागे. पा. १८१ पहा. )

## विटंबनेनंतर —

या विटंबनेच्या वेळी नागदेवाचार्य प्रत्यक्ष मुधादित्याच्या देवळात होते की नाही हे सांगता येत नाही. पाइकांनी स्वामींनाच तेवढे नेले होते. त्यामुळे नागदेवाचार्य बरोबर नसावे असे वाटते. तथापि गुंफेचा झालेला नाश आणि बाइसांनी केलेला देहत्याग पाहून अत्यंत दुःखित अंतःकरणाने ते पैठणला गेले असावे आणि मुधादित्याच्या आसपास घिरट्या घालीत असावे असे वाटते. स्वामींचे इतर शिष्य तर त्यांना सोडून केव्हांच पळून गेले होते. अशा स्थितीत आपल्या विटंबनेचे दुःख धैर्याने धारण करून स्वामी परिभ्रमण करू लागले. फक्त नागदेवाचार्य काय ते त्यांच्याबरोबर होते. ते दोघेहि प्रथम पैठण जवळील कावलापुर नावाच्या गावी गेले. तेथें कावसेनेच्या देवळात त्यांनी ती रात्र काढली. त्याच गावात लखुबाइसा राहत होती. नागदेवाचार्य सकाळी तिच्या घरी गेले. ती घरी नव्हती तरी दार उघडून तेथील एक वस्त्र व भरणे ते घेऊन आले. त्यांनी पाणी तापवले. स्वामींनी मुखप्रक्षालन करून वस्त्र परिधान केले. दुसऱ्या दिवशी दोघेहि चापडगावला जाऊन पोचले, तो तेथे आउसा एका देवळात दुःख करीत बसलेली त्यांना आढळली. तिचे सांत्वन करून पुढील दिवशी ते तिघे जवळ-गावला येऊन पोचले. स्वामींच्या अवयवछेदाची वार्ता आता हळूहळू पसरत चालली होती. दाइंबाच्या कानावर ही वार्ता जाताच तो ‘ तुटकिया वाहाणा : फुटकी करवटी : फाटुके धोत्र : फाटुके पांगरूण : मोकळिया झींजिया ’ अशा वेषात स्वामींचा शोध घेत घेत जवळगावला येऊन पोचला; आणि स्वामींना दंडवत करून त्यांनी ही अवयवछेदाची ‘ लीळा स्वीकारल्याबद्दल ’ दुःख करू लागला. ( उत्त. ४४९ ). आपल्या आसनासाठी स्वामींनी

नागदेवाचार्याला एक देऊळ पाहायला पाठविले. ते 'देऊळ पडैल पडैल ऐसे होते :' देऊळ पाहून परतल्यावर स्वामींनी विचारले, "देऊळ कैसे ?" नागदेवाचार्यांच्या मनात, महदाश्रमाने मुधादित्याच्या देवळात जी 'पूजा' केली ती जाचत होतीच. ते म्हणाले, "असे माहादाश्रमाचिए पूजेसारखे :" हे शब्द ऐकताच स्वामींना फार वाईट वाटले. आपल्या शिष्याच्या ठिकाणी अजून समचित्तता आलेली नाही हे पाहून त्यांना दुःख झाले. ते त्यांना म्हणाले, "तुम्ही महात्मे की गा : तुम्हा मारिता पूजिता समानचि होआवा की गा : मुक्तीची चाड तेणे मुंगिए वीरू न चिंतावे :" (उत्त. ४५०). या उपदेशावरून स्वामींचा अवयवछेद करविण्याच्या कारस्थानाच्या मुळाशी महदाश्रम प्रामुख्याने असावा असे वाटते. तथापि त्यावरूनच स्वामींच्या अंतःकरणाची आत्यंतिक उदारताहि दृष्टोत्पत्तीस येते.

### अवयव-स्वीकार

स्वामींचे परिभ्रमण पुन्हा सुरू झाले. ते आंत्रा या गावी गेले. तेथे स्वामींचे एक भक्त घुइनायक हे राहत होते. त्यांची भेट घेऊन नागदेवांनी त्यांना सांगितले, "घुइनाएको : गोसावी बीजे केले असे : पर : गोसावी ऐसे स्वीकरले असे :" श्रद्धाळु घुइनायकाने उत्तर दिले, "गोसावी ईश्वरू : ईश्वरी काइ छेदभेद असेति : हे ईश्वरीची इच्छा म्हणा :" स्वामींच्या दर्शनाला तो आल्यावर स्वामी त्याला आपणहून म्हणाले, "घुइनायका : देवो ऐसा असे !" तेव्हांहि घुइनायकाने श्रद्धाशील अंतःकरणाने एवढेच म्हटले की, "ईश्वरी काइ छेद असेति : हे ईश्वरीचि इच्छा म्हणा : ऐसे पापिये काइ जी केले : ?" (उत्त. ४५७). स्वामींचा अवयवछेद झाल्यामुळे नागदेवाचार्य व आउसा यांना फार दुःख वाटत होते. स्वामींची ही प्रवृत्ति पाहून ते दोघेहि 'रडो लागले :' स्वामींनी त्यांची समजूत घालण्याचा प्रयत्न केला. ते म्हणाले : "आवघेया देहामध्ये

---

१ महदाश्रमाच्या पूजेचा हा उल्लेख त्याने शास्त्रमठात केलेल्या यंत्रासनपूजेचाहि घेता येणे शक्य आहे. (मागे पा. १८२ पहा). पण पूर्वापर संबंध आणि प्रसंग लक्ष्यात घेता हा उल्लेख मुधादित्याच्या देवळातील पूजेचाच होय, असे वाटते.

इतुला ऐसा अवेवू उणा म्हणा..."..."अरे रडता कशाला ? मी स्वतः तर तुमच्या जवळच आहे ना ? त्या माझ्या शरीराचा एवढासा अवयव उणा झाला असे समजा." पण या उपदेशाने त्या सच्छिष्यांचे समाधान झाले नाही. ते अधिकाधिक रडू लागले व दुःख करू लागले. त्यांनी स्वामीजवळ हट्ट धरला की "हे मागुते स्वीकरावे : जी : आमचे मुख उजळ करावे :" स्वामी म्हणाले, "मी हा अवयव स्वीकारीन पण त्याचा फारसा उपयोग नाही. कारण माझ्याविरुद्ध एक प्राणी अजून मनात जळतो आहे. त्यामुळे आता आमचा देह राहणे शक्य नाही." (उत्त. ४५८). स्वामींनी असे सांगितले तरी "जी : जी : मुख उजळ करावे :" असा आपला आग्रह शिष्यानी सोडला नाही. तेव्हां त्याच्या आग्रहाला मान देऊन स्वामी तीन दिवस एकांतात राहिले व तेथे त्यांनी आपल्या सामर्थ्याने तुटलेला अवयव पुन्हा स्वीकारला. तीन दिवसानंतर स्वामींची 'बत्तीसलक्षण श्रीमूर्ति' पाहताच नागदेवाचार्य व आउसा याचा आनंद काय विचारता ? "गोसावी माझा लळा पाळिला" म्हणून नागदेवाचार्य स्वामींना दंडवते घालू लागले. आउसा येऊन पोचताच तिनेहि स्वामींची पूर्ववत श्रीमूर्ति पाहून दंडवते घातली. भटोबास धुइनायकाला ही आनंदाची बातमी सागायला गेले. त्यानी धुइनायकाच्या घरून पाण्याचा डेरा आणला, पाणी तापत ठेवले, स्वामींच्या अंगाला मर्दना दिली व त्याना स्नान घातले. आउसा तर म्हणाली, "जो जी जगन्नाथा : एक सीस : मा काइसेन वोवाळी !" (उत्त. ४५८).

## बीजे करण्याची प्रवृत्ति

स्वामींनी अवयव स्वीकारल्यामुळे नागदेवाचार्य आणि आउसा यांना झालेला आनंद गगनात न मावण्याइतका असला तरी तो फार टिकला नाही. या अवयव-स्वीकारामुळे स्वामींचे आणि त्यांच्या शिष्यजनांचे मुख उजळ झाले. जो आरोप त्यांच्यावर गैरसमजामुळे किंवा दूषित दृष्टीमुळे ठेवण्यात आलेला होता त्याचे निराकरण होण्यास यामुळे कदाचित मदतहि झालेली असावी. तथापि आता स्वामींनी महाराष्ट्रातील आपले अवतारकार्य संपविण्याचे ठरविले आहे हे सर्वांना स्वच्छ दिसून आले. स्वामींच्या तोंडून

असे सूचक उद्‌गारहि वारंवार बाहेर पडू लागले. वृद्धासंगमी गुंफेचा नागोवा झाल्यानंतर 'स्वामींचा आम्ही वध केला' अशी खोटीच बातमी बाइसांच्या कानावर पडल्यामुळे त्यांनी गंगेत उडी टाकून तात्काळ देहत्याग केला, हे कळताच स्वामींना अतिशय दुःख झाले. ते उद्‌गारले, "बाइसांनी देहत्याग करण्याची घाई उगीच केली. नाही तरी सहा महिन्यांनी आम्हाला प्रयाण करावे लागणारच आहे!" 'स्नेहे झळंबौनि बोलिला सर्वज्ञरावो : बाइसी का केला वेगी लवलाहो : ईश्वरी भक्ताच्या पढियावो : आत्मयारामासी' (मूर्ति प्र. ३०१). यावरून आपल्यावर येऊ घातलेल्या अरिष्टाची व त्या निमित्ताने महाराष्ट्रातील आपले जीवित-कार्य पूर्ण करण्याची कल्पना त्यांना आधीच आलेली होती हे स्पष्ट दिसते.

## महदाइसेची भेट

हे शेवटचे सहा महिने स्वामींना फार कष्टात काढावे लागले. शिष्यजनाकडूनहि त्यांची बरीच आबाळ होऊ लागली. अवयवच्छेदाच्या रूपाने समाजातील प्रतिष्ठितांचा कोप प्रगट झाल्यावर लोक त्यांच्यापासून दूर राहू लागले असल्यास आश्चर्य नाही. स्वामींच्या भेटीला दाइंबाच काय तो आपणहून उत्कंठेने आला होता. इतरांना स्वामींनी बोलावणे पाठवले. तसे त्यातून उपाध्ये फक्त आले; इतर कोणीहि आले नाही. त्यामुळेच 'खचले प्राणिए : गेलिया बुधी' म्हणजे 'प्राण्यांची आमच्यावरील श्रद्धा नाहीशी झाली; त्यांचा धीर खचला.' असे उद्‌गार त्यांनी काढले. (उत्त. ४५१). म्हाइभट, महदाइसा यांच्यापैकीहि कोणी तावडतोब त्यांच्याकडे आले नाही. स्वामींनी म्हाइभटाला बोलावून आणण्यासाठी हासुबाइला रितपूरला पाठवले. तो निरोप ऐकल्यावर मात्र ते तावडतोब आले. पैठण येथील प्रसंग झाल्यानंतर जवळ जवळ तीन महिन्यांनी महदाइसा स्वामींच्या भेटीला आली. तिला पाहून स्वामींच्या अंतःकरणात दुःख दाटून आले. ते स्वतः महदाइसाला म्हणाले, "बाइ, एखाद्याच्या घरी कुणी सरते, मरते तर त्याची चौकशी करतात, घरच्या लोकांचे समाधान करण्यासाठी त्याला भेटावयाला जातात. आमच्या बाबतीत तुम्ही इतकीहि आस्था दाखविली नाही!" आणि मग महदाइसाने क्षमायाचना करून आपण का येऊ

शकलो नाही याची कारणे सांगितली. स्वामींच्या अवयवछेदावरून गोष्टी निघाल्या तेव्हां महदाइसा आपणहून म्हणाली, "हा लोकु दुराराध्य : ईश्वरपुरुषु होति तयाते त्रसवितीति : होए : देखो न शकति :"(उत्त. ४८३). 'सामान्य लोकांना वस्तुस्थिति काय आहे ती कळत नाही. एकदा त्यांनी काही मनात घेतले की त्यांचे समाधान करणे कठीण असते. साधु पुरुषांना हे लोक नेहमीच त्रास देत असतात !' महदाइसेचे हे म्हणणे किती खरे होते. (उत्त. ४८२). स्वामीवर आलेल्या वृथा आरोपावरून मग तिने ज्ञानांकुश नावाच्या सत्पुरुषाची हकीकत स्वामींना सांगितली. ती अशी:

## ज्ञानांकुशाची आख्यायिका

एका गावात ज्ञानांकुश नावाचे सत्पुरुष होते. त्यांच्याकडे पाहून त्या गावातील स्त्रियांना त्यांच्याचसारखी मुले होऊ लागली. तेव्हां गावातील लोकांनी म्हटले की हे व्यभिचार करतात. शिक्षा म्हणून आता यांना 'खैरी जुंपा :' ज्ञानांकुश म्हणाले, "मला उगीच का शिक्षा करता ? माझ्यावर ठेवलेल्या आरोपाबद्दल अगोदर नीट चौकशी करा." पण लोकांनी ऐकले नाही. त्यांनी तेल्याचे बैल आणले आणि ज्ञानांकुशांना 'खैरी जुंपले.' पण बैल बुजले. ते काही केल्या चालेनात. तेव्हां ज्ञानांकुश हे ईश्वरपुरुष आहेत असे समजून त्यांना सोडून देण्यात आले. मग आपल्यावरील वृथा आरोपाचे निराकरण करण्यासाठी ज्ञानांकुशाने एक युक्ति केली. त्यांनी गावाच्या वेशीजवळ दोन नंदीबैल करून उभे केले. एक स्फटिकाचा आणि दुसरा तांब्याचा. गावातून बाहेर पडतांना आणि आत शिरतांना गाई त्यांच्याकडे मोहीत होऊन पहात असत. परिणाम असा झाला की गावातील सगळ्या

१ स्वामींच्या अवयवछेदाची (व शेवटच्या प्रकरणाची) हकीकत रत्नमालास्तोत्रात नाही. हा वृत्तांत दुःखद असल्यामुळेच त्याचा अंतर्भाव केला नसावा. तथापि, स्वामींना झालेल्या अवयवछेदाच्या उपद्रवाचे वर्णन अप्रत्यक्ष रीतीने आलेले आहे. ते असे : '...तया परेशो महदंबयासौ चक्रे निजोपद्रवगोष्टिमीशः ॥ आकर्षित कोडगथाह नारी यथाश्रुतं तां मुहुराह देवः । यदात्मरक्षां न शशाक कर्तुं किं वोभिरक्षेत्किमुपागतं तत् ॥ तमाह नारी परचक्रपाणिं भूतानि साधूष्वपकारकाणि...' (रत्नमालास्तोत्र. पा. १७४)

गाईंना त्या नंदीसारखीच वासरे होऊ लागली. हे पाहताच मग मात्र लोकांचा संशय फिटला. शानांकुशाच्या शीलाविषयी त्यांची खात्री पटली. ( उत्त. ४७३ ).

महदाइसेने सांगितलेल्या कथेवरून, चक्रधरस्वामीवर पैठणच्या पंडितांनी कोणता आरोप केला होता व त्यापासून ते निर्दोष कसे होते याची स्पष्ट कल्पना येईल. चक्रधरावर पैठणच्या महाजनांनी केलेला आरोप खोटा होता, स्वामी पूर्णपणे निर्दोष होते असेच या आख्यायिकेच्या द्वारा सूचित होत नाही काय ?

## अखेरचे दिवस : निरवानिरव

महदाइसा स्वामींना भेटायला आल्यावर स्वामींच्या आरोगणेची वगैरे व्यवस्था नीट होऊ लागली. पूर्वी स्वामींची सर्व व्यवस्था बाइसा करीत असत. पण त्यांनी देहत्याग केल्यामुळे आणि इतर शिष्य पांगल्यामुळे आता स्वामींची काळजी घेणारे त्यांच्याजवळ कोणी राहिले नाही. लखुबाइसा नावाची एक म्हातारी कशीतरी सेवा करू लागली. एकवेळ देमाइसा स्वामींच्या दर्शनाला आली, तिला राहण्याला स्वामींनी सांगितले. लखुबाइसानेहि आग्रह केला. पण ' मी न ऱ्हाये ' असे निग्रहपूर्वक सांगून ती निघून गेली. ( उत्त. ४६१). ' गोसावीयाचे सेवादास्य ठकत असे —' म्हणून नागदेवाचार्य आपल्या बहिणीला-उमाइसाला बोलवावयाला गेले; पण घरच्या अडचणीमुळे तीहि येऊ शकली नाही. स्वामीबरोबर आउसा होती; पण स्वयंपाकपाणी करून ते वाढण्याची रीतभात तिला अगदी नव्हती. आणि लखुबाइसांचा स्वयंपाक म्हणजे काय विचारता ? " एथौनि म्हणीतले अलोणी तरि ये खारट करिती : खारट म्हणीतले तरी अलोणी करिती : एथौनि जरी हीरवे म्हणीतले तरि ये करविती करपले : करपले म्हणीतले तरि ये हीरवे करिती : " तिला काहीहि सांगितले तरी ती ऐकत नसे. डेराभर पाणी तापवून ती स्वतःचे अंग घासून पुसून धूत असे. पण स्वामींना कधी तिने आंघोळीला पाणी दिले नाही. स्वामी दुःखाने म्हणाले : " बाइसा मागा मादणे ऐसे हे परिभाषहि नेणे ' म्हणजे बाइसाच्या मागे स्नान हा शब्दहि मी ऐकला नाही." इतके दिवस म्हणजे जवळजवळ तीनचार महिनेपर्यंत स्वामींनी स्नानहि

केले नाही हे कळताच महदाइसेलाहि फार दुःख झाले. तिने स्वामींना उत्तम स्नान घातले आणि बाइसाप्रमाणे ती स्वामींचा पूजावसर करू लागली.

तथापि, दुधाने जीभ पोळली म्हणजे मनुष्य ताक देखील फुंकून पितो तसे नागदेवाचार्य वागू लागल्यामुळे महदाइसेलाहि अवघडल्यासारखे होऊ लागले. स्वामींच्या मठापासून दूरच्या मठात ती उतरली होती. कधी तिला परत जायला अंधार व्हायचा; कधी ती सकाळी फार फार लौकर यायची. यामुळे स्वामीवर पुन्हा आक्षेप येणाच्या भीतीने नागदेवाचार्य तिच्यावर वारंवार रागावू लागले, "हे अवघे ओखटे तुम्हीचि केले:" (उत्त ४८९) म्हणजे तुमच्यासारख्या स्त्रियाच्यामुळेच झाले. एकवेळ स्वामी वाळवंटात बसले असतांना समोरून महदाइसा धोत्रे धुवून येत होती. स्वामी जवळच असल्यामुळे त्यांना डावलून जाणे योग्य होणार नाही म्हणून ती त्यांना दंडवत करावला गेली. तेव्हां नागदेवाचार्य रागावून म्हणाले, "हे काइ रूपै : राना आलेयाहि पर तुम्हा हाती जिवो तथा असो न ल्हावो : हे घाटिचे ब्राह्मण देखत असेति : हे अवघे होताए तुम्हा स्त्रियांचेनि की : आझुइ कैसी आलीति : हे अवघे वोखटे होए ते तुम्हीचि केले :" नागदेवाचा हा वृथा कोप पाहून स्वामींनी त्यांना शांत केले; आणि यापुढे "आता म्हातारी तुम्हांसि लागे की गा : कव्हणेही अर्थे वंचीजेना" म्हणून महदाइसेची काळजी नागदेवाचार्यांना घ्यायला सांगितले, आणि महदाइसेलाहि नागदेवाची योग्यता ओळखून त्याला योग्य तो मान देण्यास सांगितले

## बीजे करण्याची प्रवृत्ति

स्वामींनी चालवलेली ही निरवानिरव पाहून, अर्थातच दोघांनाहि फार वाईट वाटू लागले. नागदेवाचार्य तर एकदम रडायला लागत. एक दिवशी नागदेवाचार्य भिक्षा मागून आले व स्वामींच्याजवळ बसले. तेव्हां स्वामींनी त्यांच्या खांद्यावर मोठ्या प्रेमाने आपला हात ठेवला. नागदेवाचार्य तो हात चुरू लागले. स्वामी म्हणाले, "बापुडे वानर आता एणेवीन एकले असैल :" हे ऐकून 'भट दुःख करू लागले :' स्वामी म्हणाले, "वानरेया : रडिजे ना की गा : रडिलेया काजळी पडे" (उत्त. ४९८). तथापि केवळ अशा उपदेशपर शब्दांनी आणि तत्त्वज्ञानाने नागदेवाचार्यांचे

रडे थोडेच थांबणार होते. स्वामींची बीजे करण्याची प्रवृत्ति पाहून ते वारंवार दुःख करीत. तेव्हां स्वामी एकदा त्यांना म्हणाले, " अरे, मी शरीराने दूर जाणार असलो तरी अंतःकरणाने निरंतर तुमच्या जवळच आहे. मी तुम्हाला उपदेशिलेली वचने हाच तुमचा यापुढे खराखुरा ईश्वर. ती माझी वाङ्मयी मूर्ति तुमच्याजवळ नेहमीच असणार असल्यामुळे वस्तुतः मी तुमच्यापासून दूर नाहीच ! "

स्वामींना 'बीजे करण्या' ची प्रवृत्ति झाली याचा सरळ अर्थ असा की, पैठणचे महाजन आणि तशात महदाश्रम, ब्रम्हसानु, हेमाडिपंडित यांच्यासारखे राजप्रिय लोक आपल्या विरुद्ध झालेले पाहून आता लौकरच केव्हां ना केव्हां तरी त्यांच्या रोषाला आपणास बळी पडावे लागणार याची स्पष्ट चिन्हे स्वामींना दिसू लागली होती. आतापर्यंतच्या अनुभवावरून, विशेषतः मुधादित्याच्या देवळात झालेल्या प्रकारावरून हा रोष कोणत्या रूपाने आपणावर कोसळणार आहे याविषयी त्यांना शंका नव्हती. म्हणूनच त्यांनी ही निरवानिरव चालवलेली होती. ज्यांची ज्यांची भेट व्हावी असे त्यांना उत्कटतेने वाटत होते त्यांच्यात्यांच्याकडे त्यांनी बोलावणी पाठवली. ते आल्यानंतर त्यांच्याकडून जे काय 'करणीय' करवून घ्यायचे होते ते करवून घेतले किंवा ते करण्यासाठी त्यांना प्रवृत्त केले. म्हाइभट, नागदेवाचार्य ह्यांना त्यांनी याच दृष्टीने काही गोष्टी आचरायला सांगितल्या. आपल्या मागे आपल्या तत्त्वज्ञानाचा प्रचार व्हावा म्हणून नागदेवाची त्यांनी आचार्य-पदी स्थापना केली. आपल्या पश्चात आपल्या अनुयायांनी कसे वागावे हे त्यांना कळावे म्हणून स्वामींनी असन्निधानधर्म त्यांना उपदेशिला.

## वातावरणातील गुणगुण

अशा निरवानिरवीत बेलापूर येथे स्वामींचे दिवस चालले होते. तिकडे महदाश्रम, हेमाडपंत वगैरे मंडळीहि स्वस्थ बसली नव्हती. वस्तुतः पैठण येथे मुधादित्याच्या मंदिरात सभा भरवून तेथे महाजनांनी स्वामींना शिक्षा सुनावल्यानंतर आणि ती अवयवछेदाच्या रूपाने अमलात आणली गेल्यानंतर या विरोधकांची मने शांत व्हावयास पाहिजे होती. पण तसे झालेले दिसत नाही. भक्तजनांच्या आग्रहावरून स्वामींनी आपला तुटलेला

अवयव पुन्हा स्वीकारल्यामुळे तर पुन्हा विरोधकांनी उठाव केला नसेल ना ? ते काहीहि असले तरी बेलापूर येथे असतांना स्वामींना एके दिवशी गुणगुण लागली. त्यांच्या विरुद्धच्या आरोपाचे गाऱ्हाणे आता राजापर्यंत जाऊन पोचलेले होते; आणि त्याने शिक्षा म्हणून स्वामींना 'वोखटे' करण्याचे ठरविले होते. ही बातमी स्वामींना कळली. एके दिवशी ते आउसाला म्हणाले, "नायका, आता आम्हाला राजाकडून बोलावणे येईल. आम्हाला नेण्याकरिता त्याच्याकडून पालखी येईल. आम्हाला घेऊन जातील आणि वोखटे करितील." आउसा दुःखोद्विग्न होऊन म्हणाली : "जी जी स्वामी जगन्नाथा, असे होऊ देऊ नका. आपण आम्हा सर्वांना अशा रीतीने सोडून गेलात तर मग आम्ही कोणाला शरण जावे ?" स्वामींनी उत्तर दिले, "आमचे असे वोखटे झाल्यानंतर तुम्ही सर्वांनी श्रीगोविंदप्रभूच्या आश्रयाला जावे." ( उत्त. ५०३ ).

## राजाकडून बोलावणे : शिरच्छेद

त्यानंतर लौकरच एके दिवशी खरोखरच राजाकडून पालखी आली. पालखी कशासाठी आली आणि पुढे आपले काय होणार आहे हे ठाऊक असूनहि चक्रधरस्वामींनी पालखीमधे आरोहण केले. स्वामी आपणाला कायमचे सोडून जात आहेत हे लक्ष्यात येऊन नागदेवाचार्यदेखील पालखी बरोबर धावू लागले. सायंकाळच्या सुमारास पालखी खोकरगावला जाऊन पोचली. तेथे सर्व जण रात्रभर राहिले. दुसऱ्या दिवशी सकाळी स्वामी पुन्हा पालखीत बसले. भोयांनी पालखी बंदीशाळेजवळ नेली. काही सेवक राजाकडे बातमी देण्यास गेले. नागदेवाचार्य स्वामींना विनंती करू लागले, "जी : प्रवृत्ती भंगिजो जी :" म्हणजे 'बीजे करण्याची जी इच्छा आपण स्वीकारली आहे ती मोडावी.' तेव्हां स्वामी म्हणाले, "राओ याते बोलावील तरि प्रवृत्ती भंगैल गा :"–अर्थात्, "राजा जर मला काही विचारील आणि बोलायला संधी देईल तर सर्व काही त्याजजवळ मी सांगून टाकीन आणि मग बीजे करण्याचे कारण राहणार नाही. असे बोलणे होत आहे तोच भोई पालखी घेऊन कीर्तिखांबापाशी गेले. तेथे राजा स्वतः आला होता. त्याच्या बरोबर हेमाडिपंडित, ब्रह्मसानु, महदाश्रम वगैरे होतेच. स्वामी

पालखीत बसले होते, पण त्यांच्या पायाचा अंगठा बाहेर होता. तो पाहून राजा म्हणाला, "कैसा जोगी बरवा दिसे!" राजा असे बोलतो तोच नागदेवाचार्य पुन्हा पालखीजवळ जाऊन स्वामींना "जी : प्रवृत्ति भंगिजो जी : बोलिजो जी :" म्हणून विनंती करू लागले. त्यांना पालखीपाशी जातांना पाहून तेथील एक चांडाळ एकदम म्हणाला, "हाणा हाणा : याते परता लोटा :" त्याप्रमाणे एकाने नागदेवाचार्यांना कांबीने टोला मारला. त्यामुळे नागदेवाचार्य तेथून जाऊ लागले. स्वामींनी त्यांना राहविण्याचा प्रयत्न केला पण "ना जी : हे मज पाहावे ना :" असे म्हणून नागदेवाचार्य परत फिरले. राजाने आज्ञा केली, "दांडी घेउनि जा : बोखटे करा :" अशी राजाज्ञा होताच भोई पालखी घेऊन निघाले.

भोयांनी ती पालखी, घाटाखाली हातियाळे नावाच्या तळ्याजवळ आणली. त्याठिकाणी स्वामींना त्यांनी उतरायला सांगितले. त्याप्रमाणे स्वामी तेथे उतरले. ते उतरताक्षणीच अमरा, गांगा आणि मैळा या नावाचे तीन चांडाळ त्यांच्या बाजूंनी आपापली शस्त्रे घेऊन उभे राहिले. त्यापैकी मैळा याने स्वामींना वधासाठी तयार होण्याचे सांगून त्याने आपले शस्त्र उपसले आणि "खर्ग घातले : श्रीकमळ एकीकडे पडले : श्रीमूर्ति धड एकीकडे पडले." स्वामींचे शिर धडापासून वेगळे होताच ते चांडाळ आणि ते भोई सर्वजण तेथून परतले.

## पुनश्च पूर्ववत्

तो काय आश्चर्य सांगावे ? तळ्याच्या पाळीवर जवळच एक नाथपंथी बसले होते. त्यांना तेथे एक महाचमत्कार आढळून आला. एका क्षणापूर्वी मैळा चांडाळाच्या खड्गाने धडापासून वेगळे झालेले स्वामींचे शिर हलू लागले. तिकडे ते धडहि हलू लागले. 'श्रीकमळ एकीकडोनि चालीले : श्रीमूर्तीधड एकीकडोनि चालिले : आन दोन्ही जडली : मीळली : आन उठोनि तेणेची घाटे बीजे केले :' हा विस्मयकारक प्रकार पाहून त्या नाथ–

१. या शेवटच्या प्रकरणाविषयीच्या महत्त्वाच्या लीळा परिशिष्ट १ मध्ये दिल्या आहेत, त्या पहाव्या.

पंथीयाने आश्चर्याने उद्गार काढले, " सिद्ध रे सिद्ध " असे म्हणून त्याने आपल्या जवळचे शिंग फार मोठ्या जोराने फुंकले. त्यामुळे सगळे आकाश दुमदुमून गेले.

**प्रयाण**

स्वामी घाट चढून जात होते. तितक्यात तिकडून पाल्हा डांगिया धावत धावत आला आणि म्हणाला, " आम्ही असतांना आपणाला बोखटे करणार आहेत हे ऐकताच मी धावत धावत आलो. " हे शब्द उच्चारतांना पाल्हा डांगियाचा गळा दाटून आला होता. त्याच्या डोळ्यांतून अश्रूंचा पूर वाहत होता. स्वामी त्याला म्हणाले, " तुम्ही म्हणता ते खरे आहे; म्हणजे खरोखरच यांनी आमचे बोखटे केले.–' हे नव्हे शस्त्र घातले ! " असे म्हणून स्वामींनी आपला कंठ त्याला दाखविला. त्यावर जेथे शस्त्राचा घाव घातला होता तेथे शस्त्राची रेघ तशीच होती. ती पाहून पाल्हा डांगियाने विचारले, " आता आपण कुठे जाल ?" स्वामी म्हणाले, " आता हे उत्तरापंथे बीजे करील : " तदनंतर स्वामी पैठणला गेले. सारंगपंडिताला त्यांनी भेट दिली; पण तो ' आड पालौ ' करून जाऊ लागला. स्वामींनी मुद्दाम त्याला बोलावले. तो जवळ आला आणि म्हणाला, " गोसावी केव्हळी बीजे केले जी : " स्वामी म्हणाले, " हे नव्हे : आताचि : " सारंगपंडित म्हणाला : " जी : गोसावी आवारासि बीजे करावे जी : मी स्नान करोनि येईन जी : " असे म्हणून सारंगपंडित स्नानाला गेला आणि स्वामी उत्तरापंथे निघून गेले.

**विंध्य पर्वतावर भेट**

उत्तरापंथे मार्ग आक्रमण करीत असतांना विंध्य पर्वताच्या माथ्यावर गंगातीरावरील काही व्यापाऱ्यांना स्वामींचे दर्शन झाले. स्वामींच्या शिरच्छेदाचा वृत्तांत त्यापूर्वी त्यांच्या कानावर गेल्यामुळे स्वामींना पाहून त्यांना फार आश्चर्य वाटले. त्यांनी विचारले, " आम्ही गोसावियावरि ऐसेनि ऐसे आइकिले होते : ते साच जी ? " स्वामींनी उत्तर दिले, " आइकिले ते साच की देखिले ते साच? " अर्थात् " देखिले ते साच : " असेच उत्तर देणे अवश्य होते. कारण, स्वामींची मूर्ति प्रत्यक्ष त्यांच्यासमोरच होती.

( उत्त. ५०५ ). व्यापाऱ्यांचा निरोप घेऊन स्वामी पुढे निघाले व उज्जयिनीला जाऊन पोचले. तेथेहि काही दिवस त्यांचे अवस्थान होते. गंगातीरावरील काही व्यापाऱ्यांना तेथे स्वामींचे दर्शन झाले. परतून आल्यावर त्यांनी नागदेवाचार्यांना स्वामींच्या उज्जयिनी येथील अवस्थानाची वार्ता सांगितली. ती ऐकून काही भक्तांनी उज्जयिनी येथे स्वामींच्या जवळ जाऊन राहण्याची इच्छा व्यक्त केली. पण "गोसावी माते वर्जिले : आता असन्निधानी सर्वज्ञे म्हणितले ते करावे : आणि षड्विध दुःख जो करील तयासि गोसावी भेटि देतील : " असा आपला निर्णय देऊन नागदेवाचार्यांनी त्यांना उज्जयिनीला जाण्यापासून परावृत्त केले. ( उत्त. ५०६ ). स्वामी उज्जयिनीहून निघून उत्तरापंथे हिमालयात गेले व तेथे ते अजून 'राज्य करितात' अशी महानुभावांची समजूत आहे.

———

# १५

# श्रीचक्रधरस्वामींचा कालनिर्णय

श्रीचक्रधरस्वामींचा कालनिर्णय करणे जितके महत्त्वाचे आहे तितकेच ते कठिणहि आहे. कारण, या बाबतीत मतमतांतरे फार आहेत. त्यातून वाट काढणे कठिण होऊन बसले आहे. तथापि निर्भेळ सत्यशोधकाची ऐतिहासिक दृष्टि समोर ठेवून कार्याला लागल्यास मार्ग बराच सोपा होईल. त्याच दृष्टीने श्रीचक्रधरस्वामींचा काळ निश्चित करण्याचा प्रयत्न या ठिकाणी करीत आहे.

## पाच कालखंड

अवतार-स्वीकार, शक्ति-स्वीकार, नागांबिकेला प्रेमदान, नागदेवाचार्यांचे अनुसरण, आणि प्रयाण हे श्रीचक्रधरस्वामींच्या आयुष्यातील मुख्य टप्पे होत. भरवस येथील हरिपाळदेवनामक प्रधानपुत्राच्या मृत शरीरात प्रवेश करून ते उठवणे (एकांक. ४, ५) हा अवतार-स्वीकार होय; रामटेकच्या यात्रेच्या मिषाने भरवस नगराचा त्याग करून ऋद्धिपुरला येणे व तेथे श्रीगोविंदप्रभूंचे शिष्यत्व स्वीकारून त्यांच्यापासून ज्ञानशक्ति स्वीकारणे (ए. ७) हा शक्ति--स्वीकाराचा प्रसंग होय. यानंतर एकाकी विहरण करीत करीत श्रीचक्रधरस्वामी मेहेकर येथून पैठणला गेले, तेथे त्यांनी नागांबिका नावाच्या शिष्येला (बाइसाला) 'प्रेम' दिले हा तिसरा टप्पा होय. येथे श्रीचक्रधरस्वामींच्या आयुष्यातील 'एकाकी' विहरणाचा काळ संपून पूर्वार्धाला प्रारंभ होतो. तदनंतर नागदेवांची भेट होऊन त्यांना दीक्षा देईपर्यंतचा काळ हा पूर्वार्धकाल होय. तेव्हां नागदेवांचे अनुसरण

अथवा दीक्षाकाल हा चौथा टप्पा मानावा लागतो. आणि यानंतर शेवटचा टप्पा म्हणजे श्रीचक्रधरस्वामींनी 'उत्तरापंथे बीजे करणे' म्हणजे प्रयाण करणे हा होय. श्रीचक्रधरस्वामींच्या आयुष्याचा अवधि निश्चित करण्यासाठी या पाचहि प्रसंगांचे काळ ठरवणे अत्यवश्य आहे.

## सांप्रदायिक व ऐतिहासिक दृष्टी

हे काळ ठरवण्याच्या प्रामुख्याने दोन दृष्टी आहेत. एक सांप्रदायिक दृष्टी आणि दुसरी ऐतिहासिक दृष्टी. कोणत्याहि व्यक्तीचा काळ ठरवितांना जेथे सांप्रदायिक दृष्टीत व ऐतिहासिक दृष्टीत विरोध उत्पन्न होत नाही तेथे विवादाचा प्रश्नच उभा राहत नाही. पण जेथे असा विरोध उत्पन्न होतो तेथे कोणता मार्ग स्वीकारायचा हा महत्त्वाचा प्रश्न आहे. संशोधकांनी सांप्रदायिक दृष्टीपेक्षा ऐतिहासिक दृष्टीच स्वीकारली पाहिजे हे कुणालाहि कबूल करावे लागेल. 'सध्याच्या अवनतीच्या (!) काळापेक्षा'[१] जुन्या काळात 'पंथामधे विद्वान व चिकित्सक महंत जास्त असले पाहिजेत'[२] असेच गृहीत धरून चालायचे म्हटले तर मार्गच खुंटला. मग या जुन्या 'विद्वान व चिकित्सक' महंतांनी लिहून ठेवलेले 'शोध' ऐतिहासिक घटनाशी कितीहि विसंगत असले तरी त्यांना केवळ परंपरेचा आधार असल्यामुळे ते निमूटपणे मान्य केल्याशिवाय गत्यंतर राहणार नाही. पण ही मुळी संशोधकाची दृष्टीच नव्हे. आणि अशा संशोधनाचा 'सावध संशोधने' म्हणून गौरव करणेहि बरोबर नाही. इतके या ठिकाणी लिहिण्याचे कारण असे की, श्रीचक्रधरस्वामींचा काळ निश्चित करतांना काही संशोधकांनी परंपरेच्या अभिमानाला बळी पडून सांप्रदायिक दृष्टीची कास धरली आहे व संशोधनाची जणु तीच दृष्टी "सावध" होय असे त्यांचे म्हणणे आहे. हे चुकीचे कसे आहे ते पुढील विवेचनावरून लक्षात येईलच. प्रथम, ही सांप्रदायिक दृष्टी म्हणजे काय व ती स्वीकारणे सर्वस्वी बरोबर होईल की नाही याचा विचार करू.

---

१ महाराष्ट्र. ता. ९ मे. १९३७. श्री. ह. ना. नेने यांचा निबंध. २ श्री. कृष्णशास्त्री घुले. महाराष्ट्र: २१ फेब्रु. १९३७.

## महानुभावांच्या पोथ्यातील शकसंवत्सरांचे उल्लेख

सांप्रदायिक व ऐतिहासिक दृष्टींचा प्रश्न उपस्थित होतो तो विशेषतः शकसंवत्सरांच्या उल्लेखाविषयी. महानुभावांच्या काही पोथ्यातून श्रीचक्रधरस्वामींच्या आयुष्यातील उपरिनिर्दिष्ट घटनांचे सांप्रदायिक शकसंवत्सरांचे उल्लेख आढळतात, यात शंका नाही. पण ते डोळे मिटून ग्राह्य मानता येत नाहीत असे मला वाटते. याची प्रामुख्याने तीन कारणे सांगता येतील. एक तर यातील काही उल्लेख खोडाखोडीने डागळलेले आहेत. काही ठिकाणी तर मुळात उल्लेख नसूनहि ते मागाहून घातले असावेत असे स्पष्ट दिसते. दुसरे असे की, श्रीचक्रधरस्वामींच्या आयुष्यातील काही महत्त्वाच्या घटनाविषयी पोथ्यातून आढळणारे शकसंवत्सरांचे उल्लेख इतके भिन्न भिन्न व मतमतांतरांनी युक्त आहेत की त्यापैकी खरा 'सांप्रदायिक' शक कोणता मानायचा, परंपरेचा आधार कोणत्या विशिष्ट मताला आहे, हे कोणी व कसे ठरवायचे ? कारण, ही सगळीच मतमतांतरे जुन्या 'विद्वान व चिकित्सक महंतांनी' नमूद करून ठेवलेली ! मग ही सगळीच मते खरी मानायची की काय ? यात पुन्हा काही शकसंत्सरांच्या बाबतीत शकांचा व संवत्सरांचा मेळ पडत नसल्यानेहि घोटाळे निर्माण होतात. तिसरे असे की, ह्या बहुतेक उल्लेखांचा त्याच 'विद्वान व चिकित्सक' महंतांनी निर्देशिलेल्या ऐतिहासिक घटनांशी विरोध येतो. या अनेक कारणामुळे केवळ सांप्रदायिक शकसंवत्सरांच्या उल्लेखावर विश्वासून राहणे चुकीचे होय. कसे ते आपण काही उदाहरणावरून पाहू या.

### अवतार-स्वीकाराचा काळ

प्रथम श्रीचक्रधरस्वामींच्या अवतार-स्वीकाराचाच काळ पाहू. कै. भावे यांनी हा काळ 'शके १०७५ श्रीमुख संवछरीं भाद्रपद शु. २' असा देऊन महानुभाव ग्रंथकार 'वार देत नाहीत' असे नमूद करून ठेवले

१. म. सा. भाग १. पा. ५५. तळटीप.

आहे. डॉ. य. खु. देशपांडे यांनीहि 'शके १०७५' असाच हा काल नमूद करून ठेवला आहे. श्री. का. आ. पाध्ये यांनी 'शके ११०३ विरोध संवत्सरी भाद्रपदमासीं शुक्रवार द्वितीयेसी पुर स्वीकेरिलें :' या शब्दात श्रीचक्रधराच्या अवतार-स्वीकाराचा काळ दिलेला आहे. कै. भावे व डॉ. देशपांडे यांनी दिलेल्या शक-काळात शके १०७५ साली श्रीमुख संवत्सर येतो हे खरे आहे. पण केवळ तेवढ्यामुळे हा काळ खरा मानायचा असे मात्र नाही. श्री. पाध्ये यांनी नमूद केलेला काळ जंत्रीप्रमाणेच चुकीचा ठरतो. कारण, शके ११०३ ला 'विरोधी' संवत्सर येत नाही, 'प्लव' येतो. त्या सुमारास विरोधी संवत्सर शके १०९१ ला येतो. म्हणजे शक-संवत्सराच्या या उल्लेखात १२ वर्षांची विसंगति आहे.

या तिघांनीहि दिलेले हे काळ मान्य करता येत नाहीत. याचे मुख्य कारण असे की, मी पाहिलेल्या पोथ्यात मला हे काळ कुठेच आढळले नाहीत. आम्नाय पाठ व तळेगावकर पाठ यांच्या चरित्राच्या पोथ्यात अवतार-स्वीकाराचा काळ नमूद केलेला नसतो. फक्त वाइंदेशकराच्या पोथ्यात तो असतो. पण तेथेहि शकाचा आकडा नसून फक्त संवत्सराचा असतो. मी पाहिलेल्या एका पोथीत हा काळ 'विक्रम संवत्सर भाद्रपदमासी शुक्लपक्षी एणे पुर स्वीकरिले' असा दिलेला आहे. त्याच पाठाच्या आणखी दोन पोथ्यात हा उल्लेख आढळला, पण तेथे 'विक्रम' शब्द खोडून त्यावर 'श्रीमुख' रंगवलेले उघड उघड दिसते. त्यामुळे त्या पोथ्यातील 'श्रीमुख' संवत्सराचा उल्लेख प्रक्षिप्त ठरतो. (स्थूल मानाने 'विक्रम' संवत्सर बरोबर मानायला हरकत नसावी.) श्रीमुख संवत्सराच्या अनुरोधाने कै. भावे यांनी दिलेला व श्री. देशपांडे यांनी मान्य केलेला १०७५ शक खरा मानला तर दुसरीहि एक मोठी आपत्ति येते, ती अशी. श्रीचक्रधराच्या अवतार-स्वीकारापूर्वी तीनच वर्षे अगोदर गुजराथवर सिंघण यादवाने स्वारी केली होती व तीत हरिपाळदेवाने सिंघणाचा पराभव केला होता, असे लीळाचरित्राच्या वाइंदेशकर पाठात स्पष्ट नमूद केले

१. म. म. वाङ्मय. पा. ४ व १४. २. हेमाडपंत यांचे चरित्र. पा. ११२.

आहे. सिंघण यादवाची कारकीर्द शके ११३२ ते ११६९ आहे. तेव्हां शके ११३२ मधे गादीवर बसलेला सिंघण शके १०७२ मधे किंवा शके ११०० मधे गुजराथवर स्वारी कसा करू शकेल ? ऐतिहासिक घटनाशी केवढा हा विरोध ! ही गोष्ट या तिन्ही व्यक्तींच्या लक्ष्यात आलेली दिसत नाही. श्रीमुख संवत्सरे शके १०७५ प्रमाणेच शके ११३५ मधेहि येतो. तो घेऊन कै. भावे व डॉ. देशपांडे यांना ही विसंगती टाळता आली असती. पण त्यांनी तसे केलेले नाही. मला आढळलेल्या, खोडतोड न केलेल्या एका पोथीतील संवत्सर 'विक्रम' आहे. हा संवत्सर शके ११४२ (गत) ला येतो. पण त्या वर्षी भाद्रपद शु. २ ला शुक्रवार न येता रविवार येतो. 'विक्रम संवत्सरे' खोडून 'श्रीमुख' संवत्सराचा 'संस्कार' खरा धरून चालले व हा श्रीमुख संवत्सर शके ११३५ मधील आहे असे मानले तरी तो जंत्रीप्रमाणे जुळत नाही. कारण शके ११३५ श्रीमुख संवत्सर भाद्रपद महिन्याच्या शुद्ध द्वितीयेला शुक्रवार येत नाही, सोमवार येतो.

सारांश, श्रीचक्रधरस्वामींचा अवतार-स्वीकार 'सांप्रदायिक' (!) दृष्टया शके १०७५; शके ११०३; शके ११३५ व शके ११४२ या निरनिराळ्या शकात, अथवा संवत्सरांच्या भाषेत बोलायचे तर 'श्रीमुख संवत्सरी, 'विरोध' संवत्सरी, किंवा 'विक्रम संवत्सरी' झाला असे मानावे लागते. यातील कोणत्या सांप्रदायिक प्रमाणावर विश्वास ठेवावा !

---

१. 'तयासि वर्षे बावीस भरली तवं सिंघण रायाचें कटकु गुर्जराबरि चालिले'......'प्रधानपुत्रासि पंचवीस वर्षे भरली......प्रधानपुत्राचे देह गेके...ते पुर पणे स्वीकारिलें.' (एकांक). तसेच श्रीच. भू. ऐ. इ. पा. ३ व ४ पहा.

२. आश्चर्य हे की, शके ११३२ ते ११६९ मधे होऊन गेलेल्या सिंघणाने गुजराथवर स्वारी केली होती या गोष्टीच्या पुष्टयर्थ '११०३ विरोधी संवत्सरा' च्या उल्लेखाची लीळा श्री. का. आ. पाध्ये यांनी दिली आहे. (हेमाड. च. पा. ११२ पहा). कदाचित, शके ११०३ हा हरिपाळदेवाचा जन्मशक आहे अशी श्री. पाध्यांची समजूत झाली असावी. तरीहि तो उल्लेख त्यांना उपोद्बलक होऊ शकत नाही. कारण तदनुसार ही स्वारी ११०३ + २२ = शके ११२५ मधे–म्हणजे सिंघण राज्यावर येण्यापूर्वीची ठरते !

अशा या विसंगतीतून व खोडाखोडीतून एकच मार्ग मला दिसतो. तो असा की, कालनिर्णय करतांना हे उल्लेख प्रामुख्याने लक्ष्यात घेणे इष्ट नाही. त्याऐवजी, त्या त्या काळी घडलेली एखादी ऐतिहासिक घटना जर चरित्रग्रंथात उल्लेखिलेली असेल तर ती प्रमाण मानून तदनुरोधानेच कोणताहि काल ठरवावा. उदाहरणार्थ, याच ठिकाणी श्रीचक्रधरस्वामींचा अवतारकाल ठरविताना त्यावेळी दक्षिणेत सिंघण राजा राज्य करीत होता इकडे आपले लक्ष केंद्रित झाले पाहिजे. सिंघणाची गुजराथवर स्वारी नक्की कोणत्या शकात झाली हे इतिहासाच्या दृष्टीने अनिर्णित असल्यास श्रीचक्रधराचा अवतार-स्वीकार स्थूलमानाने सिंघणाच्या कारकिर्दीत झाला एवढेच निश्चित मानावे. नक्की शक ठरविण्याला ऐतिहासिक असे दुसरे प्रमाण उपलब्ध नाही, ही नाइलाजाची गोष्ट होय. त्याला आपला काय उपाय आहे ?

## शक्ति--स्वीकाराचा काळ

श्रीचक्रधरस्वामींच्या आयुष्यातील दुसरा टप्पा म्हणजे रामयात्रेच्या मिषाने भरवस शहराचा त्याग करून त्यांचे ऋद्धिपुरला येणे व तेथे श्रीगोविंदप्रभूपासून ज्ञानशक्ती स्वीकारणे हा होय. श्रीचक्रधरस्वामी ऋद्धिपूरला गेल्याची "ही गोष्ट शके ११०७ मध्ये विश्वावसू संवछरी चैत्र शु.१५ स घडली." असे कै. भावे म्हणतात. (म. सा. १. पा. ५७).मी पाहिलेल्या कोणत्याच पोथीमध्ये या काळाचा उल्लेख मला आढळला नाही. वाइंदेशकर पाठाच्या सहाहि पोथ्यात या काळाचा कुठेच निर्देश नाही. कै. भावे यांना तो कुठे मिळाला हे कळत नाही. अवतार-स्वीकारानंतर हरिपाळदेव ३२ वर्षे भडोच येथे होता व तदनंतर तो रामयात्रेला निघाला या (वाइंदेशकर पाठातील) कालगणनेच्या साह्याने १०७५+३२ = ११०७ असा शक ठरवून त्याला संवत्सराचा व तिथीचा उल्लेख जोडलेला दिसतो. शके ११०७ ला विश्वावसू संवत्सर येतो हे खरे, पण हरिपाळदेव भरवस सोडून निघाला त्यावेळी 'सेजा सिंघणदेवो राज्य करीत असे' या सर्व पाठात व सर्व पोथ्यात उल्लेखलेल्या ऐतिहासिक घटनेशी हा ११०७ शक उघड उघड विसंगत आहे. हाच काळ डॉ. देशपांडे यांनी कै. भावे यांच्या उल्लेखावरून घेतलेला दिसतो. (म. मा. वा. पा. ४, १४). स्वतंत्र आधार

त्यांनी दिलेला नाही. हा सिंघणाचा ऐतिहासिक उल्लेख आपल्या प्रक्षिप्त ११०७ ला बाधक होईल म्हणूनच की काय, मुळात " एकदा रामयात्रे जावे म्हणौनि प्रधानाते पुसिलें : प्रधानें म्हणितले : तो देश पारखा : कैसा पाठवावा : भवति राजके : सेजा **सिंघण देवो** राज्यो करीतुसे " असा उल्लेख असूनहि यातील 'सिंघणा'ला उडवून लावून भाव्यांनी " सेजा **जाधव** राज्य करिती असेति " असा बदल करून ते वाक्य दिले आहे ! (म. सा. १. पा. ५७) तेव्हां या शककाळाच्या उल्लेखावर विश्वास ठेवून कालनिर्णय करूं जाणे म्हणजे जाणुनबुजून आडरानात शिरणे होय.

## नागांबिकेला प्रेमदान

यानंतरचा स्वामींच्या आयुष्यातील तिसरा टप्पा म्हणजे नागांबिकेला ( ऊर्फ बाइसाला ) प्रेमदानाचा काळ होय. बरीच वर्षेपर्यंत एकाकी भ्रमण करून शेवटी मेहकर येथून सिंहस्थाच्या निमित्ताने श्रीचक्रधरस्वामी पैठणला आले. तेथे आल्याबरोबर पहिल्याच दिवशी त्यांनी नागांबिकेला दर्शन देऊन तिसऱ्या दिवशी तिला 'प्रेम' संचार केला. हा प्रसंग लीळाचरित्राच्या सर्व पोथ्यात आहे. या प्रसंगाचे शकसंवत्सर पुढीलप्रमाणे नमूद केलेले आढळतात.

(१) कै. भावे यांनी " शके ११८५ कार्तिक महिन्यात गुरु सिंह राशीस असतांना संन्यासदीक्षा धारण केली " असा उल्लेख केलेला आहे. (म. सा. १. पा. ५९ ) हा शक एखाद्या पोथीत असला तरी त्यात संवत्सर व वार दिलेले नसल्यामुळे तो तपासून पाहता येत नाही. तथापि श्रीचक्रधरस्वामींनी दीक्षा घेतली ती 'सिंहस्थ' असतांना घेतली हे कै. भावे यांना ( व त्यांना माहिती पुरवणाऱ्या महंतांना ) पूर्णपणे मान्य आहे ही महत्त्वाची गोष्ट होय.

(२) श्रीतळेगावकरांच्या पाठात " शके ११८५ क्रोधिन संवत्सरी कार्तिक वदि सप्तमी शनिवार " असा हा काळ दिला आहे. ( पूर्वार्ध. लीळा. ११९ ). पण शके ११८५ ( गत ) ला 'क्रोधन' संवत्सर येत येत नाही; 'रुधिरोद्गारी' येतो. क्रोधन संवत्सर गत शके ११८७ ला येतो. ११०५ रुधिरोद्गारी संवत्सरातील कार्तिक वद्य ७ ला शनिवार न येता गुरुवार

येतो. तसेच ११८७ क्रोधिन संवत्सराच्या कार्तिक वद्य ७ ला हि शनिवार येत नाही तर गुरुवार येतो. तेव्हां या उल्लेखातील शक, संवत्सर व वार यांचा मेळ बसत नाही.

(३) प्रेमदानाच्या शकाचा तिसरा उल्लेख 'तीर्थमालिके' त पुढील प्रमाणे आहे :—शाके शास्त्रपुराणभूपरमिती रक्ताक्ष संवत्सरीं

मासे कार्तिक संज्ञिके मुनि तिथौ शुक्ले शशीवासरी

नागांबेप्रति भेट देउनि तदानंता जिवा उद्धरी (आवृत्ती. १ श्लो. १२). या श्लोकाप्रमाणे हा काळ शके ११८६ रक्ताक्ष संवत्सर कार्तिक शुद्ध ७ सोमवार येतो. हा उल्लेख बरोबर आहे असे ज्यो. ती. पंडित नीळकंठ शास्त्री (इंदूर) म्हणतात.[१] पण ११८६ ला रक्ताक्ष संवत्सर असला तरी कार्तिक शुद्ध ७ ला सोमवार येत नाही; बुधवार येतो हे लक्षात घेतल्यास दि. ब. पिल्ले यांच्या जंत्रीप्रमाणे हा उल्लेख बरोबर आहे असे म्हणता येत नाही.

(४) एका स्थानपोथीच्या शेवटी हा काळ "सके ११८६ क्षेय संवत्सरी कार्तीक मासी प्रतिस्थानी बाइसा भेटी दीघली" असा लिहिला आहे. (श्री. गो. ग्रं. सं : स्थानपोथी.) दुसऱ्या आणखी एका पोथीत मला हाच उल्लेख आढळला.[२] पण यात उल्लेखिल्याप्रमाणे ११८६ ला क्षय संवत्सर येत नाही; तो शके ११८८ ला येतो. तेव्हां याहि उल्लेखात शकसंवत्सरांचा मेळ नाही.

(५) वाइंदेशकर पाठाच्या ऽ प्रतीत पूर्वार्ध पा. १७ वर 'माघ वदि अष्टमीसी गोसावी मेघंकरीहुनि बीजे केले : तेथौनि सातवां दीवशीं माघ वदि चतुर्दशी गोसावी प्रतिष्ठाना बीजे केले : बाइसा भेटि दिघली' असे लिहिलेले आहे. त्यापुढील लीळेवरून या भेटीनंतर तिसऱ्या दिवशी (म्हणजे फाल्गुन शु. २ ला) श्रीचक्रधरस्वामींनी नागांबिकेला प्रेम

१. महाराष्ट्र. ता. २ फेब्रु. १९३६. 'नागांबा कालनिर्णय'

२. भा. बो. पा. ७५ पद्य.

दिल्याचा उल्लेख आहे. यात शकसंवत्सर नाही. शिवाय यातील महिन्याचा व मितीचा उल्लेख इतर उल्लेखाशी विसंगत आहे.

सारांश, ही सर्व 'सांप्रदायिक' मते ग्राह्य मानली तर पिल्ले यांच्या जंत्रीप्रमाणे ते शास्त्रशुद्ध होणार नाही. दुसरे असें की, हाच प्रेमदानाचा काळ शके ११८५ व ११८६ यातील मान्य कोणता करायचा ? संवत्सर तर क्रोधन, रक्ताक्ष व क्षय असे तीन उल्लेखलेले आहेत. बरे, या सर्व उल्लेखात निदान महिना व तिथिवार एक असावेत, तर तेहि नाही. एकजण 'कार्तिक **वद्य** ७' म्हणतो तर दुसरा 'कार्तिक **शुद्ध** सप्तमी' म्हणतो, तर तिसरा 'माघ वद्य चतुर्दशी (किंवा फाल्गुन शुद्ध २)' असे म्हणतो. तसेच एकजण 'शनिवार' देतो, तर दुसरा 'सोमवार' देतो. कोणत्याच बाबतीत त्यांचे एकमत दिसत नाही ! शिवाय या सगळ्या उल्लेखांचा, तत्पूर्वी निर्देशिलेल्या 'सिंहस्था' च्या काळाशी ऐतिहासिक दृष्ट्या विरोध येतो तो निराळाच. कारण हा सिंहस्थ शके ११९० ला येतो. त्याच साली श्रीचक्रधरस्वामींनी बाइसाला भेट देऊन प्रेमसंचार केला हे पुढे दाखवले आहे.

## नागदेवाचार्यांचा अनुसरण-शक

श्रीचक्रधरस्वामींच्या आयुष्यातील चौथा टप्पा नागदेवाचार्यांच्या अनुसरणकालाचा होय. याहि काळाच्या बाबतीत एकवाक्यता नाही. तळेगावकरांच्या चरित्रपोथीत (उत्त. ली. १) हा काळ "ऐसे भट ईश्वरीं सर्वभावें अनुसरले : शके ११८९ शुक्ल संवत्सरी माघ शुद्ध अष्टमी शुक्रवारी चतुर्थ प्रहरीं" असा दिला आहे. एका स्थानपोथीत हाच काळ "सके ११९० प्रमोदीसंवत्सरीं माघ मासीं खडकुलीए अनुसरण" असा उल्लेखिलेला आहे. (श्री. गो. ग्रं. सं. स्थानपोथी). हरिबास व सोंगोबास यांच्या अन्वयस्थळात देखील हाच काळ आढळतो. (भा. बो. पा. ७५) अनुसरण शकाच्या बाबतीत हे एकच मतांतर आढळते. वरील मित्यांच्या उल्लेखात शकसंवत्सरांचा मेळ नाही. शके ११८९ ला शुक्ल संवत्सर येत नाही; तो ११९१ ला येतो. त्यावर्षी माघ शु. ८ ला शुक्रवार येतो. तेव्हां संवत्सराच्या अनुरोधाने पुढील मिती बरोबर आहे. पण मुळातच शके ११९१ च्या ऐवजी ११८९ लिहिलेला असल्यामुळे सर्व उल्लेख विसंगत

ठरतो. दुसऱ्या मितीच्याहि बाबतीत तसेच झालेले आहे. कारण, शके ११९० ला प्रमोद संवत्सर येत नाही, विभव येतो. प्रमोदसंवत्सर शके ११९२ मधे येतो. तिसरी महत्त्वाची गोष्ट ही की, नागदेवाच्या अनुसरणाचा हा काळ ऐतिहासिक दृष्ट्या तत्पूर्वी घडलेल्या रामदेवराव जाधवाच्या राज्यारोहण-शकाशी पूर्णपणे विसंगत आहे. त्यामुळे त्यावर अवलंबून राहणे चुकीचे होईल.

## श्री चक्रधरस्वामींचा प्रयाण-शक.

श्रीचक्रधरस्वामींच्या आयुष्यातील शेवटचा टप्पा म्हणजे त्यांचा प्रयाणकाळ. या प्रयाण-शकाविषयी बरेच वादंग माजलेले आहे. स्थूल मानाने शके ११९४ हा श्रीचक्रधराचा 'सांप्रदायिक' प्रयाणशक अगदी 'हलवून हलवून बळकट' केलेल्या 'खुंट्या'प्रमाणे कित्येकांना वाटतो. पण तसा तो नाही हे पुढील मतमतातरावरून दिसून येईल. श्रीचक्रधराच्या प्रयाणकाला-विषयी तरी प्राचीन महानुभाव ग्रंथकारामधे एकवाक्यता असेल असे वाटत होते. पण तेथेहि पूर्ण निराशा होते. इतकेच नाही तर या महत्त्वाच्या काळा-विषयीच मतमतांतरांचा गलबला विशेष आहे. या काळाविषयीचे मला आढ-ळलेले उल्लेख पुढीलप्रमाणे आहेत.

(१) श्रीगोपीराज- ग्रंथसंग्रहालयातील स्थानपोथीत '**सके ११९३ श्रीमुख संवत्सरी माघ सुध चौथीसी** गोसावीं बीजें केलें' असा हा काळ दिलेला आहे. शके ११९३ साली 'श्रीमुख' संवत्सर येत नाही; 'प्रजापति' येतो. श्रीमुख संवत्सर शके ११९५ ला येतो. महिना, तिथी, वार वगैरे दिलेले नसल्यामुळे ही मिती अधिक तपासून पाहता येत नाही.

(२) श्री.तळेगावकर पाठाच्या चरित्र-पोथीत, उत्तरार्धात हा प्रयाणशक पुढीलप्रमाणे आहे. "श्री शके **११९३ श्रीमुख संवत्सरीं माघ** शुद्ध तिथ चतुर्थी **कृष्णपक्ष सोमवारीं** प्रथम प्रहरीं...बीजें केलें ॥ शाके लोकनवैकभूपरिमिते संवत्सरे श्रीमुखे। मासे माघकसंज्ञिके शशिदिने

१. महाराष्ट्र. ता. ९ मे १९३७. 'एक महानुभावीय अप्रसिद्ध ग्रंथ' श्री. ह. ना. नेने यांचा लेख.

सत्यां चतुर्थ्यां तिथौ ॥ पक्षे कृष्णकसंज्ञिके सुरपतिश्चाद्येथयामे परः। सत्ते श्रीप्रभुप्रेरितस्त्वरधरो दर्भेश्वरादुत्तराम् ॥"

या उल्लेखातील आरंभीच्या गद्य ओळीत 'शुद्ध चतुर्थी...कृष्णपक्ष' हे तर विरोधाचे सुंदर उदाहरण होईल. तथापि, श्लोकात फक्त 'कृष्ण' पक्षच वर्णिला असल्यामुळे तोच लेखकाला अभिप्रेत आहे असे आपण समजून चालू. गद्याप्रमाणे श्लोकातहि 'लोक (३) नव (९) एक (१) भू (१)' = ११९३ हाच शक व संवत्सर श्रीमुखच आहे. पण शके ११९३ मधे श्रीमुख संवत्सर येत नाही, तो ११९५ मधे येतो हे आपण वर पाहिलेच आहे. शके ११९३ ला प्रजापति संवत्सर येतो आणि त्या वर्षीच्या माघ वद्य ४ थीला सोमवार येत नाही तर बुधवार येतो. बरे, संवत्सराच्या अनुरोधाने विचार केला तर श्रीमुख संवत्सर ११९५ ला येऊन त्या वर्षीच्याहि माघ वद्य चतुर्थीला सोमवार न येता शनिवार येतो. कदाचित गद्य ओळीतील उल्लेखाप्रमाणे ११९३ माघ शुद्ध चतुर्थी अपेक्षित असेल असे घटकाभर मानले तरी ते जमत नाही. कारण ११९३ च्या माघ शुद्ध ४ ला बुधवार येतो ( आणि ११९५ च्या माघ शुद्ध ४ ला शनिवार येतो ). तेव्हां कोणत्याहि दृष्टीने पाहिले तरी यातील शकसंवत्सर व तिथिवार यांचा मेळ बसत नाही. अशा उल्लेखावर, केवळ तो 'सांप्रदायिक' म्हणून विश्वास ठेवायचा कसा ?

(३) लीळाचरित्राच्या-हिराइसा पाठ-पोथीच्या शेवटी "शके ११९४ श्रीमुख संवत्सर गोसावी माहो मास शुद्ध चतुर्थी सोमवारी-" बीजे केल्याचा उल्लेख आहे. या शकाचा उल्लेख मला अनेक ठिकाणी आढळला. श्री. गो. ग्रं. संग्रहातील एका पोथीत गद्य 'अबाब' आहे त्यात; केशिराजपुत्र राघवकृत 'चरित्र अबाब अन्वयात' ( महाराष्ट्र. ता. ९ मे १९३७ ); स्मृतिस्थळात ( स्मृ. स्थ. पा. ३ ); आणि नागदेवाचार्य स्मृतीतहि ( विश्ववाणी. डिसें. १९३३ ) हीच मिती उल्लेखिलेली आहे. पण या उल्लेखातील शकसंवत्सरांची व तिथिवारांची संगति बरोबर नाही. कारण, शके ११९४ मधे श्रीमुख संवत्सर येत नाही, 'अंगिरा' संवत्सर येतो. शिवाय ११९४ च्या माघ शुद्ध ४ ला सोमवार नसून मंगळवार आहे.

(४) वरील उल्लेखात संवत्सर व वार यांची जी विसंगति आहे ती नाहीशी करणारा उल्लेख 'तीर्थमालिके' त आढळतो. त्यातील शकाचा

श्लोक पुढीलप्रमाणे:—

" शाके वेदनवेंदुभूमिगणिते संवत्सरे त्र्यांगिरे
क्रुष्णे माघ चतुर्थि मंगलदिने ग्रामांत बेलापुरे
गंगातीर त्यजोनिया जिवपती बीजे करी उत्तरे " (७८)

यातील वेद (४); नव (९); इंदु (१); भूमि (१) = ११९४ अंगिरा संवत्सर, माघ वद्य चतुर्थी, मंगळवार हे सर्व उल्लेख पिल्ले यांच्या जंत्रीप्रमाणे बरोबर आहेत. तेव्हां हाच श्रीचक्रधरस्वामींचा प्रयाणकाल मानला तर मग यापूर्वी ११९३ म्हणून ज्यांनी उल्लेख केला, तसेच पुढे ११९६ म्हणून ज्यांनी लिहिले आहे त्यांच्या मतांचे काय करायचे ? कारण सर्वच प्राचीन महानुभाव लेखकांनी शके ११९४ ला मान्यता दिलेली नाही.

(५) श्री गुंफेकर महानुभाव ( रितपूर ) यांच्याकडून मिळालेल्या स्थानपोथीच्या शेवटी मला पुढील उल्लेख आढळला. " **भावा संवत्सरीं** माघ वधि चौथी ते दीवसी गोसावी बीजें केलें........ ॥ ११८६ वरुषें तै गोसावी बीजें केले ॥ एवं उत्तरार्ध ॥ "

यातील ११८६ मधील ८६ वर लाल शाई फासलेली आहे. कारण लेखकाला आपण लिहिलेला तो आकडा चुकीने लिहिला याची जाणीव झाली असावी असे दिसते; आणि ते बरोबरहि आहे. कारण 'भाव' संवत्सर शके ११८६ ला येत नसून ११९६ ला येतो. प्रथम शकाचा आकडा लिहायचाचा राहून गेला असावा. तो लेखकाने नंतर लिहिला. पण ११९६ ऐवजी त्याने ११८६ असे चुकीने लिहिले. त्याला ११९६ हाच शक अपेक्षित असावा हे ६ या आकड्यावरून व भाव संवत्सराच्या सुस्पष्ट उल्लेखावरून उघड दिसते. तेव्हां या स्थानपोथीकाराच्या मते **शके ११९६ भाव संवत्सर माघ वद्य चतुर्थी** हा श्रीचक्रधरस्वामींचा प्रयाणकाळ ठरतो.

( ६ ) श्री तुळसाबाई आराध्ये ( चांदूर बाजार ) यांच्याकडून बेलापुर चरित्राची एक पोथी मला मिळाली. तिच्यात ( पान १७६ वर ) हा प्रयाणकाल " मार्गरूढ : ॥ **सके ११९६** ॥ अकरा शते स्याहान्वौ **श्रीमुख संवछर माघ मास शुद्ध चतुर्थे :** वार सोमवार गोसावी

बीजे केले " असा दिलेला आहे. यावरून मागील उल्लेख करणाऱ्याप्रमाणेच आणखी काही ( मार्गरूढीतील ) महंताच्या मते श्रीचक्रधरस्वामींचा प्रयाणशक ११९६ असावा असे दिसते. शके ११९६ ला श्रीमुख संवत्सर येत नाही; भाव संवत्सर येतो. तथापि श्रीमुख संवत्सर गतशक ११९५ ला, म्हणजे चालू ११९६ ला येतो, हे लक्ष्यात घेतले तर या उल्लेखातील शक-संवत्सरांचा मेळ पडू शकतो. ११९६ च्या माघ शु. ४ ला सोमवार येत नसून गुरुवार येतो; त्यामुळे तिथिवारांचा मेळ मात्र पडत नाही.

तेव्हां 'सध्याच्या अवनतीच्या काळातील' नव्हे, तर प्राचीन काळातील पंथीय 'विद्वान व चिकित्सक महंतांनी' श्रीचक्रधरस्वामींचा प्रयाणकाळ शके ११९३, ११९४ व ११९६ असा उल्लेखिला आहे. संवत्सरांच्याहि बाबतीत त्यांच्यात एकवाक्यता नाही. एक जण 'श्रीमुख' देतो, दुसरा 'अंगिरा' देतो, तर तिसरा 'भाव' संवत्सर देतो. माघ महिन्याच्या बाबतीत मात्र मतैक्य दिसते. पण त्यातहि काही जण '**शुद्ध चतुर्थी** सोमवार'; काही 'शुद्ध चतुर्थी मंगळवार' तर काही '**वद्य चतुर्थी** सोमवार' असे उल्लेख करतात.

## शक-संवत्सरांचे उल्लेख अनुपयोगी

सारांश, श्रीचक्रधरस्वामींचा कालनिर्णय करतांना तदुत्तरकालीन पोथ्यातून दिलेल्या शकावर सर्वस्वी विश्वसून चालणार नाही हे उघड दिसते. श्रीचक्रधरांच्या आयुष्याचे जे पाच टप्पे वर उल्लेखिले आहेत त्यापैकी एकाहि बाबतीत प्राचीन महानुभाव पंडितांचे एकमत दिसून येत नाही. तेव्हां त्यातील अमुकच एक शक खरा व सांप्रदायिक, असे केवळ त्या शक-निदर्शक आकड्यावर अवलंबून म्हणणे बरोबर नाही. विशेषतः हे कोणतेच शक मूळ चरित्राच्या पोथ्यात आढळत नसल्यामुळे तर त्यावर संपूर्णतया विश्वास ठेवणे किंवा त्यातील कोणत्याहि एका शकाला 'खुंट्या' सारखा दृढमूल मानणे योग्य नाही.

## कालमापनात्मक गणिते

जी गोष्ट शकसंवत्सरांच्या उल्लेखाविषयी तीच गोष्ट अनेक पोथ्यात आलेल्या कालमापनात्मक गणिताविषयी, म्हणजे श्रीचक्रधरस्वामी निरनि-

राळ्या ठिकाणी किती किती दिवस राहिले यासंबंधी खास लीळाचरित्राच्या व इतर पोथ्यात जे उल्लेख आलेले आहेत त्याविषयी म्हणता येईल. एकांकआळी आणि तदनंतर नागांबिकेला प्रेमसंचार केल्यावर श्रीचक्रधरस्वामी कोणकोणत्या ठिकाणी गेले, प्रत्येक ठिकाणी त्यांनी किती दिवस मुक्काम केला हे अनेकांनी लिहून ठेवले आहे. त्यांच्या हिशेबानेच श्रीचक्रधरस्वामींच्या आयुष्याचा पूर्वार्ध काल स्थूल मानाने ४ वर्षे १॥ महिना आणि उत्तरार्ध काल ४ वर्षे ठरविण्यात आलेला आहे. (मागे पा. ५८ व ६० पहा). माझ्या मते केवळ या कालमापनात्मक निर्देशावर व गणितावर विसंबून राहणे बरोबर होणार नाही. याचे मुख्य कारण असे की, प्रत्येक ठिकाणी श्रीचक्रधरस्वामी नक्की किती किती दिवस राहिले याविषयीच्या उल्लेखात महानुभाव ग्रंथकारात मतैक्य नाही. याची अनेक उदाहरणे देता येतील.

पूर्वार्धात प्रारंभी प्रतिष्ठानाहून निघाल्यानंतर मार्गात स्वामी पञ्चेश्वराला राहिले. 'नेने' प्रतीप्रमाणे (भा. २ पा. १६) ते तेथे 'दीस सातच्यार' होते; घ प्रतीच्या लेखकाच्या मते ते 'त्रिरात्र' होते, ग प्रतीच्या मताने "रामेश्वर-वास वासना : पंच रात्र;" स्थानपोथीच्या मते 'दीस सात पाच' तर गद्य अबाबकाराच्या हिशेबाप्रमाणे ते तेथे 'दीस ४' होते. पुढे ते एळापुर येथे गेले. तेथे ते ग व घ प्रतींच्या मते १० महिने होते; पण गद्य अबाबकाराच्या मते ते तेथे फक्त ६ महिने ६ दिवसच होते असे ठरते. आणि स्थानपोथीत तर 'मग अवस्थान जाले : मास १ : एक म्हणती मास १०' असा आश्चर्यकारक उल्लेख आहे! त्यानंतरच्या श्रीनगर येथील निवासात श्रीचक्रधरस्वामी ग व घ प्रतीनुसार 'भीलमठी मास १०' होते. पण स्थानपोथीनुसार 'भीलमठी अवस्थान ॥ हीराइसा : मास २ : एक म्हणती मास १० ॥' १ व १०, तसेच २ व १० यातील महदंतर व हे वासनाभेद आश्चर्यजनक आहेत! याशिवाय केवळ पूर्वार्धापुरताच विचार केला तर ही मतभिन्नता कशी आहे याची, स्थानपोथीतील व अबाबतील पुढील दोनचार उल्लेखावरून सुद्धा सहज कल्पना येईल. नाशिककडून परतल्यावर एळापुर येथे श्रीचक्रधरस्वामींचे पुन्हा अवस्थान झाले. ते स्थानपोथी-काराच्या मते 'दीस ३' तर अबाबकाराच्या मते 'दीस १५'! त्यानंतर भडेगावी 'वसैए' मधे अवस्थान स्थानपोथीच्या व अबाबकाराच्या मते

'दीस ७ : शोधु : दीस २०' ! कुठे ७ आणि कुठे २० दिवस ! तसेच पूर्वार्धाच्या शेवटी शेवटी हिवरळी येथे स्थानपोथीच्या मते 'हीवरळी मास २' तर अब्राबकाराच्या मते 'हिवरळीए मढी अवस्थान मासु १' ! म्हणजे एक महिन्याचे अंतर !!

पूर्वार्धापेक्षा उत्तरार्ध चरित्रात अधिक मतांतरें आहेत. आणि तेहि इतके की ते मोजता मोजता कशाशीच काही मेळ बसत नाहीसे पाहून अब्राबकार अनेक ठिकाणच्या अवस्थानाचा काळ देतांना 'नेमु नाही' असा अभिप्राय ठेवून देतो ! प्रत्यक्ष काही उदाहरणेच आपण पाहू या. उत्तरार्धाच्या आरंभी स्वामी खडकुली येथे राहिले. तेथे त्यांचा निवास स्थानपोथीकाराच्या मते 'मास आउठ,' हिराइसाच्या मते 'मास ३' तर तळेगावकार-पाठाप्रमाणे 'मास ४' ! या मतांतराला कंटाळून अब्राबकाराने 'खडकाळीए अवस्थान : नेमु नाही' एवढाच उल्लेख करून काम आटोपले ! आता श्रीचक्रधरस्वामी खडकुलीला राहिले किती दिवस ? ३ महिने, ३॥ महिने की ४ महिने ? यापैकी खरे कोणते समजायचे ? खडकुलीनंतर जोगेश्वरीला एका स्थानपोथीच्या व ऽ प्रतीच्या मते 'अवस्थान दीस १५', पण ऽ प्रतीनेच 'एकी वासना : मास १' म्हणून दिलेले आहे. यानंतर छिन्नपापी येथे ४ महिने अवस्थान बहुतेकांनी दिले आहे. पण तळेगावकर पाठात पान ४० वर '४ महिने अवस्थान' तर पान ५४ वर 'छिन्नपापीसि अवस्थान मास ६' असे दिलेले आहे. इतकेच नाही तर 'आषाढापासून तों मार्गशीर्षपर्यंत' (= ६ महिने) स्वामी तेथे होते असे स्पष्ट केले आहे. म्हणजे येथे २ महिन्यांचा फरक पडला. याहून मौज पुढेच आहे. छिन्नपापीहून स्वामी डोंबेग्राम येथे गेले. तेथे ते स्थानपोथीकाराच्या मते 'मास ६' राहिले. (पण शेवटी हिशेब करतांना त्यानेच 'डोमेग्रामी मास ३' असे म्हटले आहे !). ऽ प्रतीत 'मास ३ : एकी वासना मास ४' असे सांगितले तर तळेगावकर पाठाच्या ५५ व्या पानावर 'मास १०' दिलेले आहेत ! आता श्रीचक्रधरस्वामी डोंबेग्राम येथे यावेळी ३ महिने, ४ महिने, ६ महिने की १० महिने होते म्हणून म्हणायचे ? तेथून ते नेवाशाला गेले. तेथे ते ४ महिने होते असे स्थानपोथीकाराने आरंभी म्हटले आहे. (पण शेवटच्या उल्लेखात ३ च महिने लिहिले आहेत.) तळेगावकर व पिढीपाठाच्या काही

पोथ्यांनी हाच काळ ६ महिन्यांचा सांगितला आहे. म्हणजे ३ ते ६ ! यापैकी नक्की किती ?

सारांश, श्रीचक्रधरस्वामी प्रत्येक गावी किती किती दिवस राहिले ते क्रमाने लक्षात घेऊन व मोजून त्यांच्या आयुष्यमानाची किंवा त्यातील विशिष्ट विभागाची गणना करणे चुकीचे होईल. या अवस्थानादिकांच्या गणनेत सर्व पोथ्यात एकवाक्यता असती तर प्रश्न निराळा होता. पण तशी एकवाक्यता नाही. त्यात 'वासनाभेद' इतके आहेत आणि त्यातील अंतर इतके मोठे आहे की त्यावर किंवा त्यातील एखाद्या उल्लेखावर सर्वस्वी अवलंबून राहणे शक्य नाही.

**चरित्र अबाबकाराचे गणित !**

'चरित्र अबाब अन्वयकार' याने अशी गणिते करून काही काळ दिलेले आहेत; आणि ते 'खुंट्या सारखे' बळकट आहेत असे श्री. ह. ना. नेने मानतात. पण मी निर्देशिलेली मतमतांतरे लक्षात घेता अबाब अन्वयकाराच्या गणितावर विश्वास ठेवून त्यांचे म्हणणे सर्व मतांच्या दृष्टीनेहि बरोबर आहे व तेच गणित 'सांप्रदायिक' आहे असे मानणे कसे चूक आहे ते लक्षात येईल. शिवाय दुसरी महत्त्वाची गोष्ट अशी की, श्री. ह. ना. नेने यांनी 'गणिती कवि' म्हणून ज्याची पाठ थोपटली आहे तो 'चरित्र अबाब अन्वयकार' गणिते कशी करीत असे ते पहा. 'श्रीकृष्ण चरित्र लीळा ४८; श्रीदत्तात्रेय लीळा ७; अज्ञात लीळा १४४; श्रीचक्रधर लीळा पूर्वार्ध ६२६ व उत्तरार्ध ६९५; श्रीगोविंदप्रभु लीळा ३३० असे लीळांचे गणित सांगून कवि म्हणतो 'आवघीया लीळा : त्या एक हजार : आठ शते वर : बेचाळीस ॥११॥ द्वारावतीचीया ( श्रीकृष्णाच्या ) : यामधे आलीया : लीळा दुसरीया : आन नाही...॥' अशी माहिती देऊन त्यावर श्री. नेने म्हणतात की, 'शके १६८२ मधे असलेला गणिती कवि वरील प्रकारचे आकडे अक्षरात देऊन लीळांची एकंदर संख्या किती हे सांगत आहे.' पुढे

१. महाराष्ट्र ता. ९ मे १९३७. 'एक महानुभावीय अप्रसिद्ध ग्रंथ.' श्री. ह. ना. नेने यांचा लेख.

अप्रत्यक्षपणे याच ग्रंथकाराला उद्देशून त्यांनी 'सध्याच्या अवनतीच्या काळापेक्षा शके १६८३ मधे पंथामधे विद्वान व चिकित्सक महंत खास ज्यास्त असले पाहिजेत' असेहि म्हटले आहे. आता वाचकांना एवढीच विनंती आहे की, त्यांनी वरील लीळांची संख्या नीट लिहून त्यांची बेरीज करून पहावी. ४८ + ७ + १४४ + ६२६ + ६९५ + ३३० यांची बेरीज 'सध्याच्या अवनतीच्या काळातील सामान्य लोकांच्या दृष्टीने १८५० होईल. पण ही बेरीज या असामान्य 'गणिती कवीने' मात्र १८४२ केली आहे ! इतकेच नव्हे तर ती नुसती आकड्यात न देता 'अक्षरात' दिलेली आहे. आणि या गणित-नैपुण्याबद्दल श्री. नेने यांनी त्या कवीची पाठ थोपटली आहे ! (द्वारावतीच्या लीळा म्हणजे श्रीकृष्णाच्या लीळा हे श्री. नेने यांचे स्पष्टीकरण बरोबर नाही. द्वारावतीच्या लीळा म्हणजे श्रीचक्रपाणी अवताराच्या लीळा ! द्वारावतीकार म्हणजे श्रीचक्रपाणी हे महानुभावपंथात सर्वप्रसिद्ध आहे.)

'शके ११९४ माघ शु ४ सोमवारी' श्रीचक्रधरस्वामींनी प्रयाण केल्यापासून तो 'शके सोळासे : बेहासीचा नेम : असे हा विक्रम : संवत्सर' म्हणजे शके १६८२ पर्यंत किती वर्षे लोटली याचेही गणित या कवीने करून दिले आहे. 'चारशे वरुषे आणीक नव्हयाशी : बीजे केलेयासी काळ जाला' असे सांगून 'श्रीमुखापासौनि विक्रमापर्यंत : पहावी गणित काळसंख्या ॥ ११४॥ याचा गुणाकार : करील चतुर : न कळे सुमार सर्वत्रासी ॥ ११५ ॥' अशी प्रौढी स्वतः कवीच मिरवितो; व त्याबद्दल श्री. नेने त्यांची स्तुति करतात. वरील काळ काढतांना 'गुणाकार' करण्याची गरज कुठे आहे ते कळत नाही हे एक. आणि दुसरे असे की, शके ११९४ पासून तो १६८२ पर्यंत हा गणिती कवि म्हणतो त्याप्रमाणे ४८९ वर्षे गेली की ४८८ गेली हेहि पहावे, म्हणजे त्याचा गणितीपणा दिसून येईल. आणि अशा या चतुर गणिती कवीने मोजून ठेवलेला काळ 'हलवून हलवून बळकट केलेल्या खुंट्या' प्रमाणे श्री. नेने यांना वाटत असला तरी तसा तो वास्तविक नाही हे वरील विवेचनावरून दिसून येईल.

### कालनिर्णयाची दृष्टी

शकसंवत्सरांच्या व कालमापनात्मक गणिताच्या उल्लेखांचा श्रीचक्रधरांच्या कालनिर्णयासाठी फारसा उपयोग होऊ शकत नाही, त्यावर विसंबून

राहणे योग्य नाही हे आतापर्यंत विस्ताराने पाहिले. तेव्हां पुढचा प्रश्न असा की, मग श्रीचक्रधरस्वामींचा कालनिर्णय करायचा कसा ? याला उत्तर असे की लीळाचरित्रात आलेल्या ऐतिहासिक व ज्योतिर्विषयक घटनांच्या अनुरोध ने हा कालनिर्णय करणे योग्य होईल. ज्या ऐतिहासिक व ज्योतिर्विषयक घटना आधार म्हणून घ्यायच्या त्या बाबतीत शक्यतोवर मतभिन्नता असता कामा नये. अर्थात्, ज्या ऐतिहासिक घटनांच्या बाबतीत सर्व पोथ्यात एकवाक्यता असेल त्यांचाच आधार कालनिर्णयासाठी घेतला पाहिजे. नागदेवाचार्यांच्या हयातीत लिहिलेल्या 'रत्नमालास्तोत्रा' चाहि यासंबधी विचार करायला पाहिजे. याच दृष्टीने श्रीचक्रधरस्वामींच्या आयुष्यातील जे पाच टप्पे आरंभी उल्लेखिले त्यांचे काळ ठरविण्यासाठी कोणकोणत्या सर्वसंमत घटना आढळतात त्या पाहून तदनुरोधाने कालनिर्णय करण्याचा प्रयत्न करू या.

## अवतार-स्वीकार

या दृष्टीने श्रीचक्रधरस्वामींच्या अवतार-स्वीकाराचा काळ निश्चित करण्यासाठी सर्व पाठांना संमत असलेली ऐतिहासिक घटना शोधण्याचा प्रयत्न केला तर मोठी निराशा होते. कारण, जिच्यामुळे अवतारस्वीकाराच्या काळावर स्पष्ट प्रकाश पडू शकेल अशी, लीळाचरित्राच्या सर्व पाठात अंतर्भूत झालेली एकहि ऐतिहासिक घटना आढळत नाही. या बाबतीतील ऐतिहासिक घटनेचा (व संवत्सराचा) उल्लेख केवळ वाइंदेशकर पाठातच आढळतो. ती घटना इतकीच की, अवतारस्वीकारापूर्वी तीन वर्षे अगोदर सिंघण यादवाने गुजराथवर स्वारी केली होती. या स्वारीनंतर हरपाळदेव कोणत्याशा रोगाने पाचसात दिवस आजारी पडून त्यातच त्याला मृत्यु आला आणि त्याच प्रसंगी ईश्वराने त्याच्या मृत शरीरात प्रवेश करून अवतार धारण केला. तेव्हां वाइंदेशकर पाठाच्या मते ही घटना सिंघणाच्या कारकीर्दीत म्हणजे शके ११३२ ते ११६० च्या दरम्यान केव्हां तरी घडून आली असे म्हणता येते. त्याच पाठाने नमूद केलेला अवतारस्वीकाराचा संवत्सर लक्षात घेतला तर हा अवतार-स्वीकाराचा काळ शके ११४२ होता असे म्हणता येते. पण खुद्द वाइंदेशकर पाठातील काही उल्लेखाशी याचा आत्यंतिक विरोध येतो. तो पुढीलप्रमाणे :

अवतार-स्त्रीकारानंतर ( म्हणजे सिंघणाच्या स्वारीनंतर तीन वर्षे उलटल्यावर ) सुमारे दोन वर्षांनी हरिपाळदेवाला कमळाराणीपासून पुत्र झाला. तो सोळा वर्षांचा झाल्यावर त्याचा विवाह करून देण्यात आला. या घटनेनंतर ( म्हणजे १८ वर्षानंतर ) आणखी १४ वर्षे हरिपाळदेव तेथेच होता. तदनंतर तो रामयात्रेच्या मिषाने तेथून निघाला. अर्थात, अवतार-स्त्रीकारानंतर ३२ वर्षांनी हरिपाळदेव भरवस सोडून निघाला हे उघड दिसते. आणि यावेळी देखील सिंघण राजाच राज्य करीत होता. तेव्हा अवतारस्वीकार व भरवसत्याग या दोन प्रसंगातील अंतर ३२ वर्षांचें असून हे दोन्ही प्रसंग सिंघणच्या कारकीर्दीत घडले असे म्हणावे लागते. पण सिंघणाची कारकीर्द अवघी २८ वर्षांचीच आहे. सिंघण गादीवर आला त्याच वर्षी ( शके ११३२ ) त्याने गुजराथवर स्वारी केली असे घटकाभर गृहीत धरून चालले तरी तदनंतर ३२ वर्षांनी ( म्ह. शके ११६४ मधे ) झालेला भरवसत्यागाचा प्रसंग सिंघणाच्या कारकीर्दीत ( ११३२ ते ११६० ) घडून येऊ शकत नाही. पण भरवसत्यागाच्या प्रसंगी सिंघण राज्य करीत होता ही घटना लीळाचरित्राच्या सर्व पाठात नमूद केलेली असल्यामुळे ती निश्चित असणें अवश्य आहे. तदनुरोधाने मागे जाऊन अवतारस्वीकाराचा काळ ठरवू गेल्यास सिंघणाच्या कारकीर्दीपूर्वी तो प्रसंग घडून आला असावा असे म्हणावे लागते. सारांश, अवतार-स्वीकाराच्या काळाविषयी वाइंदेशकर पाठातील ऐतिहासिक घटना त्याच पाठात नमूद केलेल्या इतर घटनांशी विसंगत असल्यामुळे तिच्यावर विसंबून राहणे चुकीचे होईल. आणि म्हणूनच हा काळ सर्वसंमत अशा एखाद्या ऐतिहासिक घटनेच्या आधाराने सोडविण्याचे अशक्य होऊन बसले आहे. म्हणून तो अनिर्णितच राहतो. त्याला इलाज नाही.

## शक्ति-स्वीकार.

शक्ति-स्त्रीकारासाठी रामयात्रेच्या मिषाने हरिपाळदेवाने भरवसचा

---

१ 'भरवसी राज्य करीता गोसावियापासूनि कमळा राणीयेचा ठाइ एक पुत्र जाला : तो शतायु : तया नाव महिपाळदेव......'

जेव्हां त्याग केला तेव्हां महाराष्ट्रात सिंघणे राजा राज्य करीत होता ही गोष्ट आम्नाय पाठ, तळेगावकर पाठ व वाइंदेशकर पाठ या सर्व पाठात नमूद असल्याकारणाने ती निर्विवाद आहे. त्यावरून चक्रधराने सिंघणाच्या कारकीर्दीत म्हणजे शके ११३२ ते ११६० च्या दरम्यान केव्हांतरी ज्ञान-स्वीकार केला असे म्हणता येते. ही घटना नक्की कधी झाली हे निश्चित ठरविण्यासाठी याहून निराळा असा दुसरा पुरावा नाही. त्यामुळे या स्थूल निर्देशावरच आज अवलंबून राहणे भाग आहे.

## नागांबिकेला प्रेमदान.

यानंतरचा मुख्य व अत्यंत महत्त्वाचा टप्पा म्हणजे श्रीचक्रधरस्वामीकडून नागांबिकेला प्रेम देण्याचा काळ हा होय. वाइंदेशकर पाठाने उल्लेखिलेली श्रीचक्रधरस्वामींच्या संन्यासदीक्षेची घटना व नागांबिकेच्या प्रेमदानाची घटना, या दोन्ही घटना एकाच सुमारास केवळ तीन दिवसांच्या अंतराने झालेल्या आहेत, ही गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे. नागांबिकेच्या प्रेमदानाच्या काळासंबंधी महानुभाव लेखकांनी नमूद करून ठेवलेल्या शकसंवत्सरांच्या उल्लेखात मतभेद आढळत असले तरी ती घटना 'सिंहस्था'त झाली याविषयी मात्र त्यांच्यात एकवाक्यता आहे. श्रीचक्रधरस्वामींनी पैठणला आल्यावर तिसऱ्या दिवशी नागांबिकेला प्रेमसंचार केला. ( ली. च. भाग २ पान २ ). पैठणला येण्यासाठी ते मेहकरहून जेव्हां निघाले तेव्हां सिंहस्थ यात्रेच्या निमित्तानेच निघाले ही गोष्ट लीळाचरित्राच्या सर्व पाठात व सर्व पोथ्यात नमूद केलेली आढळते. केसोबासांच्या संस्कृत 'रत्नमालास्तोत्रा'त

१. " माता वीसाळदेआते म्हणितले : पूत्र कीलसू जाला : पाठवींजे ना का : कैसा पाठउ : सींगणदेवो राज्य करीत असे ' क. असाच वृत्तांत गच व ज पोथीत आहे. नेने प्रत व ख पोथी यात ' तो देसू पारका : तेथे जाओ नेए ' असा वृत्तांत आहे. वाइंदेशकर व तळेगावकर पाठात सिंघणाचा स्पष्ट उल्लेख आहे. मागे २९० पान पहा.

१ ली. च. भा. १ (नेने) लीळा ७२ पहा. ' सींहस्तु आला : मग बोणेबाइ म्हणितले... ' माझ्याजवळील बहुतेक पोथ्यात या लीळेची आदी ' सिंहस्ता यात्रे

( पुढे—

देखील या सिंहस्थाचा स्पष्ट उल्लेख आहे. त्यामुळे ही सिंहस्थाची घटना निर्विवाद आहे. आणि म्हणूनच कालनिर्णयाच्या दृष्टीने ती अतिशय महत्त्वाची ठरते.

या घटनेसंबंधी काही संशोधकांनी घेतलेल्या आक्षेपांचे निरसन करणे अवश्य आहे. या सिंहस्थाच्या घटनेच्या आधारे श्रीचक्रधरस्वामींचा दीक्षाकाळ ठरवता कामा नये, असे म्हणणारे पहिले आक्षेपक कै. वा. महंत श्रीदत्तलक्षराज महानुभाव हे होत. त्यांचे म्हणणे असे की, हा सिंहस्थाचा उल्लेख प्रत्यक्ष श्रीचक्रधराच्या तोंडचा नसल्यामुळे तो विश्वसनीय नाही. त्यांच्या या आक्षेपात काहीच तथ्य नाही. लीळाचरित्रातील प्रत्येक वाक्य श्रीचक्ररस्वामींच्या तोंडचे आहे असे नाही. चरित्रकाराने घटना वर्णन करतांना त्या आपल्या शब्दात वर्णन केल्या आहेत. त्या घटनांचा उल्लेख श्रीचक्रधरस्वामींच्या तोंडी असला तरच तो विश्वसनीय मानायचा, एरवी नाही, असे का ? दुसरे असे की, खुद्द श्रीदत्तराजांनी पुरवलेल्या[3] माहितीवरून कै. भावे यांनी "गुरुं[4]

चालू )
बीजे करणे ' अशी दिली आहे. काही ठिकाणी तर आदीत व लीळेत असा दोनदा सिंहस्थाचा उल्लेख आलेला आहे. उदा: क प्रतीतील उल्लेख पहा : ' सींहस्ता यात्रे बीजे करणे ॥ बोणेबाइ म्हणीतले : बा मौनदेव हो : अवघा लोकु सींहस्ता जातु असे. ' ग प्रतीत ' सींहस्ता यात्रे गमन ' अशी आदी असून त्यापुढे ' मग सींहस्थ आला : मग अवघा लोकु सींहस्ता त्रींएंबका यात्रेसी नीगाला ' असा आहे. तळेगावकर आम्नायाच्या पाठात या लीळेची आदी ' बोनेबायी विनवणी स्वीकारे सिंहस्थ यात्रे जाणे ' अशी असून त्यापुढे ' एक दी बोनेबाइ याते विनविले : बा मौनदेव हो सिंहस्थु रिगला...... ' असा मजकूर आहे. बाइदेशकर पाठातहि ' सिंहस्त प्रसंगे त्र्यंबका यात्रे निगमन ' या आदीखाली असाच मजकूर आहे. ( श्री च. च. भू. ऐ. दृष्टि. पा. ११ तळटीप १७ वी पहा.

१ सिंहस्थे व्रजतीश नाथ सुजनो गंगां व्रजमो वयं। याहि त्वंच निजां प्रियोगमथ नो देहीति विज्ञापितः ' (रत्नमाला १८८)

२ महाराष्ट्र. २४. ११. ३५.

३ महाराष्ट्र सारस्वत (आवृत्ति ३ ). खाजगी दोन शब्द. पा. ४ पहा.

४ महाराष्ट्र सारस्वत. पा. ५९.

सिंह राशीस असतांना संन्यासदीक्षा धारण केली " असा उल्लेख केला आहे. अर्थात, काही काळापूर्वी श्रीदत्तराज महंतांना हा सिंहस्थाचा उल्लेख 'श्रीचक्रधराच्या मुखीचा नसूनहि' मान्य होता. आताच तो अमान्य व्हायला कोणती कारणे घडली याचा खुलासा त्यानी केला असता तर बरे झाले असते! पण मुख्य गोष्ट ही की, हा उल्लेख श्रीचक्रधरस्वामींच्या तोंडी नसून बोणबाईच्या तोंडी असल्यामुळे ऐतिहासिक विधानाला किंवा त्या घटनेला कोणत्याहि प्रकारचा बाध येतो असे नाही.

या सिंहस्थाच्या प्रश्नाविषयी आक्षेप घेणारे दुसरे संशोधक माझे मित्र श्री. ह. ना. नेने हे होत. सिंहस्थाच्या यात्रेनिमित्त त्र्यंबकेश्वराकडे जायला निघालेल्या यात्रेकरूंच्या मेळाव्याबरोबर श्रीचक्रधर व बोणेबाई मेहेकरवरून निघाली. ती पैठणला येऊन पोचली. पैठणला आल्यावर श्रीचक्रधरांचा विचार बदलला. त्र्यंबकेश्वराला न जाता त्यांनी पैठणलाच मुक्काम केला. त्यामुळे सिंहस्थाच्या यात्रेसाठी निघालेल्या यात्रेकरूबरोबर बोणेबाई एकटीच पुढे निघून गेली. यावरून श्रीचक्रधर पैठणला 'सिंहस्थाच्या प्रारंभी' आले व त्यांनी नागांबिकेला प्रेमदान दिले यात शंकाच राहत नाही. श्री. नेने यांनाहि हे मान्य असावेसे वाटते; कारण त्यांनी या विषयी मुग्धपणा धारण केलेला दिसतो. पण त्यांचा मुख्य आक्षेप असा की, "त्रिंबकाच्या यात्रेला गेलेली बोणेबाई चक्रधरांना पुनः वाटेत भेटल्याचा उल्लेख या भागात आढळला नाही, एवढेच नव्हे तर चक्रधर त्रिंबकला पोचले असता त्या ठिकाणी सिंहस्थानिमित्त एखादी मोठी यात्रा जमली आहे असाही निर्देश नाही. 'त्रियंबकीं अवस्थान' ही लीळा वाचकांनी वाचावी......या पुढील वर्णन वाचले असता यात्रेचे वर्णन किंवा सिंहस्थाचा उल्लेख तेथे आढळत नाही. तेव्हां प्रो. कोलते यांनी रत्नमालास्तोत्रातील 'सींहस्थे व्रजतीशनाथ सुजनो गंगां व्रजामो वयं' या बोणेबाईच्या मुखी असलेल्या एका उल्लेखावरून चक्रधराच्या प्रयाणकाळाविषयी केलेल्या तर्काला अजून बळकटी नाही असे म्हणणे प्राप्त आहे."

---

१ लीळाचरित्र भाग २. (नेने) प्रस्तावना पा. ७–८ पहा.

यावरून, श्रीचक्रधरस्वामी स्वतः त्र्यंबकेश्वराला जेव्हां गेले तेव्हां तेथे सिंहस्थानिमित्त यात्रा असावी, अर्थात त्यावेळी सिंहस्थ असावा अशी अपेक्षा श्री. नेने करतात, हे दिसून येईल. पण माझ्या मते त्यांची ही अपेक्षा चुकीची आहे. कारण, सिंहस्थाच्या निमित्ताने पैठणला आलेले श्रीचक्रधरस्वामी पुढे न जाता पैठणलाच राहिले हे आपण पाहिलेच. त्यानंतर सांप्रदायिक मताप्रमाणे स्थूल मानाने पैठणला १० महिने, रितपुरला तीन महिने, एळापुरला १० महिने व सिन्नरला १० महिने राहून तेथून ते नाशकाला व मग त्र्यंबकेश्वराला गेले. म्हणजे पैठणला आल्यापासून जवळ जवळ दोन वर्षांनी श्रीचक्रधरस्वामी त्र्यंबकाला गेले. तेव्हां त्यावेळी तेथे 'सिंहस्था' निमित्त यात्रा असणे कसे शक्य आहे ? ती यात्रा केव्हांच आटोपून गेली होती. आणि दुसरे असे की सिन्नरहून त्र्यंबकेश्वराकडे जातांना श्रीचक्रधरस्वामी 'सींहस्था' साठी निघाले असे श्री. नेने यांना कोणी सांगितले ? असा उल्लेख लीळाचरित्रात कोठेहि नाही.

तेव्हां जवळ जवळ दोन वर्षांच्या कालावधीनंतर त्र्यंबकाला सिंहस्थाची यात्रा अपेक्षिणे हेच मुळात चूक आहे. श्रीचक्रधरस्वामी ज्यावेळी सिन्नरहून त्र्यंबकाला गेले त्यावेळी सिंहस्थ होता, असे मी कधीहि म्हटले नाही. तसे विधान करायला लीळाचरित्रात आधारच नाही. पण मेहकरहून श्रीचक्रधरस्वामी पैठणला आले त्यावेळी सिंहस्थ होता—तो सिंहस्थाचा प्रारंभ काळ होता, असे मी म्हटले आहे. त्याला लीळाचरित्राच्या सर्व पाठांच्या पोथ्यात आधार आहे, हे मी स्पष्ट केलेच आहे. आणि याच वेळच्या सिंहस्थाचा श्रीचक्रधरस्वामींच्या कालनिर्णयासाठी मी आधार घेतलेला आहे.

तेव्हां श्रीचक्रधरस्वामी प्रारंभी पैठणला आले व त्यांनी नागांबिकेला प्रेम दिले ही घटना सिंहस्थाच्या आरंभी घडून आली ही गोष्ट निर्विवाद होय. आता ऐतिहासिक दृष्टीने हा सिंहस्थाचा आरंभ काळ कोणता हे पाहू या. श्रीचक्रधरस्वामी पैठणला गेले त्यावेळी देवगिरी येथे महादेवराय (यादव) राज्य करीत होता हे लीळाचरित्रातील उल्लेखावरून स्पष्ट दिसते. पैठणला

---

१ ली. च. भाग २ पा. १–२ पहा.

दहा महिने राहून श्रीचक्रधरस्वामी रितपुरला गेले. तेथून ते वेरूळ येथे आले. त्या ठिकाणी असतांना 'महादेवराया' चा राऊत साळीवाहन श्रीचक्रधरस्वामींच्या दर्शनाला आला. नंतर काही दिवसांनी प्रत्यक्ष महादेवरायच त्यांच्या दर्शनासाठी वेरूळला आला. पण तो येऊन पोचण्यापूर्वीच श्रीचक्रधरस्वामी वेरूळ सोडून निघून गेले. तसेच श्रीचक्रधरस्वामी पैठणला असतांनाच तेथे महादेवरायाची 'वैजाई' नावाची राणी एक देऊळ बांधवीत असल्याचाहि उल्लेख आहे. त्यावरून, श्रीचक्रधरस्वामी पैठणला असतांना देवगिरी येथे महादेवराय राज्य करीत होता हे स्पष्ट दिसते. महादेवरायाची कारकीर्द शके ११८२ ते ११९३ पर्यंत होती. अर्थात स्वामी मेहकरहून पैठणला आले त्यावेळचा सिंहस्थ याच काळाच्या दरम्यानचा होता.

श्री दत्तात्रेय विष्णु आपटे (व्यवस्थापक-आनंदाश्रम पुणे) आणि प्रो. विश्वनाथ बळवंत नाइक पुणे या दोन विद्वानांच्या मते या वेळचा सिंहस्थ शके ११९० मध्ये येतो, असे श्री बाळकृष्णशास्त्री महानुभाव यांनी 'श्रीचक्रधरचरित्र-भूमिकापर ऐतिहासिक दृष्टि' या आपल्या प्रबंधात (पा. ११) नमूद करून ठेवले आहे. विद्वद्रत्न डॉ. के. ल. दप्तरी (नागपूर) यांच्या मतेहि हा सिंहस्थ शके ११९० मधेच येतो. मी स्वतः त्यांच्याकडे पत्राने विचारणा केली होती. त्यावेळी मलाहि त्यांनी हेच मत कळवले होते. याशिवाय अकोला येथील ज्योतिर्मणि, ज्योतिर्विद्यालंकार डॉ. ह. सी. राजंदेकर आणि मुंबई येथील श्री. कृष्णाजी विठ्ठल सोमण या सुप्रसिद्ध तज्ञासमोर मी हा प्रश्न मांडला होता. या दोघांनीहि सूक्ष्म गणिते करून पाठविली. त्यांची उत्तरे पुढीलप्रमाणे आहेत.

---

१. लीळाचरित्र. भाग २ पा. ३१ वरील 'साळीवाहनु इद्ध निरूपण'; पा. ४६ वरील 'राजदर्शन स्वीकार' आणि पा. ४७ वरील 'तथा गमन' या लीळा पहा.

२. ली. च. भाग २ पा. ७ पहा. या पाठात नुसते "वैजाए राणीया" असे म्हटले आहे. वाहंदेशकर पाठात 'मग पुसिले : देऊळ कवण करीतसे गा : श्री जी : महादेवरायाची राणी वैजाइ' असा स्पष्ट उल्लेख आहे.

डॉ. ह. सी. राजंदेकर लिहितातः...' शके ११८९ भाद्रपद कृष्ण १ सोमवारी इ० घ० २० नंतर गुरु सिंह राशीत प्रवेश करितो. नंतर शके ११८९ मार्गशीर्ष कृ. १० सोमवारी तो सिंह राशीत ४-९°-४४′-४५″ असतो व तेव्हांच तो वक्री होतो. म्हणजे या दिवशी सिंह राशीच्या १०° व्या अंशात गुरु वक्री झाला. शके ११९० मध्ये चैत्र शुद्ध ८, गुरुवारी तो सिंह राशीत वक्री गतीने ४-०°-१६′-२५″ येतो आणि या दिवशी मार्गी होतो म्हणजे तो राश्यंतर न करिता सिंहराशीतच या दिवशी मार्गी झाला. शके ११९० आश्विन कृ. ९ सोमवारी इष्ट घ० २० नंतर तो कन्या राशीत प्रवेश करितो. याप्रमाणे गुरूचा सिंह राशीतील काळ सिंहस्थ-गणितानुसार येतो."

श्री. कृ. वि. सोमण लिहितातः..." तेव्हां त्याप्रमाणे गुरूचे गणित केले असता शके ११८९ साली भाद्रपद कृष्ण प्रतिपदा सोमवारी गुरु सिंहराशीत प्रवेश करितो. शके ११८९ मार्गशीर्ष कृष्ण १० सोमवारी तो सिंहेत वक्री होतो. शके ११९० चैत्र शुद्ध ८ गुरुवारी तो सिंहेतच मार्गी होतो व शके ११९० आश्विन कृष्ण ९ सोमवारी तो कन्या राशीत जातो तात्पर्य, शके ११८९ च्या भाद्रपद कृष्ण १ पासून शके ११९० च्या आश्विन कृष्ण ९ पर्यंत सिंहस्थ होते. ......वरील माहितीत मिति व वार यात कदाचित मेळ बसणार नाही. १-२ दिवसांची फार तर चूक पडेल. कारण, अहर्गणावरून प्रत्यक्ष वार जमत नसेल तर १ किंवा २ संख्या अहर्गणात कमीजास्त करून गणित करावे लागते"

---

१. आणि या गोष्टीची या ठिकाणी आवश्यकताहि आहे. वरील दोन्ही व्यक्तींनी नमूद केलेले काळ दि. ब. पिळ्ळे यांच्या जंत्रीबरोबर तपासून पाहिले तेव्हा त्यात एकेका दिवसाचा फरक आढळला. श्री. सोमणांच्या सूचनेप्रमाणे ते दुरुस्त करून घेतले म्हणजे पिळ्ळे जंत्रीशी त्यांचा मेळ बरोबर बसतो. उदा: शके ११८९ भाद्र. कृ. १ ला डॉ. राजंदेकर (व श्री. सोमण) यांच्या मते सोमवार येतो. पिळ्ळयांच्या जंत्रीत त्या दिवशी मंगळवार येतो. हे लक्षात आणून दिल्यावर डॉ. राजंदेकर यांनीहि लिहिले की 'ग्रहगणितात तिथ्यादिकांचे गणिताविषयी निश्चयात्मक सांगितले असून वाराबाबत एक उणा अगर अधिक करण्याची सवड ठेवलेली आहे......भाद्रपद कृ. १ ला मी केलेल्या गणितात सोमवार येतो त्यात १ मिळविला म्हणजे मंगळवार निश्चित होतो.'

वरील दोन्ही ज्योतिर्विदांचे निर्णय बरोबर जुळतात. श्री. आपटे नाइक, दप्तरी इत्यादिकांच्या निर्णयाशीहि ते जुळते आहेत. तेव्हां ते मान्य करायला हरकत नाही. अर्थात, त्यावरून श्रीचक्रधरस्वामी सिंहस्थाच्या प्रारंभी म्हणजे शके ११८९ भाद्रपद महिन्याच्या सुमारास पैठणला आले व त्यांनी नागांबिकेला प्रेम दिले असे ठरते. सांप्रदायिक म्हणून पुढे मांडण्यात येणारा शके ११८६ हा काळ चुकीचा ठरतो.

हा काळ पडताळून पाहण्यासाठी आणखीहि एक साधन आहे. त्यासाठी, सिंहस्थाच्या यात्रेनिमित्त पैठणाकडे येण्याला निघण्यापूर्वी मेहेकर येथील घटनाकडे लक्ष द्यावे लागते. पैठणला येण्यापूर्वी श्रीचक्रधरस्वामी मेहेकरला होते. तेथे असतांनाच गोकुळ अष्टमीचा सण आला होता. या गोकुळ अष्टमीनंतर लौकरच सोमवारी ( सोमवती ) आली. सोमवतीनिमित्त लोणारची यात्रा आटोपल्यावर लागलीच श्रीचक्रधरस्वामी बोणेबाईसह पैठणला येण्यासाठी निघाले. ( एकांक ६७, ७१ ). या तीन घटना महत्त्वाच्या आहेत. शके ११८९ च्या गोकुळ अष्टमीनंतर, म्हणजे श्रावण वद्य ८ नंतर सव्वा महिन्यानंतरच म्हणजे भाद्रपद वद्य ३० ला सोमवारी ( सोमवती ) येते. सोमवतीपर्व लोणार येथे करून मेहेकरला परत आल्यावर लागलीच सिंहस्थासाठी निघालेल्या यात्रेकरूबरोबर बोणेबाई व श्रीचक्रधरस्वामी निघाले. अर्थात, ते आश्विन महिन्याच्या आरंभी निघाले असावेत. पैठणला पोचायला साधारणपणे १० दिवसांचा अवधि धरला तरी त्यावरून श्रीचक्रधरस्वामी साधारणपणे आश्विनातच पैठणला पोचले असावे—आणि अर्थात, नागांबिकेच्या प्रेमदानाचा प्रसंगहि आश्विनातच घडून आला, असे मानायलाहि कांही हरकत दिसत नाही. सारांश, श्रीचक्रधरस्वामींच्या पूर्वार्ध काळाचा प्रारंभ शके ११८९ मधे आश्विन महिन्यापासून मानणे योग्य व साधार ठरते. काही सांप्रदायिक शकाप्रमाणे श्रीचक्रधरस्वामींनी कार्तिक महिन्यात नागांबिकेला प्रेमदान दिले. या 'कार्तिक' महिन्याच्या उल्लेखाला हा ऐतिहासिक दृष्ट्या ठरवलेला काळ बऱ्याच अंशी जुळतो. सांप्रदायिक मताप्रमाणे ही घटना ११८६ मधे न घडता ११८९ मधेच घडली असावी असे मानायला दुसरेहि एक कारण आहे. ते असे की ११८६ च्या गोकुळ अष्टमीनंतर म्हणजे श्रावण वद्य ८ नंतर जवळ जवळ

पुढील ५ महिन्यात सोमवारी अथवा सोमवती येत नाही. ती पौष वद्य ३० ला येते. पण एकांक-लीळावरून असे वाटते की गोकुळ अष्टमीनंतर लौकरच सोमवती आली असावी. हा योग ११८९ मधे ठीक जुळून येतो. ज्योतिःशास्त्राच्या दृष्टीने सिंहस्थाचाहि प्रारंभ ११८९ च्या भाद्रपदात झालेला असल्यामुळे शके ११८९ च्या आश्विन महिन्यात श्रीचक्रधर पैठणला पोचले व त्यानी नागाम्बिकेला प्रेमदान दिले हेच म्हणणे सयुक्तिक ठरते.

सिंहस्थाच्या घटनेवरून ठरवलेल्या या काळाला, लीळाचरित्रातील दुसरी एक घटना काही संशोधकांच्या मतानुसार विघातक होईल असे वाटते. तेव्हां तिचे याच ठिकाणी स्पष्टीकरण करणे अवश्य आहे. ही घटना अशी : सिंहस्थाच्या निमित्ताने पैठणला आलेले श्रीचक्रधरस्वामी काही महिन्यानंतर रितपुरला गेले, तेथून ते वेरुळला आले, व तदनंतर सिन्नरकडे गेले. ते सिन्नर येथे असतानाच माहींम्रा ठाण्याहून परत आलेल्या महादेव-रायाने तेथे त्यांची चौकशी केली; पण श्रीचक्रधरस्वामींनी त्याला दर्शन दिले नाही. (भाग २. पा. ४९ पहा.) या आख्यायिकेत "माहादेवो रावो ठाणेया कटकै गेला होता : तो सिनरा आला" या वाक्यावरून "ठाण्या-कडील मोहीम संपवून नाशिक सिन्नरकडे माहादेवराजा आला" असे अनुमान श्री. नेने यानी केले आहे. (भाग २ प्रस्ता. ३ पहा). त्यांना बहुधा असे सूचित करायचे असावे की, 'माहादेवरायाच्या या मोहिमेचा काळ लक्ष्यात घेतला तर श्रीचक्रधरस्वामींच्या दीक्षेचा व नागाम्बिकेच्या प्रेमदानाचा कोलते यांनी ठरवलेला काळ शके ११९० (भा. बो पा. ७५) हा चुकीचा ठरतो. कारण माहादेवरायाची ठाण्यावरील स्वारी शके ११८८ मध्ये झाली असल्यामुळे तत्पूर्वीचा सिंहस्थ शके ११९० मध्ये न येता, साम्प्रदायिक मतानुसार ११८६ मधेच आला असला पाहिजे. अतएव कोलते यांनी ठरवलेला काळ चुकीचा ठरतो.' श्री. नेने यांना हे सुचवायचे असो अथवा नसो, पण त्यांनी या आख्यायिकेच्या प्रारंभीच्या वाक्याचा जो अर्थ केला आहे त्यावरून अभ्यासकांची तशी समजूत होणे शक्य आहे.

यावर माझे असे उत्तर आहे की, श्री. नेने यांनी "कटकै गेला होता" याचा "मोहिमेवर" गेला होता, असा जो अर्थ केलेला आहे तो

बरोबर नाही. ‘ कटकै ’ याचा मोहीम, स्वारी, असा एक अर्थ होतो, हे मान्य आहे. पण तो शब्द त्या अर्थाने येथे वापरलेला नाही. ‘ कटकै ’ या शब्दाचा दुसरा अर्थ ‘ अनेकांनी मिळून केलेले परिभ्रमण; फिरती, दौरा ’ असाहि होतो आणि तोच येथे लागू आहे. मी दाखवलेला अर्थ तपासून पाहण्यासाठी अभ्यासकांनी पुढील गोष्टीकडे लक्ष द्यावे:

( १ ) श्री गोविंदप्रभुचरित्रामधे ( ली. २२४ ) ‘ विन्हाहाचे ’ वर्णन केल्यावर पुढील उल्लेख आहे. ‘....ऐसा वऱ्हाडीकेसि आवघा गाऊ जेवीला : बलोरे जेववीले : साचोकारे तुपे पऱ्हीते वाहावीले : मग वऱ्हाडीचे अण भक्तिजने जेवीली होती : ते नासावया कारणे अवचीती **कटकै** केली ” याचा अर्थ इतकाच की लग्नप्रसंगी खाल्लेले अन्न जिरवण्यासाठी त्यांनी ‘ परिभ्रमण ’ केले...अनेक गावांना जाऊन येण्यासाठी दौरा काढला.

( २ ) त्याच पुस्तकातील ‘ अवचिती कटकै करणे ’ ( ली. २२५ ) ही त्याच्याच पुढची आख्यायिका आहे. तीत देखील श्रीगोविंदप्रभूंनी ‘ कटकै मांडल्याचा ’ म्हणजे परिभ्रमणाची तयारी केल्याचा उल्लेख आहे.

( ३ ) ‘ कटकै ’ या नांवाचे एक छोटेसे महानुभावीय काव्य आहे. त्या काव्यातहि श्री. गोविंदप्रभूंनी केलेल्या ‘ कटकैचा ’ हाच प्रसंग वर्णिलेला आहे. ‘ जाली आठै न्हाणे : मंगल उपचारी । मग **कटकै** स्वीकरी स्वामी माझा ॥ ४ ॥ डोळो डोळो भणौनि : चाले गजगती । तवं दाडी भक्ती : आणिली ’ ॥ ५ ॥ तसेच ‘ परिवारासहित आला श्री अनंत । मग राजमठांत : अवस्थान ॥ ९३ ॥ **कटकै** करूनि : आले चक्रपाणी । नगर महाजनी : शृंगारिले ॥ ९४ ॥ ’ ( ‘ उदय ’ साप्ताहिक, अमरावती. ता. ५-४-१९३५ ) या चरणात ‘ कटकै ’ शब्द परमार्थाने ससैन्य ‘ स्वारी ’ या अर्थाने वापरलेला नसून, केवळ ‘ परिभ्रमण ’ ‘ फिरती ’ याच अर्थाने वापरलेला आहे.

माहादेवरायाच्या उपरोक्त आख्यायिकेतहि याच अर्थाने हा शब्द वापरलेला आहे. शके ११८८ मधे माहादेवरायाने ठाण्यावर स्वारी केली असेल; नाही असे नाही. पण त्यानंतर एक दोन वर्षांनी केवळ देखरेखीसाठी म्हणून तो पुन्हा ठाण्याकडे गेला असावा व त्याचाच हा उल्लेख असावा, असे मला वाटते. वरील आख्यायिकेत स्वारीचा उल्लेख नाही असे मानण्याचे दुसरे

एक कारण आहे. पूर्वार्धाच्या 'घ' प्रतीत 'राजा प्रश्नीत पुरुला स्वयें नाम-गोपन' या आख्यायिकेत 'मग एळापुरुनि तैसाचि माहादेओराओ ठाणेया माहींयासि कटकैएसि गेला होता. ते कटकै सारूनि मग श्रीनगरासि आला' असे म्हटले आहे. च प्रतीतहि असाच उल्लेख आहे.

यावरून एवढे स्पष्ट होते की, आपल्या परिवारासहित श्रीचक्रधर-स्वामींच्या दर्शनासाठी गेलेला महादेवराव तसाच पुढे ठाण्याकडे गेला. श्रीचक्रधराच्या दर्शनासाठी जातांना त्याने आपला प्रचंड सेनासमुदाय बरोबर घेतला होता असे मानणे चुकीचे होईल. केवळ निवडक सेवकासहितच तो तेथे गेला असावा व तेथे श्रीचक्रधरस्वामींचे दर्शन न झाल्यामुळे तो तसाच पुढे 'फिरतीवर' निघाला असावा, हेच मानणे सयुक्तिक ठरते. येथे त्याच अर्थाने 'कटकै' शब्द वापरलेला आहे.

वेरुळ येथून महादेवराजा पुढे 'कटकै' साठी गेला म्हणजे कशा-साठी गेला हे निश्चित करायला आणखी एक महत्त्वाचा पुरावा आहे. 'रत्नमालास्तोत्रात'—

एळापुराद्गतो राजा **प्रजासंस्थामिषेण** वै
स्वामिनो दर्शनोत्कंठ्या यथा धनगतः पुमान ॥
तथा राजा गतो दिव्यनगरं श्रीनिकेतनं
ततश्चक्रधरे श्रुत्वा स्वपुरे पौर्वेजे मंठ ॥

या श्लोकात तर म्हटले आहे की, आपल्या प्रजेची हालहवाल पाहण्याच्या मिषाने, पण वस्तुतः चक्रधरस्वामींच्या दर्शनाच्या उत्कंठेने तो एळापुराहून पुढे गेला, व दिव्य श्रीनिकेतन नगराला गेल्यावर, आपल्या पूर्वजाच्या मठात श्री चक्रधरस्वामी आहेत असे ऐकल्यामुळे त्याने आपला पाल्हा नावाचा नोकर त्याच्या चौकशीसाठी पाठवला. यावरून महादेवराजा ठाण्याकडे गेला होता तो केवळ प्रजेची हालहवाल पाहण्याच्या निमित्ताने

१. 'माहादेओरावो **तैसाचि** येळापुरावरौनि ठाणेया माहींया गेला होता : तो येत येता श्रीनगरावरौनि आला." (च प्रत. १९१).

परिभ्रमणासाठी, दौऱ्यासाठी गेला होता असेच म्हणावे लागते. आणि ज्याअर्थी दौऱ्याला म्हणून तो ठाण्याला जातो त्याअर्थी महादेवरायाची कोकणावरील स्वारी संपून तो प्रांत त्याच्या आधिपत्याखाली यापूर्वीच आला होता हे उघड दिसते. तेव्हां ऐतिहासिक दृष्ट्या मी ठरवलेल्या सिंहस्थाच्या काळाशी लीळाचरित्रांतर्गत उपरोक्त आख्यायिकेचा विरोध येऊ शकत नाही हे आता उघड होईल.

---

१. लीळाचरित्रातील ऐतिहासिक प्रसंगाच्या वाचनाची श्री. नेने याजकडून आणखीहि एक चूक झालेली आहे. ती लक्षात आणून देणे अवश्य वाटते. लीळाचरित्र भाग ३ रा पूर्वार्ध खंड २ मधे ९० व्या पानावर "भट इंद्रभट कटका पाठवणे" या लीळेत 'कटकी महादेवरायाचे श्राध' असा उल्लेख आहे. त्यावरून "महादेवराव जाधव याची कारकीर्द संपून गेलेली आहे हे उघड आहे" असा तर्क श्री. नेने यांनी केला आहे (भा. ३ प्रस्तावना पहा.). हा तर्क करतांना पुढे आलेल्या 'सर्वांता नागनार्था वस्ति' (भा. ४ पा. ४६) या आख्यायिकेतील राज्यांतराचा व रामदेवराव गादीवर बसल्याचा वृत्तांत त्यांनी डोळ्यासमोर आणला असता तर बरे झाले असते. कारण, राज्यांतरापूर्वी फार थोडे दिवस अगोदरपर्यंत महादेवराय गादीवर होता हे इतिहासावरून स्पष्ट दिसते. दुसरे असे की, वरील आख्यायिकेतील प्रसंग चक्रधर करंजखेडला असतांना घडून आला. करंजखेडला काही दिवस राहून नंतर श्रीचक्रधरस्वामी हिवरळी येथे गेले. तेथे त्यांनी दिवाळीचा सण साजरा केला. 'हिवरळी येथे चक्रधर शके ११९० मधे कार्तिक शुद्ध प्रतिपदेला होते' असे खुद्द श्री. नेने यांनीच प्रस्तावनेत म्हटले आहे. तेव्हां श्री. नेने यांच्या मते ११९० कार्तिकपूर्वीच महादेवराय दिवंगत होऊन त्याचे श्राद्धहि झाले होते, असे ठरते. पण इतिहासावरून तर महादेवराय ११९२ मधेहि जिवंत होता असे दिसते. कारण, एक तर राज्यांतर होऊन रामदेवराव गादीवर बसला तो शके ११९३ मधे. तत्पूर्वी फार थोडे दिवस अगोदर महादेवराय मृत्यु पावला असावा. दुसरे असे की, महादेवरायाचा सर्वात शेवटचा शिलालेख कल्लुकेरी येथील असून तो श. ११४३ (चालू) म्हणजे गतशक ११४२ प्रमोदूत (प्रमोद) संवत्सर, ज्येष्ठ महिन्यातील आहे. अर्थात, ११४२ ज्येष्ठपर्यंत महादेवराय हयात असून तो गादीवर होता. तेव्हां श्री. नेने यांचा वरील तर्क चुकीचा ठरतो! तथापि ही चूक "महादेवरायाचे श्राद्ध" या शब्द-प्रयोगावरून झालेली आहे. वस्तुतः तो उल्लेख माहादेवरायाच्या श्राद्धाचा नसून महादेवरायाने केलेल्या आपल्या पितरांच्या श्राद्धाचा आहे. आम्नाय पाठाच्या काही पोथ्यात 'महादेवरायाते श्राद्ध' असाहि पाठ आहे. उदा:-मला मिळालेल्या

(पुढे

## नागदेवाचा अनुसरणशक

तेव्हां शके ११८९ आश्विन महिन्यात चक्रधरस्वामींच्या पूर्वार्धकाळाला प्रारंभ झाला हे निश्चित होय. यापुढचा टप्पा म्हणजे नागदेवाचार्यांचे अनुसरण. या अनुसरणापासूनच चक्रधराच्या चरित्राचा पूर्वार्ध संपून उत्तरार्ध सुरू होतो. तेव्हां हा काळ निश्चित करणे महत्त्वाचे होय. नागदेवांच्या अनुसरणाचा काळ ठरवण्यासाठी लीळाचरित्रात एक उत्तम ऐतिहासिक पुरावा आहे. पूर्वार्ध काळ संपण्यापूर्वी अथवा नागदेवांच्या अनुसरणापूर्वी काही दिवस अगोदर चक्रधरस्वामी 'सविता' या गांवी नागनाथाच्या देवळात उतरले होते. ते तेथे असतांनाच देवगिरी येथे आमणदेवाचे डोळे काढून त्याला सिंहासनावरून पदभ्रष्ट करून रामदेवराजा गादीवर बसला. हा उल्लेख लीळाचरित्रात स्पष्टपणे नमूद आहे. तो सर्व पाठांच्या सर्व पोथ्यातून आढळतो. तेव्हां कालनिर्णयासाठी तो ग्राह्य मानला पाहिजे.

(आमणदेवाचे डोळे काढून) रामदेवराव गादीवर बसल्याची घटना शके ११९३ मधे घडून आली असे मानण्यात येते. स्थूल मानाने ते बरोबर आहे. पैठणच्या ताम्रपटावरून ही गोष्ट स्पष्ट होते. ही घटना ११९३ च्या कोणत्या महिन्यात घडून आली हे मात्र अगदी निश्चितपणे सांगता येत नाही. तथापि नरेगल येथील शिलालेखावरून या प्रश्नावर थोडाफार प्रकाश पडू शकतो. प्रस्तुत शिलालेखावरून शके ११९६ (चालू) श्रीमुख संवत्सर वैशाख महिन्यात रामदेवरायाचे तिसरे राज्याभिषेक वर्ष चालू होते असे दिसते. अर्थात ११९४ चालू अथवा ११९३ गतशकाच्या वैशाख महिन्यात

---

चालू)

पूर्वार्ध चरित्राच्या सर्वात जुन्या पोथीत (ड प्रत) 'मग भट आणि इंद्रभट कटकासि गेले : महादेओरायाते श्राद्ध होत होते :' (लीळा २३५) असा उल्लेख आहे. तळेगावकर पाठात (ट प्रत. लीळा ५५०) व वाईदेशकर पाठातहि 'माहादेवरायाते' असाच पाठ आहे. कै. राजवाडे यांना मिळालेल्या लीळासवादात (ढ प्रत) तोच पाठ आहे. (भा. इ. सं. मं अहवाल शके १८३५ पा. ६१ ६२) या पाठाचा अर्थ राजवाडे यांनीहि 'ते... महादेवरायाच्या येथे श्राद्धाला गेले.' (पा. ६४) असाच केला आहे.

रामदेवाच्या राज्याभिषेकाचे पहिले वर्ष चालू होते असे ठरते. तेव्हां ११९३ वैशाखपूर्वीच त्याला राज्याभिषेक झाला असला पाहिजे.

वरील उल्लेखाच्या अनुरोधाने रामदेवाच्या राज्यारोहणाचा काळ ठरवण्यासाठी लीळाचरित्रांतर्गत काही घटना लक्षात घेण्यासारख्या आहेत. 'रामदेवराव राज्यी बैसला' त्यावेळी स्वामी 'सेवता' गावीं होते. तदनंतर ते जोगेश्वरी येथे गेले. येथे काहींच्या मते १ महिनाभर तर काहींच्या मते २० दिवस त्यांचा मुक्काम झाला. तेथून ते खडकुली येथे गेले. खडकुलीला असतांनाच नागदेवांचे अनुसरण झाले. तदनंतर तेथेच त्यांनी शिमग्याचा सण व दमनक पर्व साजरे केले. दमनक पर्व चैत्र शुद्ध पौर्णिमेला येते. तेव्हां ११९३ च्या चैत्र महिन्यात ते साजरे झाले. तत्पूर्वी त्यांचा शिमगा तेथे झाला म्हणजे ११९२ फाल्गुन वद्य. १ ला तो सण झाला. याच्या पूर्वीच नागदेवाचा अनुसरण-विधि झाला होता. तत्पूर्वी दहा पंधरा दिवस अगोदर चक्रधरस्वामी खडकुलीला आले होते असे धरून चालले तर (कारण खड-कुलीला आल्यावर थोड्याच दिवसात नागदेवांचा अनुसरण-विधि झाला) माघ महिन्यात ते तेथे आले असे ठरते. त्याहिपूर्वी २० दिवस जोगेश्वरीला ते होते. त्याच्यापूर्वी १ दिवस सेवत्याला होते. या गोष्टी लक्षात घेतल्या म्हणजे स्थूल मानाने ११९२ च्या पौष महिन्यात रामदेवराव गादीवर बसला असावा असे ठरते व आधीच दाखविल्याप्रमाणे ११९३ चैत्र शु. १५ च्या पूर्वी काही दिवस अगोदर म्हणजे ११९२ च्या फाल्गुनात शुक्ल पक्षात नागदेवाचार्यांचे अनुसरण घडले, असे मानायला हरकत राहत नाही. अर्थात ११८९ आश्विन पासून तो ११९२ फाल्गुनपर्यंत चक्रधरांचा पूर्वार्धकाळ ठरतो.

**चक्रधरांचा प्रयाणशक.**

चक्रधरस्वामींच्या आयुष्यातील शेवटचा टप्पा म्हणजे त्यांचे 'उत्तरापंथे प्रयाण.' हा प्रयाणशक निश्चित करण्यासाठी स्वतंत्र ऐतिहासिक घटना लीळाचरित्रात नाही. पण एक ज्योतिर्विषयक उल्लेख आढळतो. रामदेवाच्या माणसांनी चक्रधरांचे शिर धडावेगळे केल्यानंतर त्याचा पुन्हा संयोग घडून येऊन चक्रधरस्वामी तात्काळ जिवंत झाले आणि नंतर ते प्रतिष्ठानला गेले. तेथे सारंगपंडिताची व त्यांची भेट झाली. या भेटीची

आख्यायिका देतांना भेटीच्या दिवशी 'तिए दीसी माहीए अवसेची सोमवारी' म्हणजे माघ वद्य ३० असून त्याच दिवशी सोमवती होती असा उल्लेख घ व न प्रतीत केलेला आहे. इतर प्रतीमध्ये सारंगपंडिताची भेट 'सूर्यपर्वा'च्या दिवशी झाली असे म्हटले आहे. (नेने. उत्त. ३७१) एका प्रतीत ही लीळा 'एक म्हणति संनिधानपर' असा उल्लेख आढळतो. पण बहुतेक सर्व पोथ्यांनी ही 'बीजे केल्यावर' ची म्हणून नमूद केलेली असल्यामुळे या एकाद्या मतभेदाकडे लक्ष देण्याचे कारण नाही. तळेगावकर प्रतीने तर 'तद्दिनी सोमवारी आन सूर्यपर्व' असे म्हटले आहे. म्हणजे त्यादिवशी सोमवती असून सूर्यपर्वहि होते. असे दिसते.

आता प्रश्न असा की 'सूर्यपर्व' म्हणजे काय? ज्योतिर्विद्यालंकार श्री. राजंदेकर यांनी याचा खुलासा पुढीलप्रमाणे केलेला आहे. "पर्व हा शब्द पंचांगाच्या शास्त्रार्थात विशिष्ट योग अथवा पुण्यकाळ या अर्थाने उपयोजितात. अष्टमी, चतुर्दशी, पूर्णिमा, अमावस्या या दिवशी विशिष्ट योग आले असता जो पुण्यकाल असतो तो पर्व. अमावास्या व पूर्णिमा ही पर्वकाल आहेत. 'सूर्यपर्व' याचा अर्थ सूर्याचे संबंधात येणारा पर्वकाल (सूर्यग्रहण; अमावस्या); व 'सोमपर्व' म्हणजे चंद्राच्या संबंधात येणारा पर्वकाल (चंद्रग्रहण; पूर्णिमा). भारतीय ज्योतिःशास्त्रात पर्व हा शब्द पूर्णिमा व अमावास्या [illegible] अर्थाचा दिला आहे. आणखी सूर्यचंद्राच्या योगाने येणारे विशिष्ट पुण्यका[illegible] या अर्थाने हा शब्दप्रयोग केला जाण्याचा संभव आहे. अशा वेळी सूर्यपर्व

१. **पुनरपि सारंगपंडिता भेटि** : घाटांचेया माथांहुनि प्रतले : मग प्रतिस्थानासि बीजे केले : तिए दीसीं माहीए अवसेची सोमवारी : लोणारखांडीहुनी प्रागखांडी निघाले. (न प्रत. लीळा ५५६. पा. २६५. ध प्रतीमधे शब्दशः हाच उल्लेख आहे. लीळा. ५५३ पा. २७५

२. '**सूर्यपर्वी सारंगपंडिता दुर्गेसी भेटि** : मग गोसावी बीजे केले : मग प्रतिष्ठानासि आले. सूर्यपर्वी सारंगपंडित नागदेउळीया स्नाना जात होते : तव गोसावी छायागोपाळापूर्वे भेटले : जी जी गोसावी केव्हळी बीजे केले : गोसावी म्हणीतले : हें ऐसेचि आतां आले : जी जी आवारा जावे तवं मी पर्व सारून येइन.' (प प्रत, शेवटून तिसरी लीळा.) '**सूर्यपर्वी सारंगपंडिता पौळीसि भेटि** : बीजे केलेयावरि...' (थ प्रत). '**सूर्योपर्वी सारंगपंडिता दुर्गेसी भेटी**' (फ प्रत).

म्हणजे कपिलाषष्ठी, व्यतिपात अथवा सूर्यसंक्रांति (कर्क, मकर) असा होईल."

या खुलाशावरून दिसून येईल की प्रामुख्याने 'सूर्यपर्व' हा शब्द सूर्यग्रहण व अमावस्या या अर्थाने वापरला जातो. भारतीय ज्योतिःशास्त्रात तर तो अमावस्या याच अर्थाचा दिला आहे. तेव्हां तोच अमावस्या हा अर्थ ग्राह्य मानणे योग्य होईल. महानुभाव महंतहि 'अमावस्या' असाच अर्थ करतात. दुसरे असे की, स्वामींच्या प्रयाणशकासंबंधी मतमतांतरे असली तरी ती घटना माघ महिन्यात झाली, याविषयी एकवाक्यता आहे. तेव्हां प्रस्तुत 'सूर्यपर्व' म्हणजे माघ महिन्यातील अमावास्या हे सांगायला नकोच. ध न या प्रतींतील हकीकतीच्या आधारे ही अमावास्या म्हणजे सोमवारी आलेली; अर्थात हा सोमव्रतीचा सूर्यपर्वकाळ होता असे ठरते. सारांश, माघ महिन्यातील सोमवती अमावस्येला चक्रधरस्वामी पुन्हा प्रतिष्ठानाला आले. तेव्हां त्यांचा प्रयाण काळ निश्चित ठरविण्यासाठी माघ महिन्यात अमावास्येला सोमवार किंवा सोमवतीपर्व कोणत्या शकात येते हे पाहिले पाहिजे. दि. ब. पिल्ले यांच्या जंत्रीवरून शके ११९६ तील माघ महिन्याच्या अमावास्येला बरोबर सोमवती आहे; आणि शके ११९९ माघ वद्य ३० लाहि सोमवती आहे. यापैकी चक्रधराचा निश्चित प्रयाण-शक कोणता? शके ११९६ की ११९९?

---

१. 'मग श्राद्ध तिथी पर्वणी : तिथी ते एकादशी : पर्वणी म्हणजे सोमपर्वीची पौर्णिमा : आन सूर्यपर्वीची अमावस्या' (आचारबंद ५६).

२. खिद्रापूर येथील शिलालेखात (हेमाद्रिचरित्र. पाध्ये. परिशिष्ट पा. २७) 'स्वस्ति श्री शकवर्षे ११३६ श्रीमुखसंवत्सरे चैत्रे सूर्यपर्वणि सोमदिने श्री मदेवगिराधिष्ठित—' असा सूर्यपर्वाचा व सोमवाराचा एकत्रित उल्लेख आहे. यावरून सूर्यपर्व म्हणजे सोमवारी येणारी अमावस्या असाच अर्थ दिसतो.

३. शके ११९४ च्या माघ वद्य ३० ला रविवार आहे. त्याच दिवशी फाल्गुन शु. प्रतिपदाहि आहे. ११९५ माघ वद्य ३० ला गुरुवार येतो. ११९६ च्या माघ वद्य ३० ला सोमवार आहे. या सोमवारी उदयकाळापासून तो रात्री सुमारे ९ वाजपर्यंत अमावस्या तिथी आहे. ११९७ च्या माघ वद्य ३० ला रविवार

हे निश्चित करायला आणखी एक साधन आहे. नागांबिकेला प्रेमदान दिल्यापासून म्हणजे पूर्वार्धकाळाच्या प्रारंभापासून तो प्रयाणापर्यंत चक्रधर-स्वामींनी एकूण आठ दिवाळ्या साजऱ्या केल्या, हा उल्लेख अनेक ठिकाणी आढळतो. एकूण दिवाळ्या आठच झाल्या, याविषयी, ज्यांनी ज्यांनी त्यासंबंधी उल्लेख केला आहे त्या सर्वांमधे एकवाक्यता आहे. ही गोष्ट लक्षात घेतली तर चक्रधरांची पहिली दिवाळी शके ११८९ च्या कार्तिकात पैठण येथे झाली. दुसरी दिवाळी ११९० मधे; तिसरी ११९१ मधे; चौथी ११९२ मधे; पाचवी ११९३ मधे; सहावी ११९४ मधे; सातवी ११९५ व आठवी ११९६ मधे. तेव्हां ११९६ च्या कार्तिक महिन्यात झालेली दिवाळी ही शेवटची दिवाळी होय. अर्थात्, ११९६ च्या माघ महिन्यात त्यांनी प्रयाण केले व तदनंतर ११९६ च्या माघ महिन्यात अमावस्येला सोमवतीच्या पर्व-काळाच्या दिवशी त्यांनी सारंगपंडिताला पुनर्दर्शन दिले ही गोष्ट निश्चित ठरते. तेव्हां शके ११८९ आश्विनमधे चक्रधरांचा पूर्वार्धकाळ सुरू झाला व शके ११९६ माघ महिन्यात त्यांनी प्रयाण केले असे ऐतिहासिक दृष्ट्या निश्चित मानायला हरकत नाही.

चालू )

आहे. रविवारी दुपारीच सुमारे ३ वाजता अमावस्या संपून पुढील तिथी सुरू होते. ११९८ च्या माघ वद्य ३० ला गुरुवार येतो. ११९९ च्या माघ वद्य ३० काहि बरोबर सोमवार येतो.

# परिशिष्ट १

[ श्री. नेने यांच्या मुद्रित लीळाचरित्र-उत्तरार्ध प्रतीत न आलेल्या, पण काही पोथ्यात आढळणाऱ्या 'शेवटच्या प्रकरणा' विषयीच्या आख्यायिका पुढे देत आहे. जिज्ञासू अभ्यासकांना त्यांचा चांगला उपयोग होईल. ]

**मुधा आदिती पूजा स्वीकारू** ॥ मग गोसावी गंगा उतरौनि पैठणा बीजे केले : तव तेही मुधादित्यी सभा केली : हेमाडिपंडित मुख्य करूनि : सारंगपंडित : मायिता हरी : प्रज्ञासागर हे मुख्य करूनि आघवा गावीचा लोकु : आघवा लोकु : महाजन : विद्वांस : पुराणिक : संन्यासी : ब्रह्मचारी : क्षेपणीक नाथपंथिये ऐसे आघवे मिनले : गोसावियाते मुधादित्यी आणिले : गोसावियासि मुधादित्याचा चौकी आसन जाले : तिही आवघी म्हणितले : गोसावी काइ : तथा तुम्ही काइ : सर्वज्ञे म्हणीतले : हे भीक्षु महात्मे : ना सांगा का ना : तुम्ही एक एक प्रधान : अवघे मीनले असा : वीद्वांस ब्रह्मचारी : संन्यासी : पयोव्रती : शास्त्र सीधांती : पुराणिक : आणि सारंगपंडिताची वास पाहिली : आणि इउती मान केली : तथा घातली : तुम्ही महाजन अष्टदसा प्रजा : क्षेपणीक नाथपंथी ऐसे आवघे मीनले असा : जाणिवा आंब न पिया : तरि हे काइ होये ऐसे विचारा पां : हे कवण काइ ऐसे : ना याचां ठाइ स्त्रीयाचि वेधती : ऐसे आथि गा : हे स्त्रीयांचा ठाइ ऐसेनि ऐसे करिती : ऐसे आति गा : आवघा भणितले : हो आति : इतुकेनि सभेसि एकटाळी पीटली : मग एकमेकां आळोंचू लागले : तथा आळोंचू पाळंचू करू लागले : मग मायिता हरी प्रज्ञासागर हे दोन्ही उठीले : तुम्ही आवघे आळंचू ओखटा करीत असा : आळोंचा आतुनि उठिले : या राष्ट्रासि ओखटे असे हो : चांडाळ हो : भणौनि निगाले : भरली भादली घरे : वस्तभाओ संपति सांडिली : सोधु : मायितेया हरीची लवेलागणीची

तितुलीही निगाली : देशु मांडिला : घरा गेले : मायितेन हरी नायके माळवघ आवारू सांडुनि तेलंगदेस निगाले : आसूची बाखारी कढीवा बांधली : हाती चिरा : एकी हाती स्त्री : बैल : गाडी : ऐसे निगाले : तव उपरीएवरुनि तेणे भणितले : घेया घेया याची म्हेळी : आमचेया सभया न मिळे : घाला घाला माझेया महाराष्ट्राबाहेरी : मायितेन हरीन भणितले : म्हेळी घे तुम्ही आणि तुझेया बापाची : तुझेया महाराचा महाराष्ट्र-होउनि मीचि जातु असे : सर्वज्ञे भणीतले : तुम्ही एककी आगमीके : एकक प्रधान बैसले असा : एणे तुमचे काइ गा केले : ऐसे बीचारा पां : ना आम्ही विचारिले : हो कां गा : जे वीचारीले ते करा : मग अगति आतुलीए देउळीए नेले : एक म्हणति काउसेनेचेया देउळाआतु : तेथ पुजा स्वीकरीली : नाकाची : एक म्हणति कानांसहित ॥ ५५० ॥

**दांडिए अरूहण** ॥ तव रायाची दांडी आली : मग गोसावी दांडिवरि बैसले : सरीसे भटोबास निगाले : वीळिचेया पहारा एका दांडी खोंकरासि घेउनि गेले : तेथ वसति जाली : गावीचा लोकी कणीक : तांदुळ : तुप : ऐसे आणीले : मग भटोबासी रंधन केले : गोसावियातें आरोगणा दीधली : मग पहुडु ॥ एकी वासना : गोसावियासि आरोगणा नाही जाली : उदीयाचि केली होती तेंचि आरोगणा : मग गोसावी बीजे केले[२] ॥ ५५१ ॥

राजनीती बिजे करणे ॥ मग उदीयांचि दांडिएवरि आसन जाले : दांडीयेवरि झळंबू घातला : बाहीरवाहीरी दांडी भांगसिए नेली : राया पूढा सांगावेया गेले : राये बोलावु पाठवीले : भटी दांडीएचा कोंभु धरीला असे :

---

१ ही आख्यायिका द, घ व न प्रतीत सारखीच आलेली आहे. भ आणि म प्रतीत आख्यायिका अशीच आहे; पण शब्द सारखेच आहेत असे नाही. ' वृद्धासंगमीं अवस्थान ' असा आरंभ करून"...तत्समै तेचि पाइक हेमाडि पंडित आणिकी पुर्णेमा दिसीं पाठवाल : तेही म्हणीतले : जी प्रधानि बोलावु पाठवीले : तरि आले पाहिजे : गोसावी प्रतिस्थानासि बीजे केले : मुधादित्याच्या देउळी आसन आले : प्रधाने नीरोपु दीधला : तेथ सभा करावी : केली " हा मजकूर घातला आहे. नंतरचा सभेचा वृत्तांत सारखाच आहे.

२ द. घ. न. या तिन्ही प्रतीत ही आख्यायिका सारखीच आहे.

गोसावियाचिए श्रीचरणीचा अंगुठा देखिला : झळंबा बाहिरा उघडा घातला : मग भटोबासी म्हणीतले : जी हे प्रवृत्ति भंगिजो जी : याते राओ बोलावील तरि प्रवृत्ति भंगैल गा : मग दांडी कीर्तिखांबापासी नेली : तेथ राओ आला : तव राये श्रीचरणीचा अंगुठा देखिला : मग म्हणीतले : कैसा जोगिया बरवा : तव भटी भणितले : जी प्रवृत्ति भंगिजो जी : बोलिजो जी : तव एके चांडाळे भणितले : आरे हाण हाण याते : परता लोटा : तंव भटाते कांबी हाणीतले : इतुकेनि भट नीगो बैसले : वानरेया वानरेया : नावेक राहा गा : नावेक राहा : मा आश्चर्य एक देखाल : आणि पूनःसंबंध देइजैल : एकी वासना : नावेक राहा : मग तुमचे एथचि चारितार्थ कीजैल : ना जी हे मज पाहावे ना : देखवे ना : मग भटोबास निगाले : मग राये म्हणितले : दांडी घेउनि जा : ओलटे करा : मग दांडी नेली[1] ॥ ५५२ ॥

**हा होए हा नव्हे म्हणणे** ॥ मग दांडी घाटाखालि पाळी तेथे उतरीली तेथ दांडीए खालि उतरले : शस्त्रधर उभे राहिले : अमरा : गांगा : मैळा एकी वासना : अमरा : गांगा : मैळा : हा होए : हा नव्हे : हा अमरा नव्हे : हा गांगा नव्हे : हा मैळा होए : मग मैळेनि खर्ग प्रजिले : हाक देउनि उभा राहिला : मग आघवा जन प्रतला : तव तेथ नाथपंथीये जोगी बैसले होते : तया तळेयाचिये पाळी बैसले होते : तेही देखिले : श्रीकमळ एकीकडुनि चालीले : श्रीमूर्ति एकीकडुनि चालीली : आणि दोन्ही जडली : मिळाली : आणि उठूनि आसन जाले : मग तेणेचि घाटे बीजे केले : आणि तिही जोगी भणितले : सीधु रे सीधु : भणौनि बोबाइले : सींगीनादु दीला : एक म्हणति : तया तळयाचिए पाळी तया जोगियांचिया कोंपटिया होतियां[2] ॥ ५५३ ॥

---

१ द. ध. न. या तिन्ही प्रतींत ही आख्यायिका सारखीच आहे. फक्त ध प्रतीत 'ना जी हे मज पाहावे ना.........राये' हे वाक्य नाही. ते लिहितांना चुकून गळाले असावे. भ. म. प्रतीत निराळया शब्दात पण वृत्तांत हाच आहे.

२ द. ध. न प्रतीत आख्यायिका याच शब्दात आहे. ध प्रतीत 'हाक देऊनि उभा राहिला' यापुढील 'खर्ग घातले : श्रीकमळ एरीकडे पडिले : श्रीमूर्ति एरीकडे पडिली' हे वाक्य गाळले आहे. इतर सर्व मजकूर जसाचा तसा आहे. भ. म. प्रतीत निराळ्या शब्दात हाच वृत्तांत सविस्तर आलेला आहे.

**अदृष्ट भये उठवीले** ॥ गोसावी बीजे केले : तवं नगरामध्ये अरंधे पडीले : अंधकारू पडीला : गाइ चार वर्जिले : लेकरूवी स्थने वरजीली : पाखरूइ सारे वर्जिले : नगरामध्ये अरंधे पडीले : वीवसीया उठलीया : घूया बोबाती : भालुवा भुकती : धेनु हांबरडा हाणति : रावो भयाचकीतु जाला : ऐसा सातक्षीस नगरामध्ये अंदो वर्तला : एक म्हणति : दीस तीनि : राये भणितले : आम्ही थोर ओखटे केले : ईश्वर पात्री क्रिया वीसवली[१] ॥ ५५४ ॥

---

१ सर्व प्रतीत हा वृत्तांत सारखाच आहे, फक्त 'धं' प्रतीत 'दीस तीनि' या ऐवजी 'दीस तीस' असे आहे.

# सामान्य सूची

———

# स्थान सूची

---

# शुद्धिपत्र

पा. २६ ओ. २३ 'पंचकृष्णातील पाचव्या नावाचा उल्लेख देखील चक्रधरस्वामींच्या मुखीचाच आहे' असे वाक्य वाचावे.

पा. ४१ ओ. २५ 'शक्तिस्वीकार करतांना' हे शब्द गाळावे.

पा. २१५ ओ. २४ 'धोष्टर म्हणजे जाड' या ऐवजी 'सपूर म्हणजे पातळ' असे वाचावे.

# शुद्धिपत्र

| पा. | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ६ | ९ | पुनरावतार | पुनरवतार |
| २२ | १५ | दिसत | दिसते |
| २५ | १ | माथावर | माथ्यावर |
| ३१ | ५ | वापरत | वावरत |
| ३२ | ४ | अनुसरली | अनुसरले |
| ३३ | २६ | सहस्त्र | सहस्र |
| ३८ | २९ | ग्हटल्याबद्दल | म्हटल्याबद्दल |
| ३९ | १ | पीस | पीसे |
| ४८ | २७ | पातळ | पाळत |
| ५४ | १८ | पाउला | पाऊल |
| ७२ | ४ | भा. २ | भा. २ पा. ४९–५१ |
| १०८ | २६ | होतसे | होत असे |
| १२७ | २१ | रावेर | राएर |
| १४६ | ६ | कचा ? | कैचा ? |
| १४९ | २१ | तीर्थवारू | तीथवारू |
| १५५ | ७ | स्वामींच्या | स्वामींचे |
| २५२ | १३ | सारंगपाणीभट | सारंगपंडित |
| २५० | १० | मातंगाच्या | मातंगाचा |
| २८१ | १९ | शकसं वत्सरांच्या | शकसंवत्सरांच्या |

———